माननीय डॉ. चिं. द्वा. देशमुख



यांच्या हस्ते या चरित्र-ग्रंथाचा प्रकाशन समारंभ
मंगळवार ता. २५-७-६७ रोजी पार पडला.

卐

## प्रस्तावना

**माझे** जुने मित्र श्री. पु. बा. कुळकर्णी यांनीं, मुंबई येथील 'निर्णयसागर' प्रेसच्या शतसांवत्सरिक महोत्सवाप्रीत्यर्थ लिहिलेल्या "'निर्णयसागर'ची अक्षरसाधना" या आपल्या ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्याचें निमंत्रण देऊन मला उपकृत केलें आहे, असें मी समजतों. कारण त्या निमित्तानें अखिल भारताला भूषणास्पद अशा या महाराष्ट्रांतील आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या श्रेष्ठ मुद्रण-प्रकाशन-संस्थेचा गौरव करण्याचा सुयोग मला लाभला आहे. श्री. कुळकर्णी आणि मी समवयस्क असलों, तरी वृत्तपत्रव्यवसायांत माझा प्रवेश त्यांच्या मागून पांच वर्षांनीं झाला. त्या दृष्टीनेंच केवळ नव्हे, तर त्या व्यवसायांतील अनुभवाच्या दृष्टीनेंही ते मला ज्येष्ठ आहेत. माझा वृत्तपत्रव्यवसायांत रीतसर प्रवेश झाला, तो १९२३ च्या मार्चमध्यें पुणें येथील 'ज्ञानप्रकाश' दैनिकाच्या 'काव्यशास्त्रविनोद' या साहित्यविषयक साप्ताहिक पुरवणीचा संपादक म्हणून. दैनिक 'ज्ञानप्रकाश'शीं माझा प्रत्यक्ष असा संबंध कधीं आलाच नाहीं. एकादे वेळीं त्याचे संपादक श्री. काकासाहेब लिमये आणि श्री. बापुसाहेब आंबेकर हे दोघे कांहीं कारणामुळें कचेरींत येऊं शकले नाहींत, म्हणजे 'सर्व्हंटस् ऑफ इंडिया'चे संपादक श्री. श्री. ग. वझे यांचा उमेदवार-सहकारी म्हणून संपादकीय लेखनासाठीं मला जें काय त्यांच्या बरोबर तेथें जावें लागत असे, तेवढेंच. १९२४

साली मी नागपूर येथील 'महाराष्ट्र' वृत्तपत्राच्या संपादकमंडळावर काम करावयाला आलों, त्या वेळीं तेंही साप्ताहिकच होतें. दैनिकांत काम करण्याची संधि मला १९४४ च्या जानेवारींत, 'तरुण भारता'चें दैनिक स्वरूपांत पुनरुज्जीवन झालें, तेव्हांच प्रथम मिळाली. पण, त्याही दैनिकाची जबाबदारी संस्थापक-संपादक या नात्यानेंच माझ्यावर पडल्यामुळें, दैनिकाचा धबडगा किंवा धांवपळ असें ज्याचें वर्णन करण्यांत येतें, त्या कामाच्या रगाड्याचा अनुभव अजून कांहीं मला आलेला नाहीं. किंबहुना, दैनिकाच्या संपादनाचें काम पत्करल्यानंतरही माझें आयुष्य गेलीं तेवीस वर्षें, मुख्य संपादकाच्या खोलींत बसून, लिहिण्या-वाचण्यांत, गांठीभेटी घेण्यांत आणि आपल्या सहकाऱ्यांशीं हासविनोद करण्यांत गेलेलें आहे. उलट, श्री. कुळकर्णी यांनीं, मुंबईसारख्या प्रचंड औद्योगिक शहरांतील 'संदेश' आणि 'नवा काळ' या लोकप्रिय दैनिकांत, १९१९ ते १९३५ पर्यंत रिपोर्टर म्हणून काम केल्यामुळें, वृत्तपत्रव्यवसायांतील त्यांचा सुरवातीचा एक तपाहून अधिक काळ धांवपळींत गेला. या त्यांच्या दुहेरी वडीलकीची मला जाणीव असल्याकारणानें प्रस्तुत ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्यासंबंधींचें त्यांचें निमंत्रण मला बहुमानासारखें वाटलें.

श्री. कुळकर्णी हे पत्रकार आणि ग्रंथकार अशा दोन्ही नात्यांनीं गेलीं चार तपें मराठी वाचकवर्गाला सुपरिचित आहेत. 'संदेश'चे संपादक श्री. अच्युतराव कोल्हटकर यांच्यासारख्या वृत्तपत्रव्यवसायांतील 'साहेबां'च्या सपाट्यांत १९१९ सालीं ते ऐन तारुण्यांत सांपडले. कोल्हटकरांच्या सहवासांत त्या व्यवसायांतली भरती-ओहोटी त्यांना प्रत्यक्ष अनुभवावयाला मिळाली. 'संदेश'चा संबंध सुटल्यानंतर त्यांनीं 'नवा काळ' दैनिकांत सुमारें बारा वर्षें काम केलें. त्यामुळें, कोल्हटकरांच्या वादळी व्यक्तित्वाप्रमाणेंच, खाडिलकरांच्या उमगंभीर व्यक्तित्वाचाही प्रभाव पडण्याची संधि त्यांना लाभली. त्यांची आणि माझी ओळख होण्याचा योग, ते 'संदेश' कचेरींत काम करीत असतां, श्री. मालतीबाई पटवर्धन यांच्या शांतारामाच्या चाळींतील बिऱ्हाडीं आला, असें मला आठवतें. श्री. मालतीबाईंचे जावई प्रो. ना. के. बेहेरे हे दिवाळीच्या किंवा उन्हाळ्याच्या सुटींत नागपूरहून मुंबईला आले, म्हणजे त्यांच्याकडे श्री. कुळकर्णी यांची बैठक असे. तिथें श्री. श्री. अ. डांगे यांचे त्या काळांतले प्रमुख सहकारी श्री. र. शि. निमकर यांच्याबरोबर

मीं त्यांना प्रथम बघितलें. होमरूलच्या चळवळींतील लोकमान्य टिळक यांच्या गुजरातमधील दौऱ्याचें जें चटकदार रिपोर्टिंग त्यांनीं 'संदेश' मधून केलेलें होतें, त्यामुळें, श्री. अनंतराव गद्रे यांच्याप्रमाणेंच, त्यांचेंही नांव त्या वेळीं गाजलेलें होतें. त्यानंतर, मुंबईंतील व्यासंगप्रिय उत्साही तरुणांची जी 'मेरी सर्कल' या नांवाची संस्था होती, त्या संस्थेंत श्री. भा. रा. धुरंधर, श्री. श्री. अ. डांगे प्रभृति उदयोन्मुख कार्यकर्त्यांबरोबर श्री. कुळकर्णी यांच्याशींहि माझा संबंध आला. तथापि, १९२२ सालच्या अखेर मी मुंबई शहर सोडून प्रथम पुण्यास आणि नंतर नागपुरास गेल्यामुळें, हा संबंध वाढूं शकला नाहीं. पण, आपल्या वृत्तपत्रांतील कामाला ग्रंथलेखनाची जोड देऊन, श्री. कुळकर्णी यांनीं जे निरनिराळ्या स्वरूपाचे अनेक ग्रंथ गेल्या चाळीस वर्षांत लिहिले, त्यामुळें त्यांची कामगिरी माझ्या डोळ्यांपुढें सतत राहिली. विशेषतः, अगदीं अलीकडे, ना. नाना शंकरशेट आणि मामा परमानंद या अव्वल इंग्रजी अमदानींतील दोन थोर कार्यकर्त्यांचीं चरित्रें संशोधनपूर्वक लिहून, महाराष्ट्राच्या आणि मुख्यतः मुंबई शहराच्या एकोणिसाव्या शतकांतील इतिहासावर जो नवीन प्रकाश त्यांनीं पाडला, तें त्यांचें कार्य मला फार महत्त्वाचें वाटतें. किंबहुना, त्यांनीं स्वतंत्र आणि अनुवादित असें अन्य प्रकारचें वाङ्मय जरी बरेंच लिहिलेलें असलें, तरी चरित्रकार म्हणून त्यांनीं केलेली मराठी भाषेची सेवाच संस्मरणीय ठरेल, यांत शंका नाहीं.

"'निर्णयसागर'ची अक्षरसाधना" हा श्री. पु. बा. कुळकर्णी यांचा प्रस्तुत ग्रंथ ऐतिहासिक आणि चरित्रात्मक अशा दुहेरी स्वरूपाचा आहे. त्याच्या पूर्वार्धांत 'निर्णयसागर'चा गेल्या शंभर वर्षांतील इतिहास सविस्तर दिलेला असून, उत्तरार्धांत त्या कालावधींत पश्चिम महाराष्ट्रांत ज्या अनेक मुद्रण-प्रकाशन-संस्था उदयाला आल्या, त्यांपैकीं कांहीं प्रमुख संस्थांचा वृत्तांत, त्यांच्या चालकांच्या परिचयासह, साक्षेपानें दिलेला आहे. गणपत कृष्णाजींपासून जावजी दादाजींपर्यंत पहिला खंड, जावजी दादाजींपासून लक्ष्मीबाई नारायणपर्यंत दुसरा खंड आणि 'जगद्हितेच्छु' पासून 'मौज' मुद्रणालयापर्यंत तिसरा खंड अशा रीतीनें श्री. कुळकर्णी यांनीं १८३१ पासून १९६७ पर्यंत गेल्या सुमारें १४० वर्षांतील मराठी मुद्रण-प्रकाशन व्यवसायाचा इतिहास या ग्रंथांत संकलित केलेला आढळतो. 'निर्णयसागर' ही महाराष्ट्रांतील

शतकाचें आयुष्य प्रतिष्ठेनें घालवलेली एकमेव आदर्श मराठी मुद्रणसंस्था आहे. हें तिचें अद्वितीय वैशिष्ट्य ध्यानांत घेतलें असतां, श्री. कुळकर्णी यांनीं तिच्या स्थापनेपूर्वीचा आणि उत्कर्षानंतरचा असे दोन्ही कालखंड या ग्रंथामध्यें वर्णन करण्यांत जी योजकता दाखवलेली आहे, ती अभिनंदनीय वाटते. या त्यांच्या योजकतेमुळें, 'निर्णयसागर' नें मराठी मुद्रणकलेंत सर्व बाबतींत सुधारणा करून तिला दिलेलें अत्यंत सुंदर आणि शुद्ध स्वरूप, संस्कृत ग्रंथांच्या निर्दोष मुद्रणासाठीं केलेला अखंड टाइपांचा उपक्रम, टायपिंग, लायनो आणि मोनो यांच्यासाठीं केलेले लिपीच्या आणि मुद्रणाच्या सुधारणेचे प्रयोग, गुजराती, कानडी आणि इंग्रजी या अन्य भाषांच्या मुद्रणाला त्यानें दिलेलें नवीन वळण, इत्यादि मुद्रणक्षेत्रांतील त्याच्या विविध कामगिरीचें आणि महाराष्ट्रांतील मुद्रणव्यवसायावर झालेल्या तिच्या इष्ट परिणामांचें यथार्थ चित्र वाचकांच्या डोळ्यांपुढें उभें रहातें. शेठ जावजी दादाजींपासून लक्ष्मीबाई नारायणपर्यंत 'निर्णयसागर' च्या चालकांच्या तीन पिढ्यांनीं महाराष्ट्रांतील मुद्रण-प्रकाशन व्यवसायांत ही जी क्रांति आणि प्रगति घडवून आणली, तिच्यामुळें त्या संस्थेला प्राप्त झालेली आंतरराष्ट्रीय कीर्ति अगदीं स्वाभाविक वाटते. विशेषतः, प्राचीन वैदिक वाङ्मयाचें शुद्ध मुद्रण करण्याच्या बाबतींत 'निर्णयसागर' नें जें नैपुण्य प्रकट केलें, तें पाहून तर पाश्चात्य संस्कृत पंडितही विस्मित होऊन गेले. त्या दृष्टीनें "'निर्णयसागर'ची अक्षरसाधना" हें या ग्रंथाला श्री. कुळकर्णी यांनीं दिलेलें नांव अगदीं अन्वर्थक आहे. "अक्षरं परमं ब्रह्म" या भगवद्वचनानुसार अक्षरब्रह्माची इतक्या अनन्य भावानें उपासना करणारा जावजी दादाजींसारखा मुद्रक महाराष्ट्रांत तरी अद्याप दुसरा झालेला नाहीं. त्यांचें चरित्र लिहिण्याची संधि साधून मराठी मुद्रणव्यवसायाची गेल्या १४० वर्षांतील विस्तृत माहिती देणारा हा पहिलाच इतिहासग्रंथ होय.

लिपि आणि मुद्रण हीं अक्षरसाधनेचीं दोन परस्परपूरक अंगें आहेत; व म्हणून लिपीच्या पाठोपाठ मुद्रणाचा जन्म झालेला असावा, असें मला वाटतें. मानवी वाणीनें ज्या दिवशीं लिपीचें रूप धारण केलें, त्या दिवशीं माणसाच्या तोंडून बाहेर पडणाऱ्या उद्गाराला मूर्तता, स्थिरता आणि अक्षरता आली. तोंपर्यंत तो उद्गार क्षणजीवी होता,—वक्ता आणि श्रोता यांच्यापुरताच

मर्यादित होता. लिपि हें मानवी उद्गाराचें रूप आहे. हें रूप वाणीला लाभल्यामुळें, तिचा प्रसार आणि प्रभाव अकुंठित होऊन, तिला सामाजिक अधिष्ठान प्राप्त झालें. कागदाचा शोध लागण्यापूर्वीच्या त्या अत्यंत प्राचीन काळांत भूर्जपत्रावर म्हणा, मृत्फलकावर म्हणा, शिलापट्टावर म्हणा, इष्टिकेवर म्हणा, काष्ठखंडावर म्हणा किंवा ताम्रपटावर म्हणा, अक्षरें कोरून किंवा खोदून काढावीं लागत असत. पुढें कालांतरानें कापसाच्या वस्त्रावर ज्या वेळीं लिहिण्याची कल्पना निघाली, तेव्हा अक्षरांना 'वर्ण' ही संज्ञा मिळाली असावी. म्हणूनच, 'लिपिकार' या संस्कृत शब्दाला कोरीव काम, खोदकाम आणि रंगकाम करणारा असे तिन्ही अर्थ आलेले असावेत. लिपीच्या शोधाबरोबरच, जीं अक्षरें कोरलीं किंवा खोदलीं जातात, त्यांचा ठसा घेतां येतो, म्हणजेच त्यांची मुद्रा तयार होऊं शकते आणि मुद्रण करतां येतें, याही गोष्टीचा शोध लागलेला असावा. राजमुद्रा किंवा वणिग्मुद्रा हा आधुनिक मुद्रणकलेचा लिपीच्या उदयकाळांतील पहिला आविष्कार होय. खिस्तपूर्व चोविसाव्या शतकांतील 'मारीमाला' हीं ब्राह्मी लिपींतील अक्षरें असलेला जो मृत्पट्ट दक्षिण सुमेरमध्यें सांपडला, तो अशा प्रकारच्या वणिग्मुद्रा किती प्राचीन आहेत, याची साक्ष देतो. पांच हजार वर्षांपूर्वीच्या अशा अनेक मुद्रा मोहेंजोदारो, सिंधु, सुमेर, मिश्र इत्यादि अनेक प्रदेशांतल्या उत्खननांत उपलब्ध झालेल्या आहेत. अथर्ववेदांत तर यजनकर्म पुरें झाल्यावर वेदग्रंथ पुन्हां पेटींत ठेवल्याचा उल्लेख दृष्टीस पडतो. इ. स. ७६४ सालांतील मुद्रितें जपानमध्यें सांपडलेलीं असून, चीनची सम्राज्ञी शियाऊ टोकू हिनें ८६८ सालीं चिनी लिपींत छापलेल्या संस्कृत हीरक सूत्राच्या प्रती त्या देशांतील अनेक बौद्ध मंदिरांत सांपडलेल्या आहेत. अर्थात् हें सगळें मृण्मुद्रण किंवा काष्ठमुद्रण होय. म्हणजे असें कीं, मातीच्या फलकावर आणि विटेवर किंवा लाकडाच्या ठोकळ्यावर अक्षरें कोरून हीं पुस्तकें छापलेलीं होतीं. आजच्या पद्धतीच्या चिनी मातीच्या चलनी मुद्रा १०४१ सालीं पी शांग यानें तयार केलेल्या होत्या. १३१४ सालीं वांग चांग यानें काष्ठमुद्रा तयार करून आणखी एक पाऊल पुढें टाकलें. त्यानंतर कोरियाचा राजा यी यानें, १३९२ सालीं धातुमुद्रांचा कारखाना काढून, आधुनिक पद्धतीच्या छपाईचा पाया घातला, असें म्हणतां येईल. श्री. कुळकर्णी यांनीं आपल्या ग्रंथाच्या प्रास्ताविक भागांत

यांतील कांहीं माहिती थोडक्यांत दिलेली आहे. मुद्रणकलेच्या उगमाचा आणि प्रगतीचा हा वृत्तांत मी एवढ्याचसाठीं दिलेला आहे कीं, लेखन आणि मुद्रण या दोन्ही कला सह-जात असून, कोरणें, गोंदणें, रेखणें, रंगवणें आणि लिहिणें या क्रमानें जसा लेखनकलेचा विकास होत गेला, तसाच पानें, माती, लांकूड, शिळा, कापड आणि धातु या क्रमानें मुद्रणकलेचीही प्रगति तिच्याबरोबर होत गेली, हें स्पष्ट व्हावें. लायनो टाईप, मोनो टाईप, रोटरी इत्यादि जे एकापेक्षां एक सुकर आणि शीघ्र असे लेटर प्रेसचे म्हणजे अक्षर मुद्रणाचे प्रकार आज प्रचलित आहेत, त्या सर्वांचा उगम पांच हजार वर्षांपूर्वीच्या राजमुद्रांत आणि वणिग्मुद्रांत आहे, असें म्हणावयाला शंका वाटत नाहीं.

महाराष्ट्रांत अक्षरसाधनेचा उपक्रम प्रथम मराठशाहींतील शेवटले मुत्सद्दी नाना फडणीस यांनीं केला. तत्पूर्वी छत्रपति श्रीशिवाजीमहाराजांनीं आणि तंजावरच्या भोंसले घराण्यांतील श्रीमरफोजी महाराजांनीं आपल्या राज्यांत छापखाने काढण्याचा प्रयत्न केलेला होता. त्यांपैकीं श्रीशिवाजीमहाराजांनीं केलेल्या प्रयत्नाबद्दल पुरेसा पुरावा अजून तरी उपलब्ध झालेला नाहीं. तथापि तेवढ्या कारणामुळें तो प्रयत्न अविश्वसनीय मानणें मात्र सर्वथैव अयोग्य होईल. कारण, भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर खंबायतपासून कालिकतपर्यंत त्या काळीं पोर्तुगीज आणि इंग्रज या विजिगीषु पाश्चात्य आक्रमकांच्या ज्या हालचाली सुरू होत्या, त्यांच्यावर त्या दूरदर्शी राष्ट्रनिर्मात्याची अगदीं घारीसारखी बारीक नजर होती; व त्या व्यापारी विजेत्यांशीं ठिकठिकाणीं झालेल्या संघर्षांत त्यांच्या भौतिक प्रगतीचे जे अनेक विशेष महाराजांच्या डोळ्यांत भरले असतील, त्यांपैकींच मुद्रणकला हा एक असल्यास त्यांत मुळींच नवल नाहीं. म्हणून, सुरत आणि मुंबई या इंग्रजांच्या आक्रमणक्षेत्रांतील दोन मुख्य शहरांशीं संबंध असलेल्या भीमजी पारेख याच्यासारख्या धाडसी, कल्पक वनियामार्फत त्यांनीं १६७० सालीं विलायतेहून मुद्रणयंत्र आणवण्यासाठीं खटपट करावी, हें अगदीं स्वाभाविक वाटतें. पण त्यांच्या अकालनिधनामुळें ही त्यांची योजना सफल झाली नसावी. तंजावरच्या महाराजांनीं मात्र, डॅनिश मिशनरी ख्रिस्तियन फ्रेडरिक श्वार्ट्झ याच्या प्रेरणेनें काढलेल्या आपल्या राज्यांतील छापखान्यांत, १८०९ आणि १८१२ सालीं छापलेले एकनाथाचें

'युद्धकांड', माघाचा 'शिशुपालवध' इत्यादि ग्रंथ तेथील सरस्वती महालांत आजही पहावयाला मिळतात. सरफोजीमहाराजांच्या या दोन प्रकाशनांपूर्वीच महाराष्ट्रांत मुद्रणाला प्रारंभ करण्याचा श्रीशिवाजीमहाराजांचा अपुरा राहिलेला संकल्प नाना फडणिसांकडून पूर्ण होण्याचा सुयोग आला. सवाई माधवरावांच्या राजवटींत नानांनीं, ईस्ट इंडिया कंपनीचा पुणें दरबारांतील वकील सर चार्लस् मॅलेट याच्या मदतीनें, भगवद्गीतादि धार्मिक ग्रंथ छापण्यासाठीं, पुण्यास मुद्रणालय काढण्याची पूर्व तयारी सुरू केलेली होती. पण, सवाई माधवरावांच्या अपमृत्यूनंतर रावबाजींच्या हातीं पेशवाईचीं सूत्रें गेल्यामुळें, शिवाजीमहाराजांच्या संकल्पाप्रमाणें, त्यांचाही हा उपक्रम अपुरा राहून गेला. तथापि, नानांच्या आदेशानुसार तांब्याचे टाईप आणि लांकडी मुद्रणयंत्र तयार करणाऱ्या पुण्याच्या कारागिरांना मिरज संस्थानाचे तत्कालीन अधिपति श्रीमंत गंगाधरराव पटवर्धन यांनीं आश्रय दिला; व १८०५ सालीं भगवद्गीतेची पहिली मुद्रित आवृत्ति प्रकाशित झाली. अशा रीतीनें श्रीशिवाजीमहाराज आणि नाना फडणीस या महाराष्ट्रांतल्या दोघां थोर मुत्सद्यांचा संकल्प, स्वराज्य नष्ट झाल्यावर पांच वर्षांनीं, अखेर सिद्धीस गेला. मराठी राज्यकर्त्यांनीं आणि कारागिरांनीं स्वतःच्या बुद्धीनें आणि कर्तबगारीनें महाराष्ट्रांत केलेला देवनागरी लिपींतील मुद्रणाचा आद्य यशस्वी प्रयत्न म्हणून भगवद्गीतेच्या या प्रकाशनाला ऐतिहासिक महत्त्व आहे.

मराठी पुस्तकांचें मुद्रण प्रथम गोव्यांत सतराव्या शतकाच्या प्रारंभीं सुरू झालें. पोर्तुगालच्या राजानें ॲबिसिनियाच्या बादशहाला नजर केलेलें मुद्रणयंत्र घेऊन स्पॅनिश मुद्रक जुवान द बुस्तामांते हा ता. ६ सप्टेंबर १५५६ रोजीं गोव्याच्या किनाऱ्यावर येऊन उतरला. हें मुद्रणयंत्र तेथून ॲबिसिनियाला जाण्याच्या मार्गांत अनेक अडचणी उद्भवल्यामुळें अखेर गोव्यांतच राहिलें; व तेथील जेसुईट पंथाच्या मिशनरींनीं धर्मप्रसाराच्या कामीं त्याचा भरपूर उपयोग करून घेतला. बुस्तामांते याच्याबरोबर आलेला कसबी स्पॅनिश लोहार जोआओ गॉनसाल्व्हेस यानें तमिळ लिपीचे टाईप पाडले. त्या भारतीय लिपींत "दौत्रिना क्रिस्ता" हें तमिळ पुस्तक १५७८ सालीं प्रसिद्ध झालें. जेसुईट पंथाचा इतिहासकार फ्रान्सिस्को द सूझा यानें या घटनेचें असें मार्मिक वर्णन एका वाक्यांत केलेलें आहे कीं, "भारतानें आपल्या

स्वतःच्या भूमींत जन्मलेलें हें पहिलें मुद्रित पुस्तक पाहिलें." (This was the first printed book, which India saw born in its own land). १६१६ सालीं फादर स्टीफन्स यांचें विख्यात 'ख्रिस्तपुराण' प्रकाशित झालें. त्याच्या पाठोपाठ रिबेइरो, फॉक्स, साल्दाणा, अल्मिडा प्रभृति पोर्तुगीज मिशनरींनीं 'ब्राह्मणी मराठी' (Bramana Marastta) मार्फत लिहिलेलीं ख्रिस्ती धर्मावरील अनेक पुस्तकें, १६१६ ते १६७४ या कालावधींत, प्रसिद्ध झालीं. तथापि तीं सर्व रोमन लिपींत! १६५४ पर्यंत ख्रिस्त पुराणाच्या ज्या तीन आवृत्त्या निघाल्या, त्याही सर्व रोमन लिपींतच. देवनागरी लिपींतील मराठी मुद्रण, मुंबईहून मुद्दाम टाईप मागवून, १८५३ सालीं पोर्तुगीज सरकारनें सुरू केलें, तोंपर्यंत गोव्यांतील सर्व मराठी मुद्रणाची लिपि रोमन हीच होती. देवनागरी लिपींतील मराठी मुद्रणाचा उपक्रम प्रथम युरोप खंडांत झाला. प्रो. अ. का. प्रियोळकर आणि श्री. वा. शि. नाईक यांनीं आपल्या भारतीय मुद्रणावरील इंग्रजी इतिहासग्रंथांत १६७८ सालीं ॲमस्टरडॅम येथें आणि १७७१ सालीं रोम येथें देवनागरींत छापलेल्या मराठी मुद्रितांचे जे ठसे दिलेले आहेत, तेच आज तरी मराठी मुद्रणाचा उगम म्हणून दाखवितां येतील. महाराष्ट्रांत त्या काळीं स्वराज्याच्या वैभवाचा मध्यान्ह तळपत असतां आणि मराठ्यांचे घोडे अटकेपार घडक मारून आलेले असतांना देखील आमच्या मायबोलीला मुद्रणसंस्कार घडण्याचा हा योग सातां समुद्रांपलीकडील परक्या देशांत यावा, हें आमचें केवढें भाग्य! भारतांत झालेलें मराठीचें तिच्या स्वतःच्या लिपींतील पहिलें मुद्रण म्हणजे मुंबईस निघणाऱ्या 'बाँबे कूरिअर' या वृत्तपत्राच्या ता. १७ जुलै १८०२ च्या अंकांत आलेली सरकारी मराठी जाहिरात. पण ही जाहिरात मोडी लिपींत होती. इतकेंच नव्हे, तर गुजराती, मराठी आणि इंग्रजी या भाषांच्या व्याकरणासंबंधींचें जें पुस्तक डॉ. रॉबर्ट ड्रमांड यानें १८०८ सालीं कूरियर प्रेसमध्यें छापून प्रसिद्ध केलें, त्यांतील मराठी मजकुराची लिपीही मोडीच होती. तथापि, महाराष्ट्रांत जरी नव्हे, तरी बंगालमध्यें कलकत्त्यानजीक श्रीरामपूर या डॅनिश वसाहतींतील बॅप्टिस्ट मिशनच्या छापखान्यांतून 'मत्तयकृत शुभवर्तमान' आणि डॉ. विल्यम कॅरे यानें तयार केलेलें 'मराठी भाषेचें व्याकरण' हीं "महरट्टा नागरी" लिपींत (Mahratta, Nagri Type) मुद्रित केलेलीं दोन मराठी पुस्तकें

मात्र, डॉ. ड्रमांड याच्या व्याकरणापूर्वी, १८०५ सालीं प्रसिद्ध होऊन गेलेली होती.

मराठी भाषेतील पुस्तकांच्या मुद्रण-प्रकाशनाला जोराची पद्धतशीर चालना जी मिळाली, ती १८१६ सालीं मुंबई येथे अमेरिकन मिशन प्रेस आणि त्याहीपेक्षां १८२० सालीं बॉम्बे नेटिव्ह स्कूल अँड स्कूल बुक कमिटी यांची स्थापना झाल्यावर. मिशन प्रेसमधून १८१७ सालीं ख्रिस्ती धर्मावरील आठ पानांचें मराठी चोपडें बाहेर पडलें. पण, सरकारनियुक्त स्कूल बुक कमिटीनें १८२२ सालीं कूरियर प्रेसमध्यें छापून जें 'पंचोपाख्यान' प्रसिद्ध केलें, तेंच खरोखरी पहिलें शंभर टक्के मराठी पुस्तक होय. त्या कमिटीच्या या पहिल्या छोट्या प्रकाशनाची किंमत युरोपियनांसाठीं आठ रुपये आणि एतद्देशीयांसाठीं तीन रुपये होती! पुस्तकांना भरमसाट किंमती ठेवावयाला सोकावलेल्या अलीकडील नफेबाज प्रकाशकांनासुद्धां या किंमती भारी वाटल्याशिवाय रहाणार नाहींत. १८०५ सालीं मिरज येथें छापण्यांत आलेल्या भगवद्गीतेचा एक अपवाद सोडला, तर १७९६ पासून तों १८२२ पर्यंत कलकत्ता, श्रीरामपूर, तंजावर आणि मुंबई येथें देवनागरी लिपींतील मराठी मुद्रणाची ही जी प्रगति होत गेली, तिचें श्रेय सर चार्लस् विल्किन्स याला दिलें पाहिजे. तो १७७० सालीं ईस्ट इंडिया कंपनींतील एक कारकून म्हणून वयाच्या एकविसाव्या वर्षी बंगालमध्यें आला. संस्कृत भाषा शिकणारा तो पहिला इंग्रज. त्यानें गीता, हितोपदेश आणि शाकुंतल यांचे इंग्रजी अनुवाद केले; व १७७९ सालीं संस्कृत भाषेचें व्याकरणही प्रसिद्ध केलें. त्या वेळचा गव्हर्नर-जनरल वॉरन हेस्टिंग्ज यानें त्याला बंगाली लिपीचे टाईप पाडण्याचा आग्रह केला. तें काम त्यानें उत्तम रीतीनें बजावलें. १७९५ सालीं त्यानें देवनागरी टाईप पाडले. बंगाली भाषेचा भारतांतील पहिला व्याकरणकार नॅथॅनियल हॉलहेड यानें विल्किन्सच्या या उद्योगाविषयीं असे उद्गार आपल्या व्याकरणाच्या प्रस्तावनेंत काढलेले आहेत कीं, "युरोपियन कारागिरांपासून इतक्या दूर असलेल्या या देशांत, धातुशोधक, शिल्पकार, ओतारी आणि मुद्रक अशा निरनिराळ्या भूमिका घेऊन, त्याला एकट्याला हा सगळा प्रयास करावा लागला." (In a country so remote from all connection with Euro-pian artists, he has been obliged to charge himself with all

the various occupations of the Metallurgist, the Engraver, the Founder and the Printer.) त्यांनेही स्वतः असें म्हटलेलें आहे कीं, "मी आपल्या हातांनीं सगळ्या गोष्टी करून देवनागरीच्या मुद्रणाची सिद्धता केली." (......all with my own hands) ही कला त्यानें बंगाली लोहार पंचानन कर्मकार याला शिकविली; व त्याच्यापासून इतरांनीं तिचें शिक्षण घेतलें. सारांश, देवनागरी मुद्रांचा विल्किन्स हा भारतांतील आद्य निर्माता होय. मुंबईंतील अमेरिकन मिशन प्रेसनेंही, कलकत्त्याहून देवनागरी टाईप मागवून घेऊन, आपलें काम भागविलें. त्या छापखान्यांत असलेला सार्ष्टीतील तरुण हिंदी ख्रिस्ती कामगार थॉमस ग्रॅहॅम हा ही कला शिकला; व तेथील अमेरिकन व्यवस्थापक एलिजा वेब्स्टर याच्या मदतीनें त्यानें देवनागरी आणि गुजराती या दोन्ही लिपींच्या टाइपांत सुधारणा करून त्या जास्तींत जास्त मुद्रणसुकर केल्या. गणपत कृष्णाजी, जावजी दादाजी आणि राणूजी रावजी हे महाराष्ट्रांतील सुरुवातीच्या दोन पिढ्यांतले मुद्राकार आणि मुद्रक थॉमस ग्रॅहॅमच्या हातांखालीं शिकून तयार झाले. अशा रीतीनें अमेरिकन मिशन प्रेस हा एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांतील मुद्रण व्यवसायांत पडूं इच्छिणाऱ्या मुंबईंतील अनेक होतकरू तरुणांना विद्यालयासारखा उपयोगी पडला.

गणपत कृष्णाजी पाटील आणि जावजी दादाजी चौधरी या दोघांचीं चरित्रें म्हणजे एकोणिसाव्या शतकांतील मराठी मुद्रण-प्रकाशन व्यवसायाच्या प्रारंभाचा आणि प्रगतीचा इतिहासच होय. गणपत कृष्णाजी हे कुलाबा जिल्ह्यांतील थळ या गांवीं १८०० सालीं जन्मले. ते जातीनें भंडारी. जावजींचा जन्म १८३९ सालीं मुंबई येथें झाला. ते जातीनें मराठा. भंडारी आणि मराठा या दोन पराक्रमी जातींनीं महाराष्ट्राचा सतराव्या आणि अठराव्या शतकांतील लष्करी आणि आरमारी इतिहास आपल्या दिगंत कर्तृत्वानें उजळलेला आहे. इंग्रजी राज्यांत त्यांच्या शौर्याला वाव न उरल्यामुळें त्यांच्या कपाळीं मोलमजुरी आली. गणपत कृष्णाजी, जावजी दादाजी आणि राणूजी रावजी या तिघांना "शिक्षणाचा गंधही लागलेला नव्हता," असें श्री. कुळकर्णी यांनीं या ग्रंथांत म्हटलेलें आहे, तें कांहीं चुकीचें नाहीं. तथापि इंग्रजपूर्व काळांत आपल्या देशांतल्या शिक्षणाच्या कल्पनाच मुळीं सर्वथैव भिन्न होत्या. पाश्चात्य

देशांत 'थ्री आर्स' म्हणजे रीडिंग, रायटिंग आणि रेकनिंग-वाचणें, लिहिणें आणि हिशेब ठेवणें,—हा शिक्षणाचा पाया समजला जातो. त्यांच्या दृष्टीनें साक्षरता-अक्षरओळख-म्हणजेच शिक्षण. ज्याला अक्षरओळख झालेली नाहीं, तो अडाणी, "शिक्षणाचा गंध न लागलेला," अशी त्यांची समजूत आहे. उलट, आपल्या देशांत प्राचीन काळापासून विद्या ही मुखोद्गत आणि कला या हस्तगत असल्या पाहिजेत, अशी भावना आणि परंपरा चालत आलेली आहे. म्हणूनच, कोणत्याही विद्येच्या, शास्त्राच्या किंवा कलेच्या पुस्तकी ज्ञानापेक्षां गुरुमुख आणि शागिर्दी यांच्यावर आपल्याकडे इतका भर होता. वेदपठनापासून तों कारागिरीपर्यंत सगळ्या विद्यांचें, शास्त्रांचें आणि कलांचें शिक्षण अक्षरओळख झाल्याशिवायच होत असे. शिपाईगिरीच्या बाबतींत तर बोलावयालाच नको. मीं असे अनेक निष्णात गवंडी, सुतार आणि लोहारच केवळ नव्हत, तर दशग्रंथी ब्राह्मण आणि शास्त्री-पंडित पाहिलेले आहेत कीं, ज्यांना फक्त वाचतां येत असे, पण लिहितां येत नव्हतें; व असे अनेक कोट्यधीपति व्यापारी पाहिलेले आहेत कीं, ज्यांना चेकवर सहीसुद्धां धड करतां येत नाहीं, पण जे आंतरराष्ट्रीय व्यापारी उलाढाली अगदीं लीलेनें करतात. गणपत कृष्णाजी, जावजी दादाजी आणि राणूजी रावजी यांच्यासारखे आधुनिक दृष्टीनें "शिक्षणाचा गंधही नसलेले" जे आपल्या देशांतल्या औद्योगिक क्षेत्रांतील हजारों अनपढ कारागीर, कारखानदार आणि व्यापारी आपआपल्या व्यवसायांत शिखराला चढले, ते केवळ त्यांच्या त्या त्या व्यवसायाच्या अनुभवसिद्ध ज्ञानामुळें. या तिघांनीं तर अमेरिकन मिशन प्रेससारख्या छापखान्यांत टाईप घांसतां घांसतां मुद्रणकला हस्तगत केली. गणपत कृष्णाजी आणि जावजी दादाजी यांच्या चरित्रांत इतकें विलक्षण साम्य आहे कीं, गणपत कृष्णाजींच्या मुद्रणव्यवसायांतील यशस्वी जीवनाचा आदर्श डोळ्यांपुढें ठेवूनच जणूं कांहीं जावजींनीं आपला आयुष्यक्रम आंखलेला होता, असें म्हणण्याचा मोह पडतो. बदलत्या परिस्थितीनुसार आपल्या व्यवसायांत नाना प्रकारच्या सुधारणा करून त्याला पूर्णता आणण्यापासून तों त्या काळांतल्या मोठमोठ्या प्रज्ञावंतांचा स्नेह संपादन करून, त्यांच्या सहयानें आणि सहकार्यानें, आपलें प्राचीन वाङ्मय प्रसिद्ध करण्यापर्यंत हरएक बाबतींत जावजींनीं त्या आद्य मराठी मुद्रणालयाच्या संस्थापकाचा कित्ता गिरविलेला दिसतो. १८६० सालीं

गणपत कृष्णाजींचें देहावसान झाल्यावर, सात वर्षांच्या आंतच जावजींनी 'निर्णयसागर'ची स्थापना करून, त्यांचें मुद्रण-प्रकाशनाचें अपुरें राहिलेलें कार्य नव्या उत्साहानें आणि अधिक व्यापक दृष्टीनें पुढें चालविलें, हा कांहीं केवळ योगायोग म्हणतां येणार नाहीं.

गणपत कृष्णाजी आणि जावजी दादाजी या दोघांना शिक्षणाचा फारसा गंध लागलेला नसतांनासुद्धां त्यांनीं आपल्या भोंवतीं त्या काळांतल्या विद्वानांचा जो परिवार गोळा केलेला होता, तो पाहिल्यावर त्यांच्या व्यावसायीन नैपुण्याप्रमाणेंच सांस्कृतिक आकलनाबद्दलही अचंबा वाटल्याविना रहात नाहीं. तसेंच, ज्या व्यापक धर्माभिमानामुळें त्यांनीं संस्कृत आणि मराठी या भाषांतील उत्कृष्ट धर्मग्रंथांचें प्रकाशन झीज सोसून केलें, त्याबद्दल त्यांची प्रशंसा करावी कीं ज्या मार्मिक साहित्याभिरुचीनें त्यांनीं त्या वेळच्या निरनिराळ्या नियतकालिकांना आश्रय दिला आणि नवीन नियतकालिकेंही काढलीं, तिच्याबद्दल त्यांचा गौरव करावा, हें समजत नाहीं. गणपत कृष्णाजींनीं छापखाना काढला, तोच मुळीं धर्मनिष्ठेनें उद्दीपित होऊन. त्यांचे समकालीन ग्रंथकार कै. गोविंद नारायण माडगांवकर यांनीं १८६३ सालीं प्रसिद्ध केलेल्या 'मुंबईचें वर्णन' या आपल्या ग्रंथांत त्यांच्याविषयीं असे उद्गार काढलेले आहेत कीं, "अमेरिकन मिशनरींनीं सन १८१३ त छापखाना घालून ख्रिस्ती–धर्म प्रकरणीं मराठी भार्षेत शिलाछापावर पुस्तकें छापण्याचा कारखाना सुरू केला. हीं त्यांचीं पुस्तकें छापून बाहेर पडलेलीं पाहून मयत गणपत कृष्णाजी यांच्या मनांत शके १७६२ म्हणजे सन १८४० मध्यें आलें कीं, आपणही असाच कारखाना उभारून हिंदु-धर्म प्रकरणीं व दुसरीं पुस्तकें छापावीं,........मग त्यांनीं अमेरिकन मिशनरींची कृति पाहून स्वतः आपल्या युक्तीनें प्रेस (छापखाना) तयार करण्याचे उद्योग मांडिले. हे गृहस्थ भंडारी जातीचे असून कुशळ, बुद्धिमान्, धोरणी व हिंदु-धर्मावर निष्ठा ठेवणारे होते........शके १७५३ त यांनीं आपण स्वतः लिहून त्या वर्षाचें मराठी पंचांग छापिलें. त्यापूर्वी मराठी छापील पंचांग कोणासच ठाऊक नव्हतें. ........यांचें पंचांग शुद्ध असून नीट छापलेलें पाहून ब्राह्मण लोक जरी छापील पुस्तकास शिवायास कां कूं करीत असत, तरी ते संतोषानें हीं पंचांगें विकत घेऊन ह्याच पंचांगांवरून संवत्सर प्रतिपदेचे दिवशीं वर्षफळ वाचूं लागले."

माडगावकरांनीं केलेल्या गणपत कृष्णाजींच्या या वर्णनावरून तत्कालीन विद्वानांना त्यांच्याविषयीं किती आदर वाटत असे, हें दिसून येईल. या आपल्या धर्मबुद्धीनुसार त्यांनीं, पंचांगापासून तों उपनिषदांपर्यंत आणि तुकारामाच्या गाथेपासून तों 'हिंदुधर्मतत्त्वा'पर्यंत, नाना प्रकारचे संस्कृत-प्राकृत धार्मिक ग्रंथ प्रकाशित करून, अमेरिकन मिशन प्रेसकडून त्या सुमारास धडाक्यानें सुरू करण्यांत आलेल्या ख्रिस्ती धर्मप्रसाराच्या मोहिमेशीं मोठ्या ईर्ष्येनें सामना दिला; व बाळशास्त्री जांभेकर, भाऊ दाजी, दादोबा पांडुरंग, बापू गंगाधर जोशी, बाळाजी सुंदरजी, गंगाधरशास्त्री फडके, हरि केशवजी प्रभृति समकालीन प्रमुख लेखकांचे ग्रंथ आणि नियतकालिकें आपल्या छापखान्यांत छापून ज्ञानप्रसाराच्या कार्यालाही त्यांनीं तितक्याच उत्साहानें हातभार लावला. तत्कालीन लोकाग्रणी रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक हे त्यांचे या सर्व उपक्रमांत मुख्य सल्लागार आणि सहकारी होते. १८३१ पासून १८६० पर्यंत या पहिल्या मराठी मुद्रणालयाच्या संस्थापकानें ही जी लोकशिक्षणाची आणि लोकजागृतीची कामगिरी केली, तिच्यामुळें मुद्रण-व्यवसायाची उपयुक्तता आणि सामर्थ्य हीं दोन्ही जनतेच्या प्रत्ययाला येऊन, महाराष्ट्रांत त्या व्यवसायाला राष्ट्रीय अधिष्ठान प्राप्त झालें; व इतर अनेक उद्योगधंद्यांप्रमाणें हा केवळ बनियेगिरीनें करावयाचा धंदा नाहीं, तर धर्मबुद्धीनें करावयाचा लोकाभिमुख आणि लोकोपयोगी व्यवसाय आहे, अशी भावना त्याच्याविषयीं निर्माण झाली. महाराष्ट्रांतील मुद्रण व्यवसायाच्या उच्च परंपरेचा उगम त्याचे आद्य प्रवर्तक गणपत कृष्णाजी यांच्या त्या व्यवसायासंबंधींच्या या धर्मबुद्धींत आहे.

याच धर्मबुद्धीनें जावजी दादाजी यांनींही १८६९ सालीं निर्णयसागर प्रेस स्थापन केला. त्यांचे मुख्य सल्लागार आणि सहकारी रावसाहेब विनायक कोंडदेव ओक हे त्या काळांतले प्रमुख ग्रंथकार आणि शिक्षणाधिकारी होते. गणपत कृष्णाजींप्रमाणें जावजींच्याही भोंवतीं निरनिराळ्या क्षेत्रांतल्या तत्कालीन विद्वानांची देदीप्यमान प्रभावळ होती. शंकर पांडुरंग पंडित, डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे, पं. दुर्गाप्रसाद, गोविंदशास्त्री बापट, काशीनाथ पांडुरंग परब, पं. शिवदत्त शर्मा, पं. केदारनाथ, वासुदेवशास्त्री पणशीकर यांच्यासारखे गीर्वाणभाषाभिज्ञ संस्कृत वाङ्मयाच्या संपादनासाठीं; आणि

रामचंद्र भिकाजी गुंजीकर, जनार्दन बाळाजी मोडक, हरि महादेव पंडित, काशीनाथ नारायण साने, वामन दाजी ओक, राजारामशास्त्री भागवत यांच्यासारखे महाराष्ट्रभाषामर्मज्ञ मराठी संतवाङ्मयाच्या संपादनासाठीं निवडून त्यांचें सहकार्य चिरकाल मिळविण्यांत जावजींची जी गुणज्ञता आणि योजकता प्रकट झालेली दिसते, तिचा गौरव किती म्हणून करावा? गणपत कृष्णाजींप्रमाणें त्यांच्याही मुद्रण–प्रकाशनाचा शुभारंभ १८६९ सालीं पंचांगाच्या प्रसिद्धीनें झाला. त्यानंतर प्राचीन वैदिक आणि पौराणिक संस्कृत वाङ्मय तर त्यांनीं विपुल प्रसिद्ध केलेंच; पण याज्ञवल्क्य स्मृतीसारखे धर्मशास्त्रावरील, ब्रह्मसूत्र शांकरभाष्यासारखे वेदान्तावरील, पातंजल महाभाष्यासारखे व्याकरणावरील, अर्थसंग्रहासारखे मीमांसेवरील, तर्कसंग्रहासारखे न्यायशास्त्रावरील आणि अष्टांगहृदयासारखे आयुर्वेदावरील मोठमोठे प्राचीन ग्रंथ त्यांनीं तज्ज्ञांकडून संपादन करवून घेऊन लोकांना सादर केले. याशिवाय 'काव्यमाला' आणि 'काव्यसंग्रह' या दोन नियतकालिकांच्या रूपानें त्यांनीं अभिजात संस्कृत साहित्य आणि जुनें मराठी काव्य-वाङ्मय यांचें जें प्रकाशन केलें, तें निराळेंच. त्या दृष्टीनें आपल्या मुद्रणालयासंबंधींची—

वेदशास्त्रपुराणेतिहासकाव्यान्यनेकशः ।
योग्यमूल्येन दास्यन्ते ग्रन्था निर्णयसागरे ॥

ही जावजीशेठजींची प्रतिज्ञा अगदीं यथार्थ वाटते. 'निर्णयसागर'ची मालकी गेलीं शंभर वर्षें एका घराण्याकडे चालत आलेली असतांना-देखील राष्ट्रीय संस्था असें जें त्याचें गौरवपूर्वक वर्णन करावयाचें, तें त्याच्या कामगिरीच्या या अद्वितीय वैशिष्ट्यामुळें. जावजीशेठनीं ज्या वेळीं प्राचीन धार्मिक वाङ्मयाच्या प्रकाशनाला प्रारंभ केला, त्या वेळीं म. ज्योतिबा फुले यांच्या नेतृत्वाखालीं 'सत्यशोधक' समाजाची चळवळ सुरू झालेली होती; व 'दीनबंधु' सारखीं वृत्तपत्रें तिचा प्रचार जोरानें करीत होतीं. पण, जावजींची धर्मबुद्धि इतकी कांहीं खोल आणि व्यापक होती कीं, त्यांना जरी म. फुले यांच्या बहुजनसमाजाच्या उन्नतीविषयींच्या कळकळीबद्दल आदर होता, तरी त्यांनीं 'सत्यशोधक' समाजाच्या चळवळीमुळें आपलें मन यत्किंचितही कलुषित होऊं न देतां, वैदिक आणि पौराणिक, श्रौत आणि स्मार्त व दार्शनिक आणि वैज्ञानिक

संस्कृत वाङ्मयाच्या प्रकाशनाचा आपला क्रम अखंड चालू ठेवला. संस्कृत वाङ्मयाच्या अत्यंत शुद्ध आणि सुंदर मुद्रणाबद्दल कीलहॉर्न, जेकब, स्टीन, हिलेब्रांट, रेडहिल यांच्यासारख्या पाश्चात्य पंडितांनीं जीं स्तुतिसुमनें 'निर्णयसागर'वर मुक्तकंठानें उधळलेलीं आहेत, तीं जावजींनीं प्राचीन संस्कृत वाङ्मयाच्या उद्धारार्थ केलेल्या भगीरथ परिश्रमांची साक्ष देतात.

अशा या राष्ट्रीय मुद्रण-प्रकाशन संस्थेच्या शतसांवत्सरिक महोत्सवाच्या मंगल समयीं श्री. पु. बा. कुळकर्णी यांनीं लिहिलेल्या या ग्रंथाचें स्वागत मराठी वाचकवर्ग अगत्यानें करील, अशी मला खात्री वाटते. या ग्रंथाच्या रूपानें चौधरी घराण्याच्या तीन पिढ्यांनीं केलेल्या महान् सांस्कृतिक कार्याचा जो इतिहास त्यांनीं लोकांपुढें ठेवलेला आहे, तो आपल्या समाजाच्या सध्यांच्या संक्रमणावस्थेंत त्यांना खचित मार्गदर्शक वाटेल. शतकाचें आयुष्य पाहिलेल्या औद्योगिक संस्था आपल्या मराठी समाजांत बोटांवर मोजण्याइतक्यासुद्धां निघणार नाहींत. विशेषतः, एकाच घराण्यांतील स्त्री--पुरुषांनीं, प्रतिकूल परिस्थितींतही, चिकाटीनें आणि हिंमतीनें त्या चालविल्याचें 'निर्णयसागर'सारखें उदाहरण तर एकाद दुसरेंच आढळेल. आज धंद्यांतील वाढत्या स्पर्धेमुळें आणि त्याहीपेक्षां १९४० सालीं शेठ पांडुरंग जावजी यांच्या निधनानंतर खंबीर नेतृत्वाला मुकल्यामुळें 'निर्णयसागर'ला उतरती कळा लागलेली असून, त्याच्या संस्कृत आणि मराठी प्रकाशनांना सारखी वाढती मागणी असतांनादेखील, त्यांचें मुद्रण-प्रकाशनकार्य आर्थिक अडचणींमुळें मंदावल्यासारखें होऊन गेलेलें आहे. १९४० पासून गेलीं सत्तावीस वर्षें श्री. जिजाबाई, श्री. सत्यभामाबाई आणि श्री. लक्ष्मीबाई या चौधरी घराण्यांतील तीन महिलांनीं, वैधव्याच्या आपत्तीनें खचून न जातां, 'निर्णयसागर'चा कारभार, आपल्या कुवतीनुसार, दक्षतेनें चालवून, ही संस्था टिकविली, हें त्यांना भूषणास्पद आहे. पण, या संस्थेचें राष्ट्रीय कार्य आणि महत्त्व ध्यानांत घेऊन आतां महाराष्ट्र सरकारनें जर तिच्या कारभारांत कळकळीनें मन घातलें नाहीं, तर तिचें भवितव्य कठीण आहे. नाहीं तरी, सरकार आणि त्याच्या आश्रयानें चालणाऱ्या मराठी संशोधन मंडळ, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ यांच्यासारख्या संस्था यांना, जुन्या नव्या संस्कृत मराठी ग्रंथांचें मुद्रण-प्रकाशन करण्यासाठीं,

'निर्णयसागरा'सारख्या उत्कृष्ट मुद्रणालयाची गरज आहेच. मग, सरकारनें, आपलीं स्वतःचीं म्हणा, आपल्या आश्रित किंवा पुरस्कृत संस्थांचीं म्हणा आणि खुद्द 'निर्णयसागर'चींही म्हणा, प्रकाशनें काढण्यासाठीं त्याला आर्थिक सहाय्य करून, नव्या परिस्थितीला अनुरूप अशी त्याची पुनर्घटना कां करूं नये? कर्तव्य आणि व्यवहार या दोन्ही दृष्टींनीं विचार केला, तरी 'निर्णयसागर'ला सरकारनें मदत करणें अवश्य ठरतें. म्हणून, तशी सुबुद्धि आमच्या महाराष्ट्र सरकारला होवो आणि त्याच्या कृपाछत्राखालीं या राष्ट्रीय मुद्रण-प्रकाशन संस्थेचा उत्तरोत्तर उत्कर्ष होत जावो, अशी या मंगल समयीं भगवंताला माझी प्रार्थना आहे.

नागपूर,
वर्षप्रतिपदा,
ता. १० एप्रिल १९६७

ग. त्र्यं. माडखोलकर.

## पुरस्कार

शेठ जावजी दादाजी आणि निर्णयसागर हीं दोन नांवें साऱ्या दुनियेंत दुमदुमत राहिलेलीं आहेत. मी ज्यावेळीं 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' या माझ्या पुस्तकासाठीं तयारी करीत होतों, त्यावेळीं अव्वल इंग्रजींतील सर्व दुर्मिळ वाङ्मयाची माहिती अनेक ठिकाणच्या खाजगी आणि सार्वजनिक ग्रंथसंग्रहांत शोध करून जमा केली; त्यावेळीं जावजी दादाजी आणि राणूजी आरू यांच्या कामगिरीचें महत्त्व माझ्या ध्यानांत आलें. या दोन थोर व्यक्तींनीं मराठी देवनागरी अक्षरांचें जें अतिसुंदर आणि नयनमनोहर वळण जगापुढें आणलें, त्याला तोड नाहीं. निर्णयसागरची अक्षर-वाटिका पाहतांच जें नेत्रसुख मिळतें तें केवळ अवर्णनीय आहे. भारतांत आणि भारताबाहेर सर्वत्र याबद्दल एकमतानें निर्णयसागरची प्रशंसा होते.

याप्रकारचें महत्कार्य ज्यांच्या हातून घडलें, त्या दोन पुरुषांपैकीं एक जावजी दादाजी चौधरी यांच्या कामगिरीचें वर्णन करणारें विस्तृत चरित्र 'निर्णयसागर'च्या शताब्दिमहोत्सवाच्या निमित्तानें श्री. पु. बा. कुळकर्णी यांनीं लिहून तयार केलें. हें काम श्री. कुळकर्णी हे गेल्या दोन वर्षांपासून करीत आहेत. आणि आतां शताब्दिकाळीं त्यांनीं पूर्ण केलेला चरित्र-ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. या

चरित्रग्रंथाबद्दल अभिप्रायाचे चार शब्द मीं लिहावे अशी चालकांतर्फे मला थोड्या दिवसांपूर्वी विनंति करण्यांत आली. कै. विनायक कोंडदेव ओक यांनीं सुमारें साठ-सत्तर वर्षांपूर्वी लिहिलेलें जावजींचें छोटें चरित्र माझ्या संग्रहीं आहे. आतां श्री. कुळकर्णी यांनीं विस्तृत चरित्र लिहिलें आहे. तथापि आमच्याकडे चरित्रोपयोगी सामुग्री जपून ठेवण्याचा हव्यास नाहीं. त्यामुळें चरित्रकाराची फार कुचंबणा होते. तशीच श्री. कुलकर्णी यांची झाली असली पाहिजे. श्री. कुलकर्णी यांना जेवढी माहिती जमवितां आली ती जमवून जावजींनीं केलेल्या कामगिरीचा ठसा वाचकांच्या मनावर उठवण्याविषयीं चरित्रकारानें शक्य तो प्रयत्न केला आहे. आणि पुनरुक्तीचा दोष पत्करूनही वाचकांना चरित्राच्या निरनिराळ्या विभागांतून मागील आठवणी, संदर्भ न पाहतां कळतील अशी सोयही केली आहे.

ज्या काळांत जावजी उदयास आले, त्या काळांत आजच्यासारखा शिक्षणप्रसार झाला नव्हता. वृत्तपत्रें, मासिकें, ग्रंथ यांची संख्या फारच थोडी होती. छापखानेही थोडेच होते. मुद्रणकलेचा जन्म वस्तुतः चीनमध्यें झाला. चिनी लोक मूळ ग्रंथ लाकडी फळ्यांवर अक्षरें खोदून त्याच्या प्रति तयार करीत असत. या कलेला "झायलोग्राफ" असें म्हणतात. असे अनेक लाकडी ठोकळे आणि त्यांवरून छापलेले अनेक जुने ग्रंथ मी बाह्यमंगोलियांतील उलान-बातार येथील संग्रहालयांत पाहिले आहेत. तथापि या कलेचा उत्कर्ष निराळ्या रीतीनें जर्मनी, इंग्लंड वगैरे देशांत ४०० वर्षांपूर्वी झाला. आणि त्याच सुमारास प्रथम फिरंगी, मागाहून वलंदेज, फराशीस व इंग्रेज वगैरे युरोपियन लोक इकडे आल्यावर त्यांच्या मागोमाग त्यांचे छापखानेही आले. तथापि छापखाने आणि छापलेलीं पुस्तकें डोळ्यांसमोर असतांनाही इकडील ज्ञानवंतांनीं छापखाने सुरू करण्याचा किंवा पुस्तकें छापण्याचा अनेक शतकें कांहींच उपक्रम केला नाहीं.

एकोणिसाव्या ख्रिस्ती-शकाच्या प्रारंभीं खिळ्याचे ठोकळे बनवून भगवद्गीता छापण्याचा जो उद्योग महाराष्ट्रांत झाला, त्याची माहिती सदर चरित्रांत श्री. कुलकर्णी यांनीं दिली आहे. (पहा–'मुद्रणकलेचें महाराष्ट्रांत आगमन, पृष्ठ २६५ ते २७३) भगवद्गीतेचे हे खिळ्यांचे ठोकळे पुण्यास भारतइतिहास संशोधक मंडळाच्या संग्रहीं आहेत. आणि त्यांत कालाचा उल्लेख असलेला ठोकळाही आहे.

ज्ञानाचा संग्रह असलेले ग्रंथ जुनेनवे, पौर्वात्य आणि पाश्चिमात्य असे ठिकठिकाणाहून जमा करून त्यांचें प्रचंड ग्रंथालय स्थापन करणारा तंजावरचा महाराजा सरफोजी हाही महाराष्ट्रीयच होता. तथापि येथें अक्षरांचे खिळे तयार करण्याचा उद्योग करणारे युरोपियनच होते, आपल्या धर्मग्रंथाचा प्रचार करण्याची त्यांना फार कळकळ होती. त्यांच्या देशांत मुद्रणकलेचा आणि त्यामुळें होत असलेल्या ग्रंथप्रसाराचा त्यांस प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळें बंगाल्यांत डॉ. कॅरी अणि मुंबईंत थॉमस ग्रॅहॅम यांनीं खिळे तयार करण्याचा उद्योग भारतांत केला आणि जीवन लोहार आणि पंचानन कर्मकार असे कारागीर या कामांत तयार केले. जावजी दादाजी आणि राणूजी आरू हीं गरीब मुलें अशींच तयार झालीं. तो मनोरंजक वृत्तांत प्रस्तुतच्या चरित्रांत श्री. कुलकर्णी यांनीं जागजागीं सांगितलेला आहे. जावजींना थोडी अक्षर-ओळख असली तरी त्यांची गणना शिकलेल्यांत करतां येणार नाहीं; पण शिकलेल्यांनाही शिकण्या-शिकवण्याच्या कामीं जावजींचे श्रम किती कामीं आले, आणि निर्णयसागराच्या द्वारा जावजी—राणूजी या जोडीनें, या क्षेत्रांत आपलें नांव कसें अमर करून ठेवलें, याची कल्पना हें चरित्र वाचणारास आल्यावांचून राहणार नाहीं.

आपल्याकडे ग्रंथ हातानें लिहून ठेवीत असत आणि एकादा छापखाना मुंबईसारख्या ठिकाणीं जरी स्थापन झाला होता आणि ब्राह्मणांकडून लिहून घेतलेलें वनस्पतींचें वर्णन जरी हॉलंडमध्यें प्रतिमामुद्रित झालें होतें, तरीही ब्राह्मणांनीं या नवीन कलेला स्पर्श केला नाहीं. ते आपल्या सोंवळ्यांतच गुरफटून राहिले ! जुन्या काळीं "ऐसें कैसें रे सोंवळें, शिवतां होतसे ओवळें," असा श्रीतुकारामबुवांचा एक फटकारा त्यांनीं खाल्ला होता.

छापण्याच्या शाईंत चरबी वापरावी लागे, म्हणून आमच्या सोंवळ्या लोकांसाठीं जावजी प्रभृतींनीं मुद्दाम तुपाची छापण्याची शाई तयार केली. आणि अशा शाईनें छापलेल्या पुस्तकावर "तुपाच्या शाईनें छापलेलें" असा शेराही ते छापूं लागले, तेव्हां कोठें सोंवळ्या लोकांनीं भीत भीत छापील पुस्तकें हातांत घेतलीं. तरी पण छापण्यासाठीं जो कागद तयार करीत त्यामध्यें चिंध्यांचा लगदा वापरीत, म्हणूनही कित्येकांचें सोंवळें बिघडत असे, असें आम्हांस ठाऊक आहे.

आज आपण सर्रास छापील पुस्तकेंच वापरतों. तथापि शंभर वर्षांपूर्वी या प्रकरणीं परिस्थिति कशी होती, त्याचें चित्र वाचकांना या चरित्र-ग्रंथांत पहावयास मिळेल. खरें पाहतां सोंवळ्याची मूळ कल्पना कांहीं त्याज्य नाहीं. तिच्या बुडाशीं असलेलें तत्त्व ध्यानांत घेऊन तिचा समजुतीनें वापर केला पाहिजे.

युरोपियन जेथें जेथें गेले, तेथें तेथें त्यांनीं त्या त्या देशांतील लोकांच्या भाषा, रीतिरिवाज, वगैरेंची माहिती करून घेतली. या त्यांच्या जिज्ञासेमुळेंच अनेक अडचणींवर मात करून सर विल्यम जोन्स्‌सारखे किंवा डी. नोबिलीसारखे युरोपियन हे संस्कृत शिकले. आणि पुढें तर भट्ट मोक्षमुल्लर यांच्यासारख्यांनीं वेदांचा अभ्यास केला आणि वेदही छापले. उलट आमच्याकडे क्वचितच कोणा ब्राह्मणानें युरोपियन भाषांचा अभ्यास केला आणि एकाददुसराच विरळा ब्राह्मण युरोपांत गेला. परंतु तिकडील विद्या एकानेंही इकडे आणली नाहीं.

वास्तविक या देशांत चौदा किंवा अठरा विद्या आणि चौसष्ट कला यांचा हृदयंगम विकास झालेला होता. चौसष्ट कलांतच तक्षण ( सुतारी ), धातुवाद, वृक्षायुर्वेद, पुस्तकवाचन, देशभाषाज्ञान, पुष्पविद्या अशा शेंकडों गोष्टींचा अंतर्भाव झालेला दिसतो आणि अशा अनेक कलांत तयार असलेल्या स्त्रीपुरुषांच्या कथा आणि व्यवहार गुप्तकालीं चालू होते. नागरिकच काय पण वेश्याही त्याच्यांत प्रवीण होत्या, असें "चतुर्भाणि" वगैरे ग्रंथांवरून दिसून येतें. वात्स्यायनाच्या कामसूत्रांत अशा विषयांचा ऊहापोह आहे. यावरून ब्राह्मणांनीं सर्व विद्या चोरून ठेवल्या व इतरांना बंदी केली, या समजुतीस कांहीं आधार नाहीं. ब्राह्मणांनींही त्या विद्या टाकल्या असें दिसतें. ( सदर ग्रंथ पृष्ठ ८६ ) या विषयाचा प्रपंच करण्याचें हें स्थळ नाहीं; तथापि कुणी मर्मज्ञ आणि जिज्ञासु वाचक त्याचा अधिक खोलांत जाऊन अभ्यास करील, तर ब्राह्मणांकडे नेमका कोणता दोष जातो, तें त्याला हुडकून काढतां येईल.

जावजी दादाजी यांच्याही पूर्वी मुद्रणकलेच्या कार्यांत ज्यांनीं आपलें नांव गाजवलें, ते मुंबईचे प्रख्यात गणपत कृष्णाजी यांच्या चरित्राचें आणि कामगिरीचें वर्णनही श्री. कुलकर्णी यांनीं या ग्रंथांत दिलें आहे. आणि 'मुद्रणकला जन्म आणि विकास' असें एक पुरवणी प्रकरण या ग्रंथाला जोडलें आहे. आपल्या इकडील मुद्रणकला आणि त्याचें प्रकाशन याचा सविस्तर इतिहास तयार व्हावा

हें ग्रंथकर्त्याचें म्हणणें यथार्थ आहे आणि तसा कांहीं प्रयत्न या ग्रंथांत त्यांनीं केलाही आहे.

जावजींच्या चरित्राला शोभेल आणि अनेक प्रकारें जावजींच्या कर्तृत्वाशीं साम्य दाखवतां येईल, अशा एका कर्तबगार गृहस्थाचें नांव या प्रसंगीं घेणें आवश्यक आहे, असें आम्हांस वाटतें. त्या गृहस्थाचें नांव आबाजी रामचंद्र सावंत आणि यांच्या छापखान्याचें नांव "रामतत्त्वप्रकाश." महाराष्ट्राच्या दक्षिण सीमेवरील बेळगांव येथें आबाजी रामचंद्र यांनीं मराठी साहित्यप्रकाशनाचा केवढा प्रचंड उद्योग केला तो जिज्ञासूंनीं अभ्यासण्यासारखा आहे. शेंकडों ग्रंथ त्यांनीं प्रसिद्ध केले. अशा धार्मिक ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथ आबाजी रामचंद्र यांनींच पहिल्यांदा प्रसिद्ध केले. जावजी दादाजींच्या निर्णयसागरप्रमाणेंच आबाजींच्या पश्चात् त्यांचा प्रचंड उद्योग अधिक प्रचंड झाला नाहीं. त्यांचे चिरंजीव श्री. हणमंतराव वगैरे सुविद्य आहेत. त्यांचा भव्य प्रासाद बेळगांवांत आहे. देऊळ, गोशाळा वगैरे व्यापही त्यांनीं केला आणि आरंभींच्या काळांत छापलेलीं पुस्तकें बैलाच्या पाठीवर घालून गांवोगांव हिंडून त्याची विक्री त्यांनीं केली. आबाजी आणि जावजी यांचीं चरित्रें जोडीनें वाचल्यास तीं वाचकांना उद्बोधक झाल्याखेरीज राहणार नाहींत. आबाजींनीं कानडी-वाङ्मयाचीही सेवा केलेली आहे.

बालबोध, काव्यसंग्रह, काव्यमाला आणि इतिहाससंग्रह अशा चतुर्विध प्रकारांनीं जी महनीय सेवा निर्णयसागरनें केली, तसाच एक धाडसी उपक्रम ठाण्याचे कै. विनायकराव भावे यांनीं "महाराष्ट्र कवि" या मासिकाद्वारें केला. (पृष्ठ १४५) कै. पारसनीस हे तरुणपणीं 'महाराष्ट्र कोकिळ' या नांवाचें मासिक काढीत असत. (पृ. १५२) कै. रावबहादूर काशीनाथ नारायण साने आणि कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर या दोघांमध्यें जो मतभेद झाला, त्या प्रकरणीं विष्णुपंत चिपळूणकर यांना साने यांनीं लिहिलेलीं पत्रें आणि काव्येतिहाससंग्रहाच्या प्रकाशनाचा वृत्तांत प्रसिद्ध केलेला आहे. जावजी, त्यांचे चिरंजीव तुकारामशेट व त्यांच्या घरांतील धार्मिक स्त्रिया यांनीं केव्हांतरी तीर्थयात्रा केल्या असतील असा आमचा समज आहे. निदान त्यांच्या आप्तांनीं केल्या असतील. तेव्हां तीर्थोपाध्यायांच्या वह्यांतून कांहीं माहिती मिळण्याचा संभव आहे. तत्कालीन वृत्तपत्रांतूनही मृत्युलेख वगैरे आले

असतील, त्यांचाही शोध केला पाहिजे. सरकारी दप्तरखानाही–विशेषतः विद्याखात्याचा–धुंडाळला पाहिजे. त्यांतही कांहीं माहितीचे कण हाताला लागतील. त्यामुळें माहितींत भर घालतां येईल.

शताब्दीच्या निमित्तानें या चरित्रग्रंथाच्या रूपानें जावजींच्या महत्कार्याचें स्मरण करण्याला आतां प्रारंभ झाला आहे, असें आम्ही समजतों. निर्णयसागरला आलेली हल्लींची मरगळ सहज संपण्यासारखी आहे. निर्णयसागर संस्थेवर लोकांची इतकी अपार भक्ति आहे कीं, जनता त्या संस्थेला आपलीच समजते. तसें राष्ट्रीय रूप तिला येऊन सर्वांच्या सहकारानें निर्णयसागरचा कायाकल्प घडवून आणणें अवघड पडणार नाहीं. तसा तो घडून येवो आणि चालक, मालक, सरकार आणि जनता यांच्या प्रयत्नानें आणि कौशल्यानें तो घडून येईल, असा आम्हांला बळकट भरंवसा वाटतो. तसें व्हावें आणि नवजीवनानें संपन्न झालेला निर्णयसागर पुन्हां लोकसेवेच्या अग्रभागीं गेलेला दिसावा, अशी इच्छा प्रकट करून मी अल्पसें लेखन समाप्त करतों.

*१४-४-६७* *दत्तो वामन पोतदार*

## जागतिक कीर्तीच्या दोन माननीय पंडितांकडून
## निर्णयसागर-प्रशस्ति

कलकत्ता येथील डॉ. प्रो. सुनीतिकुमार चतर्जी व मद्रासचे डॉ. प्रो. व्ही. राघवन् ह्यांचें स्थान आजच्या संस्कृत-वाङ्मय-क्षेत्रांत बहुमानाचें व जागतिक कीर्तीचें आहे. निर्णयसागर मुद्रणालयाच्या शतसांवत्सरिक उत्सवानिमित्त त्यानीं त्या मुद्रणालयासंबंधानें व त्याच्या संस्थापकासंबंधीं दोन शब्द लिहावे, अशी विनंती करण्यांत आल्यावरून त्यानीं पाठविलेलीं दोन प्रशस्ति-पत्रें साभार प्रसिद्ध करण्यांत येत आहेत.

# Nirnaya Sagar Press

'A NATIONAL INSTITUTION'



*Dr. Sunitikumar Chatterji, Emeritus Professor of Comparative Philology, University of Calcutta, Chairman, Government of India Sanskrit Commission, 1956–1957; and President, Sanskrit Sahitya Parishad, Calcutta, writes:*

Dear Sri Kulkarni,

I am exceedingly happy to hear that the Centenary of the Nirnayasagar Press is going to be celebrated early next year (1967).

The Nirnayasagar Press has done inestimably valuable service for the spread and popularisation of Sanskrit literature by bringing out authoritative and beautifully-printed editions of Sanskrit classics and selling them at very cheap prices; thus enabling a dissemination of the main Sanskrit classics as well as works of lesser importance not only throughout the length and breadth of India but also the whole world, where Sanskrit is studied. The Press started as a commercial institution when it was founded by Javajee Dadajee, and its traditions were ably continued by his son Tukaram Javajee for a long number of years. There is hardly a single Sanskrit scholar in India and abroad who has not benefited by the most excellent editions published by the Nirnayasagar Press. One noteworthy thing about the Nirnayasagar Press publications is the beautiful Devanagari type in various founts in which these books were printed. All the works, both big and small, are really fine specimens of typographical artistry and some of the Nirnayasagar founts are almost at par with the magnificient Oxford fount which was based on the most beautiful Devanagari manuscripts from Banaras and Mathura and which Friedrich Maxmueller used in bringing out his *Editio Princeps* of the Rigveda Samhita with Sayana's commentary from the Oxford University in 1847 to 1870.

The Nirnayasagar Press has been to our mind not a mere business concern, but it dedicated itself to an idea and a cause the dissemination of Sanskrit learning as the greatest cultural heritage of India and also one of the great cultural, intellectual and spiritual heritages for the whole of humanity. There have been publications of Sanskrit works by various learned bodies like the Asiatic Society of Bengal, the Bhandarkar Oriental Research Institute of Poona, the Travancore Oriental Series and many more. But these were not commercial ventures, and to combine commerce with an idealism which found expression in actual production is rather rare. There have been other important houses in India which have specialised in Sanskrit publications, and their output has been also of the greatest value

for Sanskrit studies. But the Nirnayasagar Press stands unique in combining beauty and artistic printing in finely designed typography with scholarly editing, and in this way has raised high the reputation of India in the world of Sanskrit publications. The press still maintains its reputation as being one of the foremost in India. It has been unquestionably of the nature more of a *National Institution* than of a private business house. As such all Indian citizens who love books, and particularly books in Sanskrit, will hail with acclamation the achievement of the Nirnayasagar Press, and congratulate the press on its first Centenary; and I join with them in offering my hearty felicitations to the Nirnayasagar Press, with a hope that it will continue to do its great work with greater and still greater success in the decades, and, God willing, centuries to come.

Yours very sincerely,

*Sd/-*

(SUNITIKUMAR CHATTERJI)

# Nirnaya Sagar Press

## GREAT SERVICE RENDERED TO SANSKRIT EDUCATION



*Dr. V. Raghavan, Professor of Sanskrit, University of Madras, Member of the Sanskrit Commission appointed by the Government of India and of the Central Sanskrit Board of the Ministry of Education, President, 21st Session of the All-India Oriental Conference, Srinagar, writes:*

The Nirnayasagar Press, Bombay, occupies a unique position in the history of Sanskrit learning and education in this country. There had been efforts and organisations in different centres like Banaras and Calcutta for bringing into print Sanskrit Classics which had been preserved for long in manuscripts in paper and palm-leaf; but when we consider the stages of improvement

from the lithograph prints of the earliest stages in Banaras to the excellent and attractive editions of the Nirnayasagar Press, Bombay, one can realise the extent of advancement in the art of printing and the great facility and aid which the printed books gave to the spread of Sanskrit study, not only in the modern institutions,—schools, colleges and Universities—but also in the traditional Pathashalas and in the houses of Pandits. In fact, Sanskrit study and education in the classics of Sanskrit literature may be said to have grown with the publications of the Kavyamala and other Sanskrit works brought out by the Nirnayasagar Press.

The history of the Nirnayasagar Press and its Founder Jawji would read like a romance to those of this generation who do not know how that Press came to be founded. Jawji came of the humblest family which could afford no education and what he achieved contributed perhaps most significantly to the spread of knowledge in the three fields of Sanskrit, Marathi and Gujarati. He started life rubbing types for Rs. 2/- a month and became eventually the Founder-Proprietor of the most outstanding Devanagari Press of the country, having on its establishment 400 workers. With his experience in types and type-casting, Jawji founded a type foundry of his own in 1864 and five years later established the Nirnayasagar Press where he printed works with the types cast by him. As different from the Devanagari types of Uttar Pradesh and Bengal, those of Jawji's had a distinct character shape and beauty of their own in all the sizes and in Roman and Antique. These Nirnayasagar Publications—say of the Brahmasutras or of the Bhagavad Gita—with several commentaries and the series of diverse types used in them, with variations for text, quotations, pratikas, etc., had a distinct personality of their own with the text and commentaries clearly demarcated and the ink-impression very distinct and free from diffusion and the whole thing very pleasing to the eye and helpful to the mind of the reader.

Through the Kavyamala, both in its works-series and in the collection of minor works called *Guchchakas*, the Nirnayasagar Press had brought into print almost all the leading works in poetry, drama and criticism and had unearthed also many a rare minor work lying in manuscript collections in Jaipur, Tanjore and other centres. But for these publications, the knowledge of Sanskrit literature and its contributions, their variety, etc. would not have been realised by the scholars. The work of the Press became much enlarged by the anxiety of outside bodies and scholars desiring to take advantage of its excellent typography and getting their works printed at that Press, the most notable example of this being the Valmiki Ramayana and the Mahabharata of the Southern recension and works of Dvaita-Vedanta undertaken by the pioneers of Kumbhakonam who sought the help of the Nirnayasagar Press for their publications. Several Jain works were also brought out through the Nirnayasagar Press. In several Shastras, for a long time, the Nirnayasagar editions were the only ones available for teachers and students.

I have had occasions to come into close touch with the Nirnayasagar Press in the last two decades and to know the great difficulty in which it had to carry on. The Sanskrit Commission also visited the Press and on page 229 of their Report (1958) the Commission noted with regret the serious handicaps under which the great Sanskrit printers and publishers like the Nirnayasagar Press, Bombay were functioning.

Later I made a proposal to the National Book Trust of India when Dr. C. D. Deshmukh, himself a great lover of Sanskrit, was its Chairman that the Book Trust could not conceive of a greater service in the field of Sanskrit literature than extending substantial assistance to or devising some stable arrangement for the continuation of the Sanskrit publication work of the Nirnayasagar Press. Although Dr. Deshmukh realised the importance of this matter, he pointed out that the constitution of the National Book Trust did not allow any action on the

lines suggested by me. Subsequently I had occasion to mention the matter in the Central Sanskrit Board also.

In the last few years, the Central Sanskrit Board of the Ministry of Education has done laudable work in promoting Sanskrit on all possible lines, including publications. The Board has subsidised liberally the reprinting of out-of-print Sanskrit books which are of fundamental value. It would be a matter of great gratification to me and indeed to the entire world of Sanskrit scholars if the Central Sanskrit Board would consider the problems of the Nirnayasagar Press and enable it not only to publish new works but also to reprint many of its earlier publications which are now out of print. In fact, in the last 25 years the work of the Press had been almost at a standstill as they had not been able to bring out any new publications owing to financial difficulties. Not only for the spread of Sanskrit education and Sanskrit publications, but also as a measure of recognition of the great service which the Nirnayasagar Press has rendered to the above mentioned causes during the last one century, the Central Sanskrit Board may appoint a High Power Committee to consider the problems of the Nirnayasagar Press and make proposals to make its Sanskrit publication work viable and fruitful.

*Sd/-*

(DR. V. RAGHAVAN.)

४

# चरित्र–लेखकाचें निवेदन

**सुमारें** तीन वर्षांपूर्वी मी लिहिलेला 'मामा परमानंद आणि त्यांचा कालखंड' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्या ग्रंथाच्या प्रकाशन-समारंभप्रसंगीं निर्णयसागर मुद्रणालयाचे संस्थापक शेठ जावजी दादाजी चौधरी ह्यांचें विस्तृत चरित्र लिहिण्याची जबाबदारी मीं स्वीकाराची व १९६७ सालीं त्या मुद्रणालयाचा जो शताब्दि–महोत्सव साजरा केला जाईल, त्या सुमारास ह्या चरित्र--ग्रंथाचें प्रकाशन शक्य तों व्हावें, अशी अपेक्षा त्या मुद्रणालयाच्या चालकांतर्फे मराठी संशोधन मंडळाचे सध्यांचे डायरेक्टर डॉ. मालशे ह्यांच्यामार्फत जाहीर रीतीनें प्रकट करण्यांत आली.

अलीकडच्या काळांत मीं लिहिलेल्या चरित्र–ग्रंथांपैकीं 'ना. नाना शंकरशेट,' 'मामा परमानंद आणि त्यांचा कालखंड,' 'कादंबरीकार नाथमाधव,' 'आहारतज्ज्ञ काकासाहेब तांबे' व 'समाजसेवक दादासाहेब परुळेकर' वगैरे चरित्र-ग्रंथ त्या मुद्रणालयांत छापले गेल्यामुळें त्या मुद्रणालयाबद्दल सहाजिकच गेल्या सुमारें वीस वर्षांपासून माझ्या अंतःकरणांत प्रेमादराची व आपलेपणाची भावना वास करीत होती व ती उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेली. परंतु सुमारें ८०।९० वर्षांपूर्वीच्या काळांत मुद्रण–प्रकाशन क्षेत्रांत अलोट नि असामान्य कर्तृत्व गाजवून गेलेले त्या मुद्रणालयाचे संस्थापक जावजीशेठ ह्यांचें चरित्र लिहिण्याची जबाबदारी मला स्वीकारावी लागेल, अशी पुसट कल्पनाही माझ्या

*

मनांत कधीं आली नाहीं. परंतु योगायोग असा कीं, तुमच्या घ्यानींमनीं नसलेल्या जबाबदाऱ्या कधीं कधीं यदृच्छेनें तुम्हांला स्वीकाराव्या लागत असतात.

जावजीशेठ ह्यांच्यासारख्या शून्यांतून सर्वांना कल्याणप्रद होऊन रहाणारें विराट वाङ्मयीन-विश्व निर्माण करणाऱ्या थोर पुण्यपुरुषाच्या जीवनकार्याचा परिचय करून घेणें व इतरेजनांस तो करून देणें, ह्यासारखी मनाला सात्विक आनंद देणारी दुसरी कोणती गोष्ट असणार? त्याच भावनेनें मीं ती जबाबदारी स्वीकारली; परंतु नंतर आढळून आलें कीं, आरंभीं वाटलें होतें तेवढें हें कार्य सुलभ नाहीं.

शेंपाऊणशें वर्षांपूर्वीच्या काळांत आपल्या महाराष्ट्रांत जीं कर्तबगार माणसें होऊन गेलीं, त्यांच्याबद्दल आपणास कितीही आदरभाव वाटत असला, तरी अपुऱ्या साधनसामुग्रीच्या अभावीं त्यांच्या जीवनकार्याचे धागेदोरे नीट जुळवणें फार कठीण जात असतें. तत्कालीन पत्रव्यवहार, टांचणें, कात्रणें वगैरे संभाळून ठेवण्याचा प्रघात त्या काळीं तर मुळींच नव्हता. स्वतः चरित्र-नायक अशा बाबतींत उदासीन. आजूबाजूच्या मंडळींनीं तरी त्यासंबंधीं काळजी वहावयाची, परंतु त्यांनाही त्याचें अगत्य वाटत नसे.

जावजीशेठ ह्यांच्या निकट सहवासांत दीर्घकाळ असलेले तत्कालीन प्रसिद्ध लेखक विनायक कोंडदेव ओक ह्यांनीं जावजीशेठ ह्यांच्या निधनानंतर त्यांचें एक छोटेंसें चरित्र लिहिलें; परंतु माहितीच्या दृष्टीनें तें अगदींच तुटपुंजें होतें. विविधज्ञानविस्तारचे तत्कालीन विद्वान संपादक हरी माधव पंडित ह्यांनीं चरित्रलेखक विनायकराव ओक ह्यांच्याबद्दल जरूर तो आदरभाव प्रकट करून त्या तुटपुंजेपणाबद्दल त्या वेळीं कडक टीकाही केली होती. कसेंही असो; माहितीपूर्ण नसलें तरी त्या काळीं विनायकराव ओक ह्यांनीं चरित्रलेखनाची कामगिरी आपल्यामागील अनेक व्याप सांभाळून कशीबशी पार पाडली, ह्याबद्दल त्यांना द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच होतील. कारण शेठ जावजी दादाजी ह्यांच्या जीवनकार्याची व त्यांच्याठायीं असलेल्या बहुमोल गुणांची अल्प प्रमाणांत कां होईना, आम्हांला माहिती होणें, त्यामुळें शक्य झालें आहे.

जावजीशेठ ह्यांचा त्या काळीं निरनिराळ्या क्षेत्रांत वावरणाऱ्या अनेक विद्वानांशीं व शास्त्री-पंडितांशीं कार्यकारणपरत्वें संबंध आला. त्या मान्यांचेंच

वास्तव्य कांहीं मुंबईंत नव्हतें. त्यांच्याशीं पत्रव्यवहार करावा लागला असेलच. अशा पत्रव्यवहारापैकीं एकादें तरी पत्र उपलब्ध व्हावयाचें! देण्याघेण्याचे हिशेब ठेवण्यांत आले असतीलच. त्यांपैकीं कांहीं ना कांहीं हातीं लागणें जरूर होतें; परंतु कसून शोधतपास करूनही कांहीं सांपडूं शकलें नाहीं!

ह्या चरित्राला अत्यंत उपकारक ठरलेल्या एका बहुमोल साधनाचा उल्लेख येथें कृतज्ञतापूर्वक करणें जरूर आहे. जावजीशेठ ह्यांच्या निधनोत्तर सुमारें साठ वृत्तपत्रें, मासिकें नि इतर नियतकालिकांतून, त्यांच्यासंबंधीं लहान मोठे मृत्युलेख प्रसिद्ध झाले. मराठीप्रमाणेंच गुजराती, इंग्रजी ह्या भाषांतून प्रसिद्ध होणाऱ्या वृत्तपत्रांचा त्यांत समावेश करतां येईल. आज पाऊणशें वर्षांनंतर विविधज्ञानविस्तार, केसरी, ज्ञानप्रकाश, ह्यांसारखीं कांहीं फार थोडीं नियतकालिकें सोडलीं तर इतरांच्या फायली आज मिळविणें जवळजवळ अशक्यच.

महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार ह्यांनीं ह्या ग्रंथास लिहिलेल्या आपल्या पुरस्कारांत १।२ सूचना केल्या आहेत. त्या आचरणीय आहेत यांत शंका नाहीं. त्यांत तत्कालीन वृत्तपत्रांच्या फायली चाळून माहितीचे कांहीं कण सांपडल्यास पहावे, अशी एक सूचना आहे. सूचना ठीक आहे; परंतु ती आचरणांत आणण्यास तितकीच दुर्घट आहे. ती दुर्घट असली तरी ती लेखकाकडून शंभर टक्के आचरणांत आणण्यांत आलेली आहे, हें येथें नमूद करणें जरूर आहे. पाऊणशें वर्षांपूर्वीच्या वृत्तपत्रांच्या फायली कुठून उपलब्ध व्हायच्या? परंतु ह्या ठिकाणीं कृतज्ञतापूर्वक नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे शेठजींच्या निधनोत्तर ज्या निरनिराळ्या ६०।६५ नियतकालिकांतून त्यांच्यासंबंधीं लेख प्रसिद्ध झाले, त्या सर्वांचीं कात्रणें लेखकास उपलब्ध होऊं शकलीं व ह्या चरित्र-ग्रंथासाठीं त्यांचा शक्य तेवढा उपयोग करून घेतां आला.

हें कसें शक्य झालें? १८९२ सालीं जावजीशेठ निधन पावल्यानंतर निरनिराळ्या भाषांत प्रसिद्ध होणाऱ्या नियतकालिकांतून त्यांच्यासंबंधीं जे लहानमोठे लेख प्रसिद्ध झाले, त्या सर्वांचीं कात्रणें जमवून ठेवण्याचा स्तुत्य उपक्रम त्यांचे पितृभक्त चिरंजीव तुकारामशेठ ह्यांनीं काळजीपूर्वक चालू ठेविला होता. जावजीशेठ ह्यांच्या निधनानंतर सुमारें सतरा वर्षांनीं (१९०९) तुकारामशेठजींनीं तो सर्व बहुमोल कात्रण-संग्रह

'जावजी–कीर्ति–प्रकाश' ह्या नांवानें पुस्तकरूपानें, वि. कों. ओक ह्यांच्या प्रस्तावनेसह प्रसिद्ध केला. सध्यांच्या काळाच्या व चरित्र–लेखनाच्या दृष्टीनें पहातां पितृ–ऋण फेडण्याचा हा महत्तम मार्ग होय. त्या काळीं त्यांनीं जाणीवपूर्वक प्रसिद्ध केलेल्या त्या प्रकाशनाचा प्रस्तुत लेखकास फार उपयोग झाला, हें येथें कृतज्ञतापूर्वक नमूद करणें जरूर आहे.

त्याचबरोबर दुसऱ्या एका घटनेचाही उल्लेख करणें जरूर आहे. निर्णयसागर मुद्रणालयाच्या संस्थापकाचें त्याच मुद्रणालयानें प्रसिद्ध केलेलें हें एक महत्त्वाचें प्रकाशन. चरित्र–लेखनकार्यांत त्याची जरूरी फार होती. त्या प्रकाशनाची एकादी प्रत हातीं लागावी ह्या हेतूनें मुद्रणालयांतील सारीं कपाटें धुंडाळूनही ती उपलब्ध होऊं शकली नाहीं! मग ती मिळाली कुठें? मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या ग्रंथ–भांडारांत!

ह्याच नव्हे तर विविध प्रकारें ह्या ग्रंथसंग्रहालय संस्थेचा लेखकास उपयोग झाला व तेथील सारे कर्मचारी आत्यंतिक सौजन्यानें वागले. आरंभ-काळांत कांहीं महिने ह्या ग्रंथाचें लेखन संग्रहालयाच्या छत्राखालीं (ठाकूरद्वार-शाखा) शांतपणें चालू ठेवतां आलें. संग्रहालयचालकांच्या ह्या सौजन्याबद्दल नि प्रेमळ सहकाराबद्दल त्यांना कितीही धन्यवाद दिले तरी ते थोडेच होतील.

जावजीशेठ ह्यांच्या जीवनकार्यासंबंधीं ज्या ज्या मार्गांनीं माहिती मिळविणें जरूर होतें ते सर्व मार्ग चोखाळण्यांत आले आहेत. जावजीशेठ स्वतःसंबंधीं चुकूनही कधीं कोणाजवळ बोलत नसत. त्या बाबतींत त्यांना बोलकें करण्याचा कोणीं प्रयत्न केला तर 'त्यांत सांगण्यासारखें काय आहे' असें म्हणून ते उडवाउडवीचीं उत्तरें देत असत. त्या काळीं पुणें येथें 'ज्ञानचक्षु' ह्या नांवाचें एक नियतकालिक निघत असे. त्याचे संपादक चौकस नि व्यक्तिमाहात्म्याचे पुरस्कर्ते होते. मधून मधून कर्तबगार व्यक्तींचा परिचय करून घेण्याचा व देण्याचा त्यांचा परिपाठ होता. त्यांनीं जावजीशेठ ह्यांना भेटून मोठ्या शिकस्तीच्या प्रयत्नांनीं त्यांच्याकडून कांहीं माहिती मिळविली व शेठजींच्या निधनोत्तर ती आपल्या पत्राच्या ता. १६ एप्रील १८९२ च्या अंकांत प्रसिद्ध केली. प्रस्तुत लेखकास त्या माहितीचा फार चांगला उपयोग झालेला आहे. अशा रीतीनें अनेकांचें ऋण लेखकाच्या शिरावर आहे.

जावजीशेठ ह्यांच्या जीवनकार्याकडे वर वर नजर टाकणाऱ्यासही असें आढळून येईल कीं, त्यांनीं विशेषतः महाराष्ट्राच्या मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांत उज्ज्वल नि संस्मरणीय इतिहास घडविला आहे. केवळ महाराष्ट्राच्या दृष्टीनें पहातां त्या राष्ट्रोपयोगी क्षेत्रांत प्रथम पाऊल कोणीं टाकिलें व मुद्रण-प्रकाशनाचा मार्ग कोणीं मोकळा केला; त्याचप्रमाणें जावजीशेठजींच्या नंतरच्या काळांत त्या क्षेत्रांत कसकशी प्रगति होत गेली व त्यांत कोणीं कसकसा भाग घेतला, ह्याकडेही दृष्टिक्षेप टाकावा असें सहाजिकच वाटलें. त्यामुळें पहिले कर्तबगार महाराष्ट्रीय मुद्रक-प्रकाशक गणपत कृष्णाजी पाटील ह्यांच्या जीवनकार्याकडे लक्ष पुरविणें जरूर वाटलें. त्याचबरोबर जावजीशेठजींच्या नंतरच्या काळांत मुद्रण-प्रकाशन क्षेत्राला कसकशी उन्नतदशा प्राप्त होत गेली, ह्याचेंही पुसट कां होईना, वाचकांपुढें शब्दचित्र ठेवावें असें वाटूं लागलें; आणि त्यामुळें जावजीशेठ ह्यांच्या चरित्राला जोडून, तत्पूर्वीच्या व तदनंतरच्या काळांत प्रवेश करण्याचें धाडस पतकरावें असें वाटलें. व कांहीं ठिकाणीं द्विरुक्तीचा दोष पतकरूनही ह्या ग्रंथास ती जोड यथाशक्ति करून देण्यांत आली आहे. हा द्विरुक्तीचा दोष जाणीवपूर्वक पतकरण्यांत आला आहे.

हें धाडस पतकरण्याचें कारण एकच आहे. सर्व बाजूंनीं विचार करतां महाराष्ट्रांतील मुद्रण-प्रकाशन कार्याचा सुमारें गेल्या दीडशें वर्षांचा संगतवार इतिहास लिहिला जाणें अत्यंत जरूर आहे असें लेखकास तीव्रतेनें वाटतें. लेखकाचा हा प्रस्तुत प्रयत्न अगदींच तुटपुंजा असला, तरी त्या मार्गानें जो कोणी पावलें टाकील, त्याला सहाय्यभूत होऊन त्याचें मार्गदर्शन करणारा नि प्रेरक ठरणारा आहे, असें वाटतें.

जनतेच्या सर्वांगीण उन्नतीस कारणीभूत होऊन तिला पोषक ठरणारे कांहीं व्यवसाय असतात. त्यांत मुद्रण-प्रकाशन व्यवसायाला महत्त्वाचें स्थान आहे. परंतु ह्या व्यवसायाला जसें सुसंघटित नि सुफलदायी स्वरूप आलें पाहिजे, तसें तें अद्याप आलेलें दिसत नाहीं. ग्रंथ-प्रकाशन वेगांत चालू असलें तरी ग्रंथांच्या किंमती सर्वसाधारण वाचकांस परवडणाऱ्या असण्याऐवजीं त्यांचाही वेग भरघोस वाढत चाललेला आहे. मराठी वाचकवर्गांत कोणताही ग्रंथ विकत घेऊन वाचण्याची प्रवृत्ति अगोदर फार कमी. त्याला कारणें अनेक असूं शकतील.

त्यांतच सार्वत्रिक महर्घतेची भर पडून प्रकाशकांस उत्तरोत्तर ग्रंथांच्या किंमतींत वाढ करावी लागत आहे. ह्याला आळा बसून ग्रंथांच्या किंमती सर्वसाधारण जनतेच्या खिशास परवडणाऱ्या कशा रीतीनें ठेवतां येतील, ह्याचा साकल्यानें विचार होणें अत्यंत जरूर आहे. उत्तरोत्तर वाचनाची आवड वाढत चालली आहे; परंतु पुस्तकांच्या किंमती आटोक्याबाहेर वाढत चालल्यामुळें पुस्तक विकत घेऊन वाचणें निदान मध्यमवर्गीयांस आज फार जड वाटूं लागलें आहे.

मुंबईंतील कांहीं पुस्तकविक्रेत्यांनीं व प्रकाशकांनीं 'ग्रंथप्रसार-केंद्र' ह्या नांवाची एक उपयुक्त संस्था स्थापन करून तिच्यामार्फत ठिकठिकाणीं पुस्तकांचीं प्रदर्शनें भरविण्याचा अत्यंत स्तुत्य उपक्रम सुरू केला आहे. त्यामुळें ग्रंथप्रेमी लोकांस ग्रंथ डोळे भरून पहाण्याची सोय झाली आहे; परंतु पुस्तकांच्या किंमतीकडे नजर फिरविली असतां त्यांच्यावर डोळे गरगर फिरण्याची पाळी येत असते! वाचकांची आवडनिवड नि किंमतीसंबंधानें लोकमत समजून यावें, ह्यासाठीं त्या केंद्रातर्फे एक प्रश्नमालिकाही तयार करण्यांत आली आहे. हातीं आलेल्या त्या प्रश्नांच्या उत्तरांवर नजर टाकतां पुस्तकांच्या किंमती बिलकूल परवडण्यासारख्या नसल्यामुळें इच्छा बलवत्तर असूनही पुस्तक विकत घेणें परवडत नाहीं, हेंच शेंकडा ९०।९५ वाचकांकडून उत्तर मिळालें आहे.

मुद्रक-प्रकाशकांच्याही मार्गांत तशाच दुर्लंघ्य अडचणी आहेत. आपल्या प्रकाशनांची किंमत शक्य तेवढी कमींत कमी ठेवल्यानें त्यांची जास्त प्रमाणांत विक्री होऊन गुंतवलेलें भांडवल लवकर रिकामें होईल, हें न समजणारा प्रकाशक विरळा. परंतु त्याचबरोबर किंमतीचें प्रमाण खालीं कशा रीतीनें आणतां येईल, ह्याचा विचार होणें जरूर आहे. सरकारनें ह्या प्रश्नाचें महत्त्व ओळखून मुद्रक नि प्रकाशक ह्यांना जरूर त्या सवलती देण्याचें आपलें कर्तव्य ओळखलें पाहिजे. संस्कृति-संवर्धक, सात्त्विक मनोरंजन करून इष्ट परिणाम घडवून आणणाऱ्या नाटकांना किंवा बोलपटांना आपलें सरकार करमणूक कर–माफी किंवा इतर सवलती देतें, त्याचप्रमाणें उपयुक्त व संस्कृति–संवर्धक ग्रंथ प्रसिद्ध करणाऱ्या मुद्रक–प्रकाशकांस शक्य नि जरूर त्या सवलती कां देण्यांत येऊं नयेत?

जावजीशेठ ह्यांचा काळ व सध्यांचा काळ ह्यांमध्यें केवढें तरी स्थित्यंतर घडून आलेलें आहे. त्या काळांत त्यांनीं जाणीवपूर्वक पुस्तकांच्या किंमती कमीत

कमी ठेविल्या. त्यांत आतां थोडी थोडकी नाहीं तर १०।१५ पटींनीं वाढ झालेली आहे. त्या स्वस्ताईच्या व कमी किंमती ठेवणें परवडणाऱ्या काळांतही ग्रंथप्रसार जास्तींत जास्त प्रमाणांत झाला पाहिजे, आपलीं प्रकाशनें बहुजन-समाजाच्या हातीं पडलीं पाहिजेत नि ज्ञानप्रसारकार्याला आपला जास्तींत जास्त हातभार लागला पाहिजे, हें ध्येय सतत दृष्टीपुढें ठेवून नि मुद्रणालयांतील कामगारांचाही सहकार संपादन करून जावजीशेठ आपल्याकडील प्रकाशनांच्या किंमती कमींत कमी कशा ठेवतां येतील, ह्याची चिंता सतत वहात असत. आजच्या काळांतील मुद्रक–प्रकाशकांनीं काय करावें, हें सांगण्याचा अधिकार लेखकास नसला तरी सरकार, मालक, कामगार नि दुकानदार ह्या सर्वांनीं ह्या महत्त्वाच्या प्रश्नाकडे जास्तींत जास्त लक्ष पुरवून तो सहानुभूतिपूर्वक सोडविण्याची वेळ आतां आलेली आहे, असें मात्र वाटल्याशिवाय रहात नाहीं.

ह्या ग्रंथाच्या तयारींत असतां मुंबई व पुणें येथील ज्या ज्या मुद्रक–प्रकाशकांशीं मी संबंध जोडूं शकलों, त्या सर्वांनीं माझ्यावर सौजन्याचा वर्षाव केला. त्यावरून जावजीशेठ ह्यांच्याबद्दल आज शेंपाऊणशें वर्षांनंतरही सर्वांच्या अंतःकरणांत किती प्रेमादरभाव वास करीत आहे, ह्याची सहज कल्पना करतां आली. जावजीशेठ ह्यांचें मुद्रण–प्रकाशन क्षेत्रांतील कार्य अमर तसेंच अविस्मरणीय आहे. जनता आजही त्यांचें स्मरण अत्यंत कृतज्ञतापूर्वक करूं शकते, ह्यांतच त्यांच्या जीवनकार्याची थोरवी आहे. ह्या ग्रंथामुळें त्या थोरवींत अल्प प्रमाणांत जरी भर पडली, तरी लेखक स्वतःला धन्य समजेल.

जावजीशेठ ह्यांच्यासारख्या पुण्यशील पुरुषाच्या जीवन–कार्याशीं समरस होण्याची सुसंधी मिळणें ही साधी का गोष्ट आहे ? तो पूर्वपुण्याईचा एक भाग आहे अशी लेखकाची धारणा आहे. गेलीं दोन अडीच वर्षें ह्या ग्रंथ-रचनेच्या कार्यांत असतां लेखकास जो सात्त्विक आनंद व जें समाधान वेळोवेळीं मिळत गेलें, त्याच्या गोड स्मृति लेखकाच्या अंतःकरणांत दीर्घकाळ रेंगाळत रहातील. तेंच त्यांचें पारितोषिक.

ईश्वराच्या मनांतून एकादें सत्कार्य घडवून आणायचें असलें, म्हणजे तो कोणाला ना कोणाला निमित्तमात्र करीत असतो. निर्णयसागर मुद्रणालयाचे सध्यांचे उत्साही व्यवस्थापक पांडुरंगराव मोरे ह्यांना जावजीशेठजींचें चरित्र

आहे. ह्या कार्यांत असतां मला श्री. हरीभाऊ मोटे ह्यांच्या सौजन्याचा व मित्रप्रेमाचा भरपूर लाभ झाला. त्यांचे आभार मानून मोकळे होण्यापेक्षां त्या ऋण–भारांत सदैव रहाणें मी पसंत करतों. सदाशिवराव मोडक हे माझे फार जुने स्नेही. त्यांचाही सहकार व त्यांनीं वेळोवेळीं दिलेलें उत्तेजन हातांतील कार्यास पोषक ठरलें आहे. असा किती स्नेह्यांच्या नांवांचा उल्लेख करावा ?

गजाननराव ऊर्फ भाऊसाहेब माडखोलकर ह्यांचा नि माझा स्नेहसंबंध फार जुना व जिव्हाळ्याचा असला, तरी त्यांनीं ह्या चरित्र–ग्रंथास प्रस्तावना लिहावी असें मला वाटण्याचें मुख्य कारण म्हणजे शेंपाऊणशें वर्षांपूर्वीच्या काळांत आपल्या महाराष्ट्रांत जी थोर नि कर्तबगार माणसें होऊन गेलीं, त्यांच्या कर्तबगारीकडे पहाण्याचा त्यांचा असा जो विशिष्ट दृष्टिकोन आहे, त्याच्याशीं मी संपूर्णपणें सहमत असल्यामुळें प्रस्तावनेचा प्रश्न पुढें आला तेव्हां प्रथम मला त्यांची आठवण झाली. ह्या कार्यांतील माझे एक स्नेही–सल्लागार हरीभाऊ मोटे ह्यांच्यापुढें तें नांव ठेवतांच त्यांनींही त्याला विनदिक्कतपणें संमति दिली. आमच्या अपेक्षेप्रमाणें भाऊसाहेब माडखोलकर ह्यांनीं विद्वत्ताप्रचुर नि ग्रंथाच्या उपयुक्ततेंत भर घालून त्याला शोभा आणणारी प्रस्तावना लिहिली, ह्याबद्दल त्यांचे आभार कोणत्या शब्दांनीं मानावे हें समजत नाहीं.

त्याचप्रमाणें महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार ह्यांनीं अत्यंत अल्प वेळांत ह्या ग्रंथाला पुरस्कार लिहून लेखक–प्रकाशकांस ऋणी करून ठेविलें आहे. कलकत्त्याचे डॉ. सुनीतिकुमार चतर्जी व मद्रासचे डॉ. व्ही. राघवन् ह्यांनीं माझ्या विनंतीस मान देऊन निर्णयसागर मुद्रणालय व त्याचे संस्थापक ह्यांच्याबद्दल वाटणारा आदरभाव खुल्या अंतःकरणानें प्रकट केला. त्यांच्या अभिप्रायांचें मौलिकत्व शब्दांनीं व्यक्त करण्यासारखें नाहीं. त्यांनीं ज्या शुभकामना प्रकट केल्या आहेत, त्या फळास याव्या हीच प्रार्थना.

माझे दीर्घकालीन मित्र अ. का. प्रियोळकर व बापूराव नाईक ह्यांनीं लिहिलेल्या 'Printing Press in India' व 'Typography of Devanagari' ह्या दोन्ही ग्रंथांचा प्रस्तुत ग्रंथलेखनांत मला फार उपयोग झाला. शिवाय अन्य प्रकारेंही त्यांच्याकडून जरूर तो सहकार मला मिळाला. बापूराव नाईक ह्यांच्या सौजन्यामुळें ह्या ग्रंथांत प्रसिद्ध होणारे टाईपांसंबंधींचे

लिहिलें गेलें पाहिजे, अशी प्रेरणा पांडुरंगानें दिली. ती प्रेरणा साधीसुधी नव्हती. ती जाज्वल्य स्वरूपाची होती. ती त्यांना स्वस्थ वसूं देईना. "मामा परमानंद आणि त्यांचा कालखंड" हा ग्रंथ त्यांच्याच मुद्रणालयांतून बाहेर पडतांच विशेषतः त्या काळांत व्यवस्थापक ह्या नात्यानें अनेक अडचणी व संकटें ह्यांस त्यांना तोंड द्यावें लागत असतांही चरित्रलेखनाची जबाबदारी त्यांनीं प्रस्तुत लेखकावर विश्वासपूर्वक व आग्रहपूर्वक सोंपविली. ती टाळतां येण्यासारखी नव्हती. ती मीं आनंदानें स्वीकारली. त्यानंतरच्या काळांत श्री. मोरे ह्यांनीं स्वतःच्या मार्गांत अडचणींचे डोंगर उभे असले तरी माझ्या मार्गांत कोणतीही अडचण येऊं नये, ह्याबद्दल वेळोवेळीं जी दक्षता घेतली व जो आपलेपणा प्रकट केला, त्याचा विसर लेखकास कधींही पडणार नाहीं. ह्या चरित्राचा लेखक मी असलों तरी ज्या स्वरूपांत तें आज वाचकांच्या समोर येत आहे, त्याचे कर्तेकरविते श्री. मोरे हे आहेत, एवढें सांगितलें म्हणजे पुरेसें आहे. ही जबाबदारी माझ्यावर विश्वासपूर्वक सोंपवून ती पार पडेपर्यंत त्यांनीं जो उत्साह प्रकट केला, त्याबद्दल ते सर्वांच्या धन्यवादास पात्र होऊन रहातील. त्यांच्याकडून हें एक उपयुक्त पुण्यकार्य घडलें आहे, असें लेखक समजतो.

ह्या ग्रंथांत कांहीं निवडक मुद्रक–प्रकाशकांचा परिचय करून देण्यांत आलेला आहे. त्या बाबतींत जरूर तो खुलासा पान ३३४–३३५ वर करण्यांत आलेला आहेच. ह्या कार्यांत ज्या ज्या मुद्रक–प्रकाशकांनीं माहिती पुरविण्याच्या दृष्टीनें लेखकास जरूर तो सहकार दिला, त्याबद्दल त्यांना कृतज्ञतापूर्वक धन्यवाद.

आज लेखकाच्या दृष्टीसमोर असे अनेक कर्तबगार मुद्रक–प्रकाशक आहेत कीं, त्यांच्या ह्या क्षेत्रांतील कर्तबगारीचा व त्यांच्या अडीअडचणींचा परिचय करून देणें जरूर आहे. ती उणीव दूर करण्याची सुसंधी ह्यानंतरच्या काळांत लेखकाच्या वांट्यास कधीं ना कधीं येईलच.

चरित्रलेखनाचें कार्य चालू असतां अनेक सुहृद्–मित्रांनीं लेखकास परोपरीनें सहाय्य केलें. कोणीं प्रोत्साहन दिलें, कोणीं फोटो मिळवून दिले, तर कोणीं जरूर त्या साधनसामुग्रीकडे बोट दाखविलें. लेखक त्या सर्वांचा ऋणी

आहे. ह्या कार्यांत असतां मला श्री. हरीभाऊ मोटे ह्यांच्या सौजन्याचा व मित्रप्रेमाचा भरपूर लाभ झाला. त्यांचे आभार मानून मोकळे होण्यापेक्षां त्या ऋण–भारांत सदैव रहाणें मी पसंत करतों. सदाशिवराव मोडक हे माझे फार जुने स्नेही. त्यांचाही सहकार व त्यांनीं वेळोवेळीं दिलेलें उत्तेजन हातांतील कार्यास पोषक ठरलें आहे. असा किती स्नेह्यांच्या नांवांचा उल्लेख करावा ?

गजाननराव ऊर्फ भाऊसाहेब माडखोलकर ह्यांचा नि माझा स्नेहसंबंध फार जुना व जिव्हाळ्याचा असला, तरी त्यांनीं ह्या चरित्र–ग्रंथास प्रस्तावना लिहावी असें मला वाटण्याचें मुख्य कारण म्हणजे शेंपाऊणशें वर्षांपूर्वीच्या काळांत आपल्या महाराष्ट्रांत जीं थोर नि कर्तबगार माणसें होऊन गेलीं, त्यांच्या कर्तबगारीकडे पहाण्याचा त्यांचा असा जो विशिष्ट दृष्टिकोन आहे, त्याच्याशीं मी संपूर्णपणें सहमत असल्यामुळें प्रस्तावनेचा प्रश्न पुढें आला तेव्हां प्रथम मला त्यांची आठवण झाली. ह्या कार्यांतील माझे एक स्नेही–सल्लागार हरीभाऊ मोटे ह्यांच्यापुढें तें नांव ठेवतांच त्यांनींही त्याला विनदिक्कतपणें संमति दिली. आमच्या अपेक्षेप्रमाणें भाऊसाहेब माडखोलकर ह्यांनीं विद्वत्ताप्रचुर नि ग्रंथाच्या उपयुक्ततेंत भर घालून त्याला शोभा आणणारी प्रस्तावना लिहिली, ह्याबद्दल त्यांचे आभार कोणत्या शब्दांनीं मानावे हें समजत नाहीं.

त्याचप्रमाणें महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार ह्यांनीं अत्यंत अल्प वेळांत ह्या ग्रंथाला पुरस्कार लिहून लेखक–प्रकाशकांस ऋणी करून ठेविलें आहे. कलकत्याचे डॉ. सुनीतिकुमार चतर्जी व मद्रासचे डॉ. व्ही. राघवन् ह्यांनीं माझ्या विनंतीस मान देऊन निर्णयसागर मुद्रणालय व त्याचे संस्थापक ह्यांच्याबद्दल वाटणारा आदरभाव खुल्या अंतःकरणानें प्रकट केला. त्यांच्या अभिप्रायांचें मौलिकत्व शब्दांनीं व्यक्त करण्यासारखें नाहीं. त्यांनीं ज्या शुभकामना प्रकट केल्या आहेत, त्या फळास याव्या हीच प्रार्थना.

माझे दीर्घकालीन मित्र अ. का. प्रियोळकर व बापूराव नाईक ह्यांनीं लिहिलेल्या 'Printing Press in India' व 'Typography of Devanagari' ह्या दोन्ही ग्रंथांचा प्रस्तुत ग्रंथलेखनांत मला फार उपयोग झाला. शिवाय अन्य प्रकारेंही त्यांच्याकडून जरूर तो सहकार मला मिळाला. बापूराव नाईक ह्यांच्या सौजन्यामुळें ह्या ग्रंथांत प्रसिद्ध होणारे टाईपांसंबंधींचे

ब्लॉक्स् सहज व जरूर तेव्हां मिळूं शकले, ह्याबद्दल त्यांचे कितीही आभार मानले तरी ते थोडेच होतील.

शेठ जावजी दादाजी ह्यांच्या चरित्राचें प्रकाशन हा लवकरच होणाऱ्या निर्णयसागर-मुद्रणालय शताब्दिमहोत्सवाचा एक महत्त्वाचा भाग आहे. ह्या शताब्दिमहोत्सवाचा कार्यक्रम संस्थापकांच्या थोर कर्तृत्वास साजेशा सुंदर नि भव्य प्रकारें साजरा व्हावा, ह्यासाठीं बापूराव नाईक हे आरंभापासून मोठ्या उत्साहानें जाणीवपूर्वक नि कर्तव्यबुद्धीनें झटत आहेत. त्यांनीं स्वयंस्फूर्तीनें ही जबाबदारी शिरावर घेतली असून त्या कार्यांत ईश्वर त्यांना भरघोस सुयश देवो, हीच माझी प्रार्थना आहे.

निर्णयसागर मुद्रणालय ही एक थोर राष्ट्रीय संस्था आहे. ज्यांनीं तिची स्थापना करून विपरीत काळांत राष्ट्रोपयोगी वाङ्मयीन कार्य पार पाडिलें, त्यांचें सुयोग्य स्मारक होण्याची आवश्यकता इतर अनेकांप्रमाणें बापूरावांस तीव्रतेनें वाटते. त्यासंबंधीं त्यांचे जरूर ते प्रयत्न चालू आहेत. औरंगाबाद येथें भरलेल्या मुद्रक-परिषदेंत ह्या बाबतींत विचारविनिमय होऊन शेठ जावजी दादाजी ह्यांच्या नांवें एक मुद्रणसंबंधीं वस्तु-संग्रहालय स्थापन करण्याचें ठरलें आहे. जावजी शेठ ह्यांची मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांतील भव्य राष्ट्रीय कामगिरी लक्षांत घेऊन त्या वस्तुसंग्रहालयासाठीं, सध्यां सरकारकडून चर्नीरोडवर बांधल्या जाणाऱ्या मध्यवर्ती मुद्रणालयाच्या इमारतींत पांच हजार चौरस फूट जागा देण्याचें आपल्या महाराष्ट्र सरकारनें ठरविलें आहे, ही खरोखर मोठी समाधानाची घटना आहे. याबद्दल महाराष्ट्र सरकारला धन्यवाद. ही स्तुत्य नि उपयुक्त घटना घडून यावी, ह्यासाठीं बापूरावांनीं व त्यांच्या इतर सहकाऱ्यांनीं फार मोलाची नि उपकारक कामगिरी बजाविली आहे, हें येथें नमूद करणें जरूर आहे.

निर्णयसागर मुद्रणालयाचे दीर्घकालीन ऋणानुबंधी नि आमचे स्नेही वे. शा. सं. ज्योतिर्विद् कृष्णाजी विठ्ठल सोमणशास्त्री ह्यांचें ह्या ग्रंथाकडे आरंभापासून शेवटपर्यंत सतत बारकाईनें लक्ष होतें. त्यांनीं कितीतरी उपयुक्त नि आचरणीय सूचना केल्या व हा ग्रंथ शक्य तेवढ्या शुद्धस्वरूपांत प्रसिद्ध व्हावा, ह्यासाठीं ते

मनोभावें झटले. त्यांचें हें ऋण कधींही न फिटणारें व शब्दातीत आहे. त्यांचा गोड नि उपकारक सहकार अखंड लाभो, हीच ईशचरणीं प्रार्थना.

निर्णयसागर मुद्रणालय व टाईप फाऊंड्री ह्यांच्या संस्थापकांबद्दल तेथील सर्व कर्मचाऱ्यांना व कामगारांना आत्यंतिक आदरभाव वाटत असतो. ही प्रेमादरभावना वरपासून खालपर्यंत अखंड चालत आलेली आहे. त्यामुळें सर्वांनीं ह्या ग्रंथ–कार्याला मोठ्या आपुलकीनें नि आदरानें हातभार लावला. ह्याबद्दल त्या सर्वांचा लेखक अत्यंत आभारी आहे.

मुंबई, ता. १० जून १९६७ पु. वा. कुळकर्णी

ॐ

# अनुक्रमणिका

म्हणजे विद्वानांच्या बैठकीचें नि विचारविनिमयाचें स्थान ४५, सज्जन नि विद्वान सहवासाचा इष्ट परिणाम ४६, मराठी भाषेबद्दल जळजळीत अभिमान, तत्कालीन प्रमुख लेखकांची हाकाटी ४७, जावजीशेठ ह्यांचा संपूर्ण सहकार नि त्याचें गोड फळ ४८, प्रकाशनकार्याबद्दल जावजीशेठ यांची दृष्टि; वि. कों. ओकांचा एक उपक्रम, शालोपयोगी क्रमिक पुस्तकांचें प्रकाशन ४९, निर्णयसागर क्रमिक पुस्तकांचें स्वागत ५०, ओक ह्यांच्यापुढें कोणतें ध्येय होतें? ५१, निर्णयसागरची भाषांतर-पाठमाला, बालमित्र, 'मराठ्यांची बखर' वगैरे ५२, प्रो. जिनसीवाले ह्यांची विचारसरणी-एक अनुभव ५३, तत्कालीन अनेक विचारवंतांच्या ग्रंथांस प्रसिद्धी; मुद्रक नि प्रकाशक ह्यांचें राष्ट्रीय जीवनांत महत्त्वाचें स्थान ५४, मुद्रक-प्रकाशक संघटनेचा पाया ५५, ग्रंथ-प्रकाशनासंबंधीं जावजीशेठचें धोरण; त्यांनीं घेतलेलें व्रत ५६, शेठजींचें प्रकाशन-क्षेत्र फार व्यापक होतें ५७, 'बालबोध' मासिकाप्रमाणें 'प्रौढ-बोध' मासिकाची कल्पना ५८, ग्रंथांच्या किंमती कमीत कमी व कोणालाही परवडणाऱ्या ठेवण्याचें धोरण ५९, ग्रंथ-वितरणासंबंधीं शेठजींची योजना ६०, छपाईच्या बाबतींत आलेला विचित्र अनुभव ६१, चुकीची पुनरावृत्ति होऊं नये ह्यासाठीं नियम, शंभराऊणशें वर्षांपूर्वीच्या काळांतील ग्रंथ-प्रकाशनासंबंधीं कथा नि व्यथा ६२, देशबांधवांच्या उन्नतीसाठीं प्रत्येकानें झेपेल तो त्याग करावा ६३.



मुलांच्या मनावर सुसंस्कार घडविण्याची जरूरी, पूज्य साने गुरुजी, वासुदेवराव आपटे ह्यांचें कार्य ६४, तत्पूर्वीच शेठजावजी दादाजी नि वि. कों. ओक यांनीं मुहूर्तमेढ रोविली ६४, प्रतिकूळ काळांतील कामगिरी, दोन गोष्टींची अनुकूलता, विद्वानांचा सहकार ६५, मुलांच्या उत्कर्षासंबंधी जावजीशेठचे विचार, ओकांची विचारसरणी ६६, वि. कों. ओक ह्यानीं जावजीशेठपुढें आपली योजना ठेविली ६७,

विद्वान मंडळींत चर्चा, 'बालबोध' हें नांव कोणी सुचविलें? ६८, पहिल्या अंकाचें स्वरूप, संपादकीय निवेदन व विषय ६९, मुलांसाठीं लिहिलेल्या तत्कालीन कांहीं कवितांचे नमुने ७०, चरित्र-लेखनाचे महत्त्व, प्रत्येक अंकांत एक चरित्र, बालबोध मासिक म्हणजे ओकांच्या एकनिष्ठ तपस्येचें मधुर फळ ७१, 'या कार्याकडे मी कां वळलों?' ओकांचे आत्मवृत्त, विद्वानांस विनंती ७२, वर्गणीदारांकडून प्रतिसाद मिळत नसे, मालकांचें धोरण ७३, वर्गणीदारांस हांक, एक नमुना, बालबोध चालविण्यामागील शेठजींचें उदात्त धोरण ७४, मासिकाचा सर्वत्र बोलबाला, बडोद्याच्या महाराजांची गुण-ग्राहकता ७५, महाराजांच्या कारभाऱ्याचें शेठजींना पत्र, जावजीशेठजींचा आनंद ७६, विनायकराव ओक व जावजी-शेठ ह्यांचा सुखसंवाद, शेठजींनीं बक्षिसाचे एक हजार रु. संपादकाकडे पाठविले ७७, शेठजींची गुणग्राही नि निःस्वार्थ विचारसरणी ७८, शेठजींचा उत्साह द्विगुणित झाला व ओकांना कृतार्थता वाटूं लागली ७९, चौवीस वर्षांतील कार्याची रूपरेषा, जनता नि सरकार ह्या उभयतांकडून मान्यता ८०, हें घवघवीत यश कशामुळें मिळालें? ओकांची संपादन-पद्धती ८१, ओकांच्या निधनानंतर मासिकाचा कारभार आटोपता घ्यावा लागला, मालक तुकारामशेठ ह्यांनीं वाचकांचा घेतलेला निरोप ८२, बालबोधनें जन्मा आल्याचें सार्थक केलें, कवि देवस्थळी ह्यांनीं वाहिलेली काव्यमय श्रद्धांजलि ८३



संस्कृत-भाषेचें आमच्या दैनंदिन जीवनांतील महत्त्व ८४, मुद्रणाच्याद्वारें ज्ञानमार्ग मोकळा करणारे पहिले महाराष्ट्रीय म्हणजे गणपत कृष्णाजी. संस्कृत-वाङ्मय प्रकाश-नाच्या दृष्टीनें जावजीशेठ ह्यांच्या कार्याचे अपरंपार महत्त्व ८५, ह्या वाङ्मय-ठेव्याची युरोपीयनांस झालेली जाणीव, ब्राह्मण-शास्त्रीवर्गाची तत्कालीन आकुंचित दृष्टि, इंग्रजांच्या राजवटींत सर्वांना मुक्तद्वार झालें, परंतु तत्कालीन राज्य-कर्त्यांचा चुकीचा समज ८६, विद्वान् शास्त्री-पंडितांचें

अभिनंदनीय कार्य, पुणें संस्कृत-पाठशाळा-व्यवस्थापक मेजर टी. कँडी ८७, शास्त्री-पंडितांकडून साहेबांवर घालण्यांत आलेला निर्बंध, ना. जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्तीचें उत्तेजनाच्या दृष्टीनें महत्त्व ८८, चार्लस विल्किन्स ह्या गोऱ्या अधिकाऱ्याचें संस्कृत-भाषा प्रेम. संस्कृत-भाषा शिकणारे पहिले इंग्रज अधिकारी, देवनागरी नि बंगाली मुद्रिका तयार करण्यांत त्याचें सुयश ८९, गोरे अधिकारी नि मिशनरी ह्यांची देवनागरी मुद्रिकांच्या बाबतींत महत्त्वाची कामगिरी, 'काव्येतिहास-संग्रह' मासिकाचा जन्म, काव्यमालापूर्व संस्कृत-वाङ्मयाचें प्रकाशन, पहिले संपादक पं. दुर्गाप्रसाद ह्यांचें संस्कृत-वाङ्मय-संशोधनाचें महनीय व चिरस्मरणीय कार्य ९१, लहान मोठे संस्कृत ग्रंथ सुंदर देवनागरी टाईपांत छापून ते अल्पस्वल्प किंमतीस देण्याचें जावजीशेठ ह्यांचें उदार नि सेवाभावी धोरण, सर्व शास्त्रांतील संस्कृत वाङ्मयाची प्रसिद्धि ९२, 'अष्टांग-हृदय' ह्या अत्यंत उपयुक्त वैद्यकीय ग्रंथाचें उदाहरण, ग्रंथ स्वस्तांत स्वस्त देण्याचें ध्येय, उद्देश-ग्रंथ घरोघर जावे हाच ९३, रा. ब. शं. पां. पंडित नि पं. दुर्गाप्रसाद ह्यांची संस्कृत-वाङ्मय सेवा ९४, जावजीशेठ ह्यांनीं संस्कृति-संवर्धनासाठीं पत्करलेला त्याग ९५, 'काव्य-माला' मासिकाचा जन्म. स्थानिक सहसंपादक पं. का. पां. परब ९६, पहिल्या अंकाचें स्वरूप, जनता व सरकार ह्यांच्याकडून उपेक्षा होत असतांही संस्कृत वाङ्मय-प्रकाशनाच्या बाबतींत जावजीशेठनीं स्वीकारलेलें अत्यंत स्तुत्य धोरण ९७, वर्गणीदार फार कमी, परंतु जावजीशेठ निराश झाले नाहींत, संस्कृत-वाङ्मय-प्रकाशन ही शेठजींच्या श्रद्धेची बाब होती, तो त्यांचा जिव्हाळ्याचा प्रश्न होता ९८, पंधरा अंक बाहेर पडल्यानंतर विविधज्ञान-विस्तार ह्या ज्येष्ठ मासिकाकडून प्रशस्ति ९९-१०१, तत्कालीन राजे रजवाडे नि धनिक ह्यांना अशा कार्याची कदर नव्हती जावजीशेठ नि त्यांचे चिरंजीव ह्यांनी हें मासिक तोटा सोसून कां चालविलें? १०२, मासिकाशिवाय संस्कृत-ग्रंथांचें स्वतंत्रपणें प्रकाशन, काव्य-गुच्छकांचा इतिहास १०३, निर्णयसागर-मुद्रित संस्कृत-ग्रंथांचा सर्व जगभर प्रसार, सांस्कृतिक महत्त्वाची

केवढी ही कामगिरी ! १०४, संस्कृत-ग्रंथांचे मुद्रण शुद्ध स्वरुपात करण्याबद्दल जावजीशेठ यांची धडपड, संस्कृत-वाङ्मयावर एवढी श्रद्धा कां ? १०५, व्यक्तिमात्राच्या उद्धारा-संबंधी जावजीशेठजींची विचार सरणी, कांहीं महत्त्वाच्या संस्कृत-ग्रंथांचीं मराठी रुपांतरे नि त्यांचें प्रकाशन १०६, तो काळ आणि आजचा काळ, पं. जवाहरलाल नेहरु संस्कृत-वाङ्मयाबद्दल काय म्हणतात पहा, मानवजातीच्या शाश्वत कल्याणाची कामगिरी १०७, जगांतील नि भारतांतील विद्वान पंडितांकडून ह्या कार्याबद्दल प्रशंसा, पं. डॉ. व्ही. राघवन् व पं. डॉ. सुनीतिकुमार चतर्जी, गुरुवर्य डॉ. ह. दा. वेलणकर हे काय म्हणतात ? १०८, भांडारकर प्रा. वि. संशोधन मंडळाचे डॉ. पी. एल्. वैद्य ह्यांची प्रशस्ति १०९, प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर ११०

६ संत-वाङ्मय-प्रकाशनाचा पूर्वेतिहास १११–१२६

'काव्य-संग्रह' प्रकाशन पूर्वकाळांतील संत–वाङ्मय, संतांचें जनता–उद्धाराचें कार्य १११, जागोजाग विखुरलेलें हस्त-लिखित संत–वाङ्मय ११२, मुद्रणकलेनें घडवून आणलेली क्रांति, १८४० नंतरचा काळ, संत–वाङ्मयाच्या दृष्टीनें जागृतीचा, जावजीशेठजींच्या पूर्वकाळांतील प्रयत्न ११३, 'ज्ञानचंद्रोदय' मासिकाचा उदय, पांडुरंग बापू जोशी पावस्कर ह्यांचा उद्योग, गणपत कृष्णाजींचा सहकार, विपरीत परिस्थितीशीं सामना ११४ इंग्रजीचा पुरस्कार नि मायबोलीचा तिरस्कार, धार्मिक–वाङ्मय मुद्रित करण्यास विरोध ११५, भोळ्या समजुतींचा पगडा, हस्तलिखित धार्मिक ग्रंथांस मागणी, धनिक नि राजेरजवाडे ह्यांचा एक उपयुक्त छंद, परशुरामपंत गोडबोले ह्यांच्या नवनीताचें प्रकाशन ११६–११७, नवनीत काव्य-संग्रहाचें महत्त्व, परशुरामपंत गोडबोले ह्यांचा परिचय ११८, माधव चंद्रोबा डुकले हे कोण नि कुठले ? ११९, माधव चंद्रोबांचें त्या काळांतील धाडस, 'सर्व–संग्रह' मासिकाची कामगिरी ७२०, प्राचीन विद्येच्या पुनरुज्जीवनासंबंधीं विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांचे जळजळीत विचार १२१, 'काव्येतिहास–

पूर्णत्वास आणण्यासाठीं अहर्निश धडपड, 'इतिहास-संग्रह' 'प्रौढ-बोध' वगैरेसाठीं करून प्रयत्न २४२, विनायकराव ओक ह्यांचे विचार २४३, तुकारामशेठजींच्या काळांतील सर्वतोपरी वाढ व उत्कर्ष २४४, लो. टिळक नि त्यांचें कार्य ह्याबद्दल आदरभाव २४५, संस्कृत-वाङ्मय-प्रकाशन कार्यांतील उच्चांक गांठला २४६, तुकारामशेठजींची सव्वीस वर्षांची उज्वल कारकीर्द, औदार्य २४७, शेठ पांडुरंगजी नि श्रीमती जिजाबाई ह्यांचा जमाना २४८, चौधरी-घराण्यांतील कर्तबगार महिला २४९, पांडुरंगशेठजीपर्यंतचा पाउणशें वर्षांचा भरभराटीचा काळ २५०-२५१, श्रीमती सत्यभामाबाई ह्यांची कारकीर्द, देवभक्तीकडे व दानधर्माकडे ओढा २५३, 'मी एकच बेलाचें पान वाहीन', श्री. सत्यभामाबाईंची पुण्याई २५४, श्रीमती लक्ष्मीबाई ह्यांची चालू कारकीर्द, रामचंद्रराव मोरे पासून पांडुरंगराव मोरे ह्यांच्यापर्यंत २५५, निर्णयसागर-मुद्रणालय ही एक राष्ट्रीय संस्था आहे, आजच्या परिस्थितींत सरकारनें लक्ष पुरविण्याची जरुरी २५६.

## ४ मुंबईतील मुद्रणविषयक हालचाली

२७८-२८२

मुंबईचे राज्यपाल एल्फिन्स्टन ह्यांचे मुद्रण यंत्रासंबंधीं उदार धोरण २७८, त्या उदार धोरणाचा इष्ट परिणाम, 'नेटिव्ह ए. सोसायटीचें कार्य २७९, मुद्रण-कलेची पाया-भरणी, वॉर्डनसाहेबांचा विरोध २८०, एल्फिन्स्टन ह्यांचा आग्रह, 'धोक्यापेक्षां फायदेच जास्त होतील' २८१, त्या धोरणाचा परिणाम काय झाला? जनतेचा विरोध होता, तो कशासाठीं? २८२.

## कांहीं प्रकाशकांचा परिचय

५

## सुख-दुःखाचें स्वागत

"जावजी! एऽऽ जावजी! अरे जरा थावेल तो खरा? आमी तुमच्या संगती बातचीत करायला मांगते!"

जावजींचीं पावलें झपाझप पडत होती. आपल्याच विचारतंद्रींत ते घाईघाईनें चालले होते. इतक्यांत कोणीं तरी हाक मारल्याचा भास होऊन त्यांनीं मागें वळून पाहिलें. पाहातात तों काय? मामाच्या घरीं ओझरता पाहिलेला मारवाडी शेठ! त्यानें आपल्या मागून हाका मारीत कां यावें, हें त्यांना समजेना. इतक्यांत तो मारवाडी शेठच म्हणाला, "आमच्या नांव खुमाशेठ. तुमच्या मामाजवळ काई कामासाठीं आमी आले होते. तुमच्या बातचीत आमी ऐकला. मामानें तुमच्या काम नाय केला! आमी कोशीस करेल. तुमी रोजगारधंदा करायला मांगते. लय चांगला हाय. पण कसला रोजगार करायला तुमी मांगते तें सांगशाल तर बरा होएल. तुमी भला माणूस दिसले म्हणून तुमच्या मागून आमी धावत आले!"

"शेठजी, मी छापखान्यासाठीं लागणारा टाईप पाडण्याचा धंदा सुरू करणार आहे. पुस्तकं, किताब छापतात ना, त्यासाठीं टाईप लागतो. टाईप पाडण्याची कला मी शिकलों आहे. सध्या एका छापखान्यांत मी तें काम करतों. तिथें टाईपासाठीं एकसारखी मागणी असते. आमच्या जिवावर छापखानेवाला मालक चांगली कमाई करतो, मग आम्हींच तो धंदा सुरू केला तर आम्हांला नाहीं का तशीच कमाई होणार?"

" होयल ! होयल ! तुमी कसवी, हुन्नरी माणूस हाय. दोन पैसे कमवेल ! तुमचं ' टाईप ' का काय म्हणतात तें कसव मला नाय समजते. पण मला एक गोष्ट समजते. हा तुमचा धंदा नवा हाय. तुमी तो शिकून घेतला हाय आणि तुमच्या त्या वस्तूला मागणी बी हाय. म्हणून मला वाटतो, कीं तुमी त्यांत दोन पैसे कमवेल. मग बोला, तुमा किती भांडवल मांगते ? "

" शेठजी, माझी उडी मोठी नाहीं. शुभारंभ करायचा तो लहान प्रमाणांत करावा, हें बरं नाहीं का ? मी अंदाज केलाय त्याप्रमाणें मला सातशें रुपयांपेक्षां अधिक भांडवल नाहीं लागणार ! मी पोटावारी काम करणारा माणूस ! माझ्याजवळ तारणादाखल पुढें करायला कांहींएक नाहीं. हो ! अगोदरच सांगून टाकलेलं बरं ! "

" नको ! तारणबिरण तुमच्याकडून मला काय बी नको ! तुमी हुन्नरी माणूस ! आमचा पैसा बुडवेल नाय, याची खात्री हाय आम्हांला ! "

" शेठजी, माफ करा हं ! तुम्ही मारवाडी लोक, कांहींतरी चांगला ऐवज असल्याशिवाय पैसा बाहेर न काढणारे ! आणि असं असतां माझ्यावर एव्हढी मर्जी कशी बसली तुमची ? "

" अरे त्यामंदी काय हाय ? आमी माणसाच्या मुखड्यावरून नि बोलण्याचालण्यावरून त्याची हां हां म्हणतां पारख करते ! तुमी माणूस लबाड नाय. तुमी कोणाला फसवेल नाय. तुमी उद्योग करून पोट भरणारे नि देवाला भिऊन वागणारे ! तुमी काय आमाला बनवेल ! चला, तुमी धंदा शुरू करा, कमाई करा आणि मग आमच्या पैसा देऊन टाका. फिकर करूं नका. काल सकाळीं आमच्या पेढीवर या नि पैसा घेऊन जा ! "

" शेठ, तुमच्या रूपानें मला प्रत्यक्ष देवच भेटला. तुमचे आभार मी कोणत्या शब्दांनीं मानूं ? माझें स्वतंत्र धंदा करण्याचें स्वप्न, तुमच्यामुळेंच साकार होणार आहे. "

" जावजी, अरे तेच्यामंदी आभार कसले मानते ? हा व्यवहार हाय. आमी व्यवहार समजते. तें चोख व्हावा म्हणून जपते. तुमी पण तुमच्या व्यवहारांत चोख रवा. माणसाची पारख करायला शिका. हुशारीनें वागा. देव तुमाला बरकत देल ! जय गोपाळ ! "

जावजीशेठ टाईप पाडण्याच्या कलेंत पारंगत झाल्यावर आणि त्या बाबतींत आत्मविश्वास वाटूं लागल्यावर, तो धंदा स्वतंत्रपणें करण्याचा मनसुबा मनांतल्या मनांत रचीत होते. त्यांचे मामा अर्जुनजी लस्ते चांगले सधन होते. शिवाय मारवाड्यांशीं त्यांचे संबंध होते. त्यांच्याकडून जरूर असलेलें थोडेंबहुत भांडवल आपण मिळवूं शकूं, अशी जावजीशेठची कल्पना होती. परंतु प्रत्यक्ष वेळ आली तेव्हां त्यांची आशा फोल ठरली. मामांनी त्यांच्या मागणीला वाटाण्याच्या अक्षता लावल्या! 'ह्या भाच्याजवळ आहे काय आणि हा देणार काय?' हीच त्यांची कोती कल्पना! कशी तरी वेळ मारून न्यायची म्हणून "आजकाल तारणादाखल आपल्याजवळ कांहीं ना कांहीं असल्याशिवाय पैसा कोणीही देत नाहीं," असें सांगून मामांनीं जावजीशेठना वाटेला लावलें. परंतु त्याच वाटेवर खुमाशेठ मारवाड्याच्या रूपानें भगवंतानें त्यांना गांठलें आणि त्यांची अडचण दूर केली. त्या निमित्तानेंच जावजीशेठ व खुमाशेठ ह्यांच्यामध्यें वरील संवाद झाला.

आपण स्वतंत्र धंद्याची उभारणी करावी, असें जावजीशेठना वाटूं लागतांच त्यांनीं धंद्याचा पाया घातला आणि त्याच खंबीर पायावर त्यांनीं मुद्रण-प्रकाशन व्यवसायाचा टोलेजंग प्रासाद निर्माण केला. त्या प्रासादाच्या पायऱ्या चढण्यापूर्वी त्याच्या निर्मात्याचें बालपण कसें गेलें व कोणत्या धंदे-शिक्षणाच्या शाळेंत शिक्षण संपादन करून त्यानें ही वैभवश्री प्राप्त करून घेतली, तें अगोदर आपण पाहूं या.

अखिल मराठा समाजालाच नव्हे, तर अखिल भारताला भूषणभूत होऊन राहिलेल्या जावजीशेठचा जन्म मुंबईंत उमरखाडी येथें त्यांच्या आजोबांनीं बांधलेल्या लहानशा घरकुलांत १८३९ सालीं झाला. त्यांचें आडनाव होतें चौधरी. पूर्वीच्या काळीं चौधरी ह्या नांवाला फार मोठा अर्थ होता. पूर्वी निरनिराळ्या प्रकारचे उद्योगधंदे करणारे लोक मोठमोठ्या शहरांतून किंवा गांवांतून राहात असत. त्यांचा कोणी ना कोणी पुढारी किंवा नायक असे. त्याला चौधरी म्हणत असत. सरकारला अमूक एका वर्गांतील कामकऱ्यांची कांहीं ना कांहीं कारणामुळें जरूर लागली म्हणजे त्यांच्या नायकाला म्हणजे चौधरीला बोलावून घेऊन त्याला जरूर त्या कामाची माहिती

करून घ्यायची, म्हणजे त्या कामांत किंवा कलेंत प्रवीण असलेली माणसें हमखास मिळायची व कोणतेंही काम अगदीं बिनबोभाट व्हायचें. त्यामुळे जे कोणी चौधरी असत, त्यांचें समाजांतील स्थान मान्यतेचें असे. लोकांवर त्यांचें वजन असे. कोणत्या राजाच्या कारकीर्दींत जावजीशेठच्या पूर्वजांस चौधरी हें पद प्राप्त झालें, हें मात्र सांगतां येणें कठीण आहे.

जावजीशेठच्या पणजोबांपासून त्यांच्या घराण्याचा थोडासा इतिहास उपलब्ध आहे. त्यांच्या पणजोबाचें नांव होतें जावबा चौधरी. ते ठाणें जिल्ह्यांतील मुरबाड तालुक्यांत विडें नांवाचें गांव आहे, तेथें शेतीवाडी करून राहात असत. त्या खेड्यांत कुटुंबाचा उदरनिर्वाहही नीट होईना, म्हणून ते मुंबईस आले. उमरखाडी त्या काळीं जवळजवळ ओसाडच होती. तेथें त्यांना बिनतक्रार हातपाय पसरायला मिळाले. पोटापुरती नोकरीही मिळाली. त्यांच्या चिरंजिवांचें नांव पदाजी व पदाजींचे चिरंजीव दादाजी. हेच जावजीशेठचे वडील होत. आजोबांनीं गोदींत नोकरी मिळवली होती. फार कष्ट करावे लागत त्या काळीं; जेमतेम कुटुंब-पोषणा-पुरता पगार मिळत असे. तो मिळवावाच लागे.

अशा बिकट परिस्थितींत बिचाऱ्या दादाजींना शिक्षणाचा गंध कोठून लागणार ? तशी सोय नव्हती आणि जरूर तें साधनही नव्हतें. वयांत आल्यानंतर त्यांना एका पेढीवर तगादेदार शिपायाची नोकरी मिळाली. त्या काळीं पेढीवरील शिपायास पगार तो कसला मिळणार ? आणि वर्षांच्या वर्षे नोकरींत घालविलीं, तरी पगारांत वाढ ती किती होणार ?

एकूण काय, दादाजींचा संसार अगदीं गरिबीचा होता. हातीं आलेल्या तुटपुंज्या पगारात संसाराचा गाडा कसाबसा रेटावा लागत होता. जावजींची आई काशीबाई. ती काटकसरीनें संसार करण्यात फार दक्ष होती. अंथरूण पाहून पाय पसरायचे, जरूरीपेक्षां जादा खर्च करायचा नाहीं, हें त्या काळांतील स्त्रियांना सांगावें लागत नसे. काटकसरीची कला त्यांच्या ठिकाणीं जवळजवळ उपजतच असे म्हणा ना.

'शिक्षण' ह्या नांवाची कांहीं चीज आहे आणि तिचे संस्कार आपल्या मुलावर घडल्यास बरें, ह्या गोष्टीची जाणीव जावजीशेठच्या जन्मापासून वडील मंडळीस थोडथोडी होऊं लागली होती. मुंबईंत येऊन मिशनरी लोकांनीं

कोठें कोठें शाळा उघडण्याचा उपक्रम सुरू केल्याचा तो काळ होता. उमरखाडी विभागांत त्यांनीं एक शाळा उघडलीही होती.

जावजीशेठचें वय आतां ६-७ वर्षांचें झालें होतें. हें वय शाळेंत जाण्याचें, खेळण्या-बागडण्याचें, हट्ट करण्याचें व आईवडिलांस भंडावून सोडण्याचें! घरांत गरिबी नांदत असली, तरी जावजी हा आई-वडिलांचा एकुलता एक मुलगा होता. श्रीमंतींत जन्माला आलेल्या मुलाचे लाड होतात आणि गरिबींत वाढलेल्या मुलाचे लाड होत नाहींत, असें थोडेंच आहे! ज्याला त्याला आपला एकुलता एक मुलगा लाडकाच असतो व त्याचे आई-वडील आपल्या शक्तीप्रमाणें त्याचें कोडकौतुक करीतच असतात. तसेंच जावजीशेठचें बालपणीं कोडकौतुक केलें गेलें असेलच.

पेढीवाले शेठ फर्मावतील त्यांच्या दारीं जाऊन पैशांसाठीं तगादा लावायचा, म्हणजे पैसे वसूल होईपर्यंत हेलपाटे घालीत राहायचें, ह्या कामगिरींत बिचाऱ्या दादाजींचा सारा जन्म गेला. आपल्या मुलानें मोठेपणीं कोण व्हावें किंवा काय करावें, ह्याचीं स्वप्नें प्रत्येक मुलाच्या आई-बापाला पडत असतात. स्वप्नेंच तीं! त्यांपैकीं बहुतेक रसातळास जायचीं! जाईनात कां; परंतु क्षणिक आनंदाचा लाभ देणारीं तीं स्वप्नें असतात. कांहीं कांहीं स्वप्नें नांवारूपास येतही असतात. जावजीशेठच्या आई-वडिलांनीं कोणतें स्वप्न रंगवावें? त्या काळीं त्यांच्या दृष्टीनें मोठेपणाची मजल कोठवर जावी?

आपण पेढीवरचे एक साधेसुधे शिपाई! शिपाई व्हावें लागलें, कारण शिक्षणाचा गंध नव्हता! आपल्याप्रमाणें आपल्या मुलानेंही तगादेदार शिपाई व्हावें, असें कोणत्या बापाला वाटेल? मग त्यानें काय व्हावें? त्यानें शाळेंत जाऊन शिकावें-सवरावें, हिशेब-ठिशेब ठेवण्याचें ज्ञान मिळवावें आणि पेढीवरील कारकून व्हावें! कारकुनाला उन्हातान्हांतून हेलपाटे घालायला नकोत. लोडाशीं टेकून बसावें व लिहिण्याचें काम करावें. ऐषआरामी नोकरी! ती आपल्या मुलाच्या वांट्यास यावी आणि आपल्याप्रमाणें कष्टाचें व दगदगीचें जीवन त्याच्या वांट्यास येऊं नये, असें जन्मदात्या आई-वडिलांस वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. त्या दृष्टीनें पूर्वतयारी करणें जरूर होतें. पूर्वतयारी करायची म्हणजे जावजीशेठच्या शिक्षणाची सोय करायची.

मोठ्या उदात्त हेतूनें जावजीशेठना मिशनऱ्यांनीं चालविलेल्या एका शाळेंत दाखल करण्यांत आलें. त्या वेळीं त्यांच्या वयास जवळजवळ आठ वर्षें होत आलीं होतीं. वडील माणसांनीं मुलावर नजर ठेवावी लागते. बालवयांत त्यांनीं भलतीकडे वहकूं नये म्हणून डोळ्यांत तेल घालून जपावें लागतें. वेळप्रसंगीं धाक दाखवावा लागतो. जावजीशेठवर कोणाचीच नजर नव्हती. कोणतेंही बंधन नव्हतें. वडील नोकरीनिमित्त दिवसभर घराबाहेर असायचे, तर आई आपल्या घरकामांत गर्क असायची ! जावजीशेठ वाटेल तसा उनाडक्या करायला मोकळे होते. त्यांचे बालसवंगडी होते. त्यांच्याबरोबर जावजीशेठनीं मन मानेल तिकडे जावें. आंब्याच्या व बोरीच्या झाडांवर चढून कच्चीं किंवा पक्कीं, मिळतील तशीं फळें खावीं! कच्च्या कैऱ्या पाडून त्या मीठ-मसाला लावून खाणें आणि त्यावर घटाघट पाणी ढोसणें, हा जावजीशेठचा आंब्याच्या मोसमांतील एक नित्याचा उपक्रम होता. मोठेपणीं आपल्या बाळपणींच्या ह्या आठवणी मित्रमंडळीस सांगतांना त्यांच्या तोंडाला पाणी सुटत असे!

जावजीशेठच्या बालजीवनांतील एक एक दिवस अशा रीतीनें जात असतां त्यांच्या वडिलास देवाघरचें बोलावणें आलें.

जावजीशेठच्या वयानें आतां नऊ वर्षांची मर्यादा गांठली होती. घरांत कर्ते-सवरते वडील होते म्हणून संसाराचा गाडा कसाबसा रेटला जात होता. आतां जावजींच्या आईनें, काशीबाईनें, कोणाच्या तोंडाकडे पाहायचें ? काशीविश्वेश्वराच्या ? नाहींतर कोणाच्या ? दीनाची दयामाया करणारा तोच. काशीबाईची त्याच्यावर संपूर्ण श्रद्धा होती. माणसाला कोणाचा ना कोणाचा आधार लागत असतो. त्याशिवाय त्याला ह्या जगात जगतां येत नाहीं. तसेंच आतां एकुलत्या एक मुलासह जगायचें तर काबाडकष्ट करण्यासाठीं दुप्पट जोमानें कंबर कसली पाहिजे, तरच निभाव लागेल, ह्या गोष्टीचीही खूणगांठ त्या माउलीनें बांधली.

आधींच जीवन होतें कष्टाचें, तें आतां झालें दुप्पट कष्टाचें व अधिक जबाबदारीचें. पण पोटच्या पोरासाठीं कष्ट उपसणें प्राप्त होतें. तो वयानें लहान; जरा मोठा होईपर्यंत त्याच्या पोटापाण्याची सोय केली पाहिजे. मोठा झाला, म्हणजे कांहींतरी कामधंदा करील आणि पोट भरील. हाच आपला

पोरगा पुढें शेकडों कुटुंबांना पोसणारा आणि त्यांची काळजी वाहाणारा कर्तबगार मुद्रक होणार आहे, ह्याचा अंदाज त्या काळीं तिला कसा बरें लागावा ?

उनाडक्या करण्यांत दिवसांमागून दिवस जात होते. शाळेंत नांव घातलें होतें; परंतु जावजी शाळेंत जातो कीं नाहीं, इकडे कोणाचें लक्ष होतें ? काशीबाईला पोटापाण्याची सोय लागावी म्हणून आंबे, पेरू, केळीं अशीं त्या त्या ऋतूंत मिळणारीं फळें टोपलींत घालून व कोठेंतरी रस्त्याच्या बाजूला बसून विकावीं लागत होतीं! त्या व्यवहारांत दिवसाकांठीं चार सहा आणे कमवायचे आणि कशीबशी पोटाची सोय करायची! ह्या धांदलींत मुलगा शाळेंत जातो कीं नाहीं, त्याच्याजवळ पाटी-पुस्तक आहे कीं नाहीं, पाहायचें कोणीं ? शिक्षणासंबंधीं आस्थाच नव्हती कोणाला.

बाळपणांतील ह्या अनास्थेचा व निष्काळजीपणाचा परिणाम जो व्हायचा तो झाला! जावजीशेठच्या शिक्षणाची मजल अक्षर-ओळख होण्यापलीकडे जाऊं शकली नाहीं. शाळेचा आणि त्यांचा संबंध सुटला, त्या वेळीं केवळ 'जावजी दादाजी' एवढीं स्वतःच्या नांवाचीं अक्षरें त्यांना लिहितां येत होतीं! पण ह्याच जावजींच्या नंतरच्या कर्तबगारीमुळें पुढील काळांत शिक्षण प्रसारासाठीं लहान-मोठीं हजारों पुस्तकें प्रकाशित होऊन तीं शहरांतील व खेड्यापाड्यांतील घराघरांतून व शाळा-कॉलेजांतून वाचलीं जायचीं होतीं!

वयाच्या दहाव्या वर्षी जावजीशेठनीं शाळेकडे पाठ फिरवली. परंतु इतर सर्वांप्रमाणें त्यांच्याही पाठीशीं पोट होतें. त्या पोटाकडे पाठ कशी फिरवणार? त्यासाठीं कोणत्या ना कोणत्या कामाची किंवा उद्योगाची कास धरणें जरूर होतें. तें कोवळें वय का काम-धंदा करण्याचें होतें ? ज्या वयांत मुलांनीं शिकायचें, त्या वयांत पोटाची चिंता वाहाण्याचें व त्यासाठीं चौकशी करीत हिंडण्या-फिरण्याचें, जावजीशेठच्या नशिबीं आलें!

असेंच एके दिवशीं फिरतां फिरतां भेंडीबाजारांत मिशनरी लोकांनीं चालविलेल्या एका छापखान्याकडे त्यांचें लक्ष गेलें. त्या छापखान्याच्या चालकाचें नांव होतें थॉमस ग्रॅहम. मोठा हुशार, कसबी नि कल्पक. टाईप तयार करण्याच्या कलेंत तर पुरा वाकबगार माणूस. ह्याचा परिचय ह्याच ग्रंथांत अन्यत्र करून देण्यांत आलेला आहे. त्याला त्या वेळीं टाईप घासून साफसूफ करण्यासाठीं एक-दोन मुलांची जरुरी होती.

जावर्जीशेठनीं त्या थॉमस ग्रॅहॅमची भेट घेऊन, "मला कांहीं काम देतां का साहेब?" असें मोठ्या अदबीनें विचारलें. तेव्हां तो साहेब म्हणाला, "तुझं शिक्षण किती झालं आहे? लिहा-वाचायला येतं का तुला?"

"साहेब! मी शिकलों नाहीं! पण मला मराठी अक्षरं वाचतां येतात!"

"अक्षरं वाचतां येतात हें काय कमी आहे! ठीक आहे. आमच्याकडे नोकरी मिळेल तुला. आम्ही अक्षरांचे टाईप पाडतों, ते घासून-पुसून सारखे करायचे. ह्या घासकामाशिवाय तुला देण्यायोग्य दुसरी नोकरी आमच्याजवळ नाहीं. काम चोख करायचं. पगार दरमहा दोन रुपये देऊं. पुढें हुशारी पाहून वाढही करूं! आहे कबूल?"

थॉमस ग्रॅहॅम सरळ स्वभावाचा माणूस होता. त्याला घासाघीस करीत बसण्याची सवय नव्हती.

जावर्जीशेठनींही विचार केला, 'दोन रुपये तर दोन रुपये! पगाराचं काय! परंतु इथें आपण प्रवेश तर करून घेऊं या. शाळेंत जाऊन शिकलों नाहीं. ही उद्योगाची शाळा दिसते. इथें घासकाम करतां करतां कांहीं शिकतां आलं तर तेवढंच पदरांत पडेल!' आणि जावर्जीशेठना जी खरी अक्षर-ओळख झाली, ती ह्या कारखान्यात अक्षरें घासता घासतां व अक्षरांचे नमुने निरखून पाहातां पाहातां!

त्या पोरवयांत, आपण कांहींतरी शिकलें पाहिजे, लिहा-वाचायला नाहीं शिकलों, तरी ह्या जगात जगण्यासाठीं तरी आपणास हालचाल ही केलीच पाहिजे, त्याशिवाय चालणार नाहीं, एवढी जाणीव त्यांना झालेली होती.

त्यानंतर भटकणें सोडून जावर्जीशेठ त्या मिशन छापखान्यांत नित्यनेमानें जाऊं लागले व टाईप घासण्या-पुसण्याचें काम मन लावून करूं लागले.

टाईप! मुद्रिका! ह्या मुद्रिकांचें माहात्म्य किती मोठें आहे! त्यांनीं जगांत क्रांति घडवून आणली आहे. जेथें दुःखव्याप्त वैराण वाळवंट होतें, तेथें त्यांनीं आनंदाचें नंदनवन फुलविलें आहे! सीतामाई रावणाच्या अशोक-वनांत दुःखीकष्टी अवस्थेंत काळ कंठीत असता, मारुतिरायानें झाडावरून रामनामाची मुद्रिका तिच्या पदरांत टाकली! ती पाहून किती आनंद झाला तिला! क्षणार्धांत ती सारें दुःख विसरली! त्या मुद्रिकेंत दुःख विसरण्याची किमया होती!

अशाच अक्षर-मुद्रिका घासून-सवरून सुंदर बनविण्याचा कष्टदायक उद्योग जावजीशेठच्या वांट्यास आला होता. तो उद्योग कष्टदायक होता, परंतु जावजींना व अनेकांना सुखाचा मार्ग दाखविणारा होता. त्यानेंच जगांत क्रांति घडवून आणिली, मूर्खांना शहाणे होण्याचा मार्ग दाखविला आणि दुःखी-कष्टी जनांना कर्तव्य-परायण बनविलें.

आरंभी जें कष्टदायक वाटलें, तेंच पुढें सुखाला कारण होत असतें. जावजीशेठचें भाग्य थोर! जावजीशेठचेंच कां? आम्हां महाराष्ट्रीयांचें, नव्हे, अखिल भारतवासीयांचें भाग्य थोर, म्हणून जावजीशेठसारख्या अक्षरशत्रूच्या हातीं त्याच अक्षरांना सुंदर आकार देण्याचें कार्य भगवंतानें सोपविलें!

जावजीशेठ अगदीं मन लावून मुद्रिका घासण्याचें काम करूं लागले. त्या कामाचा त्यांनीं कधीही कंटाळा केला नाही एवढेंच नव्हे, तर त्यांत त्यांना गोडी वाटूं लागली. ओबडधोबड मुद्रिका घासून त्यांना सुंदर आकार आणीत असतां, ते जणूं कांहीं, आपलें दैन्यवाणें दैवच घासून-पुसून साफ करीत होते! बालपणापासून त्यांनीं जो दहा-बारा वर्षांचा जीवन-प्रवास केला, त्या प्रवासांत त्यांना जिगरदोस्त असा कोणी सापडला नव्हता. ज्या ठिकाणीं आपली मति स्थिर होईल आणि जेथें प्रेम जडेल, असें जीवनांत कोणी ना कोणी भेटावें लागतें. ती जिवा-शिवाची भेट असते म्हणा ना! तोच जीवनाधार असतो. ह्या जगांत सर्वांच्याच वांट्याला तें भाग्य येत असतें असें नाहीं. ज्यांच्या वांट्याला तें येतें, ते खरोखर भाग्यवंत होत.

सीतामाईच्या हातांत जी मुद्रिका अचानक, कांहींएक ध्यानीं-मनीं नसतां येऊन पडली, ती प्रभु रामचंद्राकडून आशेचा संदेश घेऊन आलेली मुद्रिका होती. ती मुद्रिका पाहातांच सीतामाई रोमांचित झाली. भोगलेलें सारें दुःख क्षणार्धांत विसरली! अशी त्या मुद्रिकेंत जादू होती. ती जिवा-शिवाची भेट होती!

तसें पाहिलें तर जावजीशेठचा व अक्षर-मुद्रिकांचा काय संबंध होता? जेथें अक्षरांशीं वा शब्दांशीं सलगीचें नातें जोडतां आलें नाहीं, तेथें अक्षर-मुद्रिकांचें काय? परंतु आयुष्यांत कधीं कधीं विचित्र योगायोग जुळून येत असतात. शाळेंत जाऊन जें अक्षर-ज्ञान संपादन करतां

आलें नाहीं, तें जीवनोपयोगी व सारें जीवन फुलवून सोडणारें ज्ञान त्या अक्षरांच्या मुद्रिका घासतां घासतां जावजीशेठना व्हावें, असा ईश्वरी संकेत होता!

शाळेंत जाण्याचा कंटाळा करणारे जावजीशेठ उगाच का त्या घासकामांत रंगले? त्या मुद्रिका त्यांच्यासाठीं आशेचा जीवन-संदेश घेऊन आल्या होत्या! 'जावजी! बेटा! आम्हीच तुझा जीवनाधार. आमच्याशीं प्रेमाचं व सलगीचं नातं जोड. आम्ही तुला वैभवश्रीच्या शिखरावर नेऊन बसवूं!' असें जणूं कांहीं त्या जावजीशेठना परोपरीनें सांगत होत्या आणि त्यांच्या कष्टी मनाला दिलासा देत होत्या!

जावजीशेठनीं तो संदेश झेलला. वय लहान असलें म्हणून काय झालें? त्यांच्यांत ताकद व उत्साह अपरंपार होता. शाळेंतील घोकंपट्टीची किंवा करड्या शिस्तीची व भीतीची आंच त्यांना लागली नव्हती. तो सारा उत्साह असा तसा वायां न जातां योग्य व आवडत्या कामीं लागायचा होता.

वर्षांमागून वर्षे जाऊं लागलीं, तसतसा जावजीशेठचा समजूतदारपणा व ग्रहणशक्ति वाढीस लागली. मालक थॉमस ग्रॅहॅम ह्याचें प्रत्येक कामगाराकडे बारकाईनें लक्ष लागून राहिलेलें असे. ज्याला काम शिकण्याची हौस आहे व ज्याच्याबद्दल त्याला खात्री वाटे, त्याला तो एकाच कामावर रखडवून ठेवीत नसे. जावजी मन लावून काम करणारा आहे, त्याच्या हातांत कसब आहे, तो शिकायला उत्सुक आहे, असें आढळून येतांच थॉमस ग्रॅहॅमनें आस्ते आस्ते मुद्रिका कशा पाडतात, मेट्रिसा कशा तयार कराव्या लागतात, अक्षरांना आकार कसा द्यावा लागतो, वगैरे त्या क्षेत्रांतील अंतर्गत माहिती त्याला द्यायला सुरुवात केली.

थॉमस ग्रॅहॅमचा जन्म ह्याच देशांत झालेला. त्यामुळें त्याला मराठी, गुजराती ह्या देशी भाषा उत्तम प्रकारें अवगत होत्या. त्याला शिकवण्याची हौस व आवड होती. मराठी व इतर कोणत्याही भाषेच्या मुद्रिका तयार करण्यांत तो वाकबगार होता. ती कला ह्या देशांतील शक्य तितक्या लोकांनीं शिकावी असें त्याला वाटे. जीवन लोहार हा त्याचा गुरुबंधु आणि सर्वप्रथम महाराष्ट्रांत मुद्रण-कलेची प्राण-प्रतिष्ठा करून तिला वैभवश्री प्राप्त करून देणारे

थॉमस ग्रॅहॅम



नहाराष्ट्रांत मुद्रण कलेची पद्धतशीर प्राणप्रतिष्ठा करणारे व पहिले मुद्रक-प्रकाशक
णपत कृष्णाजी, जावजी दादाजी व राणूजी आरू ह्यांच्यासारख्या त्या क्षेत्रातील
प्रणींचे गुरुस्थान शोभविणारे. (पान–९-१०, १२, २६-२७, १६४ ६५, २७०)

मुद्रण-महर्षि गणपत कृष्णाजी हे त्याचे शिष्य. त्याचप्रमाणें जावजीशेठ व त्यांचे निष्ठावंत, कलाचतुर आणि सिद्धहस्त सहकारी राणू रावजी आरू ह्यांनाही मुद्रण व्यवसायांतील त्या थोर गुरुजींचें प्रेमळ सान्निध्य लाभलें; आणि त्यांनीं मराठी मुद्रिकांना सुंदर, नयनरम्य व डौलदार आकार देऊन मुद्रणक्षेत्रांत बहुमानाचें स्थान मिळविलें.

थॉमस ग्रॅहॅमच्या मिशन प्रेसमध्यें जावजीशेठ त्या छापखान्याचें हस्तांतर होईपर्यंत म्हणजे जवळ जवळ दहा वर्षे राहिले. त्या मालकाच्या हाताखालीं काम करण्यांत त्यांना आनंद वाटे. ह्या दहा वर्षांच्या काळांत पगाराच्या दृष्टीनें त्यांची फारशी प्रगति झाली नव्हती. त्यांच्या पगाराची मजल सात रुपयांपर्यंत येऊन ठेपली होती! परंतु त्यांचें लक्ष पगारापेक्षां कामाकडे जास्त लागून राहिलेलें असे. मुद्रिका पाडण्याची कला महत्त्वाची आहे, त्या कलेंत आपण पारंगत झालें पाहिजे व त्यामध्ये प्रावीण्य मिळविण्यासाठीं झटलें पाहिजे, ही होती त्यांची आकांक्षा. त्यामुळें पगाराची फारशी फिकीर त्यांनीं कधीं केली नाहीं. आपण आपल्या कलेंत तरबेज झालों, म्हणजे पैसा वाटल्यास आपल्या मागोमाग येईल, नव्हे तो यायचाच, अशी खूणगांठ त्यांनीं स्वतःशीं बांधून ठेवली होती.

जावजीशेठच्या वयाचीं सतरा वर्षे संपून आतां त्यांना अठरावें वर्ष लागलें होतें. त्यांची विचारशक्ति त्यापूर्वींच जागी झाली होती. आपण शाळेंत हजर राहून शिक्षण घेतलें नाहीं, त्याची भरपाई अक्षर-मुद्रिका पाडण्याचें कसब चांगलें शिकून घेऊन व त्यांत तरबेज होऊन करायची असा त्यांनीं निश्चय केला. मिशन प्रेसमधील मालकांशीं जसे त्याचे आपुलकीचे संबंध होते, तसेच त्या प्रेसमधील यंत्रांशींही होते. थॉमस ग्रॅहॅमनें त्यांना हाताशीं धरून टाईप कसे कोरावे, कसे पाडावे, मेट्रिसी कशा ठोकाव्या, हें तेथील यंत्रांच्या साहाय्यानें शिकविण्याचा उपक्रम सुरू केलेला होता; परंतु एकाएकी वरिष्ठांचा आदेश आला, कीं मिशनऱ्यांनीं धर्म-प्रसाराच्या कार्यास वाहून घ्यावें. त्यांनीं छापखाने चालविण्याच्या व्यापांत पडूं नये. ह्या आदेशाप्रमाणें वागणें प्राप्त होतें. त्यामुळें मिशन प्रेस, टाईम्स ऑफ इंडिया प्रेसला वीस हजार रुपयांस विकून थॉमस ग्रॅहॅमला मोकळें व्हावें लागलें.

हें घडून आलेलें स्थित्यंतर जावजीशेठना फार जाणवलें. अक्षर-मुद्रिका पाडण्याच्या कलेंत त्यांना पारंगत व्हायचें होतें आणि हें मध्येंच संकट

आलें! मग त्यांनीं टाईम्स प्रेसमध्यें आपला शिरकाव करून घेतला. त्यांचें सारें लक्ष होतें टाईप पाडण्याच्या यंत्रागाराकडे. सुदैवानें त्याच खात्यांत त्यांना जागा मिळाली. पगारांतही तीन रुपये वाढ झाली. ह्या प्रेसमध्यें जावजीशेठनीं जवळ जवळ दीड वर्ष काढलें. तें दीड वर्ष जी कला त्यांना आत्मसात् करायची होती, त्या कलाशिक्षणाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें होतें. येथें त्यांच्या कलेला चांगला उजाळा मिळाला.

ह्या काळांतील जावजीशेठच्या जीवनक्रमासंबंधीं दुसरी एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. काय कारण असेल तें असो, परंतु त्यांची विचारशक्ति झटवहून जागी होऊं लागली होती. दृष्टीचा पल्ला चौफेर काय चाललें आहे, त्याकडे पोंचूं लागला होता. त्यांचें बेचैन व जागें झालेलें मन केवळ मुद्रिका पाडण्यांत रममाण होऊन न राहातां छापखान्यांत चाललेल्या इतर हालचालींकडेही लक्ष पुरवूं लागलें होतें. छापखान्याच्या व्यवसायांत जेवढें शिकतां येईल, तेवढें शिकून घ्यायचें, ही होती त्यांची दृष्टि.

'टाईम्स ऑफ इंडिया' प्रेसमध्यें त्या काळीं गोऱ्या लोकांचें प्राबल्य फार होतें आणि तें अगदीं स्वाभाविक होतें. तेथें जावजीशेठच्या हस्तकलेला जास्त उजाळा मिळाला. त्याचप्रमाणें माणसानें माणसाशीं कसें वागावें, गोडी-गुलाबीनें वागून दुसऱ्याकडून काम कसें करून घ्यावें, दुसऱ्यांचीं मनें कशीं जिंकावीं, वगैरे व्यवहारांत नेहमीं उपयोगी पडणारेंही शिक्षण त्यांना तेथें मिळवितां आलें.

तेथें टाईप फाउंड्रीच्या खात्यांत एकाहून एक वाकबगार अशीं माणसें होतीं. त्यामुळें स्वतंत्रपणें काम उरकण्याची ताकद असतांही ती कसोटीला लावून पाहाण्याची संधि तेथें मिळण्याचा संभव दिसेना. पगारांतही वाढ होण्याची आशा दिसेना. त्यामुळें दुसऱ्या एखाद्या छापखान्यांत प्रवेश मिळविण्याच्या विचारांत जावजीशेठ होते.

इतक्यांत १८६२ मध्यें इंदुप्रकाश छापखान्याचा उदय झाला. छापखान्याचे मालक आरंभीं होते लक्ष्मणशास्त्री हळवे व केशवशास्त्री गाडगीळ. त्यांना टाईप फाउंड्री सुरू करायची होती. त्यासाठीं माहितगार माणसाची त्यांना फार जरूरी होती. जावजीशेठनीं ती संधि साधली. अगदीं योग्य वेळीं त्यांना योग्य ती जागा मिळाली. पगारही तीन रुपयांनीं वाढला. म्हणजे दहा

रुपये मिळत होते, तेथें आतां तेरा रुपये मिळूं लागले. इंदुप्रकाशमधील जागा जावजीशेठनीं मोठ्या हौसेनें पतकरली. ह्याचें प्रमुख कारण एकच होतें. त्यांना मुद्रिका पाडण्याच्या कलेवर प्रकाश टाकायचा होता. तें काम आपण स्वतंत्रपणें व समाधानकारक रीतीनें करूं शकतों कीं नाहीं, ह्याचा पडताळा घ्यायचा होता. तेवढा आत्मविश्वास त्यांना वाटूं लागला होता; परंतु प्रत्यक्ष व्यवहाराशीं गांठ पडल्याशिवाय खरी कसोटी लागत नाहीं, ती त्यांना लावून पाहायची होती.

इंदुप्रकाशमध्यें जावजीशेठना जरूर असलेला वाव मिळाला. त्यासाठीं तर त्यांची धडपड चाललेली होती. येथें येईपर्यंत वर सांगितल्याप्रमाणें कोणाच्या ना कोणाच्या तरी हाताखालीं त्यांना काम करावें लागे. त्यामुळें त्यांच्या कसबाची जशी इतरेजनांस कल्पना करतां येत नसे, त्याचप्रमाणें त्यांनाही होत नसे. नुसता आत्मविश्वास वाटून काय उपयोग ? तो प्रत्यक्ष आचरणानें पटला पाहिजे व पटवितां आला पाहिजे. तो आत्मविश्वासाचा आनंद स्वतंत्रपणें स्वतःच्या जबाबदारीवर काम करण्याची सुसंधि येथें लाभल्यामुळें त्यांना लुटतां आला. ह्या ठिकाणीं जावजीशेठचें काम सर्वांच्या नजरेंत भरूं लागलें. त्यांच्या कामाची आंत व बाहेर वाखाणणी होऊं लागली. गरज व योग्य ती संधि पकडींत धरल्याशिवाय ह्या जगांत कोणीही पुढें येऊं शकत नाहीं.

ती लाख मोलाची सुसंधि जावजीशेठच्या जीवनांत आतां आलेली होती. परंतु किती वर्षांनीं ? बारा-तेरा वर्षांनी ! ह्या काळांत केवळ तुटपुंज्या पगारावर ते सतत राबत होते. दुसऱ्यांनीं तयार केलेल्या मुद्रिका घासण्यापासून तों स्वतः सुंदर मुद्रिकांची निर्मिति करण्यापर्यंत त्यांनीं आतां मजल मारली होती.

इंदुप्रकाश छापखान्यांतील मंडळी त्यांच्या कामावर राजी होती. त्यांच्या कामाची प्रशंसा होऊं लागली आणि मालकांनी खूप होऊन त्यांच्या पगारांत दोन रुपयांनीं वाढ केली ! ही का गुणग्राहकता झाली ? निदान पांच-दहा रुपयांनीं तरी वाढ व्हायला नको होती का ? परंतु ती होऊं शकली नाहीं. नाहीं तर नाहीं, त्या काळांत जावजीशेठ पगारापेक्षां अधिकाधिक अनुभवाचे फार भुकेले होते. ज्या कलेची आपण कास धरली, तिच्यामध्यें जास्तींत जास्त प्राविण्य मिळविण्यासाठीं झटायचें, हेंच ह्या दिवसांत त्यांनी आपल्यापुढें एकमेव ध्येय ठेविलें होतें.

अशा परिस्थितींत इंदुप्रकाशच्या मुद्रिका पाडण्याच्या कारखान्यांत त्यांनीं दोन वर्षें काढलीं. आर्थिक नसलें तरी मानसिक स्वास्थ्य तेथें त्यांना पुरेपूर मिळालें.

परंतु सर्व दिवस सारखे नसतात. कलेच्या शिक्षणासाठीं त्याग करणें जरूर होतें; तो करणें जोंवर शक्य होतें तोंवर जावजीशेठनीं केला. आतां त्यांच्या शिरावरील जबाबदाऱ्या वाढूं लागल्या होत्या. त्यांच्याकडे दुर्लक्ष करून चालण्यासारखें नव्हतें. त्या इंदुप्रकाश छापखान्यांत त्यांनीं समाधानकारक काम केलें आणि मालकांची मर्जी संपादन केली, त्यांनीं पगारवाढ केली ती अवघ्या दोन रुपयांनीं ! राजा उदार झाला आणि हातीं भोपळा दिला ! तशांतलाच हा प्रकार घडला होता.

जावजीशेठनीं सतत पंधरा वर्षें इमानें-इतबारें नोकरी करण्यांत घालविलीं. ह्या प्रदीर्घ काळाकडे त्यांनीं नोकरीच्या दृष्टीनें पाहिलें नाहीं. एका उपयुक्त कलेच्या शिक्षणासाठीं त्यांच्याकरवीं घडलेली ती तपश्चर्या होती. अक्षरांच्या मुद्रिका घासतां घासतां एके दिवशीं लागलेल्या तंद्रींत त्यांना जाणीव झाली, कीं पुढील काळांत हाच उद्योग आपला जीवनसाथी व्हायचा आहे. जे कांहीं बरे-वाईट दिवस आपल्या वांट्यास येतील, ते ह्याच व्यवसायावर अवलंबून आहेत. त्यासाठीं खूप मेहनत करायची आणि त्या कलेंत प्रवीण व्हायचें.

पंधरा वर्षांनंतर अलीकडे जावजीशेठना आत्मविश्वासाच्या आनंदाची प्रचीति चाखतां येऊं लागली. त्याचबरोबर आपल्या आर्थिक अडचणींचें निवारण व्हावें व तें आपणच करून घेतलें पाहिजे, असेंही त्यांना वाटूं लागलें.

कर्तबगार कलावंत कोठेंही असला, तरी तो दडला जात नाहीं. तो कधीं ना कधीं उजेडांत यायचाच. मुंबईंतील छापखान्याच्या तत्कालीन जगांत जावजीशेठचें नांव त्या वेळीं मशहूर झालें नसलें, तरी टाईप पाडण्यांतील त्यांचें कसब सर्वांना माहीत झालेलें होतें. त्या काळीं तरी तशीं कसबी माणसें फार थोडीं होतीं.

ओरिएंटल प्रेसच्या मालकांस टाईप ओतण्याच्या कारखान्याचा व्याप वाढवायचा होता. त्यांनीं जावजीशेठशीं बोलणें सुरू केलें व त्यांना दरमहा तीस

रुपये देण्याची तयारी दर्शविली. जावजीशेठनीं तें आमंत्रण स्वीकारून इंदुप्रकाशच्या मालकांस आपला बेत कळविला. आतां मात्र त्यांचे डोळे उघडले ! आपल्या छापखान्यांतील एक हुशार माणूस दुसऱ्या छापखान्यांत जातो, ही घटना त्यांना रुचण्यासारखी नव्हती. शिवाय जावजीशेठच्या जाण्यानें नांवारूपास येऊं लागलेलें टाईप पाडण्याचें काम थंडावणार होतें. कारण त्यांच्या तोडीचा दुसरा माणूस त्या खात्यांत नव्हता.

"जावजी, तुम्ही आम्हांला सोडून जाऊं नका. तुमचा पगार वाढवतों. एकदम दहा रुपये वाढवून पंधराचे पंचवीस करतों. मग तर झालें कीं नाहीं ?" मालक म्हणाले.

"तिकडे मला तीस रुपये देणार आहेत. परंतु हा प्रश्न पगारापुरता नाहीं. मी त्यांना येण्याचें कबूल करून चुकलों आहें. एकदां दिलेला शब्द मी मागें घेणार नाहीं. माफ करा हं." जावजीशेठ विनयानें म्हणाले.

"तुम्ही गेल्यावर आमच्या टाईप फाउंड्रीकडे कोण पाहाणार आणि जरूर असलेला टाईप आम्हांला वेळेवर कसा मिळणार ?" —मालक.

"त्या कामांत तयार झालेलीं माणसं आहेत कीं आपल्याकडे ! आणि मी ओरिएंटलमध्यें जात असलों, तरी आपलं अडूं देणार नाहीं. रात्रीं-अपरात्रीं येऊन मी आपलं काम करून जाईन. मी कुठेंही गेलों नि कुठेंही असलों, तरी इंदुप्रकाशनें मला प्रकाशांत आणलं, ह्याची जाणीव मला सदैव राहील." —जावजी.

आणि खरोखरच जावजीशेठ बोलल्याप्रमाणें शेवटपर्यंत वागले. इंदुप्रकाशला जेव्हां जेव्हां टाईपांची गरज भासली, तेव्हां तेव्हां त्यांनीं ती भागविली एवढेंच नव्हे, तर त्यांच्यामागें त्यांच्या चिरंजीवांनींही तेंच आपुलकीचें नातें सांभाळलें होतें.

ओरिएंटल छापखान्याच्या टाईप पाडण्याच्या खात्यांत जावजी दाखल होतांच तेथें डौलदार व मनोहर मुद्रिका तयार होऊन ग्राहकांच्या हातीं पडूं लागल्या. मनपसंत व सुबक कामाबद्दल ओरिएंटलची ख्याति होऊं लागली. कोणीही असो, त्याला सुंदर वस्तूंचें आकर्षण असतें. त्या काळीं धोरणी, धाडसी व हातीं पैसा खेळणाऱ्या कांहीं लोकांनीं छापखान्याच्या धंद्यांत पैसा घालण्याचें

धोरण स्वीकारलें होतें. त्यांना तयार मुद्रिकांची जरूरी भासली, म्हणजे ते ओरिएंटलकडे धाव घेत. अशा रीतीनें ग्राहकांची संख्या दिवसेंदिवस वाढूं लागली व मालकांस चांगली कमाई होऊं लागली.

ही किमया जावजीशेठनीं आपल्या कलेच्या बळावर घडवून आणली होती. मागण्यांचें प्रमाण उत्तरोत्तर वाढत चाललें, परंतु जावजीशेठच्या पगारांत वाढ करावी, त्यांना अधिक सुखी व समाधानी करावें, असें मालकांच्या मनांत कधीं आलें नाहीं. प्रत्येकाला स्वार्थ तेवढा चांगला समजतो. ज्याच्यामुळें आपला स्वार्थ साध्य होतो, त्याच्याकडे महसा लक्षच पोंचत नाहीं. मालक जागरूक नसले, तरी जावजीशेठ आतां जागरूकतेनें वावरूं लागले होते. त्यांनाही स्वार्थ समजूं व उमजूं लागला होता. आपल्या सभोंवारच्या जगाचे कडू व गोड अनुभव घेण्यांत त्यांनीं वर्षेंच्या वर्षें घालविलीं होतीं. पण सारें आयुष्य असेंच घालवायचें का ?

ओरिएंटलमध्यें येऊन तेथील टाईप खात्याचीं सूत्रें समर्थपणें हाताळीत - असतां वर्ष-दीड-वर्षाच्या काळांत त्यांना एके दिवशीं एक साक्षात्कार झाला. जेथें सचोटी, कर्तव्यनिष्ठा, उद्योगशीलता व नैपुण्य ह्या गुणांचा सुंदर संगम साधलेला असतो, तेथें साक्षात्काराचा संभव हटकून असतो !

जावजीशेठना कोणता साक्षात्कार झाला ? आपण कोणी तरी आहोंत, आपल्या हातीं अशी काहीं कलाचातुरी आहे, कीं जिच्यामुळें लोक आपल्याकडे आकर्षिले जातात. मग ह्या आकर्षणाचा उपयोग इतरांसाठीं करीत आयुष्य घालविण्याऐवजीं त्याचा उपयोग स्वतःसाठीं नाहीं का करतां येणार ? तो करण्यासाठीं आपण कंबर कसली पाहिजे.

ज्या क्षणीं हा साक्षात्कार झाला, तो जावजीशेठच्या जीवनांतील सुवर्णमोलाचा क्षण होता. सारें जीवन घुसळून सोडणारा पण त्यांना उच्चासनावर नेऊन बसविणारा !

जावजीशेठ बेचैन झाले ! आतां ह्यापुढें आपण दुसऱ्याची ताबेदारी न पतकरतां स्वतंत्रपणें उद्योग करायचा आणि तो करीत असतां आपल्या वांट्यास सुख येवो वा दुःख येवो, त्याचें स्वागत करायचें, असा निर्धार त्यांनीं स्वतःशीं केला.

जावजीशेठनीं नयनमनोहर मुद्रिका पाडण्याचें कसब हस्तगत केलें होतें. तें त्यांचें मुख्य भांडवल होतें, परंतु पैशांचें भांडवल त्यांच्याजवळ नव्हतें. तो भांडवलाचा प्रश्न त्यांना भेडावून सोडूं लागला!

माणसाजवळ पैसा पाहिजे. त्याशिवाय ह्या जगांत कोणतीही हालचाल करतां येत नाहीं. विचारांचा गाडा अडकून पडतो तो नेमका त्याच ठिकाणीं! स्वतंत्रपणें धंदा करण्याचा विचार आपल्या मनांत आला व आपण निर्धारही केला. परंतु जरूर असलेल्या भांडवलाचा प्रश्न कसा सोडवायचा, ह्यासंबंधीं विचार करीत असतां, जवळचीं नात्याचीं माणसें जावजीशेठच्या दृष्टीसमोर आलीं. त्यांत त्यांचे मामा अर्जुनजी लखे होते. त्यांच्याजवळ पैसा होता. देण्या-घेण्याचा व्यवहारही ते करीत असत. तेव्हां आपलें काम ते करतील, अशी आशा त्यांना वाटली. गरजवंतानें आशेवर जगायचें असतें. परंतु त्या मामांनीं शेवटीं त्यांची कशी निराशा केली, हें ह्या प्रकरणाच्या आरंभींच जो संवाद देण्यांत आला आहे, त्यावरून कळून येतें.

मामा नाहीं तर खुमा! जेव्हां सत्याच्या व स्वकष्टाच्या पायावर कोणत्याही कार्याची इमारत उभारण्याचा तुम्ही निश्चय करता, तेव्हां तें कार्य तुमचें राहात नाहीं, तें भगवंताचें कार्य होऊन राहात असतें आणि कोणत्या ना कोणत्या रूपानें तोच तुमचें पाठिराखेपण व मार्गदर्शन करीत असतो. 'सत्य संकल्पाचा दाता भगवान्!'

शेवटीं जावजीशेठनीं आपली जीवननौका सागरांत लोटली. ती हेलकावे खात खात कोठें जाऊन पोंचली, हें आतां आपण पाहूं या.

## २

## पंचांगासाठीं छापखाना

जावजीशेठच्या जीवनाला कलाटणी देणारा तो कसोटीचा काळ होता. कसोटी त्यांचीच नव्हे, तर अनेकांची लागायची होती. त्यांना आतां पंचविसावें वर्ष लागलें होतें. ऐन उमेदीचा हा काळ. आयुष्याचीं पंधरा वर्षे नोकरी करण्यांत गेलीं. त्या काळांत भलेबुरे अनेक अनुभव मिळाले. दहाव्या वर्षी मुद्रिका घासण्याचा व्यवसाय दैवयोगानें वांट्यास आला, त्या मुद्रिका स्वतः तयार करून त्यांना सुंदर आकार देण्याचें शिक्षण घेण्यांत पंधरा वर्षे मागें पडलीं. ओरिएंटल छापखान्यांत असतांना तेथें तयार होणाऱ्या मुद्रिकांसाठीं गिऱ्हाईक वाढत्या प्रमाणांत येऊं लागलें, ह्याचें बरेंचसें श्रेय जावजीशेठच्या हस्तकौशल्यास होतें. जावजीशेठना ह्या गोष्टीची जाणीव होऊं लागली, तेव्हां मुद्रिका पाडून त्या छापखानेवाल्यांस विकण्याचा उपक्रम आपण सुरू केल्यास आपणास किफायत नाहीं का होणार, हा विचार सारखा मनांत घोळूं लागला. नोकरीचें बंधन ह्यापुढें आणखी किती वर्षे सांभाळायचें? बरें, पगार तरी भरपूर मिळेल, तर तीही आशा बाळगतां येत नव्हती. पगारवाढीसाठीं त्यांनीं एकदा प्रयत्न करून पाहिला, परंतु त्यांत त्यांची निराशा झाली. 'देतों हाच पगार खूप आहे!' अशी मालकांची अरेरावीची भाषा त्यांच्या कानांवर आली होती.

अधिक पगाराच्या आशेनें हा कोठेंही गेला, तरी ह्याला कोण ठेवणार आहे? राहील येथेंच, ही होती मालकांची कल्पना! प्रत्येकजण मिळस्त

स्वभावाचा फायदा घेण्यासाठीं टपलेला असतो. तेव्हां हित-अहित ज्याचें त्यानेंच पाहायचें असतें.

जावजीशेठ एकमार्गी होते. आपला उद्योग मला आपण भले. तो उद्योगमात्र मन लावून व एकतानतेनें करायचा. त्यामुळें मुद्रिका बनविण्याच्या कलेंत ते पारंगत झाले होते. आतां ती पारंगतता त्यांना, परक्याची गुलामगिरी झुगारून देऊन, स्वतंत्र होण्याची प्रेरणा देऊं लागली होती.

स्वतंत्रपणें धंदा करावा, हा विचार ठीक आहे; परंतु स्वतंत्र धंद्याला भांडवल नको ? कोणीतरी सहकारी नको ? आणि शिवाय गिऱ्हाईक आपल्याकडे यायला नको ? धाडस करून आपण बाहेर पडलों आणि तें धाडस अंगाशीं आलें तर ?

असे नानाप्रकारचे विचार जावजीशेठच्या मनांत थैमान घालूं लागले. कोणतेंही काम असो, तें घाई-घाईनें, कसेंतरी उरकून मोकळें व्हायचें नाहीं. सावधगिरीनें व विचारपूर्वक वागायचें, हा जावजीशेठच्या अंगीं एक ईश्वरदत्त गुण होता. तसेंच एकट्याच्या विचारानें न वागतां, आपल्या स्नेही-सोबत्यांचा व हित-चिंतकांचा विचार घेऊन, मगच पुढें पाऊल टाकायचें, हें जावजी-शेठचें नेहमींचें धोरण होतें.

जावजीशेठ ओरिएंटल छापखान्यांत काम करीत होते. मातृका व मुद्रिका तयार करण्यांत ते जसे पारंगत झाले होते, त्याचप्रमाणें राणूजी रावजी आरू ह्या नांवाचे एक गृहस्थ भायखळ्यावरील एज्युकेशन सोसायटीच्या छापखान्यांत तशाच प्रकारच्या कामगिरीवर रावत होते.

हे दोघेही उद्योगी, निर्व्यसनी, निरहंकारी व सज्जनांतील सज्जन होते. 'समानशीलव्यसनेषु सख्यं ।' दोघांचेंही व्यसन एकच होतें. वळणदार, सुंदर व नेत्रदीपक अशा मुद्रिका तयार करण्यासाठीं झटायचें व त्यांत कमालीचें हस्तकौशल्य प्रकट करायचें. ह्या कलेंत नैपुण्य मिळविण्यासाठीं दोघांमध्यें जणूं काय अविरत चढाओढ लागून राहिलेली ! हल्लींच्या कलावंतांत चुरस लागून राहाते, तशा स्वरूपाची ती मारक चुरस नव्हती. ती एकमेकांस पोषक व सर्वांना उपकारक होऊन राहाणारी, सात्त्विक स्वरूपाची चुरस होती. हे दोघेही पुढील आयुष्यांत जीवनसाथी होऊन राहायचे होते.

सुंदर व नयनमनोहर मुद्रिका तयार करण्याच्या बाबतींत जावजीशेठ व राणूजी ह्या दोघांनींही एकत्र येऊन दैदीप्यमान इतिहास घडविला आहे. त्या क्षेत्रांतील राणूजींच्या प्रतिमेला तर तोड सापडणें कठीणच आहे.

महाराष्ट्रांतील मुद्रण-व्यवसायाचा सांगोपांग इतिहास लिहिला जाईल, त्या वेळीं ह्या दोघांच्याही नांवांचा व परस्पर सहकाराचा उल्लेख सुवर्णाक्षरांत केला जावा, एवढी त्या क्षेत्रांतील त्यांची कामगिरी बहुमोल व अविस्मरणीय आहे.

ह्या दोघांमध्यें व्यावसायिक साम्य आहे एवढेंच नव्हे, तर तें इतर अनेक बाबतींतही आढळून येतें. दोघेही कमालीचे जन्मदरिद्री, तसेंच अक्षरशत्रु! जावजीशेठनीं शाळेचें तोंड तरी पाहिलें होतें, परंतु गणूजींचें दारिद्र्य इतकें सडतर होतें, कीं त्यांना बालपणांत शाळेचें किंवा पाटी-पेन्सिलीचें दर्शन कधींच घडलें नाहीं! अशा ह्या अक्षरशत्रु परंतु प्रतिभासंपन्न कलावंतांनीं सुंदर मुद्रिकांची निर्मिति करून ज्ञान-प्रसाराचें कार्य सुलभ करावें व मुद्रा-मंदिर सुंदर रीतीनें सजवावें, अशी ईश्वरी योजना होती! तो आपलें वास्तव्य कोठें प्रकट करील व आपलें कार्य कोणाकडून करवून घेईल, हें सांगतां येणें कठीण आहे!

**ठाव नाहीं बूड। घरें बसविली कूड॥ १॥**
**भलतेठायीं तुझा वास। सदा परवीं उदास॥ २॥**

कोणत्याही क्षेत्रांत असो, असामान्य प्रतिभेचें दर्शन घडलें असतां तुकोबारायांच्या ह्या अभंग-चरणांचें स्मरण झाल्याशिवाय राहात नाहीं.

गणपत कृष्णाजी, जावजी दादाजी व गणूजी रावजी, ह्या सामान्य स्थितींत जन्मलेल्या तीन असामान्य महाराष्ट्रीयांनीं मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांत अखंड गाजविलेली कर्तबगारी अजोड स्वरूपाची आहे. त्यांतही गणूजींचें स्थान आगळें आहे. त्यांची कामगिरी आपण समजून घेतली पाहिजे. जावजी दादाजींच्या कर्तबगारीबरोबरच गणपत कृष्णाजी व राणूजी रावजी ह्यांच्याही असामान्य कर्तबगारीचा परिचय व्हावा, ह्या हेतूनें तो ह्या ग्रंथांत इतरत्र करून देण्यांत आलेला आहे.

जावजीशेठना गणूजींबद्दल भारी आपलेपणा वाटायचा. तेही नोकरीला कंटाळले होते. दिवसभर राबायचें आणि मालकाचें धन करायचें! हे दोघेही वेगवेगळ्या ठिकाणीं काम करीत असले, तरी दोघांच्याही अंतःकरणांत

पटणाऱ्या असंतोषाचें कारण एकच होतें. त्यांची स्वतंत्र होण्यासाठीं धडपड चाललेली होती.

भेटी-गांठीचे प्रसंग आतां वारंवार येऊं लागले. पुढें काय करायचें, नोकरीला एकदम रामराम ठोकण्याचें धाडस पतकरणें योग्य होईल कीं नाहीं ह्यासंबंधानें उभयतांमध्यें चर्चा होऊं लागली.

शेवटीं दोघांनीही एक विचार कायम केला. कोणताही प्रसंग येवो, एकमेकांस शक्य तें साहाय्य करायचें. नोकरी तडकाफडकीं सोडायची नाहीं. शहरांतील इंदुप्रकाश, मुंबई समाचार, प्रभाकर, वगैरे छापखानेवाल्यांशीं सलोख्याचे संबंध आहेत. त्यांना टाइपांची नेहमीं जरूरी असते. त्यांचीं कामें मिळवून तीं फावल्या वेळांत घरीं उरकायचीं. अशा रीतीनें कमा काय जम बसतो तें पाहून मग नोकरीच्या बंधनांतून मोकळें व्हायचें, असा ठाम विचार दोघांनीही ठरविला.

आपल्या विचारांना पाठिंबा देणारा व आपल्यावरोबर वाटेल त्या परिस्थितींत काम करायला तयार असणारा सवंगडी मिळाल्याबद्दल जावजी-शेठना आनंद होणें स्वाभाविक होतें.

स्वतंत्रपणें धंदा करायचा तर त्यासाठीं जरूर ती साधन-सामुग्री मिळविणें जरूर होतें. त्यासाठीं भांडवल पाहिजे होतें. तें कोठून व कसें मिळवावें ह्या चिंतेत असतां जावजीशेठना आपल्या मामांची आठवण स्वाभाविकपणें झाली. माणसाची कसोटी प्रसंगाशिवाय लागत नाहीं. आप्त असोत, स्वकीय असोत, तोंडापुरतें गोड बोलण्याच्या कलेंत सारे प्रवीण असतात. वेळ आली म्हणजे पाठ फिरवितात !

जावजीशेठचें बालपण गरिबींत गेलें. नंतर ते नोकरी करूं लागले, तेव्हां त्यांना पगार मिळायचा तोही तुटपुंजा ! जग कोणाचीही किंमत त्याच्या मिळकतीवरून करतें. मामांच्या हिशेबीं जावजीशेठना मोल नव्हतें. त्यामुळेंच कांहींतरी कारण पुढें करून, त्यांनीं स्वतःची सुटका करून घेतली.

परंतु ज्यानें उद्योगाची व कलेची आराधना एकनिष्ठपणें चालविली आहे, त्याला निराशा भेडसावूं शकत नाहीं. कांहीं म्हणा, कोणत्याही व्यवसायाचा आरंभ-काल मोठा बिकट असतो. त्यांतल्या त्यांत गरीब

महाराष्ट्रीयाच्या मार्गांत नाना विघ्नें उभीं राहातात. स्वतःचींच माणसें जेथें तुच्छ लेखतात, तेथें परक्यांनीं आम्हांला कां जवळ करावें ?

आरंभ-काळांतील आधार, ही एक लाख-मोलाची बाब आहे. तो आधार देण्याचें सत्कृत्य ज्यांच्या हातून घडतें, ते खरोखर धन्य होत. अशा ऐन प्रसंगीं न मिळालेल्या आधारामुळें कितीतरी वर येऊं पाहाणाऱ्या होतकरू तरुणांच्या आशा-आकांक्षा जागच्या जागीं करपून गेल्या असतील !

त्या दृष्टीनें पाहातां जावजीशेठ भाग्यवान् होते. भाग्यश्री भलत्या-सलत्या माणसाच्या वांट्यास येत नाहीं. उद्योग-प्रियता आणि कला-नैपुण्य ह्या दोन गुणांशिवाय आणखी एक दुर्मिळ गुण जावजीशेठच्या ठायीं वास करीत होता. 'राखावीं बहुतांचीं अंतरें । भाग्य येतें तदनंतरें ॥' ह्या कव्युक्तीची प्रचीति पदोपदीं देणारें त्यांचें जीवन आहे. त्यांनीं माणसें जोडण्याचा सपाटा आरंभापासून चालू ठेविला होता. ह्या जगांत मिळविण्यासारखें म्हणून जर कांहीं असेल, तर तें म्हणजे माणसांचा लोभ. तो उगाच नाहीं मिळत. त्यासाठीं कांहीं ना कांहीं त्याग करावा लागतो. दुसऱ्याच्या उपयोगी पडावें लागतें. नम्रता अंगीं बाणावी लागते. अहंकाराची होळी पेटवावी लागते. जावजीशेठनीं कधीं कोणाला तोडलें नाहीं. जोडण्याचा आपला धंदा. सुंदर मुद्रिका बनवायच्या आणि त्यांची ठाकठीक जोडणी करायची ! तसेंच मार्गांत येतील तीं माणसें जोडायचीं !

त्याचा परिणाम काय झाला ? जावजीशेठ स्वतःच्या पायांवर उभे राहाण्याचा मनसुबा रचूं लागले, त्या वेळीं अनेकांनीं सहकाराचा आपआपला हात जाणीवपूर्वक पुढें केला. सुमाशेठ मारवाड्यानें तर कमाल केली ! ना जातीचा, ना गोताचा. शिवाय परप्रांतीय ! त्यानें आरंभ-काळांत प्रकट केलेली आत्मीयता किती प्रशंसनीय होती !

जावजीशेठना त्याच्याबद्दल फार आदर वाटायचा. चांगले दिवस आले तेव्हां सुमाशेठचे पैसे त्यांनीं सव्याज फेडले. ते फेडले तरी त्याच्याबद्दल वाटणारी कृतज्ञता व प्रेमादर त्यांच्या अंतःकरणांत अखेरपर्यंत होता. पैसे फेडतां येतात, परंतु माणुसकी फेडतां येत नाहीं. ती एक दैवी गुण आहे.



**श्रीमती भागीरथीबाई जावजी चौधरी**

ह्यांनी जावजीशेठजींना जीवनभर उत्तमप्रकारें साथ देऊन वाढत्या संसाराचा गाडा नीट सांभाळला. उत्तर आयुष्यांत ह्यांची प्रकृती नीट रहात नसे. त्यावर्तीत जावजीशेठ आत्यंतिक दक्षता बाळगीत असत. दोघांनीही एकमेकांस दिलेला सहकार अनन्यसाधारण होता.

भरभराटीच्या काळांत खुमाशेठची कोठेंही भेट-गांठ झाली असतां, जावजीशेठना देव भेटल्यासारखा आनंद होत असे.

ह्या आरंभ-काळांत आर्थिक साहाय्याचा हात पुढें करणारे दुसरे गृहस्थ म्हणजे 'मुंबई समाचार' पत्राचे मालक शेठ फिरोजशहा मेहरजी हे होत. जावजीशेठ इंदुप्रकाश छापखान्यांत टाईप पाडण्याच्या कामावर असतां शेठ फिरोजशहा हे कांहीं कामानिमित्त एकदा तेथें आले. त्या वेळीं उभयतांचा परिचय झाला. उत्तम टाईप पाडण्याची कला ही त्या काळीं मुद्रण-व्यवसायांतील मोजक्या लोकांच्या दृष्टीनें कौतुकाचा विषय होऊन राहिली होती. त्या कलेंतील एक वाकबगार माणूस ह्या नात्यानें शेठ फिरोजशहा ह्यांच्या स्मरणांत जावजीशेठ राहिले आणि पुढें वेळ आली तेव्हां त्यांनीं त्यांस जरूर तें साहाय्य केलें.'

हा काळाचा महिमा आहे. तुमच्या समोवार अनुकूल वातावरण निर्माण होऊं लागलें, म्हणजे तुमचें प्रत्येक पाऊल, यशाच्या मार्गावर, सतत पुढें पुढें पडत जातें. उत्साहानें उत्साह वाढीस लागतो. त्या उत्साहाच्या बळावर तुम्ही जेथें जेथें जाल, तेथें तेथें तुमचें स्वागत होऊं लागतें.

टाईप पाडण्यासाठीं लागणारी सर्व यंत्र-सामुग्री एकदम खरेदी करणें, ही त्या काळीं जावजीशेठच्या आटोक्याबाहेरची गोष्ट होती. इंदुप्रकाशमध्यें सुसज्ज टाईप-फाउंड्री होती. ती सुसज्ज बनवून कार्यक्षम करण्यांत जावजीशेठचा हातभार लागलेला होता. तेथील नोकरी सोडून ते ओरिएंटल छापखान्यांत गेले, तरी मालकांशीं त्यांचे संबंध सलोख्याचे होते. तो राखलेला सलोखा जावजीशेठना ह्या वेळीं उपयोगी पडला.

आपण स्वतंत्रपणें धंदा सुरू करणार, तेव्हां आपल्या पाठीशीं थोर व परिचित मंडळींचे आशीर्वाद असावे, ह्या हेतूनें जावजीशेठ इंदुप्रकाशच्या मालकांस भेटायला गेले.

"शेठ, आतांपर्यंत नोकरींत आयुष्य घालवलं. आतां टाईप पाडण्याचा धंदा स्वतंत्रपणें सुरू करून नशिबाची परीक्षा पाहाण्याच्या विचारांत आहें. आपला आशीर्वाद घ्यायला आलों आहें."—जावजी.

"फार चांगला विचार आहे. जपून पावलं टाका म्हणजे झालं. तुमच्या हातांत कसब आहे. कसबी नि उद्योगी माणसापुढें नशिबाला वाकावं लागतं! मांडवलाचा प्रश्न सुटला ना?"—मालक.

"सुटला असं म्हणतां येत नाहीं. सुटेल आस्ते आस्ते. मी आरंभ करणार तोच अल्प प्रमाणांत. अंथरूण पाहून पाय पसरणं बरं, नाहीं का? पण मला आपल्याही सहकाराची जरूरी आहे."

"माझा सहकार कोणत्या बाबतींत हवा तें स्पष्टच सांगा ना!"

"आपल्याकडून मला पैशांची मदत नको. पण मनांत आणाल तर दुसऱ्या मार्गानें आपण मला मदत करूं शकाल. जरूर पडेल तेव्हां आपली फाउंड्री मला मोकळी असावी. तीही फार दिवस नाहीं. माझी जमवाजमव चाललीच आहे."

"एवढंच ना जावजी! आमची टाईप फाउंड्री तुमचीच आहे असं समजा. तुमच्यासारख्याला तिचा उपयोग करूं देणं हें आमचं कर्तव्यच आहे. मात्र एक करा, मधून मधून आम्हांला टाईप लागतो, तो तुम्ही पाडून देत जा, म्हणजे झालं!"

"अगदीं कबूल! पण शेठ, ही खात्री मी इथून जातांनाच आपल्याला दिली आहे, नाहीं का? ती जबाबदारी माझी. माझ्या शब्दाला आपण मान दिलात त्यामुळें माझा हुरूप वाढला आहे. आपले हे उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं!"

ह्या काळांत जावजीशेठ जेथें जेथें गेले, तेथें तेथें त्यांना हाच गोड अनुभव आला.

थॉमस ग्रॅहॅम व जीवन वल्लभ लोहार हे जावजीशेठना गुरुस्थानीं होते. टाईपासाठीं लागणाऱ्या मेट्रिसा [ मातृका ] तयार करण्यांत व टाईप [ मुद्रिका ] पाडण्यांत दोघांचाही हातखंडा होता. गुरुजनांचा आशीर्वाद घेतल्याशिवाय पाऊल पुढें कसें टाकायचें? शिवाय या आरंभ-काळांतही जावजीशेठनीं आपल्यापुढें एक ध्येय ठेविलें होतें. आपल्या कामांत कसूर राहूं द्यायची नाहीं. त्यांत सुबकपणा आणण्यासाठीं शक्य त्या परीनें जपायचें. आपण टाईप पाडण्यांत तरबेज झालों, असें त्यांना कधीं वाटलें नाहीं. मिळेल त्याचें सहकार्य संपादन करून जगापुढें यायचें आणि तेंही सुंदर स्वरूपांत.

ह्या काळांत एके दिवशीं ते थॉमस ग्रॅहॅम व जीवन वल्लभ लोहार ह्यांची भेट घेण्यासाठीं गेले. त्यांना आपला बेत त्यांनीं निवेदन केला. तेव्हां त्यांनीं त्यांचें कौतुक केलें.

" जावजी, तुम्ही खुशाल पुढें पाऊल टाका. आम्ही तुमच्या पाठीशीं आहोंत." त्यांनीं आश्वासन दिलें.

त्याच वेळीं मराठी व गुजराती मेट्रिसा तयार करून देण्याची विनंती जावजीशेठनीं त्यांना केली, ती त्यांनीं आनंदानें मान्य केली.

जावजीशेठ त्या काळीं कोलभाट गल्लींत राहात असत. त्या जागेशेजारीच एक लहानशी जागा भाड्यानें घेऊन, त्यांनीं १८६४ सालीं, उपलब्ध झालें तेवढें साहित्य जवळ करून, लहानशीच कां होईना, परंतु स्वतःच्या मालकीची टाईप फाउंड्री सुरू केली.

आरंभ-काळांत ती फाउंड्री चालविण्याची जबाबदारी सांभाळण्यासाठीं त्यांचे परम स्नेही राणूजी हे नोकरी सोडून त्यांना येऊन मिळाले. अगदीं जरूरीपुरतीं दोन-चार माणसें ठेवण्यांत आलीं. जावजीशेठनीं एकदम नोकरी सोडायची नाहीं, चार-सहा महिने जम कसा काय बसतो तें पाहून, मगच नोकरी सोडायची, असा बेत एकमेकांच्या सल्ल्यानें ठरला.

जावजीशेठच्या व राणूजींच्या जीवनांतील ती एक महत्त्वाची घटना होती. आम्रवृक्षाची बी लावण्यांत आली. बी लावली म्हणजे भागलें नाहीं. तिची नीट मशागत केली पाहिजे. तिला जरूर तें खतपाणी घालून, तिची वाढ जोमानें होत जाईल, ह्यासाठीं डोळ्यांत तेल घालून जपलें पाहिजे, ह्याची पूर्ण जाणीव दोघांनाही होती आणि त्यामुळेंच आपलें प्रत्येक पाऊल ते जपून टाकीत होते.

त्या काळीं छापखान्याचा धंदा नवीन असला, तरी उद्योगी व थोडेंसें धाडस असणाऱ्या लोकांना त्या धंद्याबद्दल एक प्रकारचें आकर्षण वाटत असे. ज्यांनीं त्या धंद्याची कास धरली, त्यांना त्यांत किफायत होत गेली.

मुद्रण-व्यवसाय सुरू करायचा, तर जवळ मुद्रिका पाहिजेत. लहान-मोठ्या आकाराच्या व सुंदर मुद्रिका तयार करण्याचे कारखाने त्या काळीं फारसे

नव्हते. मोठमोठ्या छापखानेवाल्यांजवळ टाईप पाडण्याच्या फाउंड्या असल्या, तरी लहानमहान व नवीन निघणाऱ्या छापखानेवाल्यांजवळ ती सोय नव्हती. त्यांचें लक्ष जावजींच्या फाउंड्रीकडे वळूं लागलें.

आस्ते आस्ते काम मिळूं लागलें. आपल्याकडे येणाऱ्या गिऱ्हाइकांचा संतोष हेंच आपलें भांडवल. आपल्याला धंद्याचा जम बसवायचा आहे. तो समाधानकारक रीतीनें बसवायचा, तर आपल्या छोट्याशा कारखान्यांतून बाहेर जाणारा माल गिऱ्हाइकांच्या पसंतीला उतरला पाहिजे. ह्यासाठीं ह्या फाउंड्रीचे चालक जास्तींत जास्त काळजी घेत असत.

ह्या आरंभ-काळांतील एक घटना सांगण्यासारखी आहे. आपल्या लहानशा जागेंत फाउंड्रीचा जम बसविण्यासाठीं जावजींची व राणूजींची धडपड चाललेली होती. पैशांचा व त्याचबरोबर कामाचा तुटवडा पदोपदीं जाणवत होता. आरंभ-काळांत तो कोणाला जाणवत नाहीं म्हणा!

जावजीशेठ ज्या घरांत राहात होते, त्याच घरांत पांडुरंग काशीनाथ बनारसे ह्या नांवाचे एक भले गृहस्थ राहात असत. ते बॉंबे गॅझेट प्रेसमध्ये कामाला होते. जावजीशेठची रोजच्या रोज चाललेली धडपड त्यांच्या दृष्टीस पडत असे. जो व्यवसाय जावजीशेठनीं आरंभला होता, त्या व्यवसायाशीं त्यांचा निकट संबंध होता. ते माहीतगारही होते. दोघांचेही संबंध घरोब्याचे होते. एकदा तर जावजीशेठनीं त्यांना आपल्या व्यवसायांत थोडें भांडवल घालून भागीदार होण्याचीही विनंती केली. परंतु नोकरींत बराच वेळ मोडत असल्यामुळें म्हणा किंवा अन्य कारणामुळें म्हणा, त्या विनंतीस त्यांनीं नकार दर्शविला. भागीदार नाहीं झाले, तरी जावजीशेठबद्दल व त्यांनीं धाडस पतकरून सुरू केलेल्या व्यवसायाबद्दल त्यांना सहानुभूति वाटत असे. हस्तें-परहस्तें त्यांना मदत व्हावी, असें त्यांना मनापासून वाटत असे. तशी मदत करण्याची संधि त्यांना ह्या आरंभ-काळांतच मिळाली.

आजची सेंट्रल रेल्वे ती त्या काळांतील जी. आय्. पी. रेल्वे. तिचा पसारा उत्तरोत्तर वाढत चाललेला होता. त्या रेल्वे कंपनीचा त्या काळीं स्वतंत्र छापखाना नव्हता. कंपनीला निरनिराळ्या स्टेशनांच्या नांवांचीं मोठ्या अक्षरांचीं

लेबलें मुबलक प्रमाणांत लागत असत. तीं कामें चौंबे गॅझेट छापखान्याकडे येत असत. अशीं लेबलें छापण्याचें काम जेव्हां आलें, तेव्हां तें बनारसे ह्यांच्याकडे सोपविण्यांत आलें. कारण ते अक्षरांसाठीं लागणारे पंच तयार करण्याच्या कामांत वाकबगार होते.

जावजीशेठना आरंभ-काळांत उत्तेजनाची फार जरूरी होती आणि ती नसते कोणाला? परंतु तें सर्वांच्या वांट्यास येत मात्र नाहीं. परमेश्वरावर विसंबून जावजीशेठनीं आपलें जहाज सागरांत लोटलें होतें.

बनारसे ह्यांनीं कामाची जबाबदारी स्वीकारली, कारण आपल्या हातून हें काम पार पडेल, अशी त्यांना खात्री वाटत होती. त्याचबरोबर जावजीशेठना उत्तेजन देण्याचीही त्यांना मित्रत्वाच्या नात्यानें जरूरी भासत होती. जावजीशेठचें मुद्रिका-कौशल्य त्यांनीं पाहिलें होतें. लहानमोठ्या वळणदार अक्षर-मुद्रिका तयार करण्याचें त्यांचें कसब त्यांनाही पसंत पडलें होतें. ह्या कलेंत ते जात्याच हुशार आहेत अशी त्यांची खात्री होऊन चुकली होती. पंच कसे तयार करावे, ह्याची बनारसे ह्यांनीं जावजीशेठना माहिती करून देतांच त्यांनीं जरूर असलेले मोठ्या व वळणदार अक्षरांचे पंच रात्रीचा दिवस करून तयार केले व ते बनारसे ह्यांच्या स्वाधीन केले. बनारसे ह्यांनीं ते दाखविण्यासाठीं आपल्या चौंबे गॅझेट कचेरींत नेले. त्यांच्या वरिष्ठांनीं खूष होऊन त्यावर पसंतीचा शिक्का मारला. "पुढें त्या पंचांच्या मेट्रिसा ठोकून जावजींनीं आपल्या घरच्या चुलीवर घरच्याच कढईंत शिसें कढवून एक मोल्ड तयार करून त्याच्या द्वारें तीं मोठीं मराठी अक्षरें ओतलीं व तीं गॅझेट ऑफिसांत पुरविलीं."[१]

ह्या कामाबद्दल जो मोबदला मिळाला, तो बनारसे ह्यांनीं जावजीशेठच्या हवालीं केला. अशा रीतीनें बनारसे ह्यांनीं जावजीशेठना परहस्तें कां होईना, आर्थिक सहकार दिला. त्याचें महत्त्व त्या काळाच्या दृष्टीनें बहुमोलाचें होतें. शिवाय ह्याच्याहीपेक्षां बनारसे ह्यांनीं त्या काळांत त्यांना व्यवसायविषयक जो सहकार दिला, तो अधिक मोलाचा होता. फाउंड्री चालविण्याच्या बाबतींत मधून मधून अडचणी निर्माण व्हायच्या. अशा वेळीं बनारसे त्यांच्या मदतीला येत.

[१] सुबोधपत्रिका : ता १ मे १८९०, जावजीशेठच्या निधनानंतर पांडुरंग काशीनाथ बनारसे ह्यांनीं प्रसिद्ध केलेलें पत्र

धंद्याचा जम बसवीत असतां आरंभ-काळांत मदतीसाठीं वेळीं-अवेळीं कोण कोण धावून आले, त्याची हकीकत आपल्या मित्रांजवळ सांगत असतां, बनारसे ह्यांचा उल्लेख जावजीशेठ अत्यंत कृतज्ञतापूर्वक करीत असत.

दिवसेंदिवस काम वाढत चाललें. ह्या कामाचा वाढता पसारा एकट्या राणूजींना संभाळणें जड जाऊं लागलें. आपल्या टाईप फाउंड्रीला कामाचा तुटवडा पडणार नाहीं व तें काम उत्तरोत्तर वाढत जाणार असें दिसून येतांच, जावजीशेठनीं नोकरीचें बंधन ताडकन् तोडलें आणि ते आपल्या छोटेखानी कारखान्यांत दाखल झाले.

आतां जावजीशेठ आणि राणूजी दोघेही खांद्याला खांदा लावून काम करूं लागले. जरूर असलेला माल मनपसंत व वेळच्या वेळीं मिळूं लागल्यामुळें मुंबईतीलच नव्हे, तर मुंबईच्या बाहेरील छापखानेवाल्यांकडूनही जावजीशेठच्या फाउंड्रीकडे मागण्या येऊं लागल्या. त्या मागण्या पुऱ्या पाडीत असतां, टाईपांत सौंदर्याच्या व सुलभतेच्या दृष्टीनें कोणत्या सुधारणा करतां येतील, ह्यासंबंधानें उभयतांत नेहमीं विचारविनिमय चालू असे; त्याचबरोबर प्रयोगही करून पाहाण्यांत येत असत.

एकाच विषयाला जीवनसर्वस्व मानणारीं दोन कलाकुशल माणसें क्वचितच एकत्र येत असतात व एकमेकांना आपलें जीवन समर्पीत असतात. आणि हें समर्पण कोठवर? आयुष्याच्या अंतापर्यंत व तदनंतरही!

जावजीशेठ आणि राणूजी हे दोघेही एकाच कलेचे उपासक होते. त्या काळांत सुंदर मुद्रिका तयार करण्याच्या बाबतींत त्यांचा हात धरणारा दुसरा कोणीही नव्हता. असें असतांना दोघांपैकीं एकालाही अभिमानानें कधीं ग्रासलें नाहीं. अजून आपणास दुसऱ्यांकडून पुष्कळ शिकायचें आहे, असें त्यांना शेवटपर्यंत वाटत असे.

आणि काय मौज आहे पाहा! एकाद्यानें "काय हो! तुमच्या मुद्रिका किती सुंदर असतात!" असे जावजीशेठजवळ सहज उद्गार काढले असतां, त्यांनीं तात्काळ उत्तर द्यावें, "बाबारे, ती सारी करामत आमच्या राणूजींची आहे!" आणि राणूजींजवळ तशाच प्रकारचें स्तुतिस्तोत्र कोणी गाऊं

लागला असतां, त्यांनीं सरळ जावजींकडे बोट दाखवून मोकळें व्हावें! ह्यांतील खरें रहस्य काय, तें ज्याचें त्यानें समजावें!

जावजीशेठनीं मुद्रणकलेच्या क्षेत्रांत, नंतरच्या काळांत, कोणींही हेवा करावा, असें अपरंपार यश मिळविलें. त्या यशांत राणूजींचाही मोठा हिस्सा आहे, हें विसरून चालणार नाहीं. दोन कलावंत माणसें एकत्र येतात, एकमेकांस पूरक व प्रेरक होऊन राहातात; परंतु हें अजोड ऐक्य अखेरपर्यंत टिकून राहात नाहीं. जावजीशेठचें जीवन यशस्वी व वैभवशाली झालें ह्याला कारण, माणसाची योग्य पारख करून त्याला आपलासा करून ठेवण्याची त्यांना साध्य झालेली किमया! राणूजी ह्या किमयेच्या कक्षेंत संपूर्णपणें आले होते.

एकटे राणूजी त्यांच्या जीवनांत आले, त्यांच्याशीं समरस झाले आणि स्थिरावले असें नसून, निरनिराळ्या क्षेत्रांत वावरणारीं अनेक थोर माणसें त्यांच्या सान्निध्यांत आलीं, दीर्घकाळ स्थिरावलीं व त्यांच्यासाठीं झटण्यांत जीवन-साफल्य मानून गेलीं! कलासंपन्न राणूजींनींही तेंच केलें.

जावजीशेठनीं स्थापन केलेल्या टाईप फाउंड्रीला उत्तरोत्तर उन्नत स्वरूप येऊं लागलें. पसारा वाढत चालला. जागा पुरेनाशी झाली. त्यामुळें त्या आरंभकाळांत ग्रँट-रोडवर जागा भाड्यानें घेऊन तेथेंही कांहीं माणसें ठेवून, छापखान्यास लागणारें विविध प्रकारचें साहित्य ते निर्माण करूं लागले.

अशा रीतीनें अवघ्या तीन-चार वर्षांच्या काळांत जावजीशेठनीं आपल्या फाउंड्रीचा जम उत्तम प्रकारें बसविला. त्यांना व्यापारी दृष्टि होती. केवळ टाईप पाडून देण्याचें एकच एक काम घेऊन ते बसले नव्हते. छापखान्याशीं संबंध येणाऱ्या इतर उलाढालीही ते करीत होते. छापखान्यांत लेडा, क्वॉड्रट्स्, वगैरे साहित्य लागतें. तेंही तयार करून ते विकूं लागले.

छापखान्यासाठीं लागणारें सारें साहित्य तयार करून आपण इतर छापखानेवाल्यांना संसार थाटतों, मग आपल्या टाईप फाउंड्रीच्या जोडीला आपणच एखादा छापखान्याची उभारणी केली, तर नाहीं का चालणार? असे विचार जावजीशेठच्या मनांत आतां घोळूं लागले. त्या व्यवसायाचीं सर्व अंगें-उपांगें आतां त्यांना माहीत झालीं होतीं. त्या काळांत कोणालाही नवीन छापखाना स्थापन करायचा असला, किंवा जुना छापखाना विकायचा असला, तर त्या

व्यवसायांतील एक माहितगार ह्या नात्यानें लोक त्यांच्याकडे येत असत. कधीं कधीं जुना मोडकळीस आलेला छापखाना विकत घेऊन व त्याला कामचलाऊ नवें सरूप देऊन, ज्याला गरज असेल त्याला तो विकून टाकण्याचाही व्यवसाय ह्या ४।५ वर्षांच्या काळांत त्यांनीं केला.

पहिले महाराष्ट्रीय छापखानेवाले गणपत कृष्णाजी हे १८६० सालीं निधन पावले असले, तरी त्या काळांत त्यांच्या मागेंही त्यांनीं स्थापन केलेल्या छापखान्याची कीर्ति सर्वत्र दुमदुमत होती. त्यांनीं ज्या काळांत छापखान्याचा व्यवसाय सुरू केला व तो भरभराटीस आणला, तो काळ जावजीशेठच्या काळापेक्षां कितीतरी पटींनीं प्रतिकूल होता. त्या काळांत केवळ स्वावलंबनाच्या व एक प्रकारच्या जिद्दीच्या बळावर त्यांनीं सभोवारच्या परिस्थितीवर जय मिळविला. पहिलें मराठी पंचांग प्रसिद्ध करून [ १८३१ ] तें लोकप्रिय करण्याचा मान त्यांच्याकडे जातो. शिळा-प्रेसवर पहिलें मराठी पंचांग छापून त्याच शुभ मुहूर्तावर त्यांनीं आपल्या छापखान्याचा शुभारंभ केला. तें पंचांग अनेक वर्षे शिळा-प्रेसवर छापलें जात असे, परंतु नंतर त्यांच्यामागें त्या छापखान्याच्या चालकांनीं १८६७ सालचें जें पंचांग प्रसिद्ध केलें, तें खिळा-प्रेसवर. अर्थात् पंचांगाच्या बाबतींत ती एक क्रांतिकारक सुधारणा होती. त्या काळीं टाइपांत छापलेलें तें पंचांग पाहून सर्वांचे डोळे दिपले असल्यास नवल नाहीं.

त्या काळीं विठ्ठल सखाराम अग्निहोत्री ह्यांनीं फणसवाडींत एक शिळा-प्रेस चालविला होता. शंभर वर्षांपूर्वीच्या त्या काळांत मुंबईंत मिशनऱ्यांनीं चालविलेले छापखाने त्यांच्या कर्तृत्वामुळें व सरकारी साहाय्यामुळें भरभराटींत होते. त्यात नवल करण्यासारखें कांहीं होतें, असें आम्हांला वाटत नाहीं. परंतु कोणाचाही सहकार नसतां गणपत कृष्णाजी, खातू, हेंगिस्टे, अग्निहोत्री, ह्यांच्यासारख्या सर्वसाधारण स्थितींतील महाराष्ट्रीयांनीं छापखाने स्थापन करून ते प्रतिकूल परिस्थितींत चालविण्याचें व त्या मार्गानें लोक-शिक्षणास यथाशक्ति हातभार लावण्याचें उदात्त धोरण स्वीकारलें होतें, हें विशेष आहे.

विठ्ठल सखाराम अग्निहोत्री हे धार्मिक प्रवृत्तीचे गृहस्थ होते. गणपत कृष्णाजींप्रमाणें त्यांनींही पंचांग-प्रकाशनाचें कार्य अनेक वर्षांपासून

चालविलें होतें; परंतु तें शिळा-प्रेसवर छापून बाहेर पडत असे. शिळा-प्रेस व खिळा-प्रेस यांच्या छपाईंत महदंतर असतें, हें कोणीही सांगूं शकेल. जें सुबक व ठाकठीक दिसेल, त्याकडे जनता आकर्षिली जाणार, हें स्वाभाविक आहे.

गणपत कृष्णाजींच्या छापखान्यातर्फे टाइपावर छापलेलें पंचांग बाहेर पडलेलें पाहातांच, इतरांप्रमाणें अग्निहोत्री हेही त्याकडे आकर्षिले गेले. त्यांना आढळून आलें कीं, यापुढें शिळा-प्रेसवर छापलेलें पंचांग हातांत घ्यायला सहसा कोणीही तयार होणार नाहीं. आपणही त्या तंत्राचें अनुकरण करणें अत्यावश्यक आहे.

परंतु पंचांगाच्या बाबतींतील ही आवश्यक सुधारणा कशी घडवून आणायची, हा पेंच-प्रसंग अग्निहोत्री ह्यांच्यापुढें उभा राहिला. त्यांच्यामध्यें आतां पूर्वीचा जोम राहिला नव्हता. मग ह्या कार्यांत कोणाचें सहकार्य संपादन करावें, ह्यासंबंधीं विचार करीत असतां, मुद्रण-व्यवसायांत व विशेषतः मुद्रिका तयार करून देण्याच्या कौशल्यांत, ज्यांचें नांव प्रामुख्यानें ऐकूं येऊं लागलें होतें, त्या तरुण जावजीशेठची त्यांना आठवण झाली.

अग्निहोत्री आणि जावजीशेठ ह्यांची ह्या कामानिमित्त एके दिवशी भेट घडून आली. ह्या भेटीला जावजीशेठच्याच नव्हे, तर महाराष्ट्रांतील मुद्रण-कलेच्या इतिहासांत फार महत्त्व आहे. कारण ह्या भेटीमुळें व ह्या भेटींत जें कांहीं ठरलें त्यामुळें, जावजीशेठच्या जीवनाला एकदम कलाटणी मिळाली आणि ह्याच भेटी-गांठींतून निर्णय-सागरसारखी नामवंत मुद्रण-संस्था जन्मास आली.

ह्या भेटींत एकमेकांच्या व्यवसायासंबंधीं बोलणें झाल्यानंतर अग्निहोत्री जावजीशेठना उद्देशून म्हणाले, "जावजी, तुम्हीं थोड्याच काळांत आपल्या व्यवसायांत चांगली मजल मारलीत, हें पाहून आम्हांला संतोष वाटतो. तुम्ही उद्योगी आहांत, तसेच कल्पक हुन्नरीही आहात. तुमच्या मुद्रिका-व्यवसायाशीं सुसंबद्ध असं माझं एक काम आहे. तें तुम्हीच करूं शकाल, असं मला वाटतं."

"शास्त्रीबुवा ! आपल्या कामाचं स्वरूप समजलं, तर विचार करतां येईल. माझ्या हातून होण्यासारखं असेल, तर मी जरूर प्रयत्न करून पाहीन. आपल्यासारख्यांचे आशीर्वाद माझ्या पाठीशीं असल्यामुळेंच मला डोकं वर करणं शक्य झालं आहे. सांगा वरं, मी आपली कोणती सेवा करूं ?"

"माझी सेवा कसली? मी सांगतों त्या कामाची जबाबदारी स्वीकारून तें जर तुम्हीं पार पाडलंत, तर जनता-जनार्दनाची सेवा केल्याचं पुण्य मात्र तुमच्या पदरीं पडेल. जावजी, तुम्ही तरुण आहांत, उत्साही आहांत व लहान-मोठ्या मुद्रिका पाडण्यांत वाकबगारही आहांत. गणपत कृष्णाजींच्या छापखान्यांतून बाहेर पडलेलं शिळा-छाप पंचांग तुमच्या पाहाण्यांत आलं असेलच. आज-काल तें पंचांग सर्वांच्या कौतुकाचा विषय होऊन राहिलं आहे. आम्ही आजवर आमचं पंचांग शिळा-प्रेसवर छापीत आलों, परंतु आतां मनु पालटला आहे. ह्यापुढें लोक शिळा-प्रेसची छपाई पतकरणार नाहींत नि आमच्या शिळा-प्रेस पंचांगाला कोणी विचारणारही नाहीं. सर्व बाजूंनीं विचार करून मी तुमच्याकडे आलों आहें. तुम्हीं मनावर घेतलंत, तरच हें कार्य होईल. जम बसवण्यासाठीं तुम्हांला कसून मेहनत घ्यावी लागेल, ह्याची जाणीव मला आहे. त्याच्यासाठीं वेगळ्याच प्रकारचा टाईपही तुम्हांला तयार करावा लागेल. पण तुम्ही हें काम पतकरा नि मला पंचांगाचं एकादं पान तयार करून दाखवा. तुम्हीं घेतलेल्या मेहनतीबद्दल, मी तुम्हांला पांचशें रुपये बक्षीस देईन. प्रथम त्रास झाला, तरी पुढं-मागं त्याचं फळ तुम्हांला मिळाल्याशिवाय राहाणार नाहीं. मग सांगा, आहे का तुमची तयारी?"

जावजीशेठच्या व्यवसायाबाहेरचें हें काम नव्हतें. त्यांनीं मनावर घ्यायचें ठरवलें असतें, म्हणजे त्यांच्या आटोक्यांत येण्यासारखें होतें. इतरांप्रमाणें मुहूर्त, सण, वार, वगैरेसाठीं तेही पंचांग पाहात असत, परंतु पंचांग पाहाणें वेगळें व त्याची घडवणूक करणें वेगळें. ही जबाबदारी स्वीकारावी कीं नाहीं, ह्याचा विचार करायला त्यांनीं वेळ मागून घेतला नाहीं. 'प्रयत्नान्तीं परमेश्वर.' आपण कसून प्रयत्न केला, तर अशक्य कांहीं नाहीं. चालून आलेली संधि वायां कां दवडायची? असा विचार करून ते म्हणाले, "शास्त्रीबुवा, मी प्रयत्न करून पाहातों. कारण ही कामगिरी नवीन स्वरूपाची आहे. आपल्याला माझ्यानें नकार देववत नाहीं. थोडा वेळ लागेल, परंतु ह्यापुढं इतर कामं सांभाळून मी पंचांगासाठीं जरूर तो टाईप व इतर साधनसामुग्री तयार करण्याच्या मार्गे लागतों. देवदयेनं यश मिळालं तर ठीक आहे."

अग्निहोत्री ह्यांस निरोप दिल्यानंतर जावजीशेठ इतर दैनंदिन कामें सांभाळून पंचांगासाठीं जरूर तीं साधनें निर्माण करण्याच्या तयारीस लागले.

गणपत कृष्णाजी छापखान्याचें पंचांग घेऊन टाइपाचा आकार, वळण व इतर आवश्यक गोष्टी त्यांनीं निरखून पाहिल्या. त्यांत सुधारणा कोणत्या करतां येतील, ह्याचाही विचार ते करूं लागले. हातीं घेतलेलें काम कसेंतरी उरकून मोकळें व्हायचें, हें त्यांच्या स्वभावांत नव्हतें. कालावधि लागला, वाजवीपेक्षां जास्त खर्च करावा लागला, तरी तो करून काम सुबक करायचें, हा त्यांच्या ठायीं एक स्वाभाविक गुण होता.

जावजीशेठ ह्या नवीन कामांत अगदीं रंगून गेले. परक्यानें सोंपविलेलें काम असलें म्हणून काय झालें ? त्याचें समाधान झालेंच पाहिजे, ह्यासाठीं ते झटत होते.

सर्व सुसज्जता झाल्यानंतर जावजीशेठनीं पंचांगाचें एक पान नमुन्या-दाखल तयार केलें. तें छापून घ्यायला त्या वेळीं त्यांच्याजवळ छापखान्याचें साधन नव्हतें. एका परिचित छापखान्यांत जाऊन तें पंचांगाचें पान त्यांनीं छापून घेतलें व तें घेऊन ते अग्निहोत्री ह्यांस भेटण्यासाठीं गेले.

तेथें पाहातात तों काय ? सारी उलथापालथ झालेली ! अग्निहोत्री ह्यांचा पूर्वीचा तो उत्साह मावळला होता. त्यांची सद्दी संपुष्टांत येण्याच्या मार्गास लागली होती. त्यांना उतरती कळा लागून ते हताश स्थितींत काळ कंठीत होते !

'आलें देवाजीच्या मना, तेथें कोणाचें चालेना ।' जावजीशेठनीं तयार करून आणलेलें तें पंचांगाचें छापील पान पाहून अग्निहोत्री खूष झाले. त्यांनीं जावजीशेठची पाठ थोपटली व म्हटलें, "जावजी, माफ करा हं ! मी तुम्हांला त्रास दिला खरा. पण आतां माझा निरुपाय झालेला आहे. मी सध्या फार अडचणींत आहें. मी कांहीं करूं शकत नाहीं व ह्या बाबतींत बोलूंही शकत नाहीं !"

"कांहीं चिंता करूं नका. ह्या तयार केलेल्या पानाचं व इतर साहित्याचं पुढें काय करायचं, तें मी पाहीन; परंतु तुमच्या आशीर्वादाचा मी भुकेला आहें !"

अग्निहोत्री ह्यांचे आशीर्वाद घेऊन जावजी घरीं आले. विचार करूं लागले. आपला जीव आटवून व मन लावून पंचांगासाठीं जी मेहनत घेतली, ती सारी वायां दवडायची का ?

जावजीशेठ बेचैन होऊन पुढें काय करायचें, ह्याचा विचार करूं लागले. पंचांग ही एक मंगल व पवित्र वस्तु आहे. त्याच भावनेनें मीं ह्या कामास हात घातला. अनेक दिवस खपून मीं जो उद्योग केला, तो कशासाठीं ? हीं साधना

वायां जाऊं द्यायची काय ? नाहीं ! तसें होऊं द्यायचें नाहीं ! पंचांग-साधनेच्या रूपानें माझ्या जीवनांत परिवर्तन घडवून आणवावें, असा ह्यांत ईश्वरी हेतु नसेल कशावरून ? गणपत कृष्णाजींनीं पंचांगास माक्ष ठेवून आपल्या छापखान्याचें गणपति-पूजन केलें व त्या कार्यांत त्यांनीं भरघोस यश मिळविलें. तेंच उदात्त उदाहरण दृष्टीपुढें ठेवून व त्यांच्या पावलांवर पावलें टाकून, आपण ह्यापुढील वाटचाल कां करूं नये ? पंचांगासाठीं प्रेसची स्थापना ! हाच आपला निर्णय !

जावजीशेठनीं नेहमींप्रमाणें आपल्या निकटवर्ती स्नेह्यांचा व सहकाऱ्यांचा सल्ला घेतला, तेव्हां त्यांनींही त्यांचा निर्णय उचलून धरला. त्याच निर्णयाला सागर ह्या शब्दाची जोड देऊन छापखान्याचें नांव 'निर्णय-सागर' ठेवायचें असें ठरलें. (१८६९)

नांव ठेवायचें तें कसें भव्य व भावपूर्ण असावें. नांवाच्या द्वारें आपल्या मनांतील आशा-आकांक्षा व्यक्त होत असतात. त्या सर्वांच्या बाबतींत फळास येत असतात, असें मात्र नाहीं. न येईनात कां ! आपल्या इच्छा, अपेक्षा, चांगल्या असाव्या. छापखान्याचें नांव 'निर्णय-सागर' ठेवण्यांत जावजीशेठच्या हिशेबीं असाच कांहीं ना कांहीं भव्योदात्त हेतु असावा. तो हेतु कोठवर सफल झाला, हें आज शंभर वर्षांनंतर आपण सांगूं शकतों. 'निर्णय-सागर' हा पुढील काळांत 'विद्या-सागर' झाला. अनेक शास्त्री-पंडितांचें व विद्वानांचें माहेरघर झाला. तसेंच शेंकडों लोकांना अन्न मिळवून देणारा आधार झाला. कालानुक्रमें पंचांग, बाल-बोध, काव्य-संग्रह, काव्य-माला व इतिहास-संग्रह ह्या पुण्य-पावन पंच-नद्यांचे प्रवाह त्यांत सामील होऊन, जावजीशेठच्या निर्णय-सागरनें भरतीचें भाग्य अनेक वर्षें अनुभवलें !

३

## धोरणी ग्रंथ-प्रकाशन

सुमारें शंभर वर्षांपूर्वी अत्यंत विपरीत परिस्थितींत, आज माननीय व अत्यंत महत्त्वाच्या होऊन राहिलेल्या ग्रंथ-प्रकाशनाच्या क्षेत्रांत जावजीशेठनीं जी कामगिरी बजावली, ती अतुलनीय आहे. आज अनुभवामुळें इंग्लंड, अमेरिका यांच्या सारख्या सुधारलेल्या राष्ट्रांशीं व त्यांच्या वाङ्मय-प्रकाशनाशीं आपला निकट संबंध आल्यामुळें ग्रंथ-प्रकाशनाचें क्षेत्र उत्तरोत्तर विकास पावत आहे. वाढत्या शिक्षण-प्रसारामुळें ग्रंथांची मागणीही वाढत चालली आहे. ग्रंथ-लेखक, ग्रंथ-प्रकाशक व वाचक ह्यांचे परस्पर संबंध कसे असावेत, ह्याचे संकेत आज निश्चित झाले आहेत.

शंभर वर्षांपूर्वी जावजीशेठनीं ग्रंथ-प्रकाशन सुरू केलें, तो काळ फार वेगळा होता. गणपत कृष्णाजींनीं ग्रंथ-प्रकाशनाचा भक्कम पाया घालून ठेवला होता, परंतु त्या पायावर सुंदर इमारतीची उभारणी व्हायची होती. त्या महान् कार्याचें बरेंचसें श्रेय निर्णय-सागर छापखान्याचे कर्तबगार संस्थापक जावजीशेठ व त्यांचे विद्वान् सहकारी ह्यांच्या वांट्यास जायचें होतें.

ह्या जगात ज्ञान ही एक प्रचंड व प्रभावी शक्ति आहे. ज्ञान-प्रसाराचें प्रमुख साधन म्हणजे छापखाना होय. ह्या छापखान्यानें जगांत क्रांति घडवून आणली आहे. जावजीशेठनीं ह्या छापखान्याचा उपयोग स्वार्थ व परमार्थ साधण्यासाठीं मोठ्या चतुराईनें केला.

प्रकाशन-कार्यांत त्यांनीं स्वतःपुढें कोणता मंत्र ठेवला होता व त्यासाठीं त्यांनीं कोण-कोणत्या तंत्रांचा कसा-कसा उपयोग केला, हें पाहाण्यापूर्वी प्रथमतः मुद्रण-क्षेत्रांत त्यांनीं कोणत्या मार्गानें प्रवेश केला, हें पाहूं या.

जावजीशेठची टाईप फौंड्री आतां स्वयंपूर्ण झाली होती. आपल्या कोणत्याही कार्यांत उणेपणा राहूं नये, ह्यासाठीं ते सतत डोळ्यांत तेल घालून जपत असत. सफाईदार टाईप पाडण्याचें एक यंत्र, तसेंच इंग्रजी टाइपाच्या दोन जातींच्या मेट्रिसा त्यांनीं त्या काळीं विलायतेहून मागविल्या होत्या. ह्या बाबतींत थॉमस ग्रॅहम ह्यांची सल्ला–मसलत त्यांना उपयोगी पडत असे.

एकेक पाऊल टाकीत, 'आगे कूच' करीत जायचें हें धोरण, त्यांनीं आरंभापासून ठेवलें होतें. मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें १८६९ साल हें जावजीशेठच्या जीवनांत फार महत्त्वाचें होतें. लहान लहान छापखाने घेऊन, ते सुसज्ज करून विकणें, हा त्यांचा एक जोड-धंदा होता. असाच एक लहानसा छापखाना १८६९ सालीं घेऊन व त्याला कामचलाऊ करून, त्यांनीं तो कमळोजी गौरोजी ह्या गृहस्थास विकून टाकला. छापखान्याकडे मनाची ओढ होती, परंतु तो पसारा आपण मांडावा कीं नाहीं, ह्या विचारांत ते होते. नेहमींप्रमाणें प्रत्येक पाऊल ते जपून टाकीत होते; इतक्यांत अग्निहोत्री ह्यांच्यासाठीं केलेली पंचांग-साधना त्यांच्या वांट्यास प्रतिकूल काल आल्यामुळें अंगावर पडली. ती मेहनत वायां जाऊं द्यायची नाहीं, पंचांग-प्रकाशन हें एक धार्मिक व लोकोपयोगी कार्य आहे, एवढेंच नव्हे, तर तो परमेश्वरी प्रसाद आहे, त्याचा स्वीकार आपण पवित्र भावनेनें केला पाहिजे, ह्या जाणिवेनें जावजीशेठनीं निर्णय-सागर छापखान्याची स्थापना केली. त्याची सुरुवात त्यांनीं एका सुपर रॉयल यंत्रापासून केली. पुढें कांहीं मोडकीं-तोडकीं यंत्रें विकत घेऊन, तीं स्वतःच्या देखरेखीखालीं दुरुस्त करविलीं. अशा रीतीनें पंचांग–देवतेची त्यांनीं आपल्या मुद्रण-मंदिरांत प्राणप्रतिष्ठा केली.

आमच्या माहितीप्रमाणें छापील पंचांगाच्या मागें सुमारें दीडशें वर्षांचा इतिहास आहे. 'मुंबई-समाचार' (साप्ताहिक) पत्राचे संस्थापक फर्दुनजी मर्झबान ह्यांनीं छापण्याच्या यंत्राचें महत्त्व ओळखून, मुंबईंत १८१२ सालीं एक लहानसा छापखाना स्थापन केला व १८१४ सालीं एक गुजराती पंचांग

तयार करवून घेऊन तें त्या छापखान्यांत छापिलें. मुंबईंत छापून प्रसिद्ध झालेलें हें पहिलें पंचांग. पंचांगाच्या मागोमाग त्यांनीं 'मुंबई समाचार' हें आजही लोकप्रिय होऊन राहिलेलें वृत्तपत्र ता. १ जुलै, १८२२ रोजीं साप्ताहिक स्वरूपांत व नंतर दहा वर्षांनीं [ १८३२ ] दैनिक स्वरूपांत सुरू केलें.[1]

पहिलें मराठी पंचांग शिळा-प्रेसवर छापून प्रसिद्ध करणारे सुप्रसिद्ध मुद्रक-प्रकाशक गणपत कृष्णाजी हे होत. ते धार्मिक वृत्तीचे होते. हिंदु लोकांस सण, तिथि, वार, मुहूर्त, वगैरे समजण्यासाठीं साधन पाहिजे, ह्या हेतूनें स्वकष्टानें शिळा-प्रेसची मांडणी करतांच, त्यांनीं केलेलें पहिलें सत्कृत्य म्हणजे पंचांग-प्रसिद्धि हें होय ( सन १८३१ ), हें पंचांग त्या काळीं तयार करून देण्याची जबाबदारी त्यांचे मित्र रखमाजी देवजी मुळे ह्यांनीं स्वीकारून ती समाधानकारक रीतीनें पार पाडली.[2] हे गृहस्थ जातीनें शिंपी होते.

त्या काळीं हें छापील पंचांग हातीं धरण्यास शास्त्री-पंडित तयार नसत. परंतु त्याच्या उपयुक्ततेमुळें तें हळू-हळू लोकप्रिय होत गेलें. तिथि, वार, नक्षत्र, योग व करण ह्या पांच अंगांचा विचार करणारें तें पंचांग, अशी पंचांगाची व्याख्या करण्यांत आली आहे. गणपत कृष्णाजींचें छापील पंचांग प्रसिद्ध होण्यापूर्वी महाराष्ट्रांतील जनता पंचांगासंबंधींची आपली गरज कशा रीतीनें भागवीत असे ? आमचे पूर्वकालीन शास्त्री-पंडित पंचांग करीत व लोकांना घरोघरीं जाऊन सांगत. लिपि-ज्ञान होण्यापूर्वी आपले सारे व्यवहार तोंडीच होत असत. प्राचीन काळापासून बहुजन-समाजास ज्योतिष-शास्त्राचें आकर्षण आहे. अमुक दिवस, नक्षत्रें व योग ह्या दिवशीं अमुक कृत्यें करावीं, असें वेदांतही सांगितलें आहे. त्यावरून ज्योतिष-शास्त्र हें किती प्राचीन आहे, ह्याची कल्पना करतां येईल.

गणपत कृष्णाजींच्या पंचांगाची उत्तरोत्तर वाढत चाललेली लोक-प्रियता पाहून पुण्या-मुंबईंत अनेकांनीं त्यांचें अनुकरण केलें. विठ्ठल सखाराम अग्निहोत्री

---

1 Printing Press in India by A. K. Priolkar, Page 78

२ विविधज्ञान विस्तार, पुस्तक २४, अंक ६, जून, १८९२

ह्यांचें पंचांग अनेक वर्षे शिळा-प्रेसवर छापून बाहेर पडत असे. शिळा-प्रेसची जागा खिळा-प्रेसनें घेतली, त्या वेळीं त्यांना जावजीशेठकडे धांव घ्यावी लागली.[1]

तोच जावजीशेठच्या खिळा-प्रेसचा शुभारंभ ठरला. पंचांगाला लागणारीं विशिष्ट अखंड अक्षरें, आंकडे, वगैरे सर्व साहित्य तयार होतें. लहानशा छापखान्याचीही मांडणी करण्यांत आली. त्यावरोबर पंचांगाचा खर्डा तयार करून देण्याची जबाबदारी वसई येथील नामांकित ज्योतिषी वे. शा. सं. चिंतामणि पुरुषोत्तमशास्त्री पुरंदरे ह्यांच्याकडे विश्वासपूर्वक सोंपविण्यांत आली व ती त्यांनीं समाधानकारक रीतीनें पारही पाडली. त्या काळीं अत्यंत लोकप्रिय असलेल्या ग्रहलाघवी पद्धतीच्या गणिताचें पंचांग ते तयार करीत असत. त्यांच्या मातबर सहकारामुळें शके १७९१ [इ. स. १८६९-७०] या वर्षाचें निर्णय-सागरचें पहिलें पंचांग प्रसिद्ध करणें शक्य झालें. जावजीशेठच्या निर्णय-सागर छापखान्यानें मोठ्या पवित्र भावनेनें सुरू केलेल्या ह्या स्तुत्य उपक्रमाला आणखी तीन वर्षांनीं एक शतक पूर्ण होईल ( १९६९ ). निर्णय-सागर पंचांगानें अल्पावधींत मिळविलेली व दीर्घकाळ टिकवलेली लोकप्रियता खरोखर अतुलनीय आहे. ह्या पंचांगावर जनतेची आत्यंतिक श्रद्धा आहे. स्वच्छ व सुंदर छपाई हें त्याचें बाह्य कारण झालें, परंतु त्याचें अंतरंगही जनतेची ज्योतिष-विषयक जिज्ञासा भागविणारें असतें. श्रम-साध्य असें महाप्रत गणित, गुरुशुक्रादि ग्रहाचे कालांशानुरोधानें अस्तोदयकाल, एकादशी, किंवा इतर पवित्र दिवस नेमके कोणत्या दिवशीं येतात ह्याचें सूक्ष्मांत सूक्ष्म गणित करून देण्याची पद्धति, वगैरे अनेक कारणांमुळें, तसेंच जयंत्या, पुण्यतिथ्या, वगैरे आवश्यक वाटणारे दिन-निर्देश ह्या पंचांगावरून अचूकपणें समजतात, अशी जनतेची खात्री पटल्यामुळें, निर्णय-सागर पंचांग हें आज-काल खऱ्या अर्थानें जनतेचें पंचांग होऊन राहिलें आहे. आजवर अनेकांचीं पंचांगें निघालीं, परंतु ह्या पंचांगानें जशी जन-मनाची घट्ट पकड घेतली, तशी दुसऱ्या कोणत्याही पंचांगानें आजतागायत घेतलेली नाहीं.

ज्योतिर्विद् चिंतामणिशास्त्री पुरंदरे हे जुन्यालाच चिकटून राहणारे नव्हते. कांहीं वर्षांनीं त्यांना आढळून आलें, कीं ग्रहलाघवीय पंचांग-गणित आकाशांत

[1] भारतीय ज्योतिष-शास्त्राचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास, शंकर बाळकृष्ण दीक्षित, पृष्ठ २९४

कांहीं अंशीं दृक्-प्रत्ययास येत नाहीं. तेव्हां त्यांनीं शक १८२६ मध्यें अखिल-भारतीय ज्योतिष-परिषदेंत मंजूर झालेल्या ठरावांतील दृक्-प्रत्यय-तुल्य नूतन गणित-पद्धतीला मान्यता दिली. शक १८३२ मध्यें ते निधन पावल्यानंतर त्या शास्त्रांत पारंगत असे त्यांचे चिरंजीव नारायण चिंतामणिशास्त्री पुरंदरे ह्यांनीं आपल्या वडिलांची परंपरा त्याच नेटानें पुढें चालविली. त्यांच्या कारकीर्दीत जनतेंत दृक्-प्रत्यय-तुल्य गणितांचें आकर्षण निर्माण झालें होतें. जनतेचा ओढा लक्षांत घेऊन व त्यांनाही ती पद्धति पसंत पडल्यामुळें, त्यांनीं तिचा अंतर्भाव पंचांग-रचनेंत क्रमाक्रमानें करण्यास प्रारंभ केला. शक १८५५ मध्यें त्यांच्या स्वर्ग-वासानंतर सोलापूर येथील वे. शा. सं. ज्यो. लक्ष्मण गोपाळ ऊर्फ नानाशास्त्री दाते हे निर्णय-सागरचें पंचांग तयार करूं लागले. शक १८८४ च्या पंचांगापर्यंत ही जबाबदारी त्यांनीं उत्तम प्रकारें सांभाळली. आणि पंचांग–गणितांत संपूर्ण दृक्–प्रत्यय–तुल्यता आणिली. अलीकडे चार वर्षें तो जबाबदारीचा भार ज्योतिर्विद् कृष्णाजी विठ्ठल सोमणशास्त्री ह्यांनीं स्वीकारला असून पूर्व-परंपरेला अनुसरूनच त्यांनीं आपलें कार्य चालविलें आहे, एवढेंच नव्हे, तर बदलत्या काळाला अनुसरून पंचांगाच्या अंतर्बाह्य स्वरूपांत कांहीं सुधारणा घडवून आणतां येतील का, ह्याचाही विचार त्यांनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनीं चालविला आहे.

सतत ९८ वर्षें आणि चालू चढा-ओढीच्या काळांतही लोक-प्रियता टिकवून धरणें ही साधी गोष्ट नाहीं. निर्णय-सागर म्हणजे पंचांग व पंचांग म्हणजे निर्णय-सागर, असें सार्थ समीकरण आज-काल होऊन राहिलें आहे. आरंभीं-आरंभीं ह्या पंचांगाच्या प्रती किती छापण्यांत आल्या हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं, परंतु गेलीं बरीच वर्षें तो आंकडा अडीच लाखांपलीकडे गेलेला आहे. प्रति-वर्षी ह्या पंचांगाला महाराष्ट्रांतील खेड्या-पाड्यांतून इतकी मागणी असते, कीं ती पाच लक्ष प्रतींनींही भागविली जाणार नाहीं; परंतु अनेक कारणामुळें चालकांस हात आंखडता घ्यावा लागत असतो.

निर्णय-सागर छापखान्याचा शुभारंभ पंचांगानें झाल्यामुळें, त्या शास्त्रीय विषयाचा येथें आरंभींच थोडा प्रपंच करावा लागला. आतां आपण जावजीशेठच्या ग्रंथ-प्रकाशन-कार्याकडे वळूंया.

## धोरणी ग्रंथ-प्रकाशनें

ज्या कार्याला हात घालायचा तें सर्वांग-सुंदर करण्यासाठीं मनापासून झटायचें, ह्या नेहमींच्या धोरणाला अनुसरून जावजीशेठनीं सुव्यवस्थित रीतीनें छापलेलें पंचांग जनतेला सादर करून, सर्वांचें लक्ष आपल्याकडे खेंचून घेतलें. धार्मिक पोथ्या-पुराणें श्रद्धेनें व भक्तिभावानें वाचण्याचा तो काळ होता. खेड्या-पाड्यांतून घरोघर पोथ्या-पुराणें वाचलीं जात असत. राम-विजय, हरि-विजय, पांडव-प्रताप ह्यासारख्या पोथ्या-पुराणांच्या चलेतीचा तो काळ होता. तीं शुद्ध व सुंदर स्वरूपांत लोकांस मिळावींत, ह्या हेतूनें जावजीशेठनीं वाङ्मयाच्या त्या शाखेकडे आपलें लक्ष प्रथम वळविलें.

त्या हेतूनें त्यांनीं आपल्या छापखान्यांत पंचांग-छपाईनंतर 'गरुड-पुराण' छापायला घेतलें. माणसानें आपली सारी हयात कशा रीतीनें घालवावी व मरणोत्तर कोणकोणते संस्कार करण्यांत यावेत, ह्यासंबंधीं विष्णु व गरुड ह्या दोघांमध्यें झालेला तो संवाद मूळ संस्कृतांत आहे. मराठी वाचकांसही त्याचें ज्ञान व्हावें, ह्यासाठीं त्या संस्कृत पुराणाचें मराठींत भाषांतर योग्य पंडितांकरवीं करून घेऊन, तें मूळ संस्कृतासह छापण्यांत आलें. हरि-विजय, राम-विजय, धर्म-सिंधु (तीन भाग), पांडव-प्रताप ह्यांसारख्या पोथ्या व धार्मिक ग्रंथ छापण्याच्या भरीस आज कोणी प्रकाशक पडत नाहीं. परंतु त्या काळीं अशा ग्रंथांचा वाचक भुकेलेला होता. अशा पोथ्या-पुराणांचें शुद्धीकरण करणें, त्यांचे पाठ बरोबर निश्चित करणें, अवघड शब्दांचे सुलभ अर्थ देणें, वगैरे आवश्यक ते संस्कार करण्यासाठीं जावजीशेठनीं विद्वान् लेखकांची नेमणूक केली व त्यांच्यावर ही कामगिरी सोंपविली.

विद्वान लेखक नेमून त्यांना सांभाळणें ही एक मोठी कला आहे. जावजीशेठना ती छान साधली होती, एवढेंच नव्हे, तर त्या कलेंत ते पूर्ण वाकबगार होते. ज्याला वशीकरण-विद्या म्हणतात, ती ईश्वर-कृपेनें जणूं काय त्यांना साध्य झालेली होती!

त्याशिवाय त्या काळीं विद्वानांना जावजीशेठचें आकर्षण वाटावें, असें एक प्रभावी साधन त्यांच्याजवळ होतें आणि तें म्हणजे मुद्रण-यंत्र. 'ज्याच्या हातीं ससा, तो पारधी!' त्याचप्रमाणें ज्याच्या हातीं मुद्रण-यंत्र, त्याच्या पदरीं विद्वान' ही घटना त्या काळाच्या दृष्टीनें अगदीं स्वाभाविक होती. पुढील विवेचनावरून ह्याचा उलगडा होईल.

देशांतील लोक गाढ अज्ञानांधकारांत वर्षेच्या वर्षे घोरत पडले होते. त्यांना खडबडून जागे करण्याचा व कर्तव्याभिमुख करण्याचा राज-मार्ग म्हणजे ज्ञान-प्रसार हाच होय. मुद्रण-यंत्राची जोड असल्याशिवाय ज्ञान-प्रसार होणें अशक्य, ह्याची खूण-गांठ तत्कालीन जाणत्या विद्वानांनीं स्वतःशीं बांधलेली होती.

इंग्रजांची राजवट सुरू होऊन शिक्षण-संस्था स्थापन झाल्यानंतरच्या म्हणजे सुमारें सव्वाशें वर्षांपूर्वीच्या काळांत ज्यांची विद्वानांत व लेखक-वर्गांत अभिमानपूर्वक गणना करतां येईल, असे आचार्य बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, सदाशिव काशिनाथ छत्रे, गोविंद नारायण माडगांवकर, हरि केशवजी पाठारे, कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांच्यासारख्या विद्वानांनीं पहिले-वहिले महाराष्ट्रीय मुद्रक गणपत कृष्णाजी ह्यांच्या व मिशनऱ्यांच्या मुद्रण-यंत्रांचा आश्रय घेऊन, त्या काळांत कांहीं ग्रंथ-निर्मिति केली. त्यात शालोपयोगी पुस्तकांचाच विशेष भरणा होता. कालानुरूप परंतु विपरीत परिस्थितींत त्या काळीं जें घडायचें तें घडलें. ज्यांच्यामुळें व ज्यांच्या सहकारानें आरंभ-काळांतील तें प्रकाशन-कार्य घडून आलें, त्यांना द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच होतील.

काळ झपाट्यानें बदलत चालला होता. शिक्षण-प्रसाराचा वेग वाढला होता. सभोंवारच्या परिस्थितीची जाणीव तीव्रतेनें होऊं लागली होती. त्याबरोबर विचार-जागृतीची लाट उसळण्यास सुरुवात झाली. निबंध-मालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर, गोपाळ हरि देशमुख (लोकहितवादी), राजारामशास्त्री भागवत, रामभाऊ गुंजीकर, विनायक कोंडदेव ओक, जनार्दन बाळाजी मोडक, महादेव मोरेश्वर कुंटे, गंगाधरपंत मोगरे, वामनराव ओक, हरि महादेव पंडित, काशीनाथ पांडुरंग परब, अशीं नांवें किती सांगावीं? ही सारी दुसऱ्या पिढीतील विद्वान् लेखक-मंडळी होय. ह्यांपैकीं पहिले विष्णुशास्त्री चिपळूणकर हे पुण्यांत राहाणारे व अल्पायुषी, ह्यामुळें जावजीशेठना त्यांचें प्रत्यक्ष मार्ग-दर्शन व सहवास लाभला नाहीं. परंतु वर ज्यांचा ज्यांचा म्हणून उल्लेख करण्यांत आला आहे, त्यांचा त्यांचा व इतर अनेकांचा सक्रिय सहकार व मार्गदर्शन ह्यांचा लाभ जावजीशेठना घडला. देश-स्थिति कोणत्याही दृष्टीनें पाहातां मोठी बिकट व हताश करून सोडणारी होती. ज्या उपरोक्त विद्वानांना

तिची जाणीव झाली, त्यांचीं अंतःकरणें स्वदेशाभिमान व स्वभाषाभिमान ह्यांमुळें पेटूं लागलीं. जनता कोठें तरी वाहात चालली आहे. स्व-देश, स्व-धर्म व स्व-भाषा ह्यांबद्दल अभिमान वाटण्याऐवजीं बहु-जन-समाजांत तिरस्काराची भावना निर्माण झालेली आहे. तेव्हां शक्य त्या मार्गांनीं हें काल-चक्र फिरवणें अत्यंत जरूर आहे, असें त्यांना वाटूं लागलें.

ह्या परिस्थितीला अनुसरून निबंध-मालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर म्हणतात: "आमचा एवढा सारा देश, जो कुंभकर्णासारखा निद्रापद भोगीत स्वस्थ व सुस्त होऊन पडला आहे, त्याला हालवून जागें करण्याची प्रथमतः तजवीज झाली पाहिजे. हाच प्रकार यापूर्वी साऱ्या युरोपांत, फ्रान्स देशांत व रशियांत झालेला आहे. अवघें युरोप खंड सोळाव्या शतकापूर्वी आमच्या देशाप्रमाणेंच स्वस्थपणें घोरत पडलें होतें, पण चीन देशांतून मुद्रण-कलेनें येऊन पाश्चात्य राष्ट्रांच्या ठायीं वस्ती केली मात्र, तों लागलीच ५०।६० वर्षांत जिकडे तिकडे चळवळ सुरू झाली. ग्रीक व लॅटीन ग्रंथांचा साऱ्या देशांत अभ्यास व्हायला लागून युरोपची बुद्धि-देवता जी निद्रिस्त झाली होती, ती एकाएकीं जागी झाली!"

निबंध-मालाकारांनीं ह्यांत विशेषतः एका गोष्टीवर जोर दिला आहे. कोणत्या? मुद्रणकलेमुळें युरोपची बुद्धि-देवता जागृत झाली ह्या. आणि हें त्रिवार सत्य आहे. आमच्याही लोकांची बुद्धि-देवता जागृत करायची, तर त्यासाठीं मुद्रण-कलेचें साहाय्य घेणें जरूर आहे. घरोघर ज्ञानाची खैरात करणारे नाना प्रकारचे ग्रंथ प्रसिद्ध झाले पाहिजेत. आणि लोकांना ते स्वस्त किंमतींत मिळण्याची सोय झाली पाहिजे, असें देश-हितैषी विद्वानांस वाटूं लागलें.

तत्कालीन जनतेची अज्ञानावस्था व खालावलेली स्थिति पाहून, त्याचप्रमाणें अनाठायीं दान-धर्माच्या नांवें होणारा पैशाचा अपव्यय पाहून, ज्यांचें अंतःकरण तीळ-तीळ तुटे, असे सरदार गोपाळ हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी ह्यांनींही वेगळ्या मार्पेत तोच तोडगा सांगितला आहे. आपल्या शतपत्रांत ते म्हणतात, "ग्रंथ छापणारे यांस पैसा द्यावा, हें सर्वांपेक्षां उत्तम आहे; या देशांत तर अति उत्कृष्ट हाच धर्म आहे. हें मूर्खांस शहाणे करण्याचें काम आहे; अशी समजूत यांची पडेल तर त्वरित लोक सुधारतील, यांत

संशय नाहीं. असें झाल्यावांचून ग्रंथही पुष्कळ होणार नाहींत; परंतु ईश्वरेच्छा प्रमाण।"

ग्रंथ-निर्मिति विपुल झाली पाहिजे व ग्रंथ जनतेच्या आटोक्यांत आले पाहिजेत, अशी हाकाटी विद्वान् मंडळींनीं चालविली होती. केवळ हाकाटी करून ती मंडळी थांबली नव्हती. त्या दृष्टीनें आपणांस जें करतां येण्यासारखें असेल, तें त्याग-पूर्वक करण्याची त्यांची तयारी होती. त्यांनीं पाहिलें कीं, जावजीशेठजवळ हुकमी, खंबीर व प्रभावी अशी मुद्रण-यंत्रणा आहे. ह्या यंत्रणेची व बुद्धिकौशल्याची बेमालूम सांगड घालण्यांत आली, तर ज्ञान-प्रसाराचें व लोक-जागृतीचें कार्य पार पाडतां येण्यासारखें आहे.

निर्णय-सागर छापखान्याची स्थापना झाल्यानंतर पहिलीं ५।६ वर्षें त्याला जरूर त्या यंत्र-सामुग्रीनें सजविण्यांत व स्वयं-पूर्ण करण्यांत गेलीं. उत्कृष्ट छपाईमुळें ह्या छापखान्याला छपाईच्या कामांची टंचाई कधींही भासली नाहीं. उलट कामांचा भार वाढत चालला. या छापखान्याची छपाईच इतकी रेखीव व आकर्षक असे कीं, प्रत्येक ग्रंथकाराला तेथें जाण्याचा मोह अनावर व्हावा. जावजीशेठ हे विद्वानांच्या सहवासाला आसावलेले व विद्वानांबद्दल आत्यंतिक आस्था आणि आदर बाळगणारे होते. त्यामुळें हळू-हळू निर्णय-सागर छापखाना हें विद्वानांच्या बैठकीचें व त्यांच्या विचार-विनिमयाचें एक पवित्र स्थान झालें. ह्या स्थानाचें माहात्म्य उत्तरोत्तर वाढत जाऊन, तें जनतेला उपकारक होऊन राहावयाचें होतें.

उद्योग हाच जावजीशेठचा परमेश्वर होता. सतत उद्योग करायचा व तो अत्यंत कौशल्यपूर्वक आणि मन लावून करायचा, ह्या एकमेव विचाराची घट्ट कांस धरल्यामुळें, उत्कर्ष-सोपानाची एकेक पायरी ते चढूं लागले. त्याच्या मनावर आपल्या उद्योगापुरते जरूर ते सारे सुसंस्कार घडले होते. त्यांचें अंतःकरण निष्पाप व निर्मळ होतें. तेथें सुसंस्काराच्या बैठकीस भरपूर जागा होती. ती जागा त्यांच्या सहवासात येत गेलेल्या भाषा-प्रेमी व देश-प्रेमी विद्वान् मंडळींनीं भरून काढली. विनायक कोंडदेव ओक, रामभाऊ गुंजीकर, काशीनाथपंत परब, महादेव मोरेश्वर कुंटे, राजारामशास्त्री भागवत ह्यांच्या-सारख्या नेहमीं निकट सहवासांत येणाऱ्या विद्वान् मंडळीवर जावजीशेठची

अपरंपार श्रद्धा होती. त्यांचा सल्ला घेतल्याशिवाय जावजीशेठ वाङ्मय-प्रकाशन-क्षेत्रांत पुढें पाऊल टाकीत नसत. जें मुद्रित व्हायचें तें एक-दोन नव्हे तर चार-पांच विद्वानांच्या नजरेखालून जावें लागत असे. जें एकदां श्रद्धेचें व विश्वासाचें स्थान ठरवलें तें कायमचें. त्या स्थानावरून जो सल्ला मिळेल, त्याप्रमाणें धोरण ठेवायचें. त्याच्या बाहेर केव्हांही पाऊल टाकायचें नाहीं. मग त्यापायीं नफा होवो वा नुकसान होवो, असें जणूं काय जावजीशेठनीं स्वतःवर पवित्र बंधन लादून घेतलें होतें. विश्वासानें विश्वास वाढतो म्हणतात, त्याप्रमाणें त्यांचे सल्लागारही आपापली जबाबदारी ओळखून त्यांच्या बाबतींत आस्थेनें व कसोशीनें वागत असत. त्यांना योग्य व जरूर तोच सल्ला देत असत.

सज्जनांच्या सहवासाचा इष्ट परिणाम मनावर झाल्याशिवाय राहात नाहीं. जावजीशेठनीं त्या प्रतिकूल काळांत शेंकडों संस्कृत व मराठी ग्रंथ प्रसिद्ध केले, ते काय केवळ फायद्यासाठीं? किती तरी ग्रंथांच्या प्रसिद्धीमुळें त्यांना जबर नुकसान सोसावें लागलें. परंतु त्याबद्दल त्यांनीं कधींही दुःख मानलें नाहीं किंवा तक्रारही केली नाहीं. सतत व्यापारी दृष्टीनें वागणारे ते मुद्रक-प्रकाशक नव्हते. ग्रंथ-प्रकाशनानें लोक-जागृति होते. ही ज्ञान-देवीची एक बहुमोल सेवा आहे एवढेंच नव्हे, तर एका छापखान्याचे चालक ह्या नात्यानें, हें आपलें एक पवित्र कर्तव्य आहे, ह्या जाणिवेनें ते वागत होते.

आज मराठी व संस्कृत भाषेला मानाचें स्थान प्राप्त झालें आहे, एवढेंच नव्हे, तर मराठीला राज्य-भाषेचें उच्चांत उच्च स्थान प्राप्त झालें आहे. आज ती महाराष्ट्राच्या राज-सिंहासनीं विराजमान झाली आहे. परंतु जावजीशेठनीं ज्या काळांत ग्रंथ-प्रकाशन-कार्य सुरू केलें, तो काळ प्रतिकूल होता. फार काय? मराठीच्या अवहेलनेचा व हेटाळणीचा तो काळ होता.

आपल्या मराठी भाषेबद्दल आमच्या तत्कालीन लोकांना काय वाटत असे हें सांगतांना निबंध-मालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर म्हणतात; "आम्हांस कित्येकांच्या तोंडून असें ऐकलेलें आठवतें कीं, मनांतील अभिप्राय खुबीदार रीतीनें स्पष्ट करण्यास मराठी अगदीं अप्रयोजक, तींत कांहीं जीव नाहीं. कित्येक शिक्षक तर इंग्रजींतील अर्थ मराठींत समजून देतांना निरुपाय होऊन हात टेकतात; त्यांतून जे कोणी अंमळ चणचणीत असतात, ते तर माफ मागून

जातात कीं, छे हो! मराठी भाषेंत याचें भाषांतरच होऊं शकत नाहीं! आपली भाषा फार मिकार पडली! अलिकडील विद्वानांनीं तर जुन्या शास्त्री लोकांवरही चढ केली! त्यांना देशभाषेचा विटाळही सोसत नाही! दहावीस वर्षांमागें शिकलेल्या लोकांस मराठींत ग्रंथ लिहिण्याची हौस वाटत असे; पण आतां ती भाषा कोणास डोळ्यांसमोरही नको!"

शास्त्री-बुवांनीं मराठी भाषेच्या जळजळीत अभिमानानें काढलेले हे उद्गार आहेत आणि त्याच काळाला अनुसरून जनतेंत वाचनाभिरुचि नाहीं व तिचें सारें लक्ष ख्याली-खुशालीकडे कसें लागलें आहे, ह्याची जाणीव करून देतांना, गोविंद नारायण माडगांवकर ह्यांनीं आपल्या 'मुंबई-वर्णन' ह्या ग्रंथांत नमूद करून ठेविलें आहे: "मुंबईंतील पारशी लोकांस वाचण्याची गोडी लागल्यामुळें गुजराथी ग्रंथ पुष्कळ खपून, ग्रंथ-कर्त्यांस उत्तेजन येऊं लागलें; व त्यांमध्यें शाळा पुष्कळ उपस्थित झाल्या. म्हणून सर्व प्रकारें त्यांचा उत्कर्ष होत चालला आहे. दक्षिणी हिंदु लोकांत अजून मराठी ग्रंथ अथवा वर्तमानपत्रें वाचण्याची गोडीच लागलेली नाहीं. आमच्या लोकांस मराठी ग्रंथ वाचण्याचा आळस. इतकेंच केवळ नाहीं, तर इंग्रजी ग्रंथ तरी लक्ष लावून वाचावयास तरी ते कुठें इच्छितात? सांप्रत काळीं त्यांचीं मनें बहुतकरून ख्याली-खुशालीकडे व डाम-डौलांकडे लागलीं आहेत. ह्या लोकांस इतकें मात्र पक्कें ठाऊक आहे कीं, जें हजार वर्षांमागें वहिवाटींत आलें होतें, तेंच चालवावें. त्यांत कांहीं फेरफार करूं नये."[१]

अशा रीतीनें विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकहितवादी, गोविंद नारायण माडगांवकर किंवा विनायक कोंडदेव ओक ह्यांच्यासारखे स्वभाषा व स्वदेश-प्रेमी तत्कालीन लेखक वस्तु-स्थितीची यथातथ्य जाणीव आपल्या गद्य लेखनानें करून देत होते, तर कविवर्य गंगाधरपंत मोगरे ह्यांच्यासारखे स्वभाषा-प्रेमी कवि लोक-स्थितीसंबंधानें आपल्या तीव्र भावना क्षणक्षणीत काव्य-पंक्तींच्या रूपानें प्रकट करीत होते.

मराठी ग्रंथकारांस उद्देशून केलेल्या प्रार्थनेंत ते म्हणतात:

---

१ मुंबई-वर्णन, लेखक—गो. ना. माडगांवकर, दुसरी आवृत्ति, पृष्ठ २२७

( आर्या )

"ग्रंथप्रसार पुष्कळ, जनपद भार्येत जों नसे झाला ।
लागायाचें नाहीं, जनमत हें तोंवरी सुमार्गाला ॥
यास्तव विद्वज्जनहो ! उघडा उघडा स्वबुद्धिभांडारें ।
अज्ञानध्वांत हरा, नाना ग्रंथप्रकाशनद्वारें ॥
जे लाजतील कोणी तुमच्या लेखां भराचया हातीं ।
समजा कृतघ्न पोरें झालीं उद्युक्त मातृघाता तीं" ॥

जावजीशेठनीं ज्या काळांत ग्रंथप्रकाशनाचें कार्य सुरू केलें, त्या काळाची थोडीशी कां होईना, कल्पना करतां यावी, या हेतूनें ही पार्श्वभूमि सांगण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. जावजीशेठच्या दिवाणखान्यांत विद्वान मंडळींच्या ज्या बैठका मधून मधून भरत असत, त्यांत हे सारे प्रश्न चर्चिले जात असत. जावजीशेठ त्या चर्चा लक्षपूर्वक ऐकून, त्यांतील ग्राह्यांश शोधून काढीत असत. आपण कोणती भूमिका स्वीकारूं शकतों, याचाही आपल्या परीनें ते विचार करीत असत.

ही विचारशक्ति जागी झाल्यामुळें, ग्रंथ-प्रकाशन क्षेत्रांत आपणांस जें जें करतां येण्यासारखें असेल तें तें करावयाचें, आंतबट्ट्याचा व्यवहार सहसा करायचा नाहीं, हें खरें असलें, तरी हा एक कल्याणकारी व्यवसाय आहे व त्याच्याशीं लोककल्याण निगडित झालेलें आहे. तेव्हां सदासर्वकाळ नफ्यावर नजर ठेवून न राहातां नुकसानीला तोंड द्यावें लागलें तरी त्याबद्दल खंत बाळगायची नाहीं. कुठून ना कुठून दोन्ही बाजू सांभाळतां आल्या म्हणजे झालें. हीच दृष्टि जावजीशेठनीं शेवटपर्यंत ठेविली होती.

त्या काळांत ग्रंथप्रकाशनाच्या बाबतींत जावजीशेठनीं कोणतें धोरण स्वीकारलें होतें, हें आजच्या बदललेल्या काळात लक्षांत घेण्याजोगें आहे.

पूर्वीच्या काळांत शिळा-प्रेसवर व खिळा-प्रेसवर जे ग्रंथ छापून प्रसिद्ध केले गेले, त्यापैकीं कित्येक ग्रंथ दुर्मिळ झाले होते. त्यांपैकीं कांहींचे हक्क सरकारकडे होते तर कांहींचे खाजगी व्यक्तींकडे किंवा त्यांच्या नातलगांकडे होते. त्यांचा तपास करून ते हक्क मिळवावयाचे व दुर्मिळ ग्रंथ वाचकाम उपलब्ध करून द्यावयाचे.

विद्वान ग्रंथकारांस शक्य तेवढें उत्तेजन देऊन त्यांना विविध विषयां ग्रंथ लिहिण्याम उद्युक्त करावयाचें व स्वतःच्या जबाबदारीवर ते ग्रं प्रसिद्ध करावयाचे.

जे प्रसिद्धीच्या प्रकाशांत आले नाहींत असे हस्तलिखित ग्रंथ मिळवून त्यांचें ज्ञात्यांकडून संपादन करवून त्यांचें प्रकाशन करावयाचें.

इंग्रजी व संस्कृत ह्या दोन्ही भाषांत अपरंपार ग्रंथसंपदा आहे. मराठी वाचकांस तिचा लाभ होऊन त्यांच्या ज्ञानांत भर पडावी ह्या हेतूनें विद्वानांकरवीं दोन्ही भाषांतील अनेक उपयुक्त ग्रंथांचीं मराठींत रूपांतरें करवून घेऊन तीं प्रसिद्ध करावयाचीं.

जावजीशेठजींच्या सांनिध्यांत नेहमीं असलेले तत्कालीन नामवंत लेखक विनायक कोंडदेव ओक हे एक विचारी व अनुभवी शिक्षक होते. त्यांनीं तत्कालीन विद्यार्थी-जगाचें अत्यंत बारकाईनें निरीक्षण केलें होतें. लहान वयापासून विद्यार्थ्यांच्या हातांत ज्ञानलालसा वाढविणारीं व बुद्धिविकासास सहाय्यभूत होतील अशीं क्रमिक पुस्तकें पडलीं पाहिजेत, त्याशिवाय मोठेपणीं त्यांच्याठायीं कर्तबगारीचें वारें शिरणार नाहीं, असें त्यांना वाटत असे.

ओकांचा व्यासंग दांडगा होता. पहिल्या इयत्तेपासून तों सातव्या इयत्तेपर्यंत वाढत्या बुद्धीला व वयोमानाला अनुसरून सात क्रमिक पुस्तकांची एक माला गुंफणें त्यांना कठीण नव्हतें. ह्या महत्त्वाच्या प्रश्नाच्या बाबतींत त्यांनीं जावजीशेठ यांच्याशीं साधक-बाधक रीतीनें चर्चा केली. जावजीशेठना त्यांचा विचार पसंत पडला. तरीही आपल्या विद्वान सल्लागार-मंडळापुढें त्यांनीं हा प्रश्न विचारासाठीं ठेविला. ओक याच्याजवळ योजना तयार होतीच. पहिल्या तीन इयत्तांसाठीं सुलभ भाषेंत व लहान वयाच्या मुलांना आकलन करतां येतील, अशा प्रकारचे धडे त्यांनीं तयार केले. लहान लहान व सोप्या भाषेंतील गोष्टी, शास्त्रीय, परंतु सुलभ भाषेंत लिहिलेले छोटे छोटे धडे, आणि रसाळ कविता ह्यांच्या जोडीला चित्रें व ठसठशीत सुंदर नि मोठा टाईप, यांचीही आकर्षक योजना करण्यांत आली.

देवाची प्रार्थना या दुसऱ्या क्रमिक-पुस्तकांतील या काव्य-पंक्ति पहा—

**'संगती मला चांगली घडो।**
**बोध मानसा चांगला जडो॥**
**बुद्धि चांगली नित्य आवडो।**
**देह चांगल्या कारणीं पडो॥'**

ही योजना सर्वसंमत होऊन ती लवकरांत लवकर अंमलांत आणण्याचें ठरलें. या क्रमिक-वाचनमालेचें महत्त्व लक्षांत घेऊन ती जितकी सर्वांगसुंदर करतां येईल, तेवढी करण्यासाठीं जावजीशेठ झटले.

जावजीशेठ यांच्या कारकीर्दीत ह्या निर्णयसागर-क्रमिक-पुस्तकमालेचीं तीन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. तत्पूर्वी अशी पद्धतशीर स्वरूपाची शालोपयोगी सचित्र क्रमिक-पुस्तकमाला तयार करण्याचें धाडस कोणींही पतकरलें नव्हतें. तुटपुंजे प्रयत्न झाले होते. हें धाडस करण्यांत कल्पकता होती, बुद्धिमत्ता होती व विद्यार्थ्यांच्या बुद्धि-विकासासंबंधीं वाटणारी तळमळही होती. विनायकराव ओक व जावजीशेठ यांनीं ही कल्पना अंमलांत आणून त्या काळांत यशस्वी करून दाखविली.

सुमारें ऐशीं वर्षांपूर्वीची ही घटना आहे. नंतर अलीकडच्या काळांत सर्व प्रकारच्या साधनांचा सुकाळ झाला. शाळेंतील मुलांच्या हातांत वयोमानानुरूप देण्यायोग्य अशीं पुस्तकें तयार करणारे अनेक पट्टीचे लेखक व प्रकाशक पुढें आले. त्यांत कर्नाटक-प्रकाशनचे मंगेशराव कुळकर्णी व ढवळे-प्रकाशनचे के. भि. ढवळे यांचा प्रामुख्यानें उल्लेख करतां येईल. या क्षेत्रांतील त्यांचा उद्योग व कर्तबगारी प्रशंसनीय आहे. पुण्यांतही अनेक प्रकाशक नंतरच्या काळांत उदयास आले.

वर सांगितल्याप्रमाणें जावजीशेठजींच्या काळांत विनायकराव ओक ह्यांनीं तयार केलेली तीन क्रमिक-पुस्तकें प्रसिद्ध झालीं. त्यांचा खपही त्या काळाच्या मानानें ठीक प्रमाणांत झाला. एकेका पुस्तकाच्या दहा दहा, बारा बारा आवृत्त्या निघाल्या. बालबोध पहिल्या पुस्तकाची १९२३ सालीं निघालेली बारावी आवृत्ति आमच्यासमोर असून तिच्या त्या काळीं पंचवीस हजार प्रति काढण्यांत आल्या होत्या. त्याचप्रमाणें इतर पुस्तकांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. पहिल्या सचित्र

पुस्तकाची किंमत दीड आणा तर दुसऱ्या सचित्र पुस्तकाची किंमत होती अवघी दोन आणे. टाईप सुंदर, ठसठशीत व मोहक देवनागरी. निर्णयसागरी-छपाई ही नेहमींच मनमोहक असायची. तो बहुमोल गुण निर्णयसागर-क्रमिक-पुस्तक-मालेच्या बाबतींत दिसून आल्यास नवल नाहीं.

त्या काळांत एकेका आवृत्तीच्या वीस ते पंचवीस हजार प्रति छापाव्या लागत असत. ह्यावरून जावजीशेठनीं सुरू केलेल्या क्रमिक-पुस्तक-मालेची लोकप्रियता समजून येईल.

जावजीशेठनंतर तुकारामशेठजींच्या कारकीर्दीत त्या मालेंतील चौथें व पांचवें पुस्तक प्रसिद्ध झालें. नंतर ह्या क्षेत्रांत चढाओढीचें युग सुरू झालें. कालमानांत व शिक्षणक्षेत्रांत क्रांतिकारक स्थित्यंतर घडून आलें नि ही माला मागें पडली.

हीं पुस्तकें तयार करताना विनायकराव ओक ह्यांच्यापुढें देशकल्याण-कारक असें विशिष्ट ध्येय होतें. ते प्रस्तावनेंत म्हणतात:—"सगळ्या शिक्षणाचा मुख्य उद्देश मनुष्यास सद्गृहस्थ बनविणें हा आहे. आणि सद्गृहस्थ म्हटला म्हणजे त्याचेठायीं ज्ञान आणि सदाचरण हे गुण पाहिजेत. म्हणून कालदेशवर्तमानानुरूप, आमच्या राष्ट्रांत असे गृहस्थ उत्पन्न व्हावे, अशा प्रकारचें शिक्षण प्राप्त व्हावें, अशीं क्रमिक-पुस्तकें विद्यार्थ्यांस पढविलीं पाहिजेत. त्या दिशेचा हा प्रयत्न आहे. ........... दिवसेंदिवस अधिकाधिक बलाढ्य होण्यास पैलवानांस जसा अधिकाधिक कसदार आणि पौष्टिक खुराक खावा लागतो, तसें आमच्या विद्यार्थिजनांस, ह्या क्रमिक पुस्तकांच्याद्वारें, ज्ञान, सदाचाराचें खाद्य अधिकाधिक योग्यतेचें देणें आवश्यक आहे. तसें ह्यांत थोडें केलें आहे."

हें जें 'थोडें केलें आहे' असें ओक म्हणतात, तें त्या काळावर मात करण्यासारखें होतें. परंतु झपाट्यानें बदलत जाणाऱ्या काळांत मात्र तें 'थोडें' टिकाव धरून रहाण्यासारखें नव्हतें.

विद्यार्थ्यांच्या हातांत वाचनीय व त्यांच्या मनावर सुसंस्कार घडविणारीं, त्याचप्रमाणें कर्तबगारीला प्रोत्साहन देणारीं पुस्तकें पडावीं, ह्या बाबतींत जावजीशेठजींचा फार कटाक्ष असे. शालोपयोगी पुस्तकें आपल्या निर्णयसागर

मुद्रणालयांतून जास्तींत जास्त बाहेर पडावीं, ही त्यांची एक आकांक्षा होती. विद्वान लेखकांस जरूर तें प्रोत्साहन देऊन हें कार्य पार पाडण्यासाठीं ते सतत झटत असत. त्यांच्या विनंतीस मान देऊन अनेक विद्वान लेखकांनीं त्यांच्याशीं च त्यांच्या चिरंजीवांशीं जाणीवपूर्वक सहकार्य केलें.

विद्यार्थ्यांस इंग्रजी भाषाविषय सुलमतेनें शिकतां यावा, ह्या सद्धेतूनें निर्णयसागरतर्फे प्रकाशित होणारी भाषांतरपाठमाला (तीन भाग) विद्यार्थि-जीवनांत गेल्या अनेक वर्षांपासून फार महत्त्वाचा भाग घेऊन राहिली आहे. कालमानाप्रमाणें शिक्षणपद्धतींत फेरबदल होत आहेत. तरीही द्वारकानाथ राघोबा तर्खडकर यांच्याकडून तयार करून घेण्यांत आलेल्या व निर्णयसागरतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या भाषांतर–पाठमालेची लोकप्रियता आजही कायम आहे. ह्या मालेच्या पहिल्या भागाची चौपन्नावी आवृत्ति १९६५ सालीं निघाली. त्याच-प्रमाणें दुसऱ्या व तिसऱ्या भागाची चाळिसावी आवृत्ति त्याच वर्षी प्रसिद्ध झाली.

निर्णयसागरच्या विनंतीस मान देऊन तत्कालीन विद्याखात्यानेंही विद्यार्थ्यांच्या उपयोगी पडणारे असे कांहीं उपयुक्त ग्रंथ पुनर्मुद्रित करण्याचे हक्क जावजीशेठ यांस दिले. 'बाळमित्र' व ग्रँट् डफ संपादित 'मराठ्यांची बखर' हीं दोन्ही पुस्तकें त्यांपैकींच होत.

कोणत्या विद्वानाचा कशारीतीनें उपयोग करून घ्यावा ह्याकडे जावजीशेठजींचें फार बारकाईनें लक्ष असे. शिवाय जरूर नि योग्य तो सल्ला देणारे सल्लागार त्यांच्याजवळ होतेच. येथें नमुन्यादाखल एक उदाहरण सांगावेंसें वाटतें. प्रो. श्री. ग. जिनसीवाले (१८५२–१९०३) हे त्या काळांतील एक नामांकित विद्वान पदवीधर होते. ते संस्कृतज्ञ होते. तसेच इतिहास वगैरे विषयांतही पारंगत होते. त्याचबरोबर ते मोठे कर्मठ, मार्मिक, निःस्पृह नि एककल्लीही होते. विल्सन महाविद्यालयांत ते संस्कृत विषयाचे प्राध्यापक होते; परंतु कांहीं कारणामुळें त्या जागेचा राजिनामा देऊन ते मुंबईस स्वस्थ राहिले होते. जावजीशेठना हें समजतांच ह्या विद्वानाचा आपल्या प्रकाशन-कार्याच्या दृष्टीनें कसा उपयोग करून घ्यावा, ह्याचा विचार ते करूं लागले.

जावजीशेठच्या सहवासांत नेहमीं असणारे विनायक कोंडदेव ओक ह्यांस एके दिवशीं बोलावून घेऊन त्यांस ते म्हणाले, "प्रो. जिनसीवाले सध्यां मुंबईत

आहेत व ते रिकामे आहेत असं समजतं, त्यांच्यासारख्या विद्वान पंडितांचा आपल्या प्रकाशन-कार्याच्या दृष्टीनं उपयोग करून घ्यावा असं मला वाटतं."

"आपला विचार चांगला आहे. मलाही तो पटतो; परंतु त्यांचा उपयोग निश्चित कोणत्या कार्यासाठीं करून घ्यावा, असं आपणांस वाटतं ?"

"आपली शंका बरोबर आहे. त्या दृष्टीनं मीं थोडासा विचार केला आहे. सध्यां शाळा–कॉलेजांतून संस्कृत पुस्तकं अभ्यासासाठीं लावलीं जातात. वेळोवेळीं विद्वानांकडून त्यांची निवडही केली जाते. प्रो. जिनसीवाले हे त्या विषयांतील एक तज्ज्ञ आहेत. त्यांनीं योग्य वाटणाऱ्या संस्कृत पुस्तकांची निवड करून विद्यार्थ्यांस मार्गदर्शक होणाऱ्या टीपा तयार कराव्या. तसंच विद्यार्थ्यांच्या उपयोगीं पडतील अशा कांहीं संस्कृत ग्रंथांचीं मराठींत भाषांतरें करावीं. त्यासाठीं योग्य तो मोबदला आपण त्यांना देऊं."

जावजीशेठची ही कल्पना ओक यांस रुचली व ती घेऊन ते प्रो. जिनसीवाले यांच्या भेटीस गेले. ह्या भेटींत ओक ह्यांनीं प्रो. जिनसीवाले यांस आपल्या भेटीचा हेतु कळवून जावजीशेठजींची विनंती नम्रपणें त्यांच्या कानावर घातली.

ओक यांचें सारें बोलणें शांतपणें ऐकून घेतल्यानंतर प्रो. जिनसीवाले त्यांस म्हणाले, "जावजीशेठ थोर मनाचे आहेत. त्यांचा उद्देशही चांगला आहे. त्यांनीं ज्ञानप्रसाराचें अत्यंत उपयुक्त कार्य चालविलें आहे, हें खरोखर त्यांना भूषणावह आहे. परंतु मी संस्कृत पुस्तकांस टीपा देण्याच्या विरुद्ध आहें. त्यामुळें विद्यार्थी घोके बनतात, दगड बनतात; म्हणून आम्ही असलं काम करूं इच्छीत नाहीं ! शिवाय मराठी ग्रंथ लिहिण्याची आम्हांला संवय नाहीं, असं जावजीशेठजींना सांगा !"

तो निरोप घेऊन वि. कों. ओक हे निराशेनें परत आले.[१]

जावजीशेठना अशा प्रकारचे अनुभव क्वचितच येत असत. अनेक लेखकांनीं त्यांच्या विनंतीस मान देऊन ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें उपयुक्त असें ग्रंथ-लेखन करून जावजीशेठनीं चालविलेल्या प्रकाशन-कार्यास हातभार लाविला.

त्यांच्या कार्यांत त्यांना मार्गदर्शन करणारें विद्वान मित्रांचें एक प्रकाशन-सल्लागार-मंडळ असे. कोणताही ग्रंथ छापण्यापूर्वी तो ह्या मंडळाकडे सुपूर्द करण्यांत

१ सांप्रतच्या लेखकांचे कर्तव्य : लेखक:–विनायक कोंडदेव ओक पृ. ३४ ३५.

येत असे व त्यांच्या अभिप्रायानुरूप त्या ग्रंथाची वासलात लागत असे. ह्या सल्लागार मंडळावर जावजीशेठजींचा संपूर्ण विश्वास होता. त्याच्या निर्णयांत ते कधींही ढवळाढवळ करीत नसत. जी गोष्ट आपणास समजत नाहीं, ती गोष्ट आपणास समजते, असा खोटा डौल त्यांनीं कधींही मिरविला नाहीं !

स्वयंस्फूर्तीनें किंवा जावजीशेठ यांच्या विनंतीला मान देऊन तत्कालीन अनेक विद्वान लेखकांनीं विविध व महत्त्वाच्या विषयांवर ग्रंथलेखन केलें व ते ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें श्रेय निर्णयसागर मुद्रणालयास दिलें. विनायक कोंडदेव ओक हे तर घरचेच लेखक होते. त्यांचे सुमारें ३०।३५ लहानमोठे नि विविध विषयांवरील ग्रंथ जावजीशेठनीं प्रकाशांत आणिले. त्याचप्रमाणें कर्नल जेकब, प्रो. विष्णु गो. विजापूरकर, न्या. मू. काशिनाथ त्र्यंबक तेलंग, लोकहितवादी, रा. ब. शं. पां. पंडित, प्रो. राजारामशास्त्री भागवत वगैरे तत्कालीन अनेक लेखकांस मुद्रण-प्रकाशनाच्या दृष्टीनें निर्णयसागरच्या छत्राखालीं येणें गौरवास्पद वाटलें. त्याशिवाय काव्यसंग्रह, काव्यमाला ह्या दोन उपयुक्त मालांच्या द्वारें जे मराठी व संस्कृत काव्यग्रंथ विद्वान संपादकांच्या नेतृत्वाखालीं प्रसिद्ध झाले, ते वेगळेच.

गणपत कृष्णाजींच्या व तदनंतरच्या काळांत कांहीं विद्वानांनीं संस्कृत नाटकांचीं मराठी भाषांतरें केलीं व त्यांची उपयुक्तता नि महत्त्व लक्षांत घेऊन सरकारच्या मदतीनें तीं प्रसिद्ध झालीं. तीं दुर्मिळ झालेलीं होतीं. सरकारकडून त्यांचे हक्क मिळवून ज्ञानप्रसाराच्या हेतूनें आपण तीं छापावीं नि अल्प किंमतींत मिळण्याची सोय करावी, अशी जावजीशेठजींची इच्छा होती. त्याविषयीं सरकार-कडे चौकशी करतां त्या नाटकांच्या प्रकाशनाचे हक्क लेखकांच्या नातलगांस देऊन टाकण्यांत आल्याचें समजलें, त्यामुळें त्यांचा निरुपाय झाला.

मुद्रक नि प्रकाशक हे राष्ट्राचे आधारस्तंभ आहेत. देशजागृति, ज्ञान-प्रसार व संस्कृतिसंरक्षण वगैरे दृष्टींनीं कोणत्याही राष्ट्रांत त्यांचें स्थान महत्त्वाचें आहे व तें तसें असलेंच पाहिजे, असें जावजीशेठना वाटत असे. त्याचबरोबर इतर व्यावसायिकांप्रमाणें मुद्रक व प्रकाशक ह्यांचे म्हणून कांहीं प्रश्न असतातच कीं नाहीं ? त्यांच्या मार्गांत मधून मधून अडचणीही उपस्थित होत असतात. त्या काळीं कांहीं मुद्रकांस बीभत्स पुस्तकें छापल्याच्या आरोपावरून सरकारकडून शिक्षा ठोठावण्यांत आल्या होत्या. एकमेकांच्या विचारानें कामें केल्यास अशा

प्रकारचीं संकटें टाळतां येतील; परंतु आपण सुसंघटित बनलें पाहिजे. तेव्हां वेळोवेळीं येणाऱ्या अडीअडचणींचें निराकरण करून घेतां यावें व मुद्रण-प्रकाशन व्यवसायाचा पाया खंबीर करतां यावा नि एकमेकांत बंधुभाव वाढावा, ह्या सद्धेतूनें मुंबईंत 'प्रिंटर्स पब्लिशर्स अँड बुकसेलर्स असोसिएशन' ह्या नांवाची संस्था स्थापन झाली. तिच्या स्थापनेंत व तिला कार्यक्षम बनविण्यांत जावजीशेठनीं त्या काळीं प्रामुख्यानें भाग घेतला. त्या संस्थेच्या सभा त्यांच्या छापखान्यांतच बहुधा भरत असत. त्या संस्थेचें कार्य नांवारूपास यावें, ह्यासाठीं जावजीशेठ वांट्यास येईल ती घस सोसण्यास आनंदानें तयार असत. त्या संस्थेंत वावरणारी मंडळी जावजीशेठजींकडे प्रेमादरभावनेनें पहात असे व त्यांचा सल्ला मोलाचा मानण्यांत येत असे. आपल्या व्यवसाय-बंधूंचें हित तेंच आपलें हित, असें जावजीशेठ मानीत असत. त्यामुळें व्यावसायिकांत त्यांची मान-मान्यता फार मोठी होती, हें सांगायलाच नको.

जावजीशेठ व त्या संस्थेचे चालक यांचा परस्परसंबंध अत्यंत जिव्हाळ्याचा होता. जावजीशेठ इहलोक सोडून गेले तेव्हां आपली संस्था आतां पोरकी झाली असें त्या संस्थेच्या चालकांस वाटलें. आपणास झालेलें दुःख प्रगट करण्यासाठीं संस्थेच्या चालकांनीं एक ठराव तयार केला नि तो जावजीशेठ यांच्या चिरंजीवांच्या भेटीस जाऊन त्यांना सुपूर्द केला. त्या ठरावांत म्हटलें होतें कीं, "परमपूज्य जावजी दादाजी म्हणजे आमच्या हिंदुस्थानांतील क्यास्लन होत. त्यांस देवाज्ञा झाल्याचें वृत्त ऐकून प्रिं. प. अँड बुकसेलर्स असोसिएशनला अतिशय दुःख झालें आहे. शेठ जावजी दादाजी हे अत्यंत साधे, परोपकारी, उदार अंतःकरणाचे, राष्ट्रहिताच्या कामांत अंतःकरणपूर्वक कळकळ बाळगणारे आणि व्यवहारांत व सल्लामसलतीच्या कामांत मोठे चतुर होते. त्यांच्या परलोकीं गमनानें, त्यांचें नांव ज्यांना म्हणून ऐकून माहीत आहे, अशा प्रत्येक मनुष्यास दुःख झाल्याशिवाय राहिलें नसेल. त्यांच्या अंगीं असणाऱ्या अनेक गुणांमुळें त्यांच्या परलोकीं गमनानें या सभेचा एक मूळस्तंभ आणि उत्कृष्ट मसलतगार गमावल्यासारखें सभेला झालें आहे."

कोणत्याही ग्रंथासंबंधीं विचार करावयाचा तो त्याच्या गुणवत्तेसंबंधानें च उपयुक्ततेसंबंधानें. तो खपेल किंवा नाहीं नि त्यांत गुंतलेलें भांडवल परत

हातीं लागेल कीं नाहीं, ह्या विचाराला जावजीशेठ ह्यांच्या हिशेबीं गौण स्थान असे. तूर्त नाहीं खपला तरी कालांतरानें कधीं ना कधीं खपेलच. भारदस्त व विद्वत्ताप्रचुर ग्रंथांना मागणी बेताचीच असावयाची; परंतु ज्या थोड्या संशोधक व विद्वान लोकांना त्या ग्रंथाची उपयुक्तता वाटते, त्यांची सोय पहाणें, हें अधिक महत्त्वाचें व राष्ट्रकल्याणाचें आहे, ह्या दृष्टीनें जावजीशेठ आपल्या प्रकाशन-व्यवसायाकडे पाहात असत.

जावजीशेठ यांच्या हिशेबीं ग्रंथाची उपयुक्तता हीच त्याची कसोटी असे. खपाच्या कसोटीला ते नेहमीं दुय्यम स्थान देत असत. जावजीशेठ यांच्या ग्रंथ-प्रकाशनाच्या बाबतींत कवि कालिदासाच्या रघुवंश ह्या महाकाव्याचें एकच उदाहरण घेऊं या. वे. शा. सं. गणेशशास्त्री लेले ह्यांनीं त्याचें भाषांतर केलें. दक्षिणा प्राईज कमिटीच्या पसंतीला तें उतरलें. कमिटीनें शास्त्रीबुवांस पांचशें रुपये पारितोषिक दिलें. ह्यावरून त्या ग्रंथाचें महत्त्व समजून येईल. जावजीशेठनीं तो ग्रंथ लेलेशास्त्री यांच्याकडून योग्य तो मोबदला देऊन विकत घेतला नि छापून प्रसिद्ध केला. ह्या भल्या, जाडजूड ग्रंथाची किंमत सर्व-साधारण लोकांस परवडावी ह्या हेतूनें अवघी दोन रुपये ठेवण्यांत आली! एक हजार प्रति छापल्या. सुमारें दहा वर्षांनीं त्या ग्रंथाच्या प्रति एकूण खपल्या किती, याचा आढावा घेण्यांत आला तेव्हां जेमतेम शैंसव्वाशें प्रति संपल्याचें आढळून आलें!

अनेक संत कवींचीं काव्यें नि अनेक दुर्मिळ आणि उपयुक्त संस्कृत ग्रंथ जावजीशेठनीं छापून प्रसिद्ध केले. किंमती सर्वसाधारण लोकांना परवडाव्या ह्या दृष्टीनें कमींत कमी ठेविल्या; तरीही त्यांपैकीं अनेक ग्रंथांचा उठाव जसा व्हावा तसा झाला नाहीं. अशा ग्रंथांचें स्वागत करण्यासाठीं वखारींत कपाटांची रांग सज्ज होऊन राहिलेली असे! तेथें बैठक मारल्यानंतर त्यांना वाळवीचा उपद्रव होऊं नये, याबद्दल मात्र शक्य तेवढी दक्षता बाळगण्यांत येत असे.

हा ज्ञान-यज्ञ आहे. तो लोककल्याणासाठीं सुरू केलेला आहे. त्यांत सतत आहुत्या टाकून तो पेटता ठेवावयाचा; कोणत्याही परिस्थितींत तो थंड होऊं द्यावयाचा नाहीं, हें जावजीशेठ यांनीं घेतलेलें व्रत होतें व तें कधींही कुरकूर न करतां त्यांनीं अखंड चालविलें.

**विष्णु परशुरामशास्त्री पंडित**



वक्तृत्वोत्तेजक सभेचे संस्थापक. जावजीशेठनी ह्या संस्थेचा जीर्णोद्धार घडवून आणिला. (पान–२०२)

**न्या. मू. मा. गो. रानडे**



मराठ्यांच्या इतिहासाचे अभिमानी व जनतेंत त्या विषयाची आवड निर्माण करणारे (पान–१४७-१४८)

**वे. शा. सं. गोविंद शंकरशास्त्री बापट**



**वे. शा. सं. नागेश विनायकशास्त्री बाप**



जावजीकालीन थोर संस्कृत पंडित. वैदिक वाङ्मयाचे संशोधन व विशेषतः ऋग्वेद-संहितेचे पदपाठ पाडणें, वगैरे कार्यांत ह्यांनी महत्त्वाचा भाग घेतला.

गोविंद नारायण माडगांवकर



'मुंबई वर्णन' ह्या उपयुक्त ग्रंथाचे लेखक व गणपत कृष्णाजींचे समकालीन व चहाते. (पान४५,२८०, २९१-९२, २९५ व ३०४)

आद्य व्याकरणकार दादोबा पांडुरंग



त्यांनी आपलें पहिलें व्याकरण गणपत कृष्णाजींच्या मुद्रणालयांत छापून घेऊन त्याचें कौतुक केलें. (पान ३०४-३०५)

श्रीधर गणेश जिनसीवाले



विद्वान व निस्पृह प्राध्यापक नि लेखक. (पान-५२-५३)

श्रीमंत सयाजीराव गायकवाड



जावजीशेठ ह्यांच्या ज्ञानप्रसार कार्याकडे ह्यांचें आरं[illegible] लक्ष होतें. (पान-७५-७७)

## विल्यम कॅरी



विपरीत काळांत मुद्रण यंत्राची स्थापना करणारा धाडसी, महाउद्योगी, कल्पक नि आर्थांतिक तळमळीचा ख्रिस्ती धर्मप्रचारक. (पान–२६८-२७०-२७१ व २८८)

## लॉर्ड वेलस्ली



हे भारताचे गव्हर्नर जनरल असता त्यांच्या कारकिर्दीवर कडक टीका होऊं लागली. त्यामुळें हे मुद्रणयंत्राकडे व त्याच्या चालकांकडे वक्र दृष्टीनें पहात असत.(पान–२७६)

## तंजावरचे राजे सरफोजी महाराज



डॅनिश मिशनरीच्या सहकारानें आपल्या राजधानींत मुद्रण यंत्राची स्थापना फार पूर्वी करून त्यांनी कांहीं धार्मिक मराठी ग्रंथांचें प्रकाशन केलें (१८०९)

## श्री छत्रपती शिवाजीमहाराज



फार पूर्वी त्यांनी मुद्रण-यंत्राचे महत्त्व ओळखलें होतें; परंतु त्याची स्थापना करायला त्यांना अवसर मिळाला नसावा (पान २६२)

## मुंबईचे धोरणी राज्यपाल माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन



आरंभकाळांत यांनीं मुद्रणयंत्राची उपयुक्तता ओळखून त्यांच्या स्थापनेस हातभार लाविला.

## मेजर टी. कँडी



मराठी पुस्तकांचे सरकारी परीक्षक व वि. कृ. ओक ह्यांचें गुरुस्थान शोभविणारे.

## रा. ब. दत्तात्रय बळवंत पारसनीस



इतिहास-संग्रह' मासिकाचे संपादक.
(पान-१५२-१५६, २६३)

## विश्वनाथ काशीनाथ राजवाडे



महान् त्यागी नि कळकळीचे इतिहास संशोधक. रा. ब. पारसनीस ह्यांनीं ह्याचा सहकार संपादन केला होता.
(पान-१५०-१५१, २८८-२८९)

धोरणी नाना फडणवीस



पेशव्यांच्या काळांत गीता-ग्रंथ छापण्यासाठीं संस्कृत मुद्रिका तयार करवून घेण्याची कल्पना सर्व प्रथम यांस सुचली. (पान २६५)

लोकमान्य बा. गं. टिळक



महाराष्ट्रांत सर्वप्रथम लिपि-सुधारणा प्रश्नाकडे ह्यांचें लक्ष गेलें, १९०४.
(पान १८८-१८९, २८५)

रावसाहेब वि. ना. मंडलिक



पहिले महाराष्ट्रीय मुद्रक-प्रकाशक गणपत कृष्णाजी ह्यांच्या मुद्रण विषयक दीर्घोद्योगाचें कौतुक करून अखेरपर्यंत त्यांचा पाठीराखेपणा ह्यांनीं केला. (पान १०२, १०९ व ३११)

डॉ. भाऊ दाजी



गणपत कृष्णाजी ह्याच्या मुद्रणविषयक कार्याचे तत्कालीन चहाते (पान-३१०)

## जनार्दन बाळाजी मोडक



जावजीशेठनीं सुरू केलेल्या काव्यसंग्रह मासिकाचे पहिले संपादक
(पान–१२२, २२९-११३३)

## शंकर बाळकृष्ण दीक्षित



ज. बा. मोडक ह्यांचे पट्टशिष्य व 'भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास' ह्या ग्रंथाचे विद्वान लेखक (पान–१३०)

## वामन दाजी ओक



जावजीशेठनी चालविलेल्या 'काव्यसंग्रह' मासिकाचे बहुश्रुत महाराष्ट्रप्रेमी दुसरे संपादक. (पान १३३-१४०, २१८)

## हरि माधव पंडित



जावजीकालीन 'विविध-ज्ञानविस्तार' मासिकाचे विद्वान संपादक, सल्लागार व शेठजींचे चहाते (पान–१७७-१७९, २९८)

गोपाळ हरी देशमुख (लोकहितवादी)



जावजीशेठजींचे चहाते व सल्लागार, त्याकाळी त्यांच्या कांहीं ग्रंथांस शेठजींच्या निर्णयसागरनें प्रसिद्धि दिली.(पान ४८,५४)

राजाराम रामकृष्ण भागवत



शेठ जावजी दादाजी ह्यांचे स्नेही व सल्लागार
(पान–२२९)

डॉ. अनंत चंद्रोबा



जावजीशेठ ह्यांचे स्नेही व डॉक्टर
(पान–२१६)

डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे



शेठजींचे सल्लागार व जिव्हाळ्याचे स्नेही. ह्यांच्या कर्तृत्वावर नि वैद्यकीय ज्ञानावर जावजी शेठजींची असीम श्रद्धा होती.
(पान–९३, १८०

महात्मा जोतिबा फुले



जावजींकालीन थोर समाजसुधारक.
(पान–२२७)

नारायण मेघाजी लोखंडे



'दीनबंधु' पत्राचे संपादक व शेठ जावजी दादाजी ह्यांचे निस्सीम चहाते (पान–२३७)

प्रा. डॉ. हरी दामोदर वेलणकर



डॉ. पी. एल्. वैद्य
(भांडारकर ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिट्यूट)



निर्णयसागर मुद्रणालयातर्फे प्रसिद्ध झालेल्या संस्कृत वाङ्मयप्रकाशनाचे महत्त्व ओळखून त्याबद्दल गुणग्राहकता प्रकट करणारे संस्कृत भाषाभिमानी. (पान १०८–१०९.)

जागतिक कीर्तीचे संस्कृत पंडित
मोक्षमुलर



ज्यांच्या नेतृत्वाखाली देवनागरी टाईपांत
विलायतेंत अथर्ववेदाचें मुद्रण झालें
(पान-८५, १२८)

जागतिक कीर्तीचे महाराष्ट्रीय संस्कृत पंडित
डॉ. रामकृष्णपंत भांडारकर.



संस्कृत-भाषा शिक्षणाचा यांनी भरभक्कम
पाया घातला

पं. भवानीशंकर शर्मा



निर्णयसागर हिंदी पंचांगाचे
आद्य प्रवर्तक

चिंतामणि पुरुषोत्तमशास्त्री पुरंदरे



निर्णयसागर मराठी पंचांगाचे पहिले प्रवर्तक
(पान-४०)

ग्रंथांतील तत्संबंधी परिशिष्टें पहावीं, म्हणजे त्यांच्या प्रकाशन-कार्याची मजल कुठवर जाऊन पोहोंचली होती, ह्याची सहज कल्पना करतां येईल.

प्रकाशन-क्षेत्रांत जावजीशेठ ह्यांनीं जी कामगिरी पार पाडली, ती त्या काळाच्या दृष्टीनें पाहातां अत्यंत महत्त्वाची आहे हें खरें असलें, तरी त्यांनीं मनांत ज्या योजना आंखल्या होत्या, त्या सर्व पार पडूं शकल्या नाहींत. परंतु त्यावरून वाङ्मय-प्रकाशनद्वारा ज्ञान-प्रसार करण्याच्या कार्याकडे त्यांचें लक्ष सतत कसें लागून राहिलेलें असे, ह्याची कल्पना करतां येते.

जावजीशेठनीं विनायक कोंडदेव ओक ह्यांच्या सहकारानें 'बालबोध' मासिक सुरू करून तें अत्यंत यशस्वी करून दाखविलें. हें मासिक विशेषतः मुलांसाठीं असलें तरी मोठ्यांनाही त्याची उपयुक्तता जाणवत असे. जावजीशेठ ह्यांचें तेवढ्यानें समाधान झालें नाहीं. थोरांमोठ्यांसाठीं विविध विषयांचें व जगांतील घडामोडींचें ज्ञान करून देणारें 'प्रौढबोध' ह्या नांवाचें एक नमुनेदार मासिक निर्णयसागरमधून बाहेर पडावें, अशी त्यांची फार मोठी आकांक्षा होती. विनायक कोंडदेव ओक ह्यांच्याप्रमाणें त्या मासिकाच्या कार्यास सर्वस्वी वाहून घेणाऱ्या संपादकाच्या शोधांत ते होते; ह्या बाबतींत त्यांचे मनापासून प्रयत्न चालू होते; त्यासाठीं वाटेल तो त्याग करण्याची त्यांची तयारी होती; परंतु त्या बाबतींत त्यांना यश मिळालें नाहीं, ही खेदाची गोष्ट होय. 'प्रौढबोध' मासिक सुरू करण्याची जावजीशेठ ह्यांची इच्छा किती तीव्रतर होती ह्याची पूर्ण जाणीव असल्यामुळें, त्यांचे कर्तबगार चिरंजीव तुकारामशेठ ह्यांनींही वडिलांच्यामागें त्या बाबतींत अनेक लेखकांशीं बोलणें करून पाहिलें; परंतु त्यांनाही त्या बाबतींत यश मिळालें नाहीं.

इंग्लंड-अमेरिकेसारख्या देशांतील मोठमोठ्या छापखानेवाल्यांनीं किंवा प्रकाशकांनीं जनतेंत ज्ञान-प्रसार व्हावा नि जनतेला उपयुक्त ग्रंथ कमींत-कमी किंमतींत उपलब्ध व्हावे, ह्या हेतूनें जशा माला चालविल्या आहेत, तशीच उपयुक्त व स्वस्त किंमतींत परवडणारी एक ग्रंथ-माला सुरू करण्याचीही योजना जावजीशेठ ह्यांनीं आंखिली होती; परंतु ती त्यांच्या अकालीं निधनामुळें अंमलांत येऊं शकली नाहीं.

आपले देशबांधव फार गरीब आहेत, त्यांच्यांत ज्ञानप्रसार तर झाला पाहिजे, आपण त्या उद्देशानें जे ग्रंथ प्रसिद्ध करतों ते त्यांच्यापर्यंत पोहोंचले पाहिजेत, भारी किंमत ठेवल्यानें तो हेतु साध्य होणार नाहीं, याची त्यांना पूर्ण जाणीव होती. आणि त्या जाणिवेनें ते ग्रंथांच्या किंमती वाचकवर्गाच्या आटोक्यांत येणाऱ्या नि कमींत कमी ठेवण्याची दक्षता बाळगीत असत. 'वाग्भट' 'वाल्मीकिरामायण,' 'तुकारामाच्या अभंगांची गाथा' ह्यांसारख्या प्रचंड ग्रंथांच्या त्यांनीं ज्या अत्यंत छोट्या किंमती ठेवल्या, त्यावरून त्यांचा हाच हेतु स्पष्ट होत आहे.

आपला महाराष्ट्रीय वाचक-वर्ग गरीब असला, तरी तो ज्ञानसंपन्न झाला पाहिजे. ग्रंथवाचनाशिवाय तो ज्ञानसंपन्न कसा होईल नि ग्रंथांच्या किंमती भारी ठेवल्यास, त्यांच्यापर्यंत ग्रंथ कसे पोहोंचतील, ह्याची जावजीशेठजींना नेहमीं चिंता वाटत असे. त्यामुळें ग्रंथांच्या कमींत कमी किंमती ठेवण्याकडे त्यांचें सतत लक्ष असे. 'वाल्मीकिरामायण,' 'तुकोबाचे अभंग' हे महत्त्वाचे ग्रंथ स्वतः आर्थिक झीज सोसून नि कारखान्यांतील ज्या कामगारांस झीज सोसण्याची शक्यता व इच्छा असेल, त्यांनाही झीज सोसायला लावून कमींत कमी किंमतींत वाचकांस उपलब्ध करून द्यावे, हेंच त्यांचें एकमेव लक्ष्य असे.

महाभारतासारखा उपयुक्त, परंतु भारदस्त नि जाडजूड ग्रंथ साधारण ऐपतीच्या माणसास, मनांत असूनही घेण्यास फार जड जातो; तेव्हां तो अल्पमोलानें सर्वांना घेतां यावा, ह्यासाठीं कांहीं ना कांहीं उपाय-योजना कृपा करून करा, अशी सूचना, जावजीशेठजींवर काळानें झडप घालण्यापूर्वी दोन-तीन महिने अगोदर, त्यांच्या एका निकटवर्ति मित्रानें त्यांना केली होती. जावजीशेठ ह्यांना ही सूचना तात्काळ पसंत पडली. धार्मिक ग्रंथांचें प्रकाशन आणि तेंही कमींत कमी किंमती ठेवून करायचें, हें तर त्यांचें एक पवित्र उद्दिष्ट होतें. महाभारताची स्वस्त आवृत्ति कशारीतीनें प्रकाशित करतां येईल, ह्याचा त्यांनीं उत्साहपूर्वक विचार चालविला होता. एवढेंच नव्हे, तर वेगवेगळे टाईप व कागद घेऊन महाभारताच्या स्वस्त आवृत्तीचे दोन-चार नमुने तयार करून ते त्यांनीं आपल्या कांहीं मार्मिक नि विद्वान मित्रांपुढें विचारासाठीं ठेविलेही होते; परंतु त्यानंतर त्यांना आजारानें गांठल्यामुळें तें उपयुक्त

कार्य त्यांच्या हातून पार पडूं शकलें नाहीं. एवढ्यावरूनही उपयुक्त नि लोकोपयोगी धार्मिक ग्रंथ-प्रकाशनाच्या बाबतींत त्यांचा उत्साह नि त्यांची उत्कंठा किती दांडगी होती, हें दिसून येतें.

ग्रंथ-प्रकाशन व त्याचें वितरण झपाटेबंद कसें होईल, उपयुक्त ग्रंथ जनतेपर्यंत जाऊन कसे पोहोंचतील, ह्या विचारांत ते नेहमीं असत. ह्या दृष्टीनें त्यांच्या मनांत घोळणारी, परंतु आचरणांत न आलेली एक योजना जातां जातां येथें सांगावीशी वाटते. आटोपशीर पानांच्या नि समान आकाराच्या ग्रंथांची प्रथमतः एक हजाराची आवृत्ति प्रसिद्ध करावयाची व निरनिराळ्या ठिकाणच्या दहा ग्रंथविक्रेत्यांकडे त्याच्या प्रत्येकीं दहा दहा प्रती पाठवायच्या व त्या खपविण्याची जबाबदारी 'दसका लकडी एक का बोजा' ह्या न्यायानें त्यांच्यावर सोंपवावयाची. त्यामुळें ग्रंथ-प्रकाशनासाठीं खर्च झालेलें भांडवल लवकर हातीं येऊन ग्रंथांचा प्रसारही हटकून होईल, अशी होती त्यांची कल्पना.

अशा योजना आपण करतों. कागदोपत्रीं त्या ठीक असतात; परंतु त्यांचें यशापयश दुसऱ्या अनेकांवर अवलंबून असल्यामुळें त्यांच्याकडून आपणास अपेक्षेप्रमाणें प्रामाणिक प्रतिसाद मिळेलच असें गृहीत धरून चालणें धोक्याचें असतें. अशा प्रकारच्या कांहीं ना कांहीं कारणामुळें ती योजना अंमलांत येऊं शकली नसावी.

एकंदरींत, त्या काळाच्या दृष्टीनें पहातां जावजीशेठ ह्यांचा प्रकाशन-क्षेत्रांतील उत्साह फार दांडगा होता. ह्या प्रकरणांत प्रकाशन-क्षेत्रांतील त्यांच्या कामगिरीची माहिती संपूर्णपणें दिलेली नाहीं. 'काव्यसंग्रह', 'काव्यमाला' ह्यांसारख्या उपयुक्त माला लोकशिक्षणाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत, ह्या जाणिवेनें त्यांनीं वर्षानुवर्षं किती झीज सोसून चालविल्या, ह्याची कल्पना त्या त्या विषयास वाहिलेल्या स्वतंत्र प्रकरणांवरून वाचकांस होईलच.

मनुष्य अनुभवानें शहाणा होत असतो. प्रकाशन-व्यवसायांत जावजीशेठ ह्यांना बरेवाईट अनुभव येत गेले आणि ते यायचेच; परंतु कोणत्याही ग्रंथाच्या किंवा व्यक्तीच्या बाबतींत त्यांच्या तोंडून तक्रारीचा शब्द कधींही बाहेर पडला नाहीं. जो कांहीं त्रास होईल तो स्वतः शांतपणें सोसायचा, त्याचा उपसर्ग दुसऱ्याला होऊं द्यायचा नाहीं, हें त्यांचें नेहमींचें धोरण होतें.

एकदां छपाईच्या बाबतींत त्यांना एक विचित्र अनुभव आला तो येथें नमूद करण्यासारखा आहे. थॉमस ग्रॅहॅम हे ख्रिस्ती गृहस्थ मुद्रिका व्यवसायांतील त्यांचेच नव्हे तर त्यांचे सहकारी राणूजी आरू ह्यांचेही गुरुजी. त्यांच्याबद्दल दोघांनाही पराकाष्ठेचा आदरभाव. त्यामुळें म्हणा किंवा सुंदर व बक्कशीर छपाईमुळें म्हणा, त्यांच्याकडे ख्रिस्ती मंडळीचीं व मिशनरी वर्गाचीं छपाईचीं कामें आरंभापासून येत असत. परस्परांचे संबंध आरंभापासून आपलेपणाचे नि अत्यंत सलोख्याचे होते.

एकदां एका ख्रिस्ती मंडळातर्फे निर्णयसागरकडे एक पुस्तक छापण्या-साठीं आलें. जावजीशेठ आजारी असल्यामुळें त्या आठवड्यांत छापखान्यांत आले नव्हते. पुस्तक छापून तें बाहेर पडलें. कांहीं लोकांच्या तें पहाण्यांत आलें, तेव्हां त्यांत श्रीकृष्णाची निंदा करण्यांत आली असल्याचें त्यांना आढळून आलें ! कोणता हिंदुधर्माभिमानी श्रीकृष्ण परमात्म्याची निंदा सहन करील ? आणि धर्माभिमानी जावजीशेठना तरी ती निंदा कशी सहन होईल ? असलें प्रकरण पेटायला व भडकायला वेळ लागत नाहीं. त्याप्रमाणें तें मनस्वी पेटलें. जावजीशेठ यांच्या छापखान्यांत अशा प्रकारचें पुस्तक कसें छापलें गेलें ? त्यामुळें झालें काय ? जावजीशेठ व त्यांचा निर्णयसागर प्रेस, ह्यांच्याविरुद्ध एकाएकीं विरोधाची लाट उसळली !

जावजीशेठनीं विरोधी मंडळीच्या पुढाऱ्यांना भेटून जो प्रकार घडला तो आपल्या गैरहजेरींत कसा घडला, हें त्यांना समजावून सांगितलें व त्याबद्दल त्यांची क्षमा मागितली. त्यामुळें विकोपास जाऊं पहाणारें तें प्रकरण थंडावलें !

ह्या विचित्र प्रकारामुळें जावजीशेठजींना अतोनात मनस्ताप झाला. त्या भरांत त्यांनीं ख्रिस्ती मंडळींना निक्षून सांगितलें कीं, 'कोणत्याही व्यक्तीची किंवा देवाधर्माची निंदानालस्ती करणारीं पुस्तकें आमच्याकडे छापण्यासाठीं आणूं नका. आम्ही तशा प्रकारचीं पुस्तकें कधींही छापणार नाहीं !'

ह्या धोरणामुळें ख्रिस्ती मंडळी त्यांच्यावर रागावली व दरवर्षी त्या मंडळीकडून जें दोन-तीन हजार रुपयांचें छपाईचें काम मिळायचें तें बंद झालें ! त्यांचें काम बंद झालें म्हणून जावजीशेठ ह्यांनीं त्याबद्दल खंत बाळगली नाहीं.

ह्या घडलेल्या चुकीची पुनरावृत्ति पुन्हां केव्हांही होऊं नये व काम स्वीकारण्याची व्यवस्था नीट लागावी, ह्या सद्धेतूनें जावजीशेठनीं छापण्यासाठीं पुस्तकें घेण्यासंबंधीं पुढीलप्रमाणें नियम करून ते ठळक ठिकाणीं लावून ठेविले.

१ "पुस्तकांत सरकारविरुद्ध, कोणत्याही धर्माविरुद्ध किंवा व्यक्तीविरुद्ध मजकूर असला, किंवा मजकुरांत बीभत्स शब्द असेल, तर तें काम ह्या छापखान्यांत छापलें जाणार नाहीं.

२ पुस्तक छापून तयार झालें म्हणजे त्याचे सर्व पैसे चुकते करून सर्व पुस्तकें नेलीं पाहिजेत.

३ थोडे पैसे देऊन थोडकीं पुस्तकें मागितल्यास मिळणार नाहींत.

४ फार्मामध्यें एक, दोन किंवा अर्धा पेज कोरा गेल्यास त्याचे पैसे कमी केले जाणार नाहींत.

५ पुस्तकाचे कॉपीबरहुकूम आम्ही कंपोज करून दोन वेळ प्रुफें देत जाऊं. त्यांत कॉपीविरहित फेरफार केल्यास प्रत्येक वेळेस एका फार्माचे प्रुफांस एक एक रुपया ठरविलेल्या दरापेक्षां जास्त द्यावा लागेल.

६ कामास जितके कागद लागतील ते विकत घेण्याकरितां त्याचे सर्व पैसे पहिल्यानें दिले पाहिजेत.

७ कागद तुम्हीं दिले तर खराबीकरितां दर फार्मास १० कागद नियमापेक्षां जास्त दिले पाहिजेत.

ज्या कोणास ह्या छापखान्यांत काम छापण्यास देणें असेल, त्यांनीं वरील सर्व सूचना वाचून त्याखालीं सही करण्याची मेहरबानी करावी."

शंभराऊणशें वर्षांपूर्वीच्या काळांतील ग्रंथ-प्रकाशनाची कथा व त्यांतील व्यथा आपण वाचीत आहांत. आणि आज ? आजकाल परिस्थिति सर्वप्रकारें अनुकूल असतांही ग्रंथ-प्रकाशन-व्यवसाय फारसा फायद्याचा होऊं शकलेला नाहीं. नुकसान सोसूनही ज्यांनीं तो आज चालविला आहे, त्यांना द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच होतील. अंतःकरण ध्येयवादानें नि उच्च प्रेरणांनीं भारून गेलेलें असल्याशिवाय ह्या व्यवसायाकडे सहसा कोणी वळणार नाहीं.

ह्यापूर्वीच सांगितल्याप्रमाणें जावजीशेठजींच्या अंतःकरणांत एक उत्तम प्रेरणा सदैव वावरत होती. कोणती ती प्रेरणा ? प्रत्येकानें आपल्या देशाच्या व देशबांधवांच्या उन्नतीसाठीं शक्य त्या परीनें झटलें पाहिजे नि झेपेल तो त्याग करायला तयार असलें पाहिजे. देशबांधवांची उन्नति नि विकास साधण्याचे नाना मार्ग आहेत. ज्याला जो शक्य असेल तो त्यानें पतकरावा. जनतेंत ज्ञानप्रसार करणें हाही देशोन्नतीचा किंवा देशबांधवांच्या विकासाचा एक अत्युत्तम मार्ग आहे. त्या मार्गानें यथाशक्ति वाटचाल करणें हें माझ्या आटोक्यांतील आहे व निष्ठापूर्वक त्याच मार्गाची मी कांस धरीन. तीच माझी इतिकर्तव्यता व त्या मार्गानें जाण्यांतच माझ्या जीवनाची सफलता आहे. ही भावना जावजीशेठ यांच्या अंतःकरणांत सदैव जागृत असे. तीच त्यांना प्रकाशन-क्षेत्रांत आनंदानें त्याग करण्याची प्रेरणा देत होती.

मात्र हा त्याग समूळ किंवा सर्वस्वी नव्हता, हेंही येथें स्पष्ट करणें जरूर आहे. ह्या एका क्षेत्रांतील त्यागाची भरपाई ' येन केन प्रकारेण ' कांहीं प्रमाणांत दुसऱ्या क्षेत्रांतील फायद्यामुळें केली जात असे. तें दुसरें क्षेत्र म्हणजे जावजीशेठजींची सुसज्ज नि सुप्रसवा टाईप फाऊंड्री होय. ही फाऊंड्री म्हणजे त्या काळीं व नंतरही सोन्याची खाण होऊन राहिली होती. त्या खाणींतून अक्षर-मुद्रिका नव्हेत, तर सुवर्णमोलाच्या सुंदर मुद्रिका बाहेर पडत होत्या. छापखान्याच्या जगांत त्या सुंदर मुद्रिकांनीं बहुमानाचें स्थान मिळविलें होतें. भारताच्या कोनाकोंपऱ्यांतून त्यांना सतत मागणी चालू होती.

एकाद्या सद्भावनेनें आपण कितीही भारले गेलेले असलों, तरी त्या सद्भावनेचें कोडकौतुक आपणास अखंड चालवितां आलें पाहिजे. ह्या बाबतींत जावजीशेठ खरोखर भाग्यवान होते. कारण रत्नप्रसवा टाईप फाऊंड्रीच्या रूपानें जणूं काय प्रत्यक्ष कामधेनूच त्यांच्या घरीं प्रसन्नतेनें वावरत होती.

# ४



## 'बालबोध' : जन्मकथा व कामगिरी



'करी मनोरंजन जो मुलांचें! जडेल नातें प्रभुशीं तयाचें.' लहान मुलें म्हणजे उमलत्या कळ्या! त्यांचें विकसन करणें, त्यांना फुलविणें, यासारखें पवित्र कर्तव्य दुसरें कोणतें असणार! पूज्य साने गुरुजींनीं हें बरोबर ओळखलें होतें. आजचें मूल म्हणजे आपल्या मायदेशाचें पांग फेडणारा उद्यांचा नागरिक. बालवयांत त्याच्या मनावर सुसंस्कार घडवून त्याला 'माणूस' बनविणें व त्यासाठीं झटणें, ही देवाला आवडणारी सेवा आहे आणि त्या भावनेनें साने गुरुजींनीं आपली सिद्धहस्त लेखणी परोपरीनें झिजविली.

त्यांच्यापूर्वी नि तदनंतरही अनेकांनीं आजवर बालवाङ्मयनिर्मितीला मनोभावें वाहून घेतलें आहे. कै. वासुदेवराव आपटे यांच्यासारख्या अनेकांनीं तेंच आपलें जीवनकार्य मानिलें; परंतु सुमारें ८०।८५ वर्षांपूर्वीच्या काळांत बालमनावर योग्य मार्गांनीं सुसंस्कार घडवून त्यांची ज्ञानलालसा तृप्त करण्यासाठीं सर्वप्रथम व समर्थपणें जर कोणीं पुढाकार घेतला असेल, तर ते म्हणजे शेठ जावजी दादाजी व विनायक कोंडदेव ओक हेच होत.

तो काळ किती विपरीत होता! शिक्षणप्रसाराच्या अभावीं वाचकांचें पाठबळ जवळ जवळ नव्हतें. सरकारकडून कार्डीचेंही उत्तेजन मिळण्याची आशा नव्हती. जनता अंधकारयुगांत वावरत होती. अशा त्या काळांत बालगोपाळांसाठीं ज्ञानदीप पाजळणें नि कितीही नुकसान सोसावें लागलें तरी तो

एकदां पेटविलेला दीप नंदादीपाप्रमाणें अखंड चालू ठेवण्यासाठीं झटणें, ही साधी का गोष्ट आहे ?

हेंच पहा ना ! आज आपणास सर्व गोष्टींची अनुकूलता आहे. वाचकवर्ग वाढलेला आहे. लेखनकला-कुशल लोकांची संख्याही वाढलेली आहे; आणि इतर कितीतरी बाबी अनुकूल आहेत; परंतु गेल्या ४०।५० वर्षांच्या काळांत खास मुलांसाठीं किती मासिकें निघालीं व किती बंद पडलीं, याचा आपण हिशेब करूं लागलों, तर मन दुःखी-कष्टी झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

आणि ह्या दृष्टीनें पहातां त्या प्रतिकूल काळांत जावजीशेठनीं मुलांच्या मनोरंजनाच्या दृष्टीनें जें पहिलें पाऊल टाकिलें नि जें पुढें दीर्घकाळ रोविलें, त्याबद्दल त्यांचे गोडवे गावे तेवढे थोडेच होतील.

त्या काळांत जावजीशेठना इतर अनेक गोष्टी प्रतिकूल असल्या, तरी त्यांना दोन महत्त्वाच्या गोष्टींची अनुकूलता होती. त्यांचें स्वतःच्या मालकीचें मुद्रणमंदिर होतें व त्यांनीं तत्कालीन विद्वान मंडळी, आपल्याठायीं असलेल्या गुणसमुच्चयाच्या बळावर जवळ केलेली होती. ज्यांना देशस्थितीबद्दल चिंता वाटत असे, व आहे त्या स्थितींत थारेपालट घडवून आणला पाहिजे असें अत्यंत तीव्रतेनें वाटत असे, अशी ती कर्तव्यपरायण विद्वान मंडळी होती.

आपसांतील हेवेदावे नि सर्वत्र बोकाळलेल्या अज्ञानापायीं ह्या देशावर पारतंत्र्याची आपत्ति आली. त्या आपत्तींतून सुटका करून घ्यावयाची झाल्यास जनतेंत ज्ञानप्रसार झाला पाहिजे. सर्वत्र पसरलेला गाढ अज्ञानाचा काळोख शक्य त्या मार्गांनी नाहींसा करणें हें प्रत्येक ज्ञानी माणसाचें पवित्र कर्तव्य आहे आणि याचा शुभारंभ संस्कारक्षम बालवयापासून झाला पाहिजे, अशी त्यांची भावना होती.

मुद्रणकला म्हणजे ज्ञानप्रसाराचें एक अमोघ व हुकमी साधन. जावजीशेठनीं आपल्या कर्तबगारीच्या बळावर हें साधन कार्यक्षम व प्रभावी बनविलें होतें. त्याचा सुयोग्य मार्गांनीं वापर करावयाचा ह्या हेतूनें अनेक विद्वान मंडळींनीं जावजीशेठशीं स्नेहाचें नातें जोडलें. त्यांत त्यांचा स्वतःचा असा स्वार्थ कांहींच नव्हता. आपण संपादन केलेल्या ज्ञानाचा फायदा आपल्या अज्ञ बंधुभगिनींना मिळावा नि जनता सुबुद्ध व्हावी, असें त्यांना मनापासून वाटत असे. त्यासाठीं आपल्याकडून शक्य असेल तो त्याग करण्याची त्यांची तयारी होती.

अशा जावजीशेठ-कालीन मुंबईंतील विद्वान व विचारी मंडळींत डॉ. भाऊ दाजी, शंकर पांडुरंग पंडित, डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे, डॉ. राजारामशास्त्री भागवत, केशवशास्त्री गाडगीळ, लक्ष्मणशास्त्री हळवे, रामभाऊ गुंजीकर, विनायक कोंडदेव ओक वगैरे जावजीशेठजींच्या निकटवर्ति स्नेह्यांचा प्रामुख्यानें उल्लेख करतां येईल.

ह्या थोर, दूरदर्शी नि देशकल्याणेच्छु विद्वान मंडळींच्या सतत सहवासांत आल्यामुळें बालपणापासून मुलांच्या मनावर सुसंस्कार घडविण्याचें महत्त्व त्यांना फार वाटूं लागलें होतें. ह्या बाबतींत आपण काय करावें, ह्याचा विचार करीत असतां त्यांना तीव्रतेनें वाटूं लागलें कीं, सर्व जातींच्या मुलांना जेथें एकत्र रहातां येईल, असें एकादें बोर्डिंग-स्कूल स्थापन करण्याच्या दृष्टीनें आपण शक्य तें करावें. मुलांच्या रहाण्यासवरण्याची नि जेवणाखाण्याची सुव्यवस्था करून विनायक कोंडदेव ओक यांच्यासारख्या अनुभवी व सुविचारी शिक्षणप्रेमी गृहस्थाकडे त्याचीं सूत्रें सोंपवावीं. आपले हे विचार उपरोक्त व आपल्या इतर मित्रांकडे ते वेळोवेळीं व्यक्त करीत असत. ती त्यांची अंतरींची एक तळमळ होती.

विचार चांगले असले तरी अनेक अडचणींमुळें ते अंमलांत आणणें दिरंगाईवर पडूं लागलें. जावजीशेठना ही परिस्थिति असह्य वाटूं लागली. मुलांच्या ज्ञानोपासनेसाठीं आपण कांहीं ना कांहीं उपयुक्त असें केलेंच पाहिजे, ह्या विचारानें त्यांच्या मनाची पक्की पकड घेतली होती.

तत्कालीन विद्वान मंडळींत जावजीशेठचे सल्लागार, सन्मित्र व वाङ्मय-प्रकाशन-क्षेत्रांतील सुविद्य मार्गदर्शक ह्या नात्यानें विनायक कोंडदेव ओक ( १८४०–१९१४ ) ह्यांचें स्थान फार आगळें होतें. ते त्यांचे अत्यंत विश्वासू सल्लागार होते. पूर्वायुष्यांत शिक्षक ह्या नात्यानें विद्यार्थिवर्गांत वावरत असतां तत्कालीन विद्यार्थ्यांच्या मार्गांतील, विशेषतः ज्ञानसंपादनमार्गांतील अडीअडचणींची व शिक्षण-कार्यांतील उणीवांची त्यांना चांगली जाणीव झालेली होती. मुलांत लहान वयापासून बहुश्रुतपणा आला पाहिजे, त्यांना वाचनाबद्दल गोडी वाटली पाहिजे, नि त्यांची ज्ञानपिपासा उत्तरोत्तर वाढत गेली पाहिजे, असें त्यांना वाटत असे. केवळ शाळेंत मिळणारें पुस्तकी शिक्षण पोटापाण्याचा प्रश्न सोडविणारें असलें तरी तें कर्तबगारीला व कर्तव्याचरणाला फारसें पोषक नाहीं, त्यासाठीं वेगळ्या मार्गांनीं प्रयत्न होणें जरूरीचें आहे, अशी त्यांची दृढ भावना

होती. त्या दृष्टीनें विचार करीत असतां मुलांसाठीं एकादें मासिक सुरू करण्याचा विचार त्यांच्या मनांत तीव्रतेनें घोळूं लागला. त्या विचारास चालना देण्याचें सामर्थ्य त्यांच्याठायीं नव्हतें. तें होतें जावजीशेठच्याठायीं.

आणि जावजीशेठ यांच्यापुढें तर ज्ञानप्रसार हें ध्येय सतत होतें. त्यांचा कल व योग्य संधि पाहून एके दिवशीं विनायकराव ओकांनीं मुलांसाठीं मासिक सुरू करण्याचा विचार त्यांच्यापुढें ठेवून त्याचें महत्त्व त्यांना पटविण्याचा प्रयत्न केला.

शैक्षणिकदृष्ट्या आज ज्यांना आपण विद्वान म्हणतों, त्या दृष्टीनें जावजीशेठ हे विद्वान नसले, तरी व्यवहार-ज्ञानांत ते कोणालाही हार जाणारे नव्हते. पुस्तकी किंवा शाळागृहीन शिक्षण त्यांच्या वांट्यास आलेलें नसलें तरी ईश्वरानें कृपाळू होऊन इतर अनेक बहुमोल गुणांची त्यांच्यावर मुक्त हस्तांनीं खैरात केलेली होती. त्यांपैकींच योग्य माणसांची पारख करून त्याला जवळ करणें किंवा आपलासा करणें व त्याला जीवेंमावें संभाळणें, हा एक गुण होय. तसेंच एकदां ज्याला निरखून पारखून जवळ केलें, त्याच्यावर संपूर्ण विश्वास टाकणें, हा असामान्य गुण त्यांच्याठायीं होता.

ह्या त्यांच्या गुणामुळें निर्णयसागर-मुद्रणमंदिर म्हणजे आपलें विसांव्याचें व विश्रांतीचें स्थान आहे, असें तत्कालीन विद्वानांस वाटत असे. आपल्या गोड व विनम्र स्वभावामुळें जावजीशेठनीं अनेक विद्वानांस जणूं काय भारून टाकिलें होतें.

मुंबईतील असो, वा मुंबईबाहेरील असो. रसिक व विद्वान मंडळींनीं एकत्र जमून गप्पागोष्टी करण्याचें व एकाद्या जनता-कल्याणाच्या नवीन उपक्रमाला जन्म देण्याचें पवित्र स्थान म्हणजे निर्णयसागर-मुद्रणमंदिर हेंच होतें. अशा एका बैठकींत ज्ञानप्रसाराचीं कोणकोणतीं साधनें हाताळण्यासारखीं आहेत, यासंबंधीं चर्चा चालू झाली. ज्ञानोपासना बालवयापासून सुरू व्हावी, मनावर सुसंस्कार घडविण्याचा तोच उपयुक्त काळ. त्या काळांत शाळेंत जाऊन मुलें शिक्षण घेत असतात; परंतु तें शिक्षण केवळ पोटभरू व मामुली स्वरूपाचें असतें. मुलांची वृत्ति विलक्षण चौकस असते. ती जिज्ञासु व प्रत्येक गोष्टीचें ज्ञान व्हावें,

ह्यासाठीं धडपडणारी असते; परंतु शाळेंत काय किंवा घरीं काय, त्या वृत्तीचें पोषण नि संवर्धन करणारी परिस्थिति नसते. शक्य तर ती उणीव भरून काढण्यासाठीं आपण एकादें मासिक सुरू करावें व बालशिक्षणाची एक बाजू त्या मार्गानें भरून काढण्याचा यथाशक्ति प्रयत्न व्हावा, असा सूर त्या चर्चेतून निघाला.

जावजीशेठ ही चर्चा शांतपणें ऐकत होते. विद्वानांशीं मिळतें घेणें, त्यांनीं पुढें मांडलेल्या विचारांत जनतेच्या कल्याणाच्या दृष्टीनें जर कांहीं असेल तर तें उचलून धरणें नि त्याला आपला सक्रिय पाठिंबा देणें, हें त्यांचें नेहमींचें धोरण होतें. शिवाय विनायकराव ओकांनीं तशा प्रकारच्या उपक्रमाचें महत्त्व त्यांना आपल्यापरीनें पटवून देण्याचा प्रयत्न केलेला होताच. कोणत्याही सत्कार्याचा भार शिरावर घेण्याचें ठरल्यानंतर जावजीशेठ नफानुकसानीच्या दृष्टीनें फारसा विचार करीत नसत. ज्ञानप्रसाराचें महत्त्व त्यांना पूर्णपणें पटलेलें होतें. तें आपलें जीवनकार्य आहे, असें त्यांना वाटत असे. सतत घडणाऱ्या त्यागी, विद्वान मंडळीच्या सहवासाचा तो परिपाक होता.

मुलांसाठीं मासिक काढण्याचें ठरलें; परंतु त्याला सुटसुटीत असें नांव कोणतें द्यावयाचें ? नांवांत तर सारी जादू असते. अनेक नांवें पुढें आलीं; त्यांत रामभाऊ गुंजीकर यांनीं विचारपूर्वक सुचविलेलें 'बालबोध' हें नांव सर्वानुमतें पसंत करण्यांत आलें.

मासिक सुरू करण्याचा बेत मुक्रर झाला. त्याच्या संपादनाची जबाबदारी कोणाकडे सोंपवावी ह्यासाठीं विचार करीत बसण्याची मुळींच जरूरी नव्हती. 'बालबोध' मासिकाचें संपादकत्व ओघानें व सहज रीतीनें विनायक कोंडदेव ओक ह्यांच्याकडे आलें व त्यांनीं तें आनंदानें नि कर्तव्य-बुद्धीनें स्वीकारलें.

हा उपक्रम फार चांगला होता; परंतु त्याला वाचकवर्गाकडून किंवा बालवाचकांच्या पालकांकडून कसें काय प्रोत्साहन मिळतें, ह्यावर त्याचें भवितव्य अवलंबून होतें. तेव्हां पाऊल टाकायचें ठरलें असलें तरी तें जपून व सावधगिरीनें टाकावयाचें; कारण एकदां टाकलेलें पाऊल सहसा मागें घ्यायचें नाहीं, हा जावजीशेठजींचा स्वभाव होता. त्या सावधगिरीच्या

स्वभावधर्माला अनुसरून पहिला अंक आठ-पानी काढण्यात आला. जरूर तेवढें प्रोत्साहन मिळालें म्हणजे पानें वाढवावयाचीं, हा विचार त्यामागें होता.

ह्या छोट्या मासिकाचा पहिला अंक एप्रिल १८८१ मध्यें निघाला. वार्षिक वर्गणी अवघी सहा आणे व बाहेर गांवीं पोष्ट खर्चासह आठ आणे ठेवण्यांत आली.

पहिल्या अंकांत मासिक काढण्याचा उद्देश पुढीलप्रमाणें कथन करण्यांत आला होताः—"मुलांनो! ही तुमची आमची पहिली भेट आहे. आम्ही दर महिन्याच्या पहिल्या तारखेस तुम्हांला भेटायला येऊं आणि तुमच्या उपयोगी पडतील व तुम्हांला आनंद होईल, अशा थोड्याशा गोष्टी तुम्हांला सांगूं. तर आमचा हेतु सिद्धीस नेण्यास, म्हणजे आमची भेट घेण्यास आणि आम्ही सांगूं त्या गोष्टी ऐकण्यास तुम्हीं तयार असावें, हें तुम्हांपाशीं मागणें आहे.

"शाळेंत कळत नाहींत, पण तुम्हांला कळल्या तर पाहिजेत, अशा लक्षावधि गोष्टी आहेत. त्यांतल्या थोडथोड्या आम्ही दर खेपेस तुम्हांस अगदीं तुमच्या साध्या भाषेनें सांगूं, तुमच्या मनाला करमणूक व्हावी, तुमच्या अंगचे सद्गुण वाढावे आणि दिवसेंदिवस तुम्हीं शहाणे आणि सुखी व्हावें, ह्यासाठीं हा आमचा प्रयत्न आहे. हा परमेश्वर सफल करो."

सुमारें ८०।८५ वर्षांपूर्वीच्या काळांत विद्यार्थिवर्गासाठीं सुरू झालेल्या ह्या अभिनव उपक्रमाचें सूतोवाच संपादक विनायकराव ओक यांनीं वरील शब्दांत केलेलें आहे. आजकाल बालवाचकांसाठीं नवनवे व एकाहून एक सरस असे वाङ्मयीन उपक्रम सुरू आहेत; जरूर ती सर्व साधनसामुग्री सज्ज आहे; वाचकवर्ग वाढत चाललेला आहे; परंतु त्या जुन्यापुराण्या काळांत बालवाचकांस सुबुद्ध करण्याच्या दृष्टीनें बालबोधाचे संपादक कोणकोणते विषय हाताळीत होते व त्यांच्या प्रयत्नांचें स्वागत कसकसें करण्यांत आलें, याची किंचित् कल्पना येथें करून दिल्यास ती अनाठायीं होणार नाहीं.

पहिला अंक आठपानी निघाला, ह्याचा उल्लेख वर करण्यांत आलेला आहेच. त्यांत विषय कोणकोणते होते? विद्या (विद्येचें सोप्या भाषेंत महत्त्व), क्षमा करणें (एक छोटी लघुकथा), थोर मनुष्यें, घड्याळ (माहितीपर), कित्येक नव्या गोष्टी, कांहीं प्रश्न वगैरे विषय.

दुसऱ्या अंकापासून एक चरित्र (चित्रामहू) सुरू झालें. हा उपक्रम शेवटच्या अंकापर्यंत सुरू होता. दुसऱ्या अंकांत सवाई माधवराव पेशवे यांचें चरित्रसार देण्यांत आलें आहे. नंतर आईचे उपकार, हिंदुस्थान (सर्वसाधारण माहिती), व्यापार, लोकांत कसें वागावें, प्रश्नांचीं उत्तरें, वगैरे.

प्रत्येक अंकांत जसें एक चरित्र असे, त्याचप्रमाणें एक सुलभ कविताही असे. तत्कालीन कवितांचे १।२ नमुने येथें देण्याचा मोह झाल्याशिवाय रहात नाहीं. हे नमुने पहिल्या २।३ वर्षांतील आहेत.

"स्वराज्य नष्ट जाहलें स्वधर्म भंग पावला ।
स्वदेश अन्य जातियांचिया करास लागला ॥
सहस्रशा कुलीन लोक दीन भीक मागती ।
कळे न हें तुम्हांस काय मंद जाहली मती" ॥

दुसऱ्या कवितेंतील एक नमुना :—

"गेलें स्वराज्य तुमचें अवघें बुडालें ।
दारिद्र्य पूर्ण तुमच्या सदनांत आलें ॥
कोणी पुसे न तुमच्या विगता यशाला ।
ही आळसता मग उगाच हवी कशाला ?" ॥

'आळसताष्टक' हा ह्या कवितेचा मथळा आहे. आणखी एका काव्याचा रसास्वाद चाखा :—

"देशाभिमान हृदयीं न वसे जयाचे ।
भासे जिणें विफल भूवर या तयाचें ॥
खायास काळ धरणीस उगाच भार ।
याहूनि काय वदणें दुसरें असार ॥"

पारतंत्र्याच्या काळांत उत्स्फूर्त झालेली किती साधी, सरळ नि हृदयस्पर्शी काव्यरचना आहे ही! आजकाल नवकाव्याच्या जमान्यांत आपण विहार करीत आहोंत. तेव्हां ओकांच्या बालबोध कवितेचें महत्त्व आम्हांला कसें पटावें? प्रत्येक अंकांत ८।१० श्लोकांची पानभर एक कविता ही असावयाचीच. आणि असें हें काव्यदोहन विनायकराव ओक सातत्यानें मासिकाच्या अखेरीपर्यंत, म्हणजे चौतीस वर्षें अखंडितपणें करीत होते! ह्या दीर्घ काळांत बालबोधमध्यें त्यांच्या ४०२ कविता प्रसिद्ध झाल्या आहेत.

ह्या मासिकांत शास्त्रीय माहितीस व ऐतिहासिक विषयांसही मधून मधून महत्त्वाचें स्थान दिलें जात असे.

ओकांचें बरेंचसें लेखन चरित्रविषयक आहे. चरित्रलेखन हा त्यांचा अत्यंत आवडता विषय होता. विद्यार्थ्यांपुढें उच्च आदर्श ठेविला जावा, व तो कोणत्या ना कोणत्या क्षेत्रांत कर्तबगारी गाजविणाऱ्या व्यक्तीच्या रूपानें ठेविला जावा, असें त्यांचें ठाम मत होतें. मोठ्या लोकांचीं चरित्रें वाचणें हें दानत सुधारण्याचें व अंगांत कर्तबगारीचें वारें संचारण्याचें एक साधन आहे असें त्यांचें म्हणणें असे. आणि त्याच हेतूनें त्यांनीं बालबोधमध्यें चरित्राला अग्रपूजेचा मान दिला होता. चरित्राबरोबर त्या व्यक्तीचा फोटो हरप्रयत्नानें मिळवून व त्याचें रेखाचित्र तयार करवून घेऊन तोही छापावयाचा. मोरोपंत म्हणजे विनायकराव ओकांचे आवडते कवि. त्यांचें चरित्र त्यांनीं एका अंकांत [1]प्रसिद्ध केलें आहे. त्यांचा फोटो त्यांना मिळवितां आला नाहीं. तो दुर्लभ मग काय करायचें ? त्यांच्या फोटोऐवजीं त्यांनीं मयूरपंतांचें (मोराचें) चित्र छापविलें आहे !

'बालबोध' मासिक हें ओकांच्या एकनिष्ठ तपस्येचें नि ध्येयसंपन्न चिकाटीचें मधुर फळ होतें. जावजीशेठनीं योग्य कार्यासाठीं अगदीं योग्य माणसाची निवड केलेली होती. जें कार्य एकदां विश्वासपूर्वक ओकांवर सोंपविलें, त्यांत त्यांनीं कधींही ढवळाढवळ केली नाहीं किंवा दुसऱ्या कोणालाही करूं दिली नाहीं. त्यामुळें वर्षानुवर्षे ओकांचा उत्साह वृद्धिंगत होत होता. इवलालें मासिक; परंतु त्यासाठीं ओक कितीतरी वाचन करीत असत. इंग्रजी, मराठी नि संस्कृत ग्रंथ वाचीत असतां जें जें ग्राह्य नि वाचकांच्या विकासाच्या दृष्टीनें योग्य वाटलें, तें तें टिपून ठेवायचें आणि त्याचा सदुपयोग बालबोधासाठीं करावयाचा, हा त्यांचा नित्यक्रम होता. ती त्यांची जीवन-तपस्या होती.

हें कार्य करायला आपण कां प्रवृत्त झालों व त्या कार्याचें स्वरूप काय होतें, याचें काव्यमय वर्णन त्यांनीं बालबोधमध्यें विसाव्या वर्षाच्या अखेरीस केलें आहे. ते म्हणतातः—

---

१ बालबोध : डिसेंबर १८८२

"जें काय चांगलें मज हितकर मंगल पवित्र आढळलें ।
तें बालबोधशब्दीं मच्चित्त कथावया नसे टळलें ॥
ह्यांत बघितलें नाहीं, स्थल धर्म तशीच जाति कोणाची ।
कीं मधु कोठेंहि असो, त्यामध्यें माधुरी असायाची ॥
हा सत्प्रसाद मजला ईशकृपेनें अखंड लाभावा ।
मुंगीच्या चालीनें तरि हेतु अखेर सिद्धिला जावा ॥"

'बालबोध' मासिकाच्या संपादनाची जबाबदारी आपण कोणत्या पवित्र हेतूनीं स्वीकारली व त्या कार्याचें पावित्र्य संभाळण्यासाठीं आपली कसकशी धडपड चाललेली असते, याचा या रसाळ काव्यपंक्तींत त्यांनीं सुंदर परिचय करून दिलेला आहे.

जावजीशेठ नि विनायकराव ओक हे ह्या कार्यांत एकमेकांस पूरक होऊन राहिले होते. ज्ञानप्रसाराचें कार्य दोघांनाही आत्यंतिक महत्त्वाचें व पवित्र वाटत असे. त्यासाठीं विद्वान मंडळीस हाताशीं धरावयाचें, त्यांना उत्तेजन द्यावयाचें नि त्यांच्याकरवीं हें कार्य पार पाडून घ्यावयाचें, हें दोघांचेंही उदात्त उद्दिष्ट होतें.

जनतेच्या कल्याणाचें नि सर्वांगीण उन्नतीचें, तसेंच राष्ट्रोन्नतीचें महत्तम कार्य जर कोणतें असेल, तर तें म्हणजे ज्ञानप्रसार हेंच होय. अशी खात्री पटल्यामुळें जावजीशेठ त्या कार्याप्रीत्यर्थ कितीही त्याग करावा लागला तरी तो आनंदानें करण्यासाठीं नेहमीं सज्ज होऊन राहिले होते.

'आधीं केलें मग सांगितलें' हा होता विनायकराव ओकांचा मार्ग. त्याच मार्गानें इतरांनीं जावें, असें त्यांना वाटत असल्यास नवल नाहीं.

एके ठिकाणीं त्यांनीं आधुनिक विद्वानांस पुढीलप्रमाणें प्रार्थना केली आहे :—

"ज्ञान ही शक्ति देवाची, ती न भ्रमेचि प्रपंचीं ।
सर्वां सारखी कृती तिची, अग्निवायूसारखी ॥
जीं काय बीजें तुमचे हातीं, आहेत लागलीं सान मोठीं ।
त्यांची पेरणी करा पोटीं, आशा पिकाची धरोनी ॥
बोला, लिहा, वाचा, पढवा, अशा नाना युक्ति लढवा ।
निज लोकांची पदवी चढवा, ज्ञानसोपानीं वर वर[1] ॥

---

[1] बालबोध : आक्टोबर १९११

'बालबोध' ह्या छोट्या मासिकाचा प्रसार महाराष्ट्रांतील शहराशहरांतून, त्याचप्रमाणें कोनाकोपऱ्यांतील खेड्यापाड्यांतूनही झाला पाहिजे, असे प्रयत्न चालू होते. तसेंच त्याची वर्गणी सर्वांच्या आटोक्यांत यावी ह्या हेतूनें अत्यल्प ठेवण्यांत आली होती. जवळपासचे नि दूरदूरचे असे ज्यांचे म्हणून पत्ते उपलब्ध झाले, त्यांच्याकडे मासिकाचे अंक वक्तशीर पाठविण्यांत येत असत. अंक वक्तशीर येत असला व त्याला आश्रय देणें हें कितीही फायद्याचें नि जरूरीचें असलें, तरी वक्तशीर वर्गणी पाठविण्याचें कार्य आमच्याकडून पार पडत नाहीं. तें जसें त्या काळीं पार पडत नसे, तसेंच धोरण आम्हीं आजतागायत न चुकतां चालू ठेविलें आहे. वाचकवर्गाकडून वर्गणीच्या रूपानें मिळणारें उत्तेजन जसें मिळावें तसें मिळत नसे, म्हणून जावजीशेठजींचा उत्साह मात्र तिळभरही कमी झाला नाहीं. आपण आरंभिलेलें हें एक सत्कार्य आहे, तेव्हां तें अव्याहत चालू ठेवणें इष्ट आहे, ह्या धोरणानें ते वागत होते.

सारेच कांहीं एका माळेचे मणि नसतात. कोणतेंही कार्य असो; त्याबद्दल आस्था व अनास्था दाखविणारीं माणसें असावयाचींच. एक वर्ष संपल्यानंतर दुसऱ्या वर्षाच्या प्रारंभीं वर्गणी व देणग्यांच्या रूपानें आश्रय देणाऱ्यांचीं, त्याचप्रमाणें एकदम पांच किंवा अधिक वर्षांची वर्गणी देणाऱ्यांचीं नांवें प्रसिद्ध करण्यांत आलीं आहेत. त्यांत न्यायमूर्ति काशीनाथ त्र्यंबक तेलंग, मामा परमानंद यांच्यासारख्या, अशा उपक्रमाचें महत्त्व ओळखणाऱ्या कांहीं विद्वानांनीं एकदम दहा किंवा पांच रुपये पाठविल्याचा उल्लेख आहे. बडोद्याचे विद्याप्रेमी महाराज श्रीमंत सयाजीराव गायकवाड, इचलकरंजीचे राजेसाहेब, यांच्यासारख्या संस्थानिकांचेंही लक्ष या उपक्रमाकडे आरंभापासून लागून राहिलें होतें, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होती; परंतु अशीं उदाहरणें त्या आरंभकाळीं तुरळक होतीं.

मासिक सुरू होऊन सुमारें पावणेदोन वर्षे झालीं होतीं. असंख्य वर्गणीदारांकडून वर्गणी यायची होती. त्यांना जागृति यावी, ह्या अपेक्षेनें बालबोधद्वारें ठोकण्यांत आलेल्या पहिल्या 'आरोळीचा' हा नमुना पहा!

"वर्षाचे अवघे सहा आणे! ते देखील अद्याप कितीएक मित्रांकडून आले नाहींत. 'बालबोध' आपलें पतकरलेलें काम वेळच्यावेळीं यथाशक्ति करतो ना? त्याच्या पोटाला द्या. पाण्यांवाचून माशाचें कसें चालेल? सांगा बरें!"[1]

वर्गणीदार आपली जबाबदारी पार पाडोत वा न पाडोत, 'बालबोध'चे चालक आपल्या उत्साहाची विलकूल खची होऊं न देतां आपली जबाबदारी वाढत्या उत्साहानें नि कर्तव्यबुद्धीनें पार पाडीत होते. एवढेंच काय? परंतु वाचकांच्या ज्ञानांत भर घालणारे अधिकाधिक विषय देतां यावे ह्या उद्देशानें मासिकाचीं पानें दोन वर्षांनंतर तिप्पटीनें वाढविण्यांत आलीं; परंतु वर्गणी कांहीं तिप्पटीनें वाढविण्यांत आली नाहीं. ती अवघी दोन आण्यांनीं वाढविण्यांत आली. एका रुपयांत दोघांस वर्गणीदार होतां येत असे! वार्षिक वर्गणी फक्त आठ आणे!

याचें कारण एकच. जावजीशेठनीं हें मासिक रोजगार-धंदा म्हणून चालविलें नव्हतें. त्यांचें जीवनकार्य सफल करण्याचें तें एक छोटेंसें साधन होतें. त्यांच्या हयातींत काय, किंवा तदनंतरच्या काळांत काय, अखेरपर्यंत तेंच धोरण कायम होतें.

अशाप्रकारच्या स्तुत्य उपक्रमाची जाणीव ठेवून वागणारीं माणसें त्या काळीं होतीं; परंतु वर सांगितल्याप्रमाणें त्यांचें प्रमाण फार कमी होतें. शहाणे व जाणकार लोक आपल्या उपक्रमाचें कौतुक करतात, हेंच आपलें पारितोषिक, असें जावजीशेठ समजत असत.

'बालबोध' दहा वर्षांचा झाला. त्याचें हिंडण्याचें क्षेत्र विस्तारलें हें पाहून जावजींना समाधान वाटूं लागलें. वर्षेंच्या वर्षे वर्गणी न पाठविणारे खंबीर लोक भेटायचेच! त्या काळांत त्यांच्या खंबीरपणापुढें वांकावें लागलें तर त्यांत नवल कसलें? आजच्या सुधारलेल्या काळांतही त्यांची परंपरा चालू ठेवणारे सवाई खंबीर लोक कमी का भेटतात?

अशा वर्गणीदारांस उद्देशून दहाव्या वर्षाच्या अखेरीस पुढीलप्रमाणें प्रार्थना करण्यांत आली आहेः—

"दिव्याला तेल पांच शेर लागत नाहीं. पळीभरच पुरतें; पण तें पळीभर पाहिजे. त्याशिवाय चालत नाहीं. तशी या लहानशा बालबोधाची

१. बालबोध : नोव्हेंबर १८८२

वर्गणी अवघी आठच आणे आहे; फार नाहीं. पण ती त्यास वेळेवर मिळाली म्हणजे त्याचें बरें चालावयाचें."[१]

अशारीतीनें मधून मधून वर्गणीदारांस जागृत करावे लागत असलें, तरी बालबोध मासिकाचा सर्वत्र बोलबाला होऊं लागला. त्याचप्रमाणें त्याचा वाचक-वर्गही उत्तरोत्तर वाढत चालला. ८।१० वर्षांच्या काळांत ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें, या मासिकानें अत्युत्कृष्ट कामगिरी बजाविली. त्याचे मालक नि संपादक अनुक्रमें जावजीशेठ व विनायकराव ओक ह्यांना तेंच पाहिजे होतें. ज्या बालकाला आपण जन्म दिला, त्याचें सर्वांकडून नि सर्वत्र कौतुक केलें जात असल्याचें अनुभवण्याचें भाग्य सर्वच जनकांच्या वांट्यास येत नसतें. जावजी-शेठजींच्या वांट्यास सुदैवानें तें आलें होतें. त्या कार्यासंबंधीं त्यांचा उत्साह आतां द्विगुणित झालेला होता. आणि त्यांत अभूतपूर्व भर घालणारी एक प्रोत्साहक, मजेदार घटना घडून आली.

बडोद्याचे महाराज श्रीमंत सयाजीराव गायकवाड ह्यांचें विद्याप्रेम सर्वत्र मशहूर आहे. मानवी उत्कर्षाची गुरुकिल्ली जर कोणती असेल, तर ती म्हणजे ज्ञानसंपन्नता. ज्ञानदानासारखें पवित्र व महत्तम कार्य दुसरें कोणतेंही नाहीं, असें मानणारे नि त्यासाठीं परोपरीनें प्रयत्न करणारे ते होते. ज्ञानप्रसाराचें कार्य कुठेंही चाललेलें असो; त्याकडे महाराजांचें लक्ष लागून राहिलेलें असे. जावजीशेठनीं वि. कों. ओक यांच्यासारख्या विद्वन्मणीचा सहकार मिळवून 'बालबोध' मासिकास जन्म दिला व त्या विपरीत काळांत तें कार्य समाधान-कारक रीतीनें चालविल्याचें पाहून त्यांना संतोष वाटूं लागला. अगदीं आरंभापासून 'बालबोध' त्यांच्या भेटीस जात असे. सतत ७।८ वर्षें तें मासिक आपल्या ध्येयधोरणास अनुसरून नियमित व सुव्यवस्थित रीतीनें चालत असल्याचें पाहून त्यावाबतींत आपलेंही कांहींतरी कर्तव्य आहे, असें त्यांना वाटूं लागलें.

एके दिवशीं आपल्या कारभाऱ्यास बोलावून महाराजांनीं त्यांच्याजवळ 'बालबोध' मासिकाबद्दल मुक्तकंठानें प्रशंसा केली नि त्याच्या चालकांस

१ बालबोध : नोव्हेंबर १८९२

पारितोषिकादाखल एक हजार रुपये मंजूर करून ते त्याच्याकडे पाठविण्याची व्यवस्था करावी, असा त्यांना आदेश दिला.

तदनुसार मासिकाच्या मालकांकडे पुढील पत्र आलें :—

" राजमान्य राजश्री 'बालबोध' पुस्तकाचे मॅनेजर यांसी,

सलाम दिगर, आपले बालबोध पुस्तकासंबंधानें श्रीमंत महाराजसाहेब यांचे उद्गार निघाले ते :—

" बालबोध पुस्तकाची भाषा सरळ असून त्यांतील शब्दरचना विचार-पूर्वक केलेली असते. मुलांस जसें पुस्तक असावें तसें हें पुस्तक उपयुक्त आहे. याकामीं ग्रंथकर्त्यांनीं केलेला आरंभ व प्रयत्न स्तुत्य आहे. अशीं पुस्तकें आपल्या मुलांबाळांसमोर जितकीं येतील, तितकीं आपले देशास फायदेशीर आहेत."

" सदर कामाबद्दल आपणांस एक हजार रुपये 'शाबासाई' देण्याविषयीं हुजूरची आज्ञा जाहली आहे. ही रक्कम आपण बडोद्याहून खानगी कारभारी यांजकडोन मिळण्याबद्दल मागणी केली असतां मिळेल."

तारीख २५ माहे डिसेंबर सन १८८८
मुक्काम पांचगणी. } **पेस्तनजी दोरावजी**

हें पत्र हातीं येतांच तें जावजीशेठ यांनीं वाचलें. तें वाचून त्यांना किती समाधान वाटलें असेल, ह्याची वेगळी कल्पना करून देण्याची जरूरी आहे असें वाटत नाहीं. त्या काळीं एक हजार रुपयांची त्यांना मातब्बरी वाटत नव्हती. परंतु गुणग्राहक बडोद्याच्या महाराजांनीं आपल्या एका लहानशा प्रयत्नाचें कौतुक करावें, ह्याबद्दल त्यांना अपरंपार आनंद झाला. ज्ञानप्रसारार्थ आपण यथाशक्ति चालविलेल्या प्रयत्नांची स्वयंस्फूर्तीनें वाटचाल करीत एका थोर नि पूज्य व्यक्तीकडून आलेली ती पावती होती.

एकादा माणूस श्रद्धापूर्वक अविरत उद्योगांत असतो. तो उद्योग हीच आपली सद्गति, अशी त्याची भावना असते. आणि कधीं ना कधीं एके दिवशीं हासभास नसतां त्या श्रद्धेचें नि चिकाटीचें फळ देवदयेनें त्याच्या पदरांत पडतें. आणि मग जो आनंद नि जी कृतार्थता वाटत असते, त्याची तुलनाच

करतां येणार नाहीं. असा तो अमृततुल्य क्षण जावजी शेठजींच्या जीवनांत आलेला होता.

त्या आनंदभरांत शेठजींनीं तें पत्र मासिकाचे संपादक विनायकरावजी ओक यांच्याकडे पाठविलें. त्यांनाही आनंदाची नि सात्त्विक समाधानाची तीच अनुभूति होणें अगदीं स्वाभाविक होतें.

त्यानंतर कांहीं काळानें उभयतांची भेट झाली. त्यावेळीं जावजीशेठजींनीं विनायकरावजींजवळ अगदीं मोकळेपणानें आपला आनंद व्यक्त केला व त्यांचें हार्दिक अभिनंदन केलें.

"यांत माझें कसलें अभिनंदन करायचें? ह्या यशाचें सारें श्रेय आपल्याकडे आहे. मी केवळ निमित्तमात्र आहें. आपण कर्ते करविते आहांत." विनायकराव नम्रतापूर्वक म्हणाले.

"असें कां म्हणतां? आपण उद्योग झटून केला, त्यामुळेंच बालबोधाला सुंदर बाळसें आलें, हें मीच काय परंतु कोणीही सांगूं शकेल. गुणग्राही महाराज काय म्हणतात तें पहा ना! कसेंही असो. आपल्या बालबोधाचा थोरा-मोठ्यांकडून बोलबाला होऊं लागला आहे. अशा रीतीनें आपण आरंभिलेल्या उद्योगाला मधुर फळ येऊं लागलें आहे, ही किती तरी समाधानाची गोष्ट आहे! बालबोधानें मानमान्यता मिळविली तशीच मानमान्यता आमच्या काव्यमालेच्या वांट्यास यावी म्हणजे झालें."

ह्याप्रमाणें जावजीशेठनीं आपल्या दुसऱ्या आवडत्या अपत्यासंबंधीं सदिच्छा प्रकट केली.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं गायकवाड सरकारकडून पारितोषिकादाखल जे एक हजार रुपये यायचे होते ते मालक ह्या नात्यानें जावजीशेठकडे आले. पैशांचा मोह कोणाला होत नाहीं? आणि छापखानेवाल्यास तर हजार तोंडें शांत करायचीं असतात. मग अचानकपणें हातीं आलेली रक्कम जशीच्या तशी नि ताबडतोब कोण हातावेगळी करील? परंतु जावजीशेठ हे दिलदार, पापभीरु नि दुसऱ्यांचें अंतःकरण जाणणारे होते. त्यांनीं त्या पैशांचा मोह तिळभरही बाळगला नाहीं. ते आले तसेच त्यांनीं परस्पर बालबोधाचे संपादक विनायकराव ओक ह्यांच्याकडे पाठवून दिले.

ती रक्कम पाहून विनायकराव ओक आश्चर्यचकित झाले. पैसा पैसे-वाल्यांकडे जायचा. जे नफानुकसान सोसतात त्या मालकांकडे जायचा. तो माझ्याकडे कां म्हणून यावा? ते तसेच तडकाफडकीं उठले आणि जावजीशेठकडे गेले.

"शेठजी! गायकवाड सरकारकडून पारितोषिकादाखल आलेली रक्कम आपण माझ्याकडे कां बरं पाठविली? आपण मालक आहांत नि त्या नात्यानें त्या पारितोषिकाचे धनी आपणच आहांत!"

विनायकराव जावजीशेठना उद्देशून नम्रतापूर्वक म्हणाले.

"नाहीं हो नाहीं! त्या पारितोषिकाशीं माझा संबंध येऊं शकत नाहीं. तें पारितोषिक आपल्यासाठीं आहे." जावजीशेठनीं सांगितलें.

"शेठजी! मला नाहीं आपलं म्हणणं पटत. मी बालबोधाचा संपादक असलों तरी त्याबद्दल आपण मला मासिक मुशाहिरा नियमितपणं देतां. शिवाय त्या मासिकापायीं अवांतर खर्च आपणास थोडा थोडका का करावा लागत असतो! ही सारी स्थिति रोजच्या रोज पहात असतां त्या रकमेचा स्वीकार मीं कोणत्या हातांनीं करूं?"

"विनायकरावजी! चुकत आहांत तुम्ही! महाराजांच्या वतीनं आपल्याकडे आलेलं पत्र आपण लक्षपूर्वक वाचलं नसावं असं मला वाटतं. त्या पत्रांत त्यांनीं संपादकीय कौशल्याची, सोप्या सरळ भाषेची नि विषयांच्या एकंदर मांडणीची प्रशंसा केली आहे. तेव्हां तें पारितोषिक निश्चितपणं आपल्यासाठीं आहे. त्यांनीं नीटनेटक्या छपाईबद्दल, उत्तम शाई, उत्तम कागद व मनोहर मुद्रणाबद्दल जर प्रशंसा केली असती, तर मात्र तें पारितोषिक आपल्या पदरांत न टाकतां मीं स्वतःसाठीं ठेवून घेतलं असतं. त्यांतील एक पैही तुम्हांला दिली नसती. परंतु जी वस्तु तुमची आहे, तिचा स्वीकार मी कसा बरं करूं? तेव्हां अगदीं निःसंकोचपणं तुम्हीं त्या पारितोषिकाचा स्वीकार करावा. तुमच्या ह्या गौरवानं मला आनंद झालेला आहे. तो आनंद हेंच माझं पारितोषिक, असं मी समजतों."

संपादकमहाशय यावर काय बोलणार? जावजीशेठजींच्या अचूक कोटिक्रमानें ते निरुत्तर झाले आणि शेवटीं त्या पारितोषिकाचा त्यांना स्वीकार करावा लागला.

असे होते जावजीशेठ. लेखकाची कदर जाणणारे, समंजस, निर्लोभी नि दयाळू.

बडोदा नरेशांकडून आलेल्या पारितोषिकास शिवायचें नाहीं, तें धन आपलें नव्हे, असें जावजीशेठजींनीं ठरविलें असलें तरी विनायकराव ओकांना त्या धनाची विल्हेवाट कशारीतीनें लावावी, हा प्रश्न सतावूं लागला. मग त्यांनीं काय केलें? निर्णयसागर मुद्रण-मंदिरांतील ज्या कामगारांचा बालबोध मासिकाशीं संबंध येत असे, त्यांना मेवामिठाई व कपडे वांटण्यासाठीं तीनशें रुपये खर्च केले नि उरलेले सातशें रुपये त्यांनीं घेतले.

या जगांत पैशांचा उपयोग किंवा दुरुपयोग परोपरीनें करतां येतो. विनायकरावांनीं हातीं आलेल्या पैशांचा उपयोग कशारीतीनें केला असेल, याचा विचार आम्हीं कशाला करावा? परंतु एक गोष्ट मात्र निश्चित आहे. श्रीमंत सयाजीराव गायकवाड ह्यांच्याकडून आलेल्या पारितोषिकामुळें त्यांना एकप्रकारची कृतार्थता वाटूं लागली. ज्या सद्भावनेनें आपण एका विशिष्ट नि देशकल्याणकारी कार्यास वाहून घेतलें, तें यशाच्या मार्गावर असल्याची त्यामुळें त्यांना जाणीव झाली. त्यांचा उत्साह द्विगुणित झाला. त्याचप्रमाणें जिवाशिवाची भेट होऊन आनंद व्हावा, तशा प्रकारचा उच्च कोटींतील आनंद, जावजीशेठजींच्या स्वभावांतील एका ज्वलंत पैलूचें दर्शन घडल्यामुळें त्यांना झाला.

अशारीतीनें आपल्या एका लाडक्या अपत्याच्या उत्कर्षाचा काळ जावजीशेठनीं पाहिला नि अनुभविला. १८९२ सालीं त्यांनीं इहलोकींची यात्रा संपविली. त्या वेळीं बालबोध अकरा वर्षांचा होता. त्यांच्यानंतर तितकेच कर्तबगार त्यांचे चिरंजीव शेठ तुकाराम जावजी ह्यांनींही बालबोधाचें संगोपन बंधुभावानें केलें. कोणत्याही बाबतींत उणें पडूं दिलें नाहीं, किंवा त्याची यत्किंचितही हेळसांड केली नाहीं.

विनायकरावजी ओक ह्यांच्या संपादकत्वाखालीं बालबोध प्रगतिपथावर होता. कारण तें त्यांचें जीवनसर्वस्व होतें. विपरीत व औदासीन्याच्या काळांत जन्मास आलेल्या बालबोधानें थोडीथोडकी नाहीं तर चौतीस वर्षांची वयोमर्यादा गांठली. सारा एक हाती नि एक टांकी कारभार. ह्या कालावधींत बालबोधमध्यें जें जें विविध प्रकारचें लेखन प्रसिद्ध झालें, तें ( २१२ लेख वगळतां )

बदलला होता. अनेक मासिकें निघूं लागलीं होतीं. ओक ह्यांनी तोंपर्यंत ठीक होतें. तरी एकाच कार्याला वाहिलेला, बहुश्रुत नि ध्येयनिष्ठ संपादक आपण कोठून शोधून काढणार? त्यापेक्षां मासिकाचा कारभार आटोपलेला काय वाईट? असें त्यांना वाटूं लागलें आणि त्याच हेतूनें वाचकांस उद्देशून त्यांनीं पुढील सूचना जाहीर केली:–

"बालबोध मासिक चौतीस वर्षे चालविलें. विनायकरावजी ओक नि बालबोध ह्यांची एकरूपता झालेली होती. त्यांच्या निधनानंतर तितक्या सरळ, नेमस्त आणि सफाईदार लेखणीनें, नियमितपणें बालबोध चालविणें आम्हांस अशक्य वाटूं लागलें आहे. चालू वर्षाचे बाकी राहिलेले अंक त्यांनींच लिहिलेल्या लेखांनीं पूर्ण करून अंक बंद करण्याचा विचार आम्हीं केला आहे. जशी भावंडांची ताटातूट व्हावी, तसें आम्हांस वाटत आहे. तथापि नाइलाजानें हा मार्ग आम्ही स्वीकारीत आहोंत."[१]

आणि त्यानंतर एक महिन्यानें प्रसिद्ध झालेल्या शेवटच्या अंकांत बालबोधनें सर्व वांचकांचा मोठ्या कष्टानें निरोप घेतला. तो शेवटचा निरोप पुढीलप्रमाणें होता:–

"जवळ जवळ तीन तपें ज्ञानप्रसारार्चे अत्यंत पवित्र कार्य चांगल्याप्रकारें केल्यानंतर तें सोडण्याची वेळ आली, तर केलेल्या कामगिरीकडे पाहून ती करणारास समाधान आणि एकप्रकारची प्रौढी वाटणार नाहीं काय? आज बालबोधास तसेंच वाटत आहे.. .......... तेव्हा ही अल्प सेवा करण्याचें सामर्थ्य ज्यानें दिलें, त्या विश्वंभराचे अनन्यभावानें उपकार मानून, जनक नि चौतीस वर्षांचे चालक कै. वि. कों. ओक, पालनकर्ते कै. जावजी दादाजी व त्यांचे चिरंजीव, पारितोषिकाच्याद्वारें प्रोत्साहन देणारे श्रीमंत सयाजीराव गायकवाड नि श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर, तसेंच वाचक आणि वर्गणीदार यांना धन्यवाद ... आज निर्णयसागरचा ... श' सर्वांचा निरोप घेत ... "

संपादकाबरोबर बालबोध मासिकानें सर्वांचा निरोप घेतला असला, तरी सतत चौतीस वर्षें ह्या जगांत बहुमानानें वावरून लोकशिक्षणाच्या नि ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें त्यानें त्या काळांत जी कामगिरी पार पाडिली, तिला तोड सांपडणें कठीण आहे. बालबोधनें जन्मा आलीयाचें सार्थक केलें. माणूस काय किंवा मासिक काय, मरण हें दोघांच्याही बाबतींत अटळ आहे. आजवर ह्या जगांत अनेक माणसें नि अनेक मासिकें जन्मास आलीं नि जगाचा निरोप घेऊन निजधामास गेलीं; परंतु बालबोधप्रमाणें दीर्घायुष्य वांट्यास आलेलीं नि लोकसेवाव्रत यथाशक्ति पालन करण्यासाठीं अहर्निश झटणारीं मासिकें फार थोडीं आढळून येतील. आणि म्हणूनच बालबोधाचे संपादक विनायक कोंडदेव ओक नि पालक शेठ जावजी दादाजी आणि त्यांचे चिरंजीव ह्यांना कृतज्ञतापूर्वक जेवढे धन्यवाद द्यावे, तेवढे थोडेच होतील.

कविवर्य भालचंद्र शंकर शास्त्री देवस्थळी ह्यांनीं विनायकराव ओक यांना त्यांच्या निधनोत्तर काव्यमय श्रद्धांजलि वाहिली आहे. त्यांत बालबोधसंबंधीं त्यांनीं म्हटलें आहे :

ठेवा अद्भुत तरुणां, दे जोडुनि बालबोध मासिक तें ।
ज्यापासुनी तरुण ते, जन किति सुजनत्व जाहले शिकते ॥
नरमणि कितीक झाले, त्यांचीं लिहुनी रसाळ तीं चरितें ।
जनदृष्टिपुढें ठेविति कीं ते होवोत सुपथ आचरिते ॥
किति वर्णावें? लेखक झाले, होतिल पुढेंहि सेवी ते ।
परि दुर्मिळ अर्थातें, ओकांसम शुद्ध सरळ जे चीते ॥

अशारीतीनें कविवर्य देवस्थळी ह्यांनीं बालबोधकारांच्या कामगिरीचा गौरव, मर्मग्राही नि रसाळ शब्दांत केला आहे.

---

१ बालबोधः डिसेंबर १९१४

८

# देव - भाषेची अनन्यसाधारण सेवा

संस्कृत भाषा नि संस्कृतवाङ्मय ह्यांचें महत्त्व आज सर्वांना वाटूं लागलें आहे; परंतु शंभर वर्षांपूर्वीच्या जावजीशेठच्या काळांत त्या भाषेला नि वाङ्मयाला आजच्यासारखें मानाचें स्थान नव्हतें. धार्मिक प्रवृत्तीच्या कुटुंबांत नि विद्वानांत त्या भाषेला आदराचें स्थान होतें. परंतु आज त्या भाषेचा जसा सर्वत्र बोलबाला होत आहे, तसा त्या काळीं होत नव्हता.

संस्कृत-भाषा ही सर्वपरीनें आमची जननी आहे. अनादि काळापासून आमच्या संस्कृतीचें, धर्माचें, नि मानव्याचें भरण-पोषण तिच्यामुळें घडत आलें आहे. तिचें महत्त्व शब्दांनीं व्यक्त करतां येण्यासारखें नाहीं. सकाळीं उठल्यापासून तों रात्रौ झोंपीं जाईपर्यंत आमच्याकडून जे जे व्यवहार घडतात, त्यांची नीट घडी बसविण्यांत संस्कृत भाषेचा सहकार फार मोठा आहे. त्या भाषेंत पावित्र्य, पुण्यपावनता नि मनाला सात्त्विक समाधान देण्याचें सामर्थ्य आहे. आमचे सारे धार्मिक आचारविचार त्या भाषेंत रूढ आहेत. वेद, उपनिषदें, स्मृति, रामायण, महाभारत वगैरे आमचे धार्मिक ग्रंथ त्याच भाषेंत लिपिबद्ध होऊन राहिले आहेत. संस्कृत भाषा म्हणजे देव-भाषा. हजारों वर्षांपासून भारतीयांच्या मानसिक घडवणुकींत त्या भाषेचा वांटा फार मोठा, तसाच महत्त्वाचा आहे. पारलौकिक नि ऐहिक साधनेंतही संस्कृत-साहित्याचें

महत्त्व अपरंपार आहे. या दोन्ही क्षेत्रांत असा एकही विषय नाहीं की ज्या विषयाला संस्कृत साहित्यानें स्पर्श केलेला नाहीं.

संस्कृत-साहित्य अपरंपार असलें तरी तें सर्वसाधारण लोकांच्या आटोक्यांत आलें पाहिजे ना? तें कसें यायचें? मुद्रणाच्या द्वारें. मुद्रण-यंत्र अस्तित्वांत येईपर्यंत संस्कृत-साहित्य हस्तलिखित स्वरूपांत विद्वान पंडितांच्या घरीं बंदिस्त होऊन राहिलें होतें. त्या बंदिवासांतून संस्कृत धार्मिक-वाङ्मयाची सुटका करून तिला मुद्रित नि सर्वस्पर्शी करणारे पहिले महाराष्ट्रीय धर्मवीर-मुद्रक म्हणजे गणपत कृष्णाजीच होत. त्यांनीं खपाचा किंवा फायद्याचा विचार न करतां अनेक धार्मिक ग्रंथ नि पोथ्या छापून काढल्या; परंतु त्या सर्वांत महत्त्वाचें कार्य म्हणजे त्यांच्या छापखान्यांतून बाहेर पडलेलें समग्र महाभारत होय.

पुणें येथील भांडारकर-संशोधन-मंडळातर्फे महाभारताच्या अनेक पोथ्या जमवून त्यांचें संशोधन करण्यांत आलें. हें कार्य ४०–४५ वर्षें चालू होतें. एकोणीस खंडांत महाभारताची संशोधित आवृत्ति यशस्वी रीतीनें पूर्ण करण्यांत आली. या महान् कार्याचा शुभारंभ गणपत कृष्णाजींच्या मुद्रणालयांतून बाहेर पडलेल्या महाभारत–आवृत्तीनें करण्यांत आला, हें आगळें भाग्य लक्षांत घेण्याजोगें आहे.

आणि त्यांच्यानंतर नफ्यातोट्याचा विचार न करतां संस्कृतवाङ्मय-प्रकाशनाकडे ज्यांनीं सर्वव्यापी दृष्टीनें आपलें लक्ष धार्मिक नि पवित्र भावनेनें वळविलें, असे श्रेष्ठ संस्कृत-ग्रंथप्रकाशक म्हणजे शेठ जावजी दादाजी हेच होत. संस्कृत-साहित्य हें कितीही बहुमोल असलें, तरी तें मोल विद्वान् शास्त्री-पंडितांपुरतें होतें. सर्वसाधारण लोकांना तें दुर्मिळ होतें. सर्वसाधारण लोकांना दुसऱ्यांच्या म्हणजे ब्राह्मणवर्गाच्या ओंजळीनें त्या अमृताचा क्वचित् एकादा दुसरा बिंदु भाग्यवशात् चाखायला मिळत असे.

आमच्या सर्वसाधारण लोकांना संस्कृत वाङ्मयाचें पवित्र महाद्वार उघडलें जाण्यापूर्वी सर विल्यम जोन्स, भट्ट मोक्षमुल्लर, विल्यम कॅरे, ए. बी. कीथ, ए. ए. मॅक्डोनल्, कर्नल जी. ए. जेकब यांच्यासारख्या अनेक युरोपीयन विद्वान् पंडितांनी संस्कृत-वाङ्मयाचा अभ्यास करून त्या साहित्यांतील दिव्य

नि तेजस्वी रत्न-भांडाराचा साऱ्या जगाला परिचय करून दिला. त्यांच्या ज्ञानलालसेची नि दीर्घोद्योगाची जितकी तारीफ करावी तितकी थोडीच होईल.

ह्या ओझरता उल्लेख करण्याचा उद्देश एवढाच कीं, अठराव्या शतकाच्या अखेरीअखेरीस युरोपमधील विद्वान् पंडितांस त्या काळीं भारतांत सोनें-नाणें पुष्कळ असलें तरी त्याहीपेक्षां संस्कृत-साहित्याच्या रूपानें बहुमोल वाङ्मय-संपदा ठिकठिकाणीं विखुरली आहे, ह्याची जाणीव झाली.

संस्कृत वाङ्मय-भांडार म्हणजे आमचें राखीव कुरण आहे. त्यांत यथेच्छ चरण्याचा नि ज्ञानसंपन्न होण्याचा खास वारसा आमचा आहे, असें ह्या देशांतील ब्राह्मण शास्त्रीवर्गाला एकाकाळीं वाटत असे. परंतु इंग्रजी राजवट सुरू झाल्यानंतर तो पडदा दूर सारला गेला. त्यासाठीं कोण कोण पुढें सरसावले, हा इतिहास कथन करण्याचें हें स्थळ नव्हे; परंतु एवढें खरें कीं, संस्कृत भाषेचें नि संस्कृत-साहित्याचें दालन सर्वांसाठीं त्या राजवटींत खुलें झालें. *आज ज्याच्याठायीं अभ्यासुवृत्ति आहे नि संस्कृत भाषेबद्दल* ज्याला आदरभाव वाटतो, अशा कोणींही पुढें यावें नि 'जगन्नाथ शंकरशेठ स्कॉलर' म्हणून संस्कृत पंडित ह्या नात्यानें समाजांत आपलें मानाचें स्थान पटकवावें. *आपल्या महाराष्ट्रापुरतें बोलायचें झाल्यास, गेल्या* शंभर वर्षांच्या काळांत निरनिराळ्या समाजांतील किती तरी होतकरू तरुणांनींच नव्हे, तर अभ्यासु वृत्तीच्या तरुणींनींही संस्कृत भाषेंतील आपापलें नैपुण्य प्रकट केलें आहे.

आज आपण संस्कृतभाषेच्या अभ्युदयाच्या काळांत वावरत आहोंत. आपलें सरकार शक्य त्या मार्गांनीं संस्कृत भाषेला उत्थापन देण्याच्या उद्योगांत आहे. जिकडे तिकडे संस्कृत भाषेची महनीयता ऐकूं येत आहे; परंतु शंभराऊणशें वर्षांपूर्वीच्या काळांत परकीय सत्तेच्या अमदानींत प्रकार वेगळा होता. 'संस्कृत-भाषा नि संस्कृत-वाङ्मय उत्तेजनार्ह नाहीं. बदललेल्या काळांत काय त्या वाङ्मयाचा उपयोग ? तें सांदीकोंपऱ्यांत पडून राहिलें आहे, तेंच सुधारलेल्या काळांत त्याचें योग्य स्थान !' असा इंग्रज राज्यकर्त्यांचा एकाकाळीं चुकीचा समज होता.

परकीय राज्यकर्त्यांनीं अज्ञानामुळें संस्कृत-वाङ्मयाची हेटाळणी चालविली असली तरी विद्वान् शास्त्री-पंडितांच्या घरीं त्या भाषेला नि हस्तलिखित संस्कृत-वाङ्मयाला बहुमानाचें स्थान होतें. त्यांना देव-भाषेतील तें वाङ्मय प्राणाहून प्रिय वाटत असे व त्यांनीं त्याची जपणूक काळजीपूर्वक चालविली होती. त्याबद्दल त्यांना द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच होतील.

पेशवाईंत संस्कृतज्ञ शास्त्री-पंडितांना परोपरीनें उत्तेजन देण्यांत येत असे, हें ठीक होतें. परंतु ब्राह्मणवर्गापुरत्या बंदिवासांत अडकून राहिलेल्या त्या भाषेला जनताभिमुख करून मोकळ्या वातावरणांत वावरण्याचें भाग्य पेशव्यांच्यानें देववलें नाहीं; उलटपक्षीं तिच्यावरील बंधनें अधिक घट्ट करणेंच त्यांना श्रेयस्कर वाटलें!

काळ कोणाचीही तमा बाळगीत नाहीं. तो झपाट्यानें आपला मार्ग आक्रमीत असतो. पेशवाई नामशेष होऊन इंग्रजांचा अंमल सुरू झाला. त्या आरंभकाळांत विद्वान् शास्त्री-पंडितांना दक्षिणेच्या रूपानें जें उत्तेजन मिळत असे, तें एकदम बंद करणें, त्या परकीय राजसत्तेला धोक्याचें वाटलें. विद्वान् वर्गाला दुखवून कसें चालेल? आपल्या सत्तेची घडी नीट बसली पाहिजे. तेव्हां जनतेंत नि विशेषतः विद्वान् शास्त्री-पंडितांत असंतोष माजूं नये, ह्यासाठीं पुण्यांत संस्कृत-पाठशाळा स्थापन करून कांहीं शास्त्री-पंडितांची सोय लावण्यांत आली. तत्कालीन इंग्रजी राज्यकर्त्यांना संस्कृत भाषेचें महत्त्व फारसें वाटत नसे; परंतु कँडीसाहेबासारख्या संस्कृत नि देशी भाषांचा अभ्यास केलेल्या गोऱ्या पंडितास त्या भाषेचें महत्त्व पटलेलें होतें.

तत्कालीन पुणेरी शास्त्री-पंडित संस्कृत भाषेचें पावित्र्य सांभाळण्यासाठीं फार जपत असत. ब्राह्मणांशिवाय इतर समाजांतील लोकांनीं संस्कृत भाषेच्या सहवासांत येऊं नये, असें त्यांना वाटे; परंतु पुण्याच्या संस्कृत पाठशाळेवर देखरेख करण्यासाठीं सरकारकडून नेमकी मेजर टी. कँडी ह्या गोऱ्या संस्कृतज्ञ विद्वान् पंडिताची योजना करण्यांत आली. (१८३७) शास्त्री-पंडितांच्या दृष्टीनें ही एक दुर्दैवी घटना होती; परंतु करणार काय? राजाज्ञेपुढें मान वाकविल्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता.

परंतु तरीही शास्त्री-पंडितांनीं कँडीसाहेबांवर कांहीं निर्बंध घातले. पुढील उताऱ्यावरून तत्कालीन परिस्थितीची सहज कल्पना करतां येईल.

" ह्या पाठशाळेवर ज्या साहेबाची नेमणूक झाली होती, त्यास वाड्यांत येण्याची परवानगी नसे. दरवाजाच्या बाहेरून एक रस्ता पुढले दिवाणखान्यांत जातो. त्या वाटेनें त्यानें येऊन त्या दरवाजावरील दिवाणखान्यांत बसावें. कोणास साहेबाचा विटाळ झाला असतां त्यानें घरीं जाऊन सचैल स्नान करून यावें. असें सांगतात कीं, एक वेळ साहेब ( कँडीसाहेब ) वाड्यांत गेला म्हणून उदकशांति केली. ह्याप्रमाणें पूर्वी ह्या ( संस्कृत ) शाळेंत सोवळ्याचें माहात्म्य होतें. पुढें साहेबास शिवल्याशिवाय अथवा वाड्यांत येऊं दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें पाहून वस्त्रांतर करूं लागले. पुढें राजास विटाळ मुळींच नाहीं, साहेबानें वाड्यांत यावें, पण बैठकीवर येऊं नये, असे शास्त्रार्थ काढले.[१]"

त्यानंतर संस्कृत-पाठशाळेला इंग्रजी शिक्षणाची जोड करून देऊन तिची उपयुक्तता वाढविण्यांत आली. राज्यकर्त्यांना आपल्या भाषेचें महत्त्व वाढवायचें होतें नि संस्कृताचें महत्त्व शक्य तेवढें कमी करायचें होतें. तो काळच तसा होता. शिक्षणांत संस्कृताला स्थान असावें कीं नाहीं, असाही वाद त्या काळीं ( १८४८–४९ ) सुरू झाला नि चांगला रंगलाही.

'बोर्ड ऑफ एज्युकेशन' म्हणजे त्या काळांतील सरकारी शिक्षणखातें. संस्कृत भाषेसंबंधी वाद सुरू झाला, तेव्हां त्या खात्याशीं निकट संबंध असलेले ना. नाना शंकरशेठ ह्यांनीं संस्कृत भाषेची सयुक्तिक नि जोरदार तरफदारी करून त्या भाषेला शिक्षणक्रमांत मानाचें स्थान प्राप्त करून दिलें. संस्कृत भाषेच्या पुनरुज्जीवनाच्या व अभ्यास चालू रहाण्याच्या दृष्टीनें त्यांची ही कामगिरी अविस्मरणीय आहे. 'ना. जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्तीनें' तर त्यांत अनुपमेय भर पडली आहे.

१८६६ सालीं 'ना. जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ति' चालू झाली आणि साधारणपणें तेव्हांपासून सर्व समाजांतील विद्यार्थिवर्गांत संस्कृत भाषा नि वाङ्मय ह्यांचा अभ्यास करण्याच्या बाबतींत सुफलदायी स्पर्धा सुरू झाली, असें म्हणतां येईल.

त्या आरंभ-काळांत मुद्रित संस्कृत-ग्रंथांची सहाजिकच दुर्भिक्षता होती. संस्कृत-वाङ्मयाचें मुद्रण-प्रकाशन भारतांत सर्वप्रथम झालें तें कलकत्त्यांत.

१ पुणें शहराचें वर्णन. ले. ना. वि. जोशी

एका काळीं कलकत्ता हें राजधानीचें शहर होतें. तेथें निरनिराळ्या कामगिरीवर इंग्लंडहून हुपार माणसें त्याकाळीं येत असत. चार्लस् विल्किन्स हे त्यांपैकींच एक अधिकारी होते. ह्यांचा विशेष परिचय पुढें करून देण्यांत आलेला आहे. ते हरहुन्नरी, महाउद्योगी, बुद्धिमान् नि कसबी होते. त्यांना भारतांतील देवनागरी टाइपांचे जनक समजण्यांत येतें.

ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरींत असतां आपलें काम साभाळून त्यांनीं प्रांतिक भाषा जी बंगाली, तिचा बारकाईनें अभ्यास केला आणि इतरेजनांसाठीं नि विशेषतः आपल्या गोऱ्या बांधवांसाठीं बंगाली मुद्रिकांचा संच स्वतःच्या कल्पकतेच्या बळावर प्रथम तयार केला. त्यांनीं संस्कृत भाषेचें ह्या देशांतील भाषांच्या व समृद्ध वाङ्मयाच्या दृष्टीनें महत्त्व किती आहे हें ओळखलें. त्यांना त्या भाषेचें आत्यंतिक आकर्षण वाटूं लागलें आणि प्रयत्नेंकरून त्या भाषेंत त्यांनीं प्रावीण्य संपादन केलें. इंग्लंडमधून नोकरीनिमित्त भारतांत येऊन संस्कृत भाषा अवगत करून घेणारे तेच पहिले इंग्रज गृहस्थ होत.

कलकत्त्यांत विल्किन्स हे १७७० सालीं आले आणि नोकरी करतां करतां बंगाली नि संस्कृत भाषाप्रवीण झाले. त्यांनीं भगवद्गीता, हितोपदेश नि शाकुंतल (नाटक) ह्या ग्रंथांचें इंग्रजींत भाषांतर केलें. त्यांनीं स्वतःच्या नि इतरांच्या सोयीसाठीं संस्कृत व्याकरण प्रथम १७७९ सालीं रोमन लिपींत प्रसिद्ध केलें; आणि त्यानंतर त्यांनीं स्वतःच्या कल्पकतेच्या नि उद्योगाच्या बळावर देवनागरी मुद्रिकांचा संच तयार केला. (१७९५) सुमारें तेरा वर्षांनीं त्या देवनागरी मुद्रिकांचा उपयोग करून त्यांच्या संस्कृत व्याकरणाची दुसरी आवृत्ति लंडनमध्यें १८०८ सालीं प्रसिद्ध करण्यांत आली.

इंग्लंडमधून भारतांत जे वरिष्ठ अधिकारी राज्यकारभार सांभाळण्यासाठीं त्या काळीं पाठविण्यांत येत असत, त्यांच्या पूर्वतयारीसाठीं नि त्यांना भारतीय भाषांचें ज्ञान व्हावें ह्यासाठीं तिकडे ईस्ट इंडिया कंपनीतर्फे स्थापन झालेल्या हेलिबरी (Hailybury) कॉलेजशीं प्राध्यापक ह्या नात्यानें विल्किन्स ह्यांचा महत्त्वाचा संबंध होता. उपरोक्त व्याकरण भारतांत येणाऱ्या आपल्या जातभाईंसाठीं त्यांनीं तयार केलें. ह्या क्षेत्रांतील त्यांची

महत्त्वाची कामगिरी, त्यांची ज्ञानलालसा नि चिकाटीचा दीर्घोद्योग लक्षांत घेऊन १८३३ सालीं ब्रिटिश सरकारकडून त्यांना 'सर' ही पदवी बहाल करण्यांत आली.*

एकंदरींत पहातां संस्कृत-वाङ्मयाचें मुद्रण नि त्यासाठीं जरूर असलेल्या देवनागरी मुद्रिका तयार करण्याची कामगिरी सर्वप्रथम पार पाडली गेली ती गोऱ्या अधिकाऱ्यांकडून नि मिशनऱ्यांकडून, ही महत्त्वाची घटना लक्षांत बाळगण्यासारखी आहे.

संस्कृत वाङ्मय-प्रकाशनाच्या दृष्टीनें पहातां मुंबईंत धार्मिक भावनेनें त्या क्षेत्राकडे वळणारे पहिले मुद्रक—प्रकाशक म्हणजे गणपत कृष्णाजी हेच होत. महत् प्रयासांनीं छापखान्याची उभारणी केल्यानंतर त्यांनीं तत्कालीन शास्त्री-पंडितांस जवळ करून त्यांचा सहकार मिळविला. धार्मिक स्वरूपाचें संस्कृत-वाङ्मय जनतेला उपलब्ध झालें पाहिजे, ही तळमळ त्यांना स्वस्थ बसूं देत नव्हती. त्या कार्यासाठीं जरूर तो पैसा खर्च करायला त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. त्यांच्यामागें त्यांच्या चिरंजीवांनींही तेंच धोरण पुढें चालविलें. गणपत कृष्णाजी ह्यांची प्रेरणा ईश्वरदत्त होती; आणि सुदैवानें त्यांत भर पडली डॉ. भाऊ दाजी नि विश्वनाथ नारायण मंडलिक ह्या देशप्रेमी नि वाङ्मयप्रेमी थोर पुरुषांच्या प्रेरणेची. संस्कृत-वाङ्मय हा भारताचा अमूल्य नि कोणीही हेवा करावा, असा ठेवा आहे व तो प्रकाशांत येऊन जनतेला उपलब्ध झाला पाहिजे, असें त्यांना वाटत असे.

त्यानंतर अनुपलब्ध संस्कृत-वाङ्मय, संत-वाङ्मय नि ऐतिहासिक बखरी ह्यांच्या पद्धतशीर प्रकाशनाच्या मद्वतूनें 'काव्येतिहास-संग्रह' मासिकाचा जन्म झाला (१८७८). विष्णुशास्त्री चिपळूणकर, जनार्दनपंत मोडक नि काशिनाथ ना. साने हे विद्वान् गृहस्थ त्या मासिकाचे संपादक होते.

केवळ संस्कृत-वाङ्मय प्रकाशनाला सर्वस्वीं वाहिलेलें जावजी शेठजींचें 'काव्यमाला' मासिक सुरू होईपर्यंतच्या आठ वर्षांच्या काळांत वेदांतकेसरी, शिवकाव्य, अमरुशतक वगैरे बारा संस्कृत ग्रंथ त्या मासिकाद्वारें प्रसिद्ध झाले.

* Printing Press in India by A. K. Priolkar, Page—53-54.

अप्रकाशित नि दुर्मिळ अशा संस्कृत वाङ्मयाचें विद्वानांकडून संशोधन करवून घेऊन तें वेळच्या वेळीं नि सुंदर स्वरूपांत वाचकांस उपलब्ध करून देण्याच्या हेतूनें जावजीशेठजींच्या निर्णयसागर मुद्रणालयानें जानेवारी १८८६ पासून 'काव्यमाला' मासिक सुरू करण्याची जबाबदारी स्वीकारली. त्यामागें कोणती भूमिका होती नि कोणत्या परिस्थितींत त्यांनीं तें मासिक चालविलें, हें पहाण्यासारखें आहे.

तत्पूर्वीच्या काळांत अस्तित्वांत असलेल्या मुंबई सरकारच्या शिक्षण खात्यातर्फे 'Bombay Sanskrit Series' या नांवानें संस्कृत ग्रंथप्रकाशन सुरू करण्यांत आलें होतें. काळ बदलत चालला. त्या काळांतील एक युरोपीयन लष्करी अधिकारी कर्नल जी. ए. जेकब हे संस्कृत वाङ्मयाचे एकनिष्ठ उपासक होते. संस्कृत भाषाभिमानी रा. ब. शंकर पांडुरंग पंडित ह्यांचेंही त्याकाळीं सरकारदरबारीं वजन होतेंच. परंतु त्याहीपेक्षां केवळ शिक्षणखात्याचेंच नव्हे तर आपल्या एकनिष्ठ उद्योगाच्या बळावर ज्यांनीं साऱ्या संस्कृताभिमान्यांचें लक्ष स्वतःकडे खेंचून घेतलें होतें, असे त्या काळांतील विद्वान् नि थोर पंडित दुर्गाप्रसाद द्विवेदी हे होत. ठिकठिकाणीं असलेल्या हस्तलिखित संस्कृत पोथ्या मिळविणें हें त्यांना जडलेलें एक व्यसनच होतें म्हणा ना. सुदैवानें त्यांना जयपूरच्या महाराजांचा आश्रय लाभला होता. पं. दुर्गाप्रसाद हे संस्कृत भाषेचे कट्टे अभिमानी होते. त्यांचा तो अभिमान साधासुधा नव्हता. त्या अभिमानापायीं त्यांनीं वांट्यास येईल तो त्याग आनंदानें केला. श्रमाकडे, पैशांकडे किंवा बहुमोल वेळेकडे त्यांनीं पाहिलें नाहीं. ज्या ज्या प्रांतांत नि जेथें जेथें हस्तलिखित संस्कृत पोथ्या असण्याचा सुगावा लागला, त्या त्या ठिकाणीं ते गेले व त्यांनीं आपला हेतु साध्य करून घेतला. काश्मीर, पंजाब, बंगाल, राजपुताना, मध्यप्रदेश, तेलंगण, वगैरे बहुतेक प्रांतांतून त्यांनीं संचार केला आणि हस्तलिखित पोथ्या जमा करण्यांत फार मोठें यश संपादन केलें.

पं. दुर्गाप्रसाद केवळ पोथ्या जमा करून थांबले नाहींत. ते विद्वान्, बहुश्रुत नि संशोधकही होते. जमा केलेल्या पोथ्यांचें संपादन करण्यास ते समर्थ होते; परंतु त्यांचें मुद्रण-प्रकाशन हें कांहीं त्यांच्या हातीं नव्हतें. मुंबई सरकारच्या

शिक्षणखात्यानें संस्कृत-ग्रंथांचें प्रकाशन करीत असतां त्यांच्या विद्वत्तेचा कांहीं काळ फायदा घेतला. त्यानंतर त्या काळांतील एक ग्रंथ-प्रकाशक ज्येष्ठाराम मुकुंदजी ह्यांनींही त्यांनीं संपादन केलेले कांहीं संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध केले. ह्या संस्कृत ग्रंथांची छपाई होत असे निर्णयसागरमध्यें. पुढें कांहीं ना कांहीं कारणांमुळें ज्येष्ठारामजींतर्फे होणारें प्रकाशन बंद पडलें. त्यामुळें पं. दुर्गाप्रसाद ह्यांना सहाजिकच दुःख झालें. कारण त्यांच्या संग्रहीं असलेल्या अपरंपार हस्तलिखित ग्रंथ-संपदेचा प्रकाशांत येण्याचा मार्ग खुंटला.

जावजीशेठजींच्या मुद्रण-प्रकाशन-कार्याच्या दृष्टीनें ऐन भरभराटीचा नि वाढत्या उमेदीचा तो काळ होता.

'बालबोध' ह्या नांवाचें एक अल्पमोली, परंतु उपयुक्त मासिक नियमितपणें नि आकर्षक स्वरूपांत चालवून त्यांनीं तें लोकप्रियतेच्या मार्गावर आणून सोडलें होतें. संस्कृत-ग्रंथ छापून ते अल्प किंमतींत वाचकांस उपलब्ध करून देण्याचें धोरण, त्यांनीं आरंभापासून स्वीकारलें होतें.

संस्कृत-भाषेचें नि संस्कृत-ग्रंथ-प्रकाशनाचें महत्त्व ओळखणारी जाणकार विद्वान् मंडळी त्यांच्या सांनिध्यांत वारंवार येऊन त्यांच्या अंगीकृत कार्यांत त्यांना प्रोत्साहन देत होती. एवढेंच नव्हे, तर प्रकाशन-कार्यास शक्य तो हातभारही लावूं लागली होती. त्यांत डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे, रा. ब. शंकर पांडुरंग पंडित, पं. काशिनाथ पांडुरंग परब, रा. ब. नारायण विष्णु बापट, वे. शा. सं. गोविंद शंकरशास्त्री बापट, तसेंच महामहोपाध्याय पं. दुर्गाप्रसाद ह्यांचा प्रामुख्यानें उल्लेख करतां येईल.

जावजीशेठ ह्यांच्यासह त्यांच्या ह्या सर्व सद्विचारी सल्लागारांचें १।२ बाबतींत तर सर्वस्वीं एकमत होतें. लहान मोठे धार्मिक स्वरूपाचेच नव्हे, तर अलंकार, व्याकरण, काव्य, नाटक, वैद्यक, ज्योतिष वगैरे निरनिराळ्या शास्त्रांतील ग्रंथ प्रसिद्ध करून ते अत्यल्प किंमतींत जनतेला उपलब्ध करून द्यावयाचे. सल्लागारांच्या ह्या सल्ल्याचा पाठपुरावा जावजीशेठनीं शेवटपर्यंत झीज सोसून केला.

वाङ्मय-प्रकाशन-क्षेत्रांतील त्यांच्या ह्या उचित औदार्याचा परिचय कुठवर करून द्यावा? आजच्यासारखा सर्वव्यापी नि सर्वभक्षक महागाईचा तो

काळ नव्हता. हें जमेस धरूनही त्या काळांत जावजीशेठच्या निर्णयसागर मुद्रणालयांतून बाहेर पडलेल्या गलेलठ्ठ ग्रंथांच्या अत्यल्प किंमती पाहिल्या, म्हणजे आजच्या काळांत, कोणताही ग्रंथ विकत घेऊन वाचणाऱ्या वाचकाला, आश्चर्याचा धक्का बसल्याशिवाय रहाणार नाहीं!

संस्कृत-वाङ्मयक्षेत्रांतील प्रत्येक दालन सुंदर, सटीक नि संशोधित ग्रंथ-प्रकाशनाच्या रूपानें जावजीशेठनीं शोभविलें आहे. उदाहरणादाखल त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या वैद्यक-शास्त्रांतील एकाद्या ग्रंथाकडे आपण लक्ष पुरवूं या. ह्या शास्त्रांतील ग्रंथ-प्रकाशनामागें मुख्यतः जावजीशेठ ह्यांचे परम स्नेही नि विश्वासू सल्लागार डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे ह्यांची प्रेरणा होती.

वागभटरचित 'अष्टांगहृदय' ह्या ग्रंथाचें आयुर्वेद-शास्त्रांतील स्थान फार महत्त्वाचें आहे. डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे, बी. ए. एम्. डी. हे विद्वान, संशोधक, संस्कृतज्ञ, त्याचप्रमाणें देशी व परदेशी वैद्यकशास्त्राचा डोळसपणें अभ्यास केलेले गृहस्थ होते. त्यांनींच 'अष्टांगहृदय' ह्या ग्रंथाचें अत्यंत परिश्रमपूर्वक संशोधन केलें. त्यासाठीं त्यांनीं घेतलेल्या परिश्रमांचा पाढा आम्ही येथें वाचीत नाहीं. सुपर रॉयल आकाराच्या सुमारें एक हजार पृष्ठांच्या ह्या महाग्रंथाची पहिली आवृत्ति १८८० सालीं प्रसिद्ध झाली. दुसरी आवृत्ति १८९१ सालीं जावजीशेठनींच प्रसिद्ध केली. ती आमच्यासमोर आहे. ती प्रसिद्ध करण्यापूर्वी डॉ. कुंटे ह्यांनीं जावजीशेठ ह्यांच्यापुढें आपली एक अट प्रामुख्यानें ठेविली आणि शेठजींनीं ती आनंदानें मान्य केली.

अशी कोणती ती अट? "ह्या ग्रंथापायीं मला कितीही मेहनत घ्यावी लागली असली तरी कोणाही सर्वसाधारण वाचकाला परवडेल, अशी त्याची किंमत कमींत कमी ठेवण्यांत यावी" अशी आपली इच्छा अण्णा कुंटे यांनीं प्रकट केली.

जावजीशेठ किंवा त्या ग्रंथाचे संशोधक डॉ. अण्णा कुंटे यांनीं असा पोक्त नि सुफलदायी विचार केला नाहीं कीं, 'अष्टांगहृदय' हा एक वैद्यक-शास्त्रावरील महाग्रंथ आहे. त्याचे वाचक ठराविक क्षेत्रांतील असणार. असे जे कोणी वाचक असणार, ते त्या ग्रंथाची किंमत पन्नास रुपये ठेविली, तरी ती देऊन ते तो ग्रंथ विकत घेणारच! मग अल्प किंमत ठेवून ग्रंथाचा दर्जा खालीं उतरा कशाला?

त्या काळांतील प्रकाशन-क्षेत्र अशा घोरणी नि दूरदर्शी विचारांनीं भारावलेलें नव्हतें. हें तत्कालीन वाचकवर्गाचें महद्भाग्य होय! लेखक नि प्रकाशक ह्यांच्याविचारें त्या गलेलठ्ठ नि आयुर्वेद-शास्त्राच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या अशा ग्रंथाची किंमत अवघी आठ रुपये ठेवण्यांत आली.

ह्या ग्रंथाची सहावी आवृत्ति १९३९ सालीं निर्णयसागरतर्फे प्रसिद्ध झाली. सध्यांच्या काळांत ह्या ग्रंथास मागणी असूनही तो दुर्मिळ होऊन राहिला आहे. कारण हा प्रचंड ग्रंथ आज पुनर्मुद्रित करावयाचा, तर त्यांत कमींत कमी तीस पस्तीस हजार रुपये भांडवल गुंतविणें जरूर आहे. आणि सध्यांच्या परिस्थितींत निर्णयसागर तेवढें भांडवल गुंतवूं शकत नाहीं. अशा शास्त्रीय, परंतु लोकोपयोगी ग्रंथाच्या प्रकाशनाकडे सरकारचें तरी लक्ष वळणें जरूर आहे, असें आजच्या परिस्थितींत वाटल्याशिवाय राहात नाहीं.

उदाहरणादाखल 'अष्टांगहृदय' ह्या वैद्यकीय ग्रंथासंबंधानें जी कथा सांगितली, तशीच इतर अनेक शास्त्रांतील अनेक ग्रंथांसंबंधानें सांगतां येण्यासारखी आहे; परंतु त्या कथा सांगणें, हा या प्रकरणाचा मुख्य उद्देश नसून 'काव्य-मालेच्या' जन्माची कथा सांगण्याच्या प्रयत्नांत असतां जावजीशेठ ह्यांचें आरंभापासून हस्तलिखित नि दुर्मिळ ग्रंथांचें मुद्रण नि पुनर्मुद्रण करण्याकडे कसें लक्ष लागून राहिलें होतें, हें सांगण्यासाठीं आम्हांला थोड्या आडवळणानें जावें लागलें.

रा. ब. शंकर पांडुरंग पंडित नि पं. दुर्गाप्रसाद ह्या उभयतांच्या सहकारानें मुंबई सरकारकडून जें संस्कृत ग्रंथांचें प्रकाशन होत असे, तें थांबल्यामुळें तें कुठें ना कुठें सुयोग्य स्थळीं चालू रहावें, असें त्यांना वाटणें साहाजिक होतें. निर्णयसागर-मुद्रणालयाशीं नि जावजी शेठ ह्यांच्याशीं दोघांचेही संबंध जिव्हाळ्याचे तसेच घरोब्याचे होते. दोघांच्याही विद्वत्तेबद्दल जावजीशेठना असीम आदर होता. शिवाय संस्कृत वाङ्मय-प्रकाशन हें तर होतें त्यांचें आवडतें नि भक्तिभावानें भारलेलें कार्यक्षेत्र.

मागें सांगितल्याप्रमाणें पं. दुर्गाप्रसाद ह्यांचा, हस्तलिखित संस्कृत पोथ्या मिळवून तेथून जमा करण्याचा उद्योग सतत चालूच होता. तें तर त्यांचें जीवनव्यापी व्यसन होतें. त्या पोथ्यांचें संपादन करून त्यांचें मुद्रण करावयाचें

तर त्या काळीं जावजीशेठसारखा संस्कृतोपयोगी सुंदर देवनागरी मुद्रिकांनीं सुसंपन्न-व त्याचबरोबर त्यागी मुद्रक भारतांत दुसरा नव्हता.

समर्थपणा अनेकांच्याठायीं संभवूं शकेल; परंतु त्याहीपेक्षां अशा कार्याच्या बाबतीत आवश्यक असलेल्या त्यागाचें काय ?

आणि हा त्याग कशासाठीं ? त्या काळीं बहुधा क्वचितच खपणाऱ्या संस्कृत वाङ्मय-प्रकाशनांत पैसा गुंतवावयाचा आणि तो कोणीं ? ज्यांच्याकडे छपाईच्या कामाची वाण मुळींच नाहीं नि ज्याच्याकडे संस्कृतसाठीं लागणारा सर्वोत्कृष्ट नि स्वयंपूर्ण देवनागरी टाईप आहे, अशा निर्णयसागर-मुद्रणालयानें !

अशा रीतीनें जावजीशेठ मुद्रणक्षेत्रांत जसे समर्थ होते, तसेच संस्कृत वाङ्मय-प्रकाशनासारखें संस्कृतिसंवर्धनाचें व देशकल्याणाचें कार्य पुढें आलें असतां, त्यापुढें आदरपूर्वक वांकून त्यासाठीं वांट्यास येईल तो त्याग करायला ते नेहमीं तयार असत. त्यामुळें संस्कृत पोथ्यांच्या मुद्रणाचा प्रश्न त्यांच्यापुढें आला, तेव्हां त्याला नकार न दर्शवितां त्यांनीं 'त्याबाबतींत जरूर विचार करूं या,' असें आशादायक उत्तर देऊन ते तावडतोब निकटवर्ती मित्रांकडे सल्लामसलतीसाठीं वळले.

जावजीशेठना सल्ला-ममलत घ्यायची होती, ती विशेषतः एकदां जबाबदारी स्वीकारल्यानंतर ती उत्तम प्रकारें व यशस्वी रीतीनें आपणांस पार पाडतां येईल कीं नाहीं, ह्यासंबंधानें. उत्कृष्ट नि नमुनेदार म्हणजे कोणींही नांव ठेवूं नये असें संस्कृत-वाङ्मयाचें मुद्रण करणें, ही गोष्ट त्यांच्या आटोक्यांतील होती; परंतु त्याशिवाय त्यांच्या आवांक्याबाहेरच्या गोष्टी कितीतरी होत्या नि त्या महत्त्वाच्याही होत्या. त्यासंबंधीं त्यांना निर्णय घ्यावयाचा होता.

कोणत्याही क्षेत्रांत पाऊल टाकण्यापूर्वी साधक-बाधक रीतीनें विचार करावयाचा, त्या दृष्टीनें आपल्या नेहमींच्या रिवाजाला अनुसरून जावजीशेठ विचार करूं लागले. त्यांच्यापाशीं विद्वान् शास्त्री-पंडितांचा भरणा भरपूर होता. परंतु प्रत्येक पोथीचें किंवा ग्रंथाचें शास्त्रशुद्ध संशोधन करून त्यावर टीपा देणें व जरूर ते संस्कार करण्यासाठीं योग्य माणसांची निवड करणें जरूर होतें. पं. दुर्गाप्रसाद हे मुख्य संपादक ह्या नात्यानें संस्कृत ग्रंथांच्या संपादनाकडे लक्ष पुरविणार हे निश्चित होतें; परंतु त्याचें सामर्थ्य एकाच जागीं नसे. कधीं जय-

पुरला तर कधीं हस्तलिखितांच्या शोधार्थ देशाच्या कोणत्या ना कोणत्या भागांत असावयाचें. त्यांना मदतनीस ह्या नात्यानें तसाच संस्कृतज्ञ, जाणकार नि त्या वाङ्मयाची आवड असणारा विद्वान् पंडित पाहिजे. त्यांच्याठायीं सोंपविलेली जबाबदारी सांभाळण्याची ताकद पाहिजे.

लोककल्याणकारी असें एकादें कार्य सुरू करण्याची जबाबदारी आपण शिरावर घ्यावी आणि आपल्या सभोंवार पहावें तों काय ? सारें अनुकूल वातावरण ! पं. दुर्गाप्रसाद ह्यांच्याबरोबरीनें नवीन उपक्रमाचे सहकारी संपादक ह्या नात्यानें कोणावर जबाबदारी सोंपवावी; हा प्रश्न महत्त्वाचा होता. रा. ब. शंकर पांडुरंग पंडित ह्यांच्या सल्ल्यानें तो यशस्वी रीतीनें सोडविणें जावजीशेठना शक्य झालें.

पं. काशिनाथ पांडुरंग परब ह्यांचा संस्कृत भाषेचा नि वाङ्मयाचा व्यासंग दांडगा होता. तो त्यांच्या जीवनाचा एक आवडता छंद होता. जावजीशेठ ह्यांचा नि त्यांचा पूर्वपरिचय कार्यकारणपरत्वें होताच; आणि त्यांतही शंकर पांडुरंग पंडित ह्यांच्या शिफारशीची भर पडली.

आणि अशारीतीनें काशिनाथ पांडुरंग परब ह्यांची स्थानिक सहसंपादक ह्या नात्यानें योजना करण्यांत आली. तें महत्त्वाचें स्थान त्यांनीं आयुष्याच्या अखेरीपर्यंत ( १९०४ ) यशस्वी रीतीनें शोभविलें नि सर्वांकडून धन्यवाद मिळविले.

पं. दुर्गाप्रसाद ह्यांनीं परिश्रमपूर्वक मिळविलेलें संस्कृत-साहित्य अपरंपार होतें. तो एक महासागरच होता म्हणाना ! त्या रत्न-भांडारांतून एक एक किंवा जरूर तेवढीं रत्नें निवडून काढावयाचीं नि त्यांना सुंदर पैलू पाडून, तीं संस्कृत वाङ्मयप्रेमी-जनांना नियमितपणें सादर करावयाचीं. वर्षेंच्या वर्षें लोटलीं तरी तें भांडार संपण्यासारखें नव्हतें.

मुद्रक, प्रकाशक नि वाचक ह्या तिन्ही घटकांच्या दृष्टीनें हें भांडार खुलें करण्याचा मार्ग मासिकाच्या रूपानें मोकळा करण्यांत यावा; त्यांत शिस्त, सुंदरपणा नि नियमितपणा असावा व एकदां सुरू केलेल्या कार्यांत सहसा खंड पडूं नये, ह्या हेतूनें केवळ त्याच कार्याला वाहिलेलें ' काव्यमाला ' नांवाचें मासिक सुरू करण्याचा बेत निश्चित करण्यांत आला.

सर्व तयारी पूर्ण झाल्यानंतर १८८६ च्या जानेवारींत काव्यमालेचा पहिला अंक प्रकाशांत आला. तत्पूर्वी मागें सांगितल्याप्रमाणें 'काव्येतिहास-संग्रहानें' अल्प प्रमाणांत कां होईना, आत्यंतिक जाणीवपूर्वक संस्कृतवाङ्मय-प्रकाशन सुरू केलेलें होतें; परंतु 'काव्यमाला' हें मासिक केवळ संस्कृतवाङ्मय-प्रकाशनासच सर्वस्वीं वाहिलेलें नि खंबीर पायावर उभारलेलें होतें.

जावजीशेठ ह्यांनीं सुरू केलेल्या ह्या कल्याणकारी नि उपयुक्त उपक्रमाचें विद्वानांकडून नि नियतकालिकांकडून अंतःकरणपूर्वक कौतुक करण्यांत आलें.

पहिल्या अंकाचा परिचय करून देतांना 'विविधज्ञानविस्तार' ह्या ज्येष्ठ नि श्रेष्ठ मासिकानें म्हटलें होतें कीं:—[१] "काव्यमाला ह्या नांवाचें संस्कृत मासिक पुस्तक जानेवारी १८८६ पासून निर्णयसागरमधून निघूं लागलें आहे. जयपुरच्या महाराजांच्या आश्रयास असलेले पं. दुर्गाप्रसाद नांवाचे विद्वान् नि शोधक गृहस्थ ह्यांजपाशीं प्राचीन व दुर्मिळ संस्कृत ग्रंथांचा मोठा संग्रह आहे. तो त्यांच्या व का. पां. परब यांच्या देखरेखीखालीं छापून प्रसिद्ध करण्याचें काम जावजीशेठनीं पतकरलें आहे. त्यांचा हा उद्योग स्तुत्य नि लोकादरास पात्र आहे. पृष्ठें ९६, वार्षिक वर्गणी ६ रु. आहे. यांतून उत्तम प्राचीन संस्कृत काव्यें, नाटकें, चंपू, भाण, प्रहसनें, छंद, अलंकार इत्यादि यथावकाश प्रसिद्ध होणार आहेत."

पहिल्याच अंकावर ह्यापेक्षां अधिक काय लिहिणार? त्या नवीन उपक्रमाचा सद्भावनापूर्वक परिचय करून देण्यांत आला.

ज्या काळांत जावजीशेठनीं हा धाडसी उपक्रम सुरू केला, तो काळ आपण लक्षांत घेतला पाहिजे. त्या काळांत संस्कृत मासिकाला वाचक नि ग्राहक कितीसे मिळणार? जिकडे तिकडे औदासीन्य पसरलेलें! देश परकीय सत्तेच्या ताब्यांत गेलेला. त्या राजसत्तेकडून उत्तेजन मिळण्याची शक्यता मुळींच नव्हती. राजाश्रय वाटेल तें करूं शकतो; परंतु परकीय राजसत्तेला आमच्या प्राचीन गीर्वाण भाषेचें कोडकौतुक करून तिचा संसार सुरळीत चालू राहील, अशी कांहीं ना कांहीं सोय करावी, असें थोडेंच वाटणार?

आणि सर्वसाधारण जनता? ती त्या काळीं राज्यकर्त्यांच्या इंग्रजी भाषेच्या आहारीं गेलेली! संस्कृत भाषा नि संस्कृत वाङ्मय जगलें काय आणि

१ विविधज्ञानविस्तार. पुस्तक १८ वें, अंक २ रा, फेब्रुवारी १८८६.

दृष्टीआड झालें काय ! त्याची पर्वा, निवडक नि कांहीं तुरळक विद्वानांखेरीज कोणालाही नव्हती !

त्यामुळें झालें काय ? काव्यमालेला नियमित ग्राहक किंवा वर्गणीदार फार थोडे मिळाले ! प्रचाराच्या दृष्टीनें शक्य ते प्रयत्न चालू असतांही आरंभकाळांत वर्गणीदारांचा आंकडा दोनशें ते अडीचशें ह्यापलीकडे जाऊं शकला नाहीं !

जावजीशेठ त्यामुळें निराश झाले नाहींत किंवा गारठूनही गेले नाहींत. कां गारठतील ? पुढेंमागें अशा परिस्थितीला आपणास तोंड द्यावें लागेल, ह्याची त्यांना पूर्ण कल्पना होती.

श्रद्धा ही अमोलिक चीज आहे. संस्कृत–वाङ्मय–प्रकाशन ही त्यांच्या आत्यंतिक श्रद्धेची नि जिव्हाळ्याची बाब होती. तो त्यांचा मानबिंदु होता. संस्कृत–भाषा ही आमचें जीवन–पावित्र्य सांभाळणारी जान्हवी. आम्हीं मानानें जगावें, ह्यासाठीं जरूर तें जीवनामृत पुरविण्याचें सामर्थ्य त्या देवभाषेंत आहे. अशा ह्या भाषेची यथाशक्ति नि परोपरीनें सेवा करण्यांत जीवनसाफल्य आहे, ह्या पवित्र भावनेचा स्पर्श त्यांच्या अंतःकरणाला प्रकाशन–व्यवसायाच्या आरंभापासून झालेला होता.

विद्यार्थ्यांच्या नि सर्वसाधारण जनतेच्या आटोक्यांत संस्कृत वाङ्मय–पुष्पांच्या पुण्यपावन नि सुगंधी पाकळ्या याव्या, ह्या सद्धेतूनें त्यांनीं ह्यापूर्वींच 'संस्कृतपाठावलि' ह्या नांवानें छोटीं छोटीं नि अल्पमोली संस्कृत पुस्तकें नियमितपणें प्रसिद्ध करण्याचा उपक्रम सुरू केलेला होता. त्या बाबतींत त्यांना आलेला आर्थिक अनुभव फारसा उत्तेजनकारक होता, असें म्हणतां येणार नाहीं; परंतु निदान ह्या क्षेत्रांत तरी निराशाजनक अनुभवानें शहाणे होणारे जावजीशेठ नव्हते.

जावजीशेठजींच्या आर्थिक हिताची जपणूक करणारा हितचिंतक-वर्ग त्यांच्याजवळ होता. 'काव्यमाला' मासिक हा आंतबट्टयाचा मामला आहे. तो नुकसानींत वर्षानुवर्षे चालू ठेवून कसें चालेल ? अशा प्रकारचा सवाल जावजीशेठपुढें कोणीं ठेवला असतां त्यांनीं म्हणावें, " ह्या बाबतींत पूर्ण विचार करून मीं पुढें पाऊल टाकलें आहे. 'काव्यमाला', हें माझें आवडतें बालक आहे. त्याला नख लावण्याचें पातक माझ्याकडून कधींही घडणार नाहीं.

संपादक ज्या दिवशीं आपल्याजवळचा संग्रह संपला असें म्हणतील, त्या दिवशीं 'काव्यमाला' बंद करण्याचा विचार करूं!"

परंतु तसा विचार करण्याचा प्रसंग त्यांच्या आयुष्यांत तरी कधींच आला नाहीं.

ह्या 'काव्यमाला' मासिकाचे नियतमितपणें पंधरा अंक वाचकांच्या पदरांत पडल्यानंतर 'विविधज्ञानविस्तार' मासिकाच्या विद्वान व वस्तुस्थितीची बरोबर जाणीव असलेल्या संपादकांना पुनरपि आपल्या कर्तव्याची जाणीव होऊन त्यांनीं ७-८ पानी विस्तृत अभिप्राय प्रसिद्ध केला.[१] तो तत्कालीन परिस्थितीची यथायोग्य कल्पना करून देणारा असल्यामुळें त्यांतील कांहीं भाग येथें उद्धृत करण्याचा मोह झाल्याशिवाय रहात नाहीं. त्या अभिप्रायांत संपादक लिहितात कीं:—

"वर्तमानपत्रें व मासिकें यांच्यावरील आमच्या लोकांचा विश्वास उडाला आहे. कारण अनियमितपणा व एकदम बंद होणें. हा उडालेला विश्वास पुन्हां जाग्यावर आणण्याचा प्रयत्न करणाऱ्यास त्रास सोसावा लागावयाचा. त्यासाठीं घस व झीज कोणीं ना कोणीं सोसलीच पाहिजे. जेव्हां एकादा चांगला मनुष्य हातीं घेतलेला उद्योग सचोटीनें, प्रामाणिकपणें व इमानानें चालवील, तेव्हां त्यास यश येण्याचा व लोकांचा गेलेला विश्वास पुन्हां येण्याचा संभव.

"आमच्या महाराष्ट्रांत हा नष्टप्राय झालेला विश्वास आमचे मित्र जावजी दादाजी ह्यांनीं आपल्या नियमितपणानें, सचोटीनें व प्रामाणिकपणानें गेल्या ५।४ वर्षांत इतका मिळविला आहे कीं, त्यांच्या सहीची, एकादे पुस्तकाविषयींची जाहिरात पाहिली म्हणजे ग्राहक लोक कांहीं एक शंका न घेतां तें पुस्तक घेण्यास तयार होतात. हा प्रकार फार अभिनंदनीय झाला आहे.

"विलायतेंत जशा पुस्तक-प्रकाशन मंडळ्या आहेत व त्या जशा चांगल्या व प्रसिद्ध ग्रंथकारांचीं पुस्तकें विकत घेऊन प्रसिद्ध करतात, तशासारखा कांहीं प्रकार आपले इकडे रा. जावजींनीं सुरू केला आहे. परंतु याविषयीं तूर्त विस्तार न करतां इतकें सांगणें पुरे आहे कीं, हा नवीन प्रकार ग्रंथोत्तेजन व ग्रंथप्रकाशन या दोन गोष्टींस मोठाच हितावह झाला आहे. मराठी व संस्कृत या दोन भाषेंतील जुन्या ग्रंथांचा उद्धार व नवीन ग्रंथांची रचना

१ विविधज्ञानविस्तार: पुस्तक अठरावें. अंक ११ व १२ सन १८८७.

या दोन कार्यांस रा. जावजींकडून पुष्कळच उत्तेजन व साहाय्य मिळतें; म्हणून प्रतिवर्षी या दोन भाषांतील ग्रंथांत पुष्कळ भर पडत चालली आहे. याबद्दल या दोन्हीं भाषांचे भोक्ते व अभिवृद्धीच्छु लोकांनीं रा. जावजींचे फार आभार मानले पाहिजेत. जो उद्योग रा. जावजी हातीं घेतात तो वेळच्यावेळीं व चोख तऱ्हेनें होत असतो. वेळेचें मूल्य व नियमितपणापासून लाभ ह्या दोन्ही गोष्टी रा. जावजी चांगल्या जाणतात असें दिसतें. त्यांनीं अंगावर घेऊन प्रकाशित केलेलीं व त्यांचीं हल्लीं चालू असलेलीं मासिक पुस्तकें कधीं व कशीं निघतात हें पाहिलें, म्हणजे या सर्वांचें प्रत्यंतर मिळतें.

"बालबोध, संस्कृतपाठावलि व काव्यमाला हीं तिन्हीं पुस्तकें निघाल्या दिवसापासून प्रत्येक इंग्रजी महिन्याच्या पहिल्या तारखेस निघत असतात. या नियमास एक वेळही बाध आल्याचें आम्हांस स्मरत नाहीं. आमच्या-इकडील बहुतेक मासिक पुस्तकांच्यासंबंधानें पाहिलें असतां असें आढळेल कीं, ज्या महिन्याचें पुस्तक त्याच महिन्यांत निघालें तर तो केवळ कपिलाषष्ठीचा योग समजावयाचा. ज्या वर्षाचें पुस्तक त्याच वर्षी निघालें तर जेथें महद्भाग्य समजलें जातें, तेथें तारखेच्या तारखेस पुस्तक निघेल तर त्याची कशांत गणना करावी, हें आम्हांस समजत नाहीं. तेव्हां आम्हां महाराष्ट्रीयांस अत्यंत दुर्लभ जो कालपालन योग, तो रा. जावजींस ज्यांच्या सहाय्यानें सुलभ झाला आहे, त्या गृहस्थांचें व जावजींचें आम्ही मोठ्या आनंदानें अभिनंदन करतों."

ह्यापुढें वि. शा. वि. चे संपादक एखादा मासिकाचा अंक वेळच्या वेळीं निघूं शकत नाहीं याला बहुशः कारण संपादक नि लेखक हेच असतात, प्रकाशक किंवा चालक ह्यांचा दोष फार कमी प्रमाणांत असला तर असावयाचा, असें सांगून, ते पुढें लिहितात—"तेव्हां ज्या व्यवस्थापकांच्या सुदैवानें त्यांस संपादकादि सहाय्यक मंडळी सर्वप्रकारें चांगली मिळाली आहे, त्या व्यवस्थापकाचें सप्रेम अभिनंदन करणें हें असा मंगल समय आला असतां प्रत्येकाचें कर्तव्य आहे, असें आम्ही समजतों; म्हणूनच कालपालनाबद्दल प्रत्यक्ष रा. जावजींचें व परंपरया तत्सहाय्यक मंडळींचें आम्ही प्रेमपुरस्सर अभिनंदन करतों.

"रा. जावजी जे उद्योग हातीं घेतात, ते जितक्या उत्कृष्ट तऱ्हेनें सिद्धीस जातील तितक्या तऱ्हेनें सिद्धीस नेण्याकरितां श्रम व पैसा लागेल तितका खर्च

करण्यास कधींही मार्गेपुढें पहात नाहींत. या योगानें त्यांचे सर्व उद्योग नांवाजण्याजोगे होतात. ह्यांनीं छापविलेला अमूक एक ग्रंथ उपांगाच्या न्यूनतेमुळें गचाळ निघाला, असा दोषारोप करण्यास आमच्यामतीं अवसरच नसतो. मूळ अंगांत न्यूनता असल्यास गोष्ट निराळी. पण त्याचा दोष जावजींचा असून इतर कोणाचा तरी असला पाहिजे.

"आतां काव्यमालेचा कागद, छपाई, स्वच्छता व तिच्या विस्ताराच्या मानानें स्वल्प किंमत या गोष्टींविषयीं कोणाला दोष ठेवण्यास जागा नाहीं. या गोष्टी जावजींच्या स्वाधीनच्या, त्याविषयीं सर्वतोमुखीं तारीफच ऐकण्यांत येते. आतां या काव्यमालेंत एकादा अश्लील ग्रंथ गोवलेला आढळला किंवा कांहीं अशुद्धी राहिली तर त्याबद्दलचा दोष जावजींवर येत नसून तो मालाकार व संशोधक यांजकडे येतो. त्या दोषाचे धनी व निर्वाहक हे संग्राहक व संशोधक होत. या दोघां विद्वान् गृहस्थांच्या (पं. दुर्गाप्रसाद व काशीनाथपंत परब) कर्तबगारीबद्दल लवकरच दोन शब्द लिहूं. तूर्त इतकेंच सांगणें आहे कीं, जावजींनीं काव्यमाला ज्या रीतीनें ग्राहकांना आकर्षक होईल, त्या रीतीनें व्यवस्था ठेविली आहे; व त्याबद्दलचे त्यांचे सर्व श्रम सफल झाले आहेत, हें कळविण्यास आम्हांस संतोष वाटतो.

"काव्यमालेसारखें अत्यंत उपयुक्त खरें पण फारच अवजड काम संग्राहक व प्रकाशक या दोघांनीं पतकरून संस्कृत भाषेच्या भोक्त्यांवर व विद्यार्थ्यांवर अपरिमित उपकार केले आहेत, असें म्हटल्यावांचून आमच्यानें रहावत नाहीं. अमूल्य, उपयुक्त व लुप्तप्राय अशा ग्रंथांचा उद्धार करण्याचें अत्यंत श्रेयस्कर कृत्य करण्याची योजना करण्याबद्दल व प्रारंभ करून आज सव्वा वर्ष फार चांगल्या तऱ्हेनें चालविल्याबद्दल ते दोघेही सर्व विद्वान् व गीर्वाणवाणी-रसलोलुप जनांच्या मनःपूर्वक स्तुतीस पात्र झाले आहेत. यांनीं हा आरंभिलेला अत्यंत स्तुत्य उद्योग परिसमाप्तिपर्यंत अखंड व अव्याहत चालो व हा उद्योग आणखी विशेष उत्साहानें चालविण्यास त्या दोघांस प्रोत्साहन अवश्य आहे, तें संस्कृत काव्यरसज्ञ धनिक असल्यास धनानें, नाहीं तर इतर प्रकारें कां होईना, पण भरपूर देवोत, असें आम्ही मनःपूर्वक इच्छितों."

अनेक हेतूंनीं प्रेरित होऊन वि. ज्ञा. वि. मधील हा लांब उतारा देण्याचें धाडस पतकरावें लागत आहे. पाऊणशें-पंचाशीं वर्षांपूर्वीच्या काळांत मराठी

मासिकांची स्थिति सर्वसाधारणपणें कशी होती नि तशा त्या निराशाजनक काळांतही जावजीशेठ आपलें कर्तव्यपालन किती कसोशीनें नि प्रामाणिकपणें करीत होते, ह्याची ह्या अभिप्रायावरून सहज कल्पना करतां येणार आहे.

विद्वान मंडळीकडून अशा रीतीनें जावजीशेठजींना प्रोत्साहन मिळत होतें व ते त्यांच्या उद्योगाचें मनसोक्त कौतुक करीत होते. त्यांना त्या कार्याची भारी कदर वाटत असे. 'विद्वानेव हि जानाति विद्वज्जनपरिश्रमम्'. इतरेजनांस त्याचें काय ?

सर्वसाधारण वाचकवर्ग असो; परंतु त्या काळीं चैनबाजींत व्यसनांत नि निरर्थक नाना छंदांत पैशांचा वाटेल तसा अपव्यय करणाऱ्या आमच्या संस्थानिकांचें, जावजीशेठनीं झीज सोसून चालविलेल्या ह्या सर्वतोपरी उपयुक्त नि कल्याणकारी उपक्रमाकडे लक्ष जायला नको होतें का ? कांहीं संस्थानिकांनीं आपापल्या संस्थानांतील ग्रंथालयांसाठीं प्रतिमासीं काव्यमालेच्या कांहीं ठराविक प्रती घेण्याचें धोरण स्वीकारलें असतें, तरी त्यांच्या शिरावरील आर्थिक भार अंशतः हलका झाला असता.

कसेंही असो; त्या काळांतील बहुसंख्य संस्थानिकांस नि धनिकांस राष्ट्रोपयोगी कार्याची कदर नव्हती, असें म्हणावें लागतें.

'काव्यमाला' तोट्यांत चालवावी लागत असली तरी लोककल्याणाच्या नि देशहिताच्या दृष्टीनें तिचें महत्त्व अपरंपार आहे, ह्याची जावजीशेठ ह्यांस पूर्ण जाणीव होती. त्या जाणिवेचें प्रतिबिंब त्यांचे सुपुत्र तुकारामशेठ ह्यांच्या मनावरही पूर्णपणें उमटलेलें होतें. त्यामुळें वडिलांकडून मिळालेला मालेचा वारसा त्यांनींही पुढें दीर्घकाळ आपल्या खांद्यावर झेलला. मुद्रणाच्या नि वक्तशीरपणाच्या दृष्टीनें त्यांनीं कधींही उणीव भासूं दिली नाहीं.

आरंभकाळांत ह्या मासिकास पं. दुर्गाप्रसाद नि काशिनाथ पांडुरंग परब हे संपादकद्वय लाभले; त्यानंतर पं. शिवदत्त शर्मा ह्यानीं कांहीं काळ ती जबाबदारी स्वीकारली. नंतरच्या काळांत पं. दुर्गाप्रसाद ह्यांच्या हाताखालीं नि त्यांच्या नजरेखालीं शिक्षण संपादून तयार झालेले त्यांचे चिरंजीव पं. केदारनाथ हे संपादकीय जबाबदारी स्वीकारण्यासाठीं मोठ्या हौसेनें पुढें आले. स्थानिक

संपादक ह्या नात्यानें त्यांना सहकार देण्यासाठीं वे. शा. सं. वासुदेव लक्ष्मणशास्त्री पणशीकर ह्यांची योजना करण्यांत आली नि ती दीर्घकाळ सुफलदायी ठरली.

'काव्यमाला' म्हणजे ज्ञात नि अज्ञात विविध कवींच्या नि विविध स्वरूपाच्या काव्यांना जन्म देणारी कामधेनूच होती. ह्या कामधेनूनें संस्कृत साहित्यांत अभूतपूर्व नि बहुमोलाची भर घातली आहे.

हें मासिक नियमितपणें दीर्घकाळ व सुंदर रीतीनें चालवून निर्णयसागरचें समाधान झालें नाहीं. ह्या मासिकामुळें जें संस्कृत वाङ्मय प्रकाशांत आलें, त्यांतील विशेष महत्त्वाच्या नि ज्याला शाश्वत मूल्य आहे अशा वाङ्मयाचें स्वतंत्र ग्रंथांच्या रूपानें पुनर्मुद्रण करण्यांत आलें. असे एकामागून एक पंचाण्णव ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत आले. त्यांपैकीं कित्येकांच्या दोन दोन नि तीन तीन आवृत्त्या निघूनही आज त्यांपैकीं बहुसंख्य ग्रंथ दुर्मिळ झाले आहेत.

काव्यमाला-ग्रंथमालेंतील शेवटच्या (९५ व्या) ग्रंथाचें नांव 'उज्ज्वल-नीलमणि' (श्रीमद्रूपगोस्वामिविरचित) हें असून त्याचीं पानें सहाशें आठ आहेत. त्याची पहिली आवृत्ति १९१३ सालीं नि दुसरी आवृत्ति १९३२ सालीं प्रसिद्ध झाली. पहिल्या आवृत्तीच्या वेळीं किंमत ३ रु. होती, तर दुसऱ्या आवृत्तीच्यावेळीं किंमत दुप्पट करण्यांत आली.

काव्यमालेंतून असंख्य ग्रंथांची निर्मिती झाली, त्याचप्रमाणें मालेंतून जीं छोटीं छोटीं असंख्य काव्यें, स्तोत्रें वगैरे प्रसिद्ध झालीं, त्यांचे गुच्छक तयार करण्यांत आले. नाना प्रकारच्या रंगीबेरंगी, सुगंधी, बिनसुगंधी पुष्पांचा गुच्छक बनविण्यांत आला, तर तो किती सुंदर दिसतो नाहीं का? तसेंच काव्यमालेंतून निवड करून बांधण्यांत आलेले हे रंगीबेरंगी गुच्छक. प्रत्येक गुच्छकांत १०।१२ विविध ढंगी काव्यांचा समावेश करण्यांत आला आहे. असे एकंदर गुच्छक चौदा प्रसिद्ध झाले. त्यांच्याही अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या.

हे स्वतंत्र ग्रंथ नि गुच्छक ग्रंथालयांतून कुठें कुठें पहायला मिळतात. परंतु 'काव्यमाला' मासिकाचे, विशेषतः अखेरच्या वर्षाचे अंक अनेक ठिकाणीं तपास करूनही उपलब्ध झाले नाहींत. त्यामुळें 'काव्यमाला' मासिक कोणत्या वर्षी नि नक्की कोणत्या कारणांमुळें बंद पडलें, ह्याचा बरोबर बोध होऊं शकला नाहीं.

सन १९१६ पर्यंत 'काव्यमाला' कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत अस्तित्वांत असावी, असा आमचा केवळ अंदाज आहे.

संस्कृत-ग्रंथ-प्रकाशन हें निर्णयसागर मुद्रणालयाचें खास वैशिष्ट्य होय. ह्या मुद्रणालयाची ही वंदनीय कामगिरी मुद्रणालयांच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखी आहे.

निरनिराळ्या शास्त्रांतील उपयुक्त संस्कृत–वाङ्मय सुंदर देवनागरी टाईपांत सुव्यवस्थित नि सुसंशोधित रीतीनें मुद्रित करून ठेवणें, ही साधी का कामगिरी आहे? चालू काळांत नाहींच; परंतु भावी काळांतही त्यापासून लाभ होण्याची आशा बाळगणें व्यर्थ होतें. मात्र त्यामुळें लाभ होणार होता भावी काळांतील अनेक पिढ्यांचा. जावजीशेठनीं नि त्यांच्या पुत्रांनीं हें बरोबर टेहळलें. हा आपल्या राष्ट्राचा बहुमोल खजिना आहे. त्याची जपणूक कोणीं ना कोणीं करण्याची जबाबदारी स्वीकारली पाहिजे. ह्या देशकल्याणाच्या नि संस्कृतिसंवर्धनाच्या कार्यांत कितीही त्याग करावा लागला तरी तो करणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे, ह्या जाणिवेनें मुद्रणालयाचे चालक वागले.

सर्व शास्त्रांतील संस्कृत–वाङ्मयाचें शुद्ध, सुंदर नि संशोधित स्वरूपांत प्रकाशन करण्यासाठीं जीं जीं साधनें नि विद्वान माणसें जवळ करणें जरूर होतें, तीं तीं साधनें नि माणसें कितीही आर्थिक भार सोसावा लागला, तरी त्याची तमा न बाळगतां जवळ करण्याची ती जबाबदारी चालकांनीं शिरोधार्य मानली. त्यामुळें केवळ भारतांतीलच नव्हे, तर जगांतील सर्व प्रमुख ग्रंथालयांतून निर्णयसागर–मुद्रित संस्कृत–ग्रंथ मानाचें स्थान पटकावून राहिले आहेत. विद्वानांची नि संशोधन-कार्यांत गुंतलेल्या शास्त्री–पंडितांची त्यामुळें केवढी सोय झालेली आहे!

जावजीशेठ ह्यांनीं ह्या महत्तम कार्याचा खंबीर पाया घालून नि त्यावर टोलेजंग इमारत उभारून, त्या इमारतींतील प्रत्येक दालन सुंदर संस्कृत ग्रंथांनीं सजविलें आहे. केवढी ही त्यांची सांस्कृतिक महत्त्वाची कामगिरी! हीं दालनें पहात फिरत असतां तुम्हांला वेदग्रंथ, कर्मकांडग्रंथ, पुराण नि इतिहासग्रंथ, धर्मशास्त्र, न्यायशास्त्र, मीमांसाशास्त्र, व्याकरण, काव्य, नाटक, छंद, कोश,

चंपू, भाण, अलंकार, वैद्यक, ज्योतिष, स्तोत्र वगैरे किती दालनें पहाल? आणि प्रत्येक दालन कसें सुंदर, सुशोभित नि आकर्षक!

प्रत्येक ग्रंथ केवळ सुंदरच नव्हे, तर तो शुद्ध स्वरूपांत प्रसिद्ध झाला पाहिजे, हा नियम ह्या मुद्रणालयांत अत्यंत कटाक्षानें पालन केला जात असे. प्रत्येक ग्रंथ अनेक शास्त्रीपंडितांच्या नजरेखालून गेल्यानंतर तो प्रकाशांत येत असे. एवढ्यानें जावजीशेठ ह्यांचें संपूर्ण समाधान होत नसे. मुंबईंत नि मुंबईबाहेर त्यांनीं अनेक विद्वान शास्त्री-पंडित कायमचे जोडून ठेविले होते. ग्रंथ छापून तयार होतांच त्याची एकेक प्रत संस्कृतज्ञ विद्वानांकडे स्मरणपूर्वक पाठविण्यांत येत असे. असें करण्यांत त्यांचा एक सद्धेतु असे. त्या ग्रंथांत कोणत्याही प्रकारच्या चुका किंवा उणीवा आढळून आल्यास, त्या त्यांनीं कृपा करून कळवाव्यात. अशा उणीवा आढळून आल्यास दुसऱ्या आवृत्तींत त्यांचा अगत्यपूर्वक जरूर तो समाचार घेतला जात असे.

संस्कृत-ग्रंथ-प्रकाशन कार्याला जावजीशेठनी नि त्यांच्या निर्णयसागर--मुद्रणालयानें अशारीतीनें वाहून घेतलें होतें. ह्या कार्याचा व्याप किती प्रचंड होता! त्याशिवाय इतर अनेक व्याप जावजीशेठना सांभाळायचे होते; परंतु संस्कृत--ग्रंथ--प्रकाशन हा त्यांचा सर्वांत जिव्हाळ्याचा व्याप होता.

संस्कृत-ग्रंथ हे देवमार्गेत रचना केलेले. ज्याला देवाची प्राप्ति करून घ्यायची आहे, त्याला सुयोग्य मार्गदर्शन करणारे हे ग्रंथ आहेत. त्या ग्रंथांच्या पठणानें प्रत्येक माणसाला धर्म, अर्थ, काम नि मोक्ष कशारीतीनें प्राप्त करून घ्यावा, विशेषतः मानवी जीवनांत सर्वांत महत्त्वाचा जो 'धर्म' तो कसा साधावा नि आचरावा, ह्याचें सम्यक् ज्ञान होतें, अशी जावजीशेठ ह्यांची दृढ श्रद्धा होती. त्या त्यांच्या श्रद्धेचें वर्णन कुठवर करावें? तीच त्यांच्याकडून हें प्रकाशन--कार्य बिनबोभाटपणें करवून घेत होती.

हें सर्व ठीक आहे. ह्याबरोबर दुसरी एक बाजू लक्षांत घेण्यासारखी आहे. ती जावजीशेठ ह्यांच्या लक्षांत आरंभापासून आलेली होती. कोणती ती महत्त्वाची गोष्ट? त्या काळीं काय, किंवा आज काय, संस्कृत ग्रंथांचें पठण करून त्यापासून जरूर तो लाभ करून घेणारीं माणसें फार थोडीं! बहुसंख्य लोक

संस्कृत ग्रंथ न वाचणारे नि न समजणारे. मग त्यांना धर्माचरणाचें नि नीतिनियमानें वागण्याचें मर्म कसें समजणार? त्यांनाही आपल्या जीवनांत धर्मपरायणता नको का आणतां यायला?

प्रत्येक व्यक्तीनें आपल्या जीवनांत धर्माचरण नि नैतिक आचरण ह्यांना महत्त्वाचें स्थान दिलें पाहिजे. त्याशिवाय त्याचा उद्धार होणार नाहीं. आणि देशाचा उद्धार तरी काय? व्यक्तिमात्राच्या उद्धारावरच अवलंबून आहे.

आरंभापासून अशा प्रकारच्या विचारसरणीनें जावजीशेठ भारले गेलेले होते. तीच भावना त्यांना कार्यप्रवृत्त करीत होती नि त्यांना वांट्यास येईल तो त्याग आनंदानें करायला लावीत होती.

त्यामुळें धर्म नि नीति ह्यांना प्राधान्य देणारे नाना प्रकारचे संस्कृत ग्रंथ प्रकाशांत आणून जावजीशेठ ह्यांचें समाधान झालें नाहीं. महत्त्वाच्या नि ज्यांत स्वधर्माचरणाची माहिती करून देण्यांत आलेली आहे, अशा संस्कृत ग्रंथांचीं मराठी भाषेत योग्य विद्वान माणसांकडून भाषांतरें करवून घेऊन तीं प्रसिद्ध करणें, हेंही आपलें एक पवित्र कर्तव्य आहे नि तें बहुजनसमाजाच्या कल्याणाचें आहे, असें त्यांनीं मनापासून मानिलें नि तदनुरूप आचरणही केलें.

अशारीतीनें धर्मसिंधु, निर्णयसिंधु, गरुडपुराण, शूद्रकमलाकर, अशौचनिर्णय, वगैरे अनेक संस्कृत ग्रंथ विद्वानांकडून मराठींत भाषांतर करवून घेऊन त्यांनीं प्रसिद्ध केले.

'धर्मसिंधु' १८७४ सालीं तीन भागांत नि 'शूद्रकमलाकर' अथवा 'शूद्र-धर्मतत्त्वप्रकाश' १८८० सालीं प्रसिद्ध करण्यांत आला. हे ग्रंथ आज दुर्मिळ झाले आहेत. दोन्ही ग्रंथांच्या मूळ आवृत्त्यांत जावजीशेठ ह्यांनीं, अशा प्रकारचे धार्मिक ग्रंथ मेहनतपूर्वक प्रसिद्ध करण्यांत आपला कोणता हेतु होता, ह्यासंबंधीं स्पष्टीकरण केलें आहे.

ह्यावरून ग्रंथप्रकाशनाच्या बाबतींत जावजीशेठ ह्यांची दृष्टि किती दूरगामी नि सर्वव्यापी होती, ह्याची सहज कल्पना करतां येणार आहे.

जावजीशेठ ह्यांनीं ७५।८० वर्षांपूर्वीच्या त्या निरुत्साही व शाश्वत लोककल्याणाची दृष्टी नसलेल्या काळांत सुंदर देवनागरी टाईपांत काळजीपूर्वक संशोधन घेतलेलें अप्रकाशित नि दुर्मिळ होऊन राहिलेलें संस्कृत वाङ्मय

प्रकाशांत आणण्यांत जी दूरदृष्टि प्रकट केली नि त्यासाठीं जो त्याग केला, त्याची महती कोणत्या शब्दांनीं गावी हेंच समजत नाहीं.

संस्कृत भाषेच्या नि इतर देशी भाषांच्या वैभवश्रीच्या काळांत आज सुदैवानें आपण वावरत आहोंत. आज संस्कृत भाषेची महती परोपरीनें गायिली जात आहे. संस्कृत–भाषा हें आमचें मूलधन आहे, एवढेंच नव्हे, तर आमच्या कल्याणाची सर्व परीनें चिंता वहाणारी ती आमची माता; तिला कुठें ठेवूं आणि कुठें नको, असें आज आमच्या असंख्य संस्कृत भाषाभिमान्यांस सार्थतेनें वाटत आहे.

पं. जवाहरलाल नेहरू ह्यांनीं संस्कृत भाषेच्या महत्त्वासंबंधीं काढलेले पुढील उद्गार सार्थ नाहींत असें कोण म्हणेल ?

"If I was asked what is the greatest treasure which India possesses and what is her finest heritage, I would answer unhesitatingly, it is the Sanskrit language and literature and all that it contains. This is a magnificent inheritance and so long as this endures and influences the life of our people, the basic genious of India would continue."

अशावेळीं अत्यंत विपरीत काळांत निरनिराळ्या दालनांत अस्ताव्यस्त विखुरलेलें नि काळाच्या भक्ष्यस्थानीं पडून जें नामशेष झालें असतें, असें संस्कृत–वाङ्मय सुंदर रीतीनें मुद्रित करून त्याच्या सुरक्षणाची जी तरतूद केली, त्याबद्दल निर्णयसागर–मुद्रणालय नि जावजीशेठ ह्यांच्यासंबंधीं आजच्या नि उद्यांच्या काळांतील संस्कृतज्ञ विद्वानांस त्यांच्याबद्दल अपरंपार कृतज्ञता नि कमालीचा आदरभाव वाटत असला, तर त्यांत नवल कसलें ?

जावजीशेठ नि निर्णयसागर–मुद्रणालय ह्यांच्याकडून पार पडलेली ही मानव जातीच्या शाश्वत कल्याणाची अविस्मरणीय कामगिरी आहे. सुंदर देवनागरी टाईपांत सुंदरीतीनें छापून प्रकाशित केलेल्या संस्कृत वाङ्मयाबद्दल केवळ भारतांतीलच नव्हे, तर जगांतील विद्वान पंडितांनीं निर्णयसागर नि त्याचे संस्थापक आणि चालक ह्यांच्यावर स्तुति-सुमनांचा वर्षाव केला आहे.

. ह्यासंबंधीं येथें थोडीशी कल्पना करून दिल्यास ती अस्थानीं होणार नाहीं, अशी आशा आहे. ह्या क्षेत्रांतील निर्णयसागरच्या अभिनंदनीय कामगिरीचें महाराष्ट्रीय विद्वानांस नि पंडितांस महत्त्व वाटावें हें ठीक आहे; परंतु बंगाल, मद्राससारख्या परप्रांतीय श्रेष्ठ विद्वान् पंडितांनीं निर्णयसागरचे नि त्याचे संस्थापक जावजीशेठ ह्यांचे मुक्तकंठानें गोडवे गावे, हें वैशिष्ट्यपूर्ण आहे.

मद्रास विश्वविद्यालयाशीं निकट संबंध असलेले विद्वान नि संस्कृत पंडित डॉ. व्ही. राघवन् ह्यांचें भारतीय प्राच्यविद्या-क्षेत्रांतील स्थान फार महत्त्वाचें आहे. त्यांनीं भारतीय प्राच्य–विद्यापरिषदेचे अध्यक्ष ह्या नात्यानें व ज्या ज्या वेळीं संधी मिळाली त्या त्या वेळीं, निर्णयसागर-मुद्रणालयानें नि त्याच्या चालकांनीं आत्यंतिक त्यागपूर्वक संस्कृत वाङ्मयाचें प्रकाशन करून जी अभिनंदनीय नि अतुलनीय कामगिरी पार पाडिली, त्याबद्दल त्यांना हार्दिक धन्यवाद दिले आहेत. त्यांनीं म्हटलें आहे कीं:–"गेल्या शंभर वर्षांच्या काळांत संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास जो उत्तरोत्तर वाढत गेला नि त्या अभ्यासाची उत्तमप्रकारें शोध झाली, ह्याला मुख्यतः कारण निर्णयसागरमधून प्रकाशांत आलेलें निरनिराळ्या शास्त्रांतील विपुल संस्कृत-वाङ्मयच होय. त्या मुद्रणालयाची ही कामगिरी अविस्मरणीय आहे."

जागतिक ख्यातीचे कलकत्ता येथील दुसरे थोर संस्कृत पंडित डॉ. सुनीति-कुमार चतर्जी ह्यांनींही १९६५ सालीं पुणें येथील डेक्कन कॉलेजांत जीं व्याख्यानें दिलीं, त्यांत त्यांनीं निर्णयसागरच्या संस्कृत-वाङ्मय-प्रकाशनाबद्दल नि विशेषतः त्यांनीं संस्कृतोपयोगी देवनागरी लिपीच्या क्षेत्रांत जी चिरस्मरणीय नि महत्त्वपूर्ण कामगिरी पार पाडली आहे, त्याबद्दल गौरवोद्गार काढले आहेत.

जावजीशेठ नि निर्णयसागर मुद्राणालयाकडून संस्कृत-वाङ्मय-प्रकाशन क्षेत्रांत गेल्या शंभर वर्षांत जें असामान्य स्वरूपाचें कार्य पार पडलें, त्याबद्दल महाराष्ट्रीय विद्वान् पंडितांकडून नेहमींच गौरवाचे नि कृतज्ञतेचे उद्गार ऐकूं येत असतात. आमच्या विशेष परिचयाचे थोर संस्कृत पंडित गुरुवर्य प्रा. डॉ. ह. दा. वेलणकर एम्. ए. ह्यांनीं ह्या बाबतींत आमच्याशीं बोलतांना जे प्रशंसोद्गार काढले, त्यांचाही येथें उल्लेख करणें जरूर आहे. ते म्हणतात:–"संस्कृत ग्रंथ-प्रकाशनाच्या क्षेत्रांत शेठ जावजी दादाजी ह्यांनीं जें प्रचंड कार्य पार पाडिलें, तें सामान्य माणसाकडून कधींच झालें नसतें. तथापि संस्कृत भाषेबद्दल जाज्वल्य अभिमान,

आर्थिक झीज सोसण्याची तयारी व शास्त्री-पंडितांबद्दल पूज्यबुद्धि ह्या तीन गोष्टींच्या त्रिवेणी संगमामुळें जावजीशेठनीं पूर्वींच्या कीर्तिकाम राजापेक्षांही श्रेष्ठ दर्जाची अशी संस्कृत भाषेची नि वाङ्मयाची केलेली निरपेक्ष सेवा श्रीसरस्वति देवीच्या दरबारीं निरंतर दाखल झाली आहे, ह्यांत शंका नाहीं. त्यांतही अत्यंत सुंदर वळणाच्या मोहक टाईपांत छापलेल्या नि निर्णयसागर छापखान्यांतून प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांबद्दल गुणग्राहक वाचकांस फारच आदर नि आत्मीयता वाटते व त्याच्या लाभानें सुगंधयुक्त सुवर्णपुष्पांच्या प्राप्तीचा आनंद होतो, असें म्हणण्यांत मला तरी अतिशयोक्ति वाटत नाहीं."

भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंडळ ( भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणें ) ह्या संस्थेतर्फे प्रकाशित झालेल्या 'महाभारत' ह्या महाग्रंथाचे एक प्रमुख संपादक, संशोधक नि संस्कृत पंडित डॉ. पी. एल्. वैद्य ह्यांच्याशीं निर्णयसागर नि शेठ जावजी दादाजी ह्यांच्या संस्कृत-ग्रंथ-प्रकाशन कार्यासंबंधीं आम्ही बोलत असतां त्यांनीं जे धन्योद्गार काढले, त्यांचाही येथें ओझरता उल्लेख करणें अनाठायीं होणार नाहीं. त्यांच्या बोलण्याचा थोडक्यांत मथितार्थ हाच कीं, "संस्कृत ग्रंथांचें प्रकाशन करतांना जावजीशेठनीं खपाचा किंवा त्यांत घातलेले पैसे वसूल होतील कीं नाहीं ह्याचा, बिलकूल विचार केला नाहीं. त्यांनीं असंख्य बहुमोल संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. त्या कार्याच्या महत्त्वाचें बरोबर मोजमाप करणें फार कठीण आहे. त्यांचें तें कार्य असामान्य कोटींतील आहे, असें म्हणतां येईल.

"वैद्यकशास्त्रावरील 'अष्टांगहृदय' ह्यासारखा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ केवळ लोकोपकारार्थ छापून तो अल्प किंमतींत देण्याची व्यवस्था केली. त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या अशा किती संस्कृत ग्रंथांचें वर्णन करावें ?

"ज्यांत विस्कळीतपणा मुळींच नाहीं, जो सुसंघटित, सुंदर नि सुवाच्य आहे, तसेंच संस्कृत ग्रंथांसाठीं जसा हवा तसा देवनागरी टाईप निर्माण करून, जावजीशेठनीं संस्कृत भाषेचें वैभव वाढविलें आहे.

"निर्णयसागर-मुद्रणालयानें तत्कालीन, आजच्या नि भावी काळांतील विद्वानांवर नि संशोधकांवर महदुपकार करून ठेविले आहेत. त्या महत्तम कार्यासाठीं त्यांनीं केलेल्या त्यागास इतरत्र तोड मांपडणें कठीण आहे, असें मला वाटतें."

मनानें पवित्र मानलेल्या ह्या कार्याचा पाठपुरावा जावजीशेठनीं आयुष्याच्या अखेरीपर्यंत केला. आणि त्यानंतर त्यांचे चिरंजीव तुकारामशेठ नि पांडुरंगशेठ ह्यांनींही ती परंपरा त्याच भावनेनें आयुष्यभर चालविली. अनेक दुर्मिळ संस्कृत ग्रंथांचें पुनर्मुद्रण केलें नि नवीन ग्रंथही प्रकाशांत आणिले.

येथें एकच ठळक उदाहरण नमूद करावेंसें वाटतें. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचे एक आद्य प्रवर्तक नि राजाराम कॉलेजचे माजी प्राध्यापक प्रो. विष्णु गोविंद विजापुरकर एम्. ए. ह्यांनीं 'ऋक्-संग्रह', अर्थात् वेदिक स्तोत्रें (सायनाचार्यांच्या टीकेसह) हा ग्रंथ विश्वविद्यालयांत विद्यार्थ्यांसाठीं मेहनतपूर्वक तयार केला. त्याला प्रकाशक कोण गांठावा, ह्या विचारांत असतां त्यांना सहाजिकपणें *निर्णयसागर-मुद्रणालयाची आठवण झाली. ही १८९५ सालची घटना.* जावजीशेठ त्यावेळीं हयात नव्हते. तुकारामशेठ ह्यांनीं त्या ग्रंथाच्या प्रकाशनासंबंधीं सर्व जबाबदारी स्वीकारली व प्रो. विजापूरकर ह्यांचें संपूर्णतया समाधान केलें. हें समाधान त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत प्रकट केलें आहे. तें प्रकट करून ते पुढें म्हणतातः—"तात्काळ आर्थिक फायदा होण्याची कांहीं आशा नसतांही निर्णयसागर-मुद्रणालयानें हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याची जबाबदारी स्वीकारली. निदान ह्या इलाख्यांत तरी तशा रीतीनें जबाबदारी स्वीकारणारें हेंच एक मुद्रणालय आहे."

"My thanks are particularly due to the proprietors of the *Nirnaya Sagar Press*, who alone, in this presidency could have undertaken the publication of this work, without any immediate prospects of pecuniary gain."

सध्यां आपण स्वातंत्र्याच्या काळांत वावरत असल्यामुळें संस्कृत भाषेला वैभवश्रीचे दिवस प्राप्त झाले आहेत; परंतु ज्या काळांत त्या भाषेला आजच्यासारखें *बहुमानाचें स्थान नव्हतें, त्या काळांत निर्णयसागर-मुद्रणालयानें नि* त्याच्या चालकांनीं तिचें महत्त्व ओळखून तिची जी निरपेक्ष सेवा केली, ती सदैव संस्मरणीय नि अभिनंदनीय होऊन राहील.

६

# संत–वाङ्मय–प्रकाशनाचा पूर्वेतिहास

शेठ जावजी दादाजी ह्यांनीं 'काव्यसंग्रह' मासिकाच्याद्वारें प्राचीन संत-वाङ्मयाचें मुद्रण, पुनर्मुद्रण, प्रकाशन नि वितरण ह्या कार्यासाठीं झीज सोसून व नफ्यातोट्याकडे न पहातां जी संत-वाङ्मय-सेवा नि राष्ट्र-सेवा केली, तिचा परिचय करून देण्यापूर्वी 'काव्यसंग्रह' प्रकाशन-पूर्वकाळांत महाराष्ट्रांत प्राचीन संत-वाङ्मय-प्रकाशनाच्या दृष्टीनें कोणीं कोणीं पुढाकार घेऊन यथाशक्ति प्रयत्न केले, त्याचा थोडासा आढावा घेतल्यास तो पुढील कार्यास पोषक ठरणारा आहे.

संत म्हणजे सत्पुरुष. त्यांची गणना देवकोटींत करावयाची. जनता सन्मार्गाकडे वळावी, जनतेंत माणुसकी निर्माण व्हावी नि तिनें आपल्या कर्तव्यास जागून, जन्मा आलियाचें सार्थक करून घ्यावें, ह्यासाठीं तर संतांचा जन्म. त्यांनीं जनतेच्या मार्गदर्शनासाठीं नि भगवंताला भक्तिभावानें आळविण्याच्या हेतूनें विविध स्वरूपाच्या काव्याच्या रूपानें जी वाङ्मय-निर्मित्ती केली, ती बहुमोलाची आहे. तिचें यथायोग्य मोलच करतां येणार नाहीं. मुकुंदराय-ज्ञानदेवांपासून तों तुकाराम-रामदासांपर्यंत, एवढेंच नव्हे तर ह. भ. प. कै. दासगणूपर्यंत महाराष्ट्रांत अनेक संत होऊन गेले. त्यांनीं आपल्या काळांत जनता-उद्धाराचें कार्य पार पाडलेंच, परंतु आपल्या मागाहून ज्या पिढ्या जन्माला येतील, त्यांनाही मार्गदर्शन व्हावें, ह्या हेतूनें त्यांनीं काव्यसंपदेचीं अगणित भांडारें निर्माण करून ठेविलीं. त्यांत त्यांचा कोणताही स्वार्थ नव्हता. त्यांना नांवाचा किंवा पैशांचा बिलकूल

मनानें पवित्र मानलेल्या ह्या कार्याचा पाठपुरावा जावजीशेठनीं आयुष्याच्या अखेरीपर्यंत केला. आणि त्यानंतर त्यांचे चिरंजीव तुकारामशेठ नि पांडुरंगशेठ ह्यांनींही ती परंपरा त्याच भावनेनें आयुष्यभर चालविली. अनेक दुर्मिळ संस्कृत ग्रंथांचें पुनर्मुद्रण केलें नि नवीन ग्रंथही प्रकाशांत आणिले.

येथें एकच ठळक उदाहरण नमूद करावेंसें वाटतें. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचे एक आद्य प्रवर्तक नि राजाराम कॉलेजचे माजी प्राध्यापक प्रो. विष्णु गोविंद विजापुरकर एम्. ए. ह्यांनीं 'ऋक्-संग्रह', अर्थात् वेदिक स्तोत्रें (सायनाचार्यांच्या टीकेसह) हा ग्रंथ विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठीं मेहनतपूर्वक तयार केला. त्याला प्रकाशक कोण गांठावा, ह्या विचारांत असतां त्यांना सहाजिकपणें निर्णयसागर-मुद्रणालयाची आठवण झाली. ही १८९५ सालची घटना. जावजीशेठ त्यावेळीं हयात नव्हते. तुकारामशेठ ह्यांनीं त्या ग्रंथाच्या प्रकाशनासंबंधीं सर्व जबाबदारी स्वीकारली व प्रो. विजापूरकर ह्यांचें संपूर्णतया समाधान केलें. हें समाधान त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत प्रकट केलें आहे. तें प्रकट करून ते पुढें म्हणतात:—"तात्काळ आर्थिक फायदा होण्याची कांहीं आशा नसतांही *निर्णयसागर-मुद्रणालयानें हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याची* जबाबदारी स्वीकारली. निदान ह्या इलाख्यांत तरी तशा रीतीनें जबाबदारी स्वीकारणारें हेंच एक मुद्रणालय आहे."

"My thanks are particularly due to the proprietors of the Nirnaya Sagar Press, who alone, in this presidency could have undertaken the publication of this work, without any immediate prospects of pecuniary gain."

सध्यां आपण स्वातंत्र्याच्या काळांत वावरत असल्यामुळें संस्कृत भाषेला वैभवश्रीचे दिवस प्राप्त झाले आहेत; परंतु ज्या काळांत त्या भाषेला आजच्यासारखें बहुमानाचें स्थान नव्हतें, त्या काळांत निर्णयसागर-मुद्रणालयानें नि त्याच्या चालकांनीं तिचें महत्त्व ओळखून तिची जी निरपेक्ष सेवा केली, ती सदैव संस्मरणीय नि अभिनंदनीय होऊन राहील.

६

# संत–वाङ्मय–प्रकाशनाचा पूर्वेतिहास

शेठ जावजी दादाजी ह्यांनीं 'काव्यसंग्रह' मासिकाव्दारें प्राचीन संत-वाङ्मयाचें मुद्रण, पुनर्मुद्रण, प्रकाशन नि वितरण ह्या कार्यासाठीं झीज सोसून व नफ्यातोट्याकडे न पहातां जी संत-वाङ्मय-सेवा नि राष्ट्र-सेवा केली, तिचा परिचय करून देण्यापूर्वी 'काव्यसंग्रह' प्रकाशन-पूर्वकाळांत महाराष्ट्रांत प्राचीन संत-वाङ्मय-प्रकाशनाच्या दृष्टीनें कोणीं कोणीं पुढाकार घेऊन यथाशक्ति प्रयत्न केले, त्याचा थोडासा आढावा घेतल्यास तो पुढील कार्यास पोषक ठरणारा आहे.

संत म्हणजे सत्पुरुष. त्यांची गणना देवकोटींत करावयाची. जनता सन्मार्गाकडे वळावी, जनतेंत माणुसकी निर्माण व्हावी नि तिनें आपल्या कर्तव्यास जागून, जन्मा आलियाचें सार्थक करून घ्यावें, ह्यासाठीं तर संतांचा जन्म. त्यांनीं जनतेच्या मार्गदर्शनासाठीं नि भगवंताला भक्तिभावानें आळविण्याच्या हेतूनें विविध स्वरूपाच्या काव्याच्या रूपानें जी वाङ्मय-निर्मिती केली, ती बहुमोलाची आहे. तिचें यथायोग्य मोलच करतां येणार नाहीं. मुकुंदराय-ज्ञानदेवांपासून तों तुकाराम-रामदासांपर्यंत, एवढेंच नव्हे तर ह. भ. प. कै. दासगणूपर्यंत महाराष्ट्रांत अनेक संत होऊन गेले. त्यांनीं आपल्या काळांत जनता-उद्धाराचें कार्य पार पाडलेंच, परंतु आपल्या मागाहून ज्या पिढ्या जन्माला येतील, त्यांनाही मार्गदर्शन व्हावें, ह्या हेतूनें त्यांनीं काव्यसंपदेचीं अगणित भांडारें निर्माण करून ठेविलीं. त्यांत त्यांचा कोणताही स्वार्थ नव्हता. त्यांना नांवाचा किंवा पैशांचा बिलकूल

इच्यास नव्हता. लोक-कल्याण साधावें नि जनता सन्मार्गास लागावी, हीच त्यांच एकमेव इच्छा होती.

ही वाङ्मय-संपदा गांवोगांवीं नि घराघरांतून हस्तलिखित स्वरूपांत धूळ खात पडली होती. तिचें मोजमाप किंवा मोल करतां येण्यासारखें नव्हतें मात्र ती संपदा अप्राप्य नव्हती. ती संपदा हिऱ्यागोत्यांपेक्षांही मौल्यवान होती. अशी संपदा कधीं ना कधीं उजेडांत आल्याशिवाय कशी राहील? भगवंताला त्याची काळजी! शिवाय, म्हणतात ना कीं:—' जरि उकिरड्यांत पडला, मळला न हिरा तथापि सामान्य !' हिऱ्याचें तेज कुठें दडून का रहाणार आहे? तुकोबारायाचे अभंग इंद्रायणी नदींत बुडवून नामशेष करून टाकण्याचा प्रयत्न झाला; परंतु ज्यांची गणना अक्षर वाङ्मयांत व्हावी, तें वाङ्मय भंग कसें पावेल? ज्यांच्यासाठीं नि ज्या मद्धेतूनें त्याची निर्मिती झाली, तो हेतु साध्य झाला पाहिजे, ह्याची भगवंताला चिंता!

तोच प्रेरणा देऊन योग्य माणसाकडून योग्य काळीं कार्य करून घेणारा. गेल्या सात साडेसातशें वर्षांच्या काळांत ह्या पवित्र महाराष्ट्र–भूमींत कवि मुकुंदराय, ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, श्रीधर, वामन पंडित, रामदास, तुकाराम, मोरोपंत, अमृतराय, अशीं संतकवींचीं किती नांवें सांगावीं? त्यांपैकीं बहुतेक संत मंडळी साक्षात्कारी नि पराकोटीला पोहोंचलेली होती. त्यांनीं जी उत्स्फूर्त वाङ्मयनिर्मिती त्याकाळीं केली, तिची तुलना कशाशींही करतां येणार नाहीं.

महाराष्ट्रीयांस मिळालेला हा वाङ्मय-संपदेचा अमूल्य वारसा आहे. सुमारें दीडशें वर्षांपूर्वीच्या काळांत महाराष्ट्रांत मुद्रण-कलेचें आगमन झालें नव्हतें. म्हणून का हा खजिना एकाजागीं नि एकाच हातीं पडून राहिलेला होता? नाहीं! त्याची देवाणघेवाण सतत चालूच होती; परंतु ती वळणदार हस्तलिखितांच्या रूपानें. कोनाकोपऱ्यांत पडून राहिलेलें, परंतु अवगत झालेलें पोथी–वाङ्मय हस्तलिखिताच्या रूपानें जरूर त्यांच्या हातीं पडत होतें नि त्याचें घरोघर भक्तिभावानें वाचन केलें जात होतें. हस्तलिखित पोथ्या घेऊन त्यांचें वाचन–पठण करणें, ही गोष्ट सर्वांच्या आटोक्यांतील नव्हती. पैसेवाल्यांस तें परवडत असे. बाकीच्यांस इच्छा असूनही स्वस्थ रहावें लागत असे.

ह्या क्षेत्रांत मुद्रण-कलेनें अचानक क्रांति घडवून आणिली. संत-वाङ्मय म्हणजे अक्षर-वाङ्मय; मानव जातीच्या उद्धाराचें वाङ्मय. त्याचा प्रसार घरोघर झाला पाहिजे नि तें प्रत्येकाच्या हातीं सुलभतेनें पडलें पाहिजे, ह्याची जाणीव झालेली माणसें त्याकाळीं नव्हतीं असें नाहीं. मुसलमानी राजवटींत किंवा इंग्रजांच्याही राजवटींत निदान १८४०–४५ सालापर्यंत तरी मराठी भाषेंत नांव घेण्यासारखें गद्य किंवा पद्य वाङ्मय असेल, अशी इंग्रज राज्यकर्त्यांची कल्पना नव्हती.

साधारणपणें पहातां ह्या गोष्टीची जाणीव १८४० नंतरच्या काळांत राज्यकर्त्यांस होऊं लागली, असें तत्कालीन इतिहासावरून दिसून येतें.

कृष्णशास्त्री चिपळूणकर ( १८२४–१८७८ ), परशुराम तात्या गोडबोले ( १७९९–१८८४ ), तसेंच माधव चंद्रोबा डुकले ( १८२५–१८८५ ) ह्यांच्यासारख्या तत्कालीन संत–वाङ्मयभोक्त्यांना तें वाङ्मय जनतेच्या आटोक्यांत आलें पाहिजे, त्याचें प्रकाशन झालें पाहिजे नि तें अभ्यासलें गेलें पाहिजे, असें अत्यंत तीव्रतेनें वाटत असे. परंतु राजसत्ता किंवा तो काळ, त्या कार्याच्या दृष्टीनें अनुकूल नव्हता. मुंबईंत मुद्रण-कलेचें आगमन नुकतेंच झालेलें होतें. मिशनऱ्यांनीं स्थापन केलेल्या शिळा-प्रेसमधून ख्रिस्ती-धर्म-प्रचारार्थ निरनिराळ्या भाषांत बायबलचीं भाषांतरें लहान मोठ्या आकारांत बाहेर पडून, लोकांना तीं नको असलीं तरीही तीं त्यांच्याशीं लगट करूं लागलीं होतीं !

परधर्मीयांनीं आमच्या देशांत येऊन आपल्या धर्माचा प्रचार वाङ्मय-प्रकाशनाच्या रूपानें करावा आणि आम्हीं तो स्वस्थ राहून पहावा ! ज्याचें मुद्रण–प्रकाशन व्हावें असें वाङ्मय आमच्या मायबोलींत नाहींच का ? आणि असलें तर तें प्रकाशांत कां येऊं नये ? त्याचा अभ्यास कां होऊं नये ? नि त्याचा सर्वत्र सुलभतेनें प्रसार कां होऊं नये ?

संत-वाङ्मय-प्रकाशनाच्या क्षेत्रांत जावजीशेठ ह्यांनीं जी भव्य कामगिरी पार पाडिली, तिचा परिचय करून देण्यापूर्वी तत्पूर्वीच्या काळांत ह्या क्षेत्रांत कोणीं कोणीं हालचाली केल्या नि त्यांची फलनिष्पत्ति काय झाली, ह्याचा ऐतिहासिक दृष्ट्या थोडा आढावा घेतल्यास, तो योग्यच होईल. जावजीशेठ

ह्यांचा 'काव्यसंग्रह' जन्मास येण्यापूर्वी ज्या काळांत विशेष नि नांव घेण्यासारख्या हालचाली झाल्या, तो काळ म्हणजे १८४० ते १८९० हा पन्नास वर्षांचा काळ होय.

१८४० सालीं 'ज्ञान-चंद्रोदय' मासिकाचा उदय झाला. तें गणपत कृष्णाजींच्या शिळा-प्रेसमध्यें छापिलें जात असे. त्याचे संपादक होते पांडुरंग बापू जोशी–पावसकर. ते विद्वान् तसेच जुन्या संतवाङ्मयाचे भोक्ते नि अभ्यासु-वृत्तीचे होते. हें मासिक सुरू करण्यापूर्वी त्यांनीं १८३६ सालीं रुक्मिणीस्वयंवराचे (एकनाथकृत) अनेक पाठ जमवून नि त्यांच्या सहाय्यानें जरूर तें संशोधन करून, तो ग्रंथ गणपत कृष्णाजींच्याच शिळा-प्रेसवर छापविला.

मुद्रण-कलेचा मुंबईंत उदय झाल्यानंतर मायबोलींतील आपलें प्राचीन वाङ्मय उजेडांत आलें पाहिजे, ह्या पवित्र भावनेनें पुढें सरसावलेले आद्य प्रकाशक, ह्या नात्यानें पांडुरंग बापू जोशी ह्यांचा उल्लेख अभिमानपूर्वक करतां येईल. ते *गणितविषयपारंगत* होते. *व्याकरणकार दादोबा पांडुरंग ह्यांनीं* आपल्या आत्मवृत्तांत गणित विषयाचे, सोसायटीच्या मराठी शाळेंतील शिक्षक, ह्या नात्यानें त्यांचा गौरवपूर्वक उल्लेख केला आहे.

त्यांचा मराठी भाषेचा नि प्राचीन संतवाङ्मयाचा अभिमान जाज्वल्य होता. त्याशिवाय कोणत्याही प्रकारचें उत्तेजन नसतां असल्या आंतबट्ट्याच्या व्यापांत कोण उतरेल ? होय; त्यांना उत्तेजन होतें तें त्याच भावनेनें प्रेरित होऊन शिळा-प्रेसची स्थापना करणारे गणपत कृष्णाजी ह्यांचें; आणि 'तेंही नसे थोडकें' !

जोशी—पावसकर ह्यांनीं आपल्या 'ज्ञान-चंद्रोदय' मासिकाच्याद्वारें ज्ञानदेवकृत हरिपाठ, राधाभुजंग, मुक्ताबाईचे अभंग वगैरे कांहीं संत-वाङ्मय प्रकाशांत आणिलें. कोणत्याही कारणामुळें असो, तें मासिक अल्पजीवि ठरलें असें दिसून येतें. तें किती वर्षें चाललें नि बंद कां पडलें, हें समजण्यास मध्यां कांहीं साधन उपलब्ध नाहीं.

तो काळ मोठा विचित्र होता. सर्व बाजूंनीं विपरीत परिस्थितीशीं सामना ! उत्तेजन मिळायचें तें कोणाकडून ? सरकारकडून नि जनतेकडूनच कीं नाहीं ? प्राचीन मराठी वाङ्मय प्रकाशांत आणण्याच्या बाबतींत ह्या दोन्ही वर्गांकडून

उपेक्षावृत्ति उघड उघड प्रकट केली जात असे. सरकार तर बोलून चालून परकेंच होतें. त्याला आमच्या प्राचीन नि धार्मिक वाङ्मयाबद्दल आपुलकी नि आस्था कां वाटावी ? परंतु त्याकाळीं इंग्रजी शिक्षण घेऊन जी नव्या विद्वानांची पिढी पुढें येत होती, त्यांना तरी मायबोलींतील प्राचीन वाङ्मयाची ओढ लागावी ! तेथेंही आस्थेच्या नांवानें शुकशुकाट !

त्याच काळांत प्रसिद्ध होणाऱ्या 'प्रभाकर' नामक पत्रांत संपादक काय म्हणतात पहा! "आमच्या नवीन विद्वानांस असें वाटतें कीं, मराठी ती काय, आडु लोकांची भाषा आहे! यामुळें विलियम दि कांकरर राजापासून इंग्लंडांत जशी फ्रेंच भाषा मोठे 'इष्की' मंडळींत बोलण्याचा परिपाठ कांहीं दिवस पडला होता, तसाच इंग्रजी भाषेचा. घरीं दारीं हवें तसें बोलतात. याजमुळें त्यांस मराठी म्हणजे केवळ परभाषेप्रमाणें होऊं लागली आहे. सारांश, इंग्रेजी शाळेंतील मुलें मराठी भाषेपेक्षां इंग्रेजींत अधिक हुपार आहेत, असें म्हटल्यास यथायोग्य माजेल.[१]"

तेव्हां इंग्रजी शिक्षणाची धुंदी चढलेल्या आमच्यांतील 'इष्की' लोकांना माय-बोलींतील संत-वाङ्मयाची मातब्वरी कशी वाटावी ?

सरकार नि आमचे नवशिक्षित विद्वान यांच्यासंबंधानें ही रडकथा झाली ! आतां राहातां राहिली सर्वसाधारण जनता. सर्वांपेक्षां जनतेच्या, बहुजनसमाजाच्या आश्रयाला नि आस्थेला महत्त्व जास्त असायचें. ती बाजू कशी काय होती ? दुर्दैवानें तीही बाजू लंगडीच होती. त्याला कारण होतें. प्राचीन संत-वाङ्मय प्रेमानें नि भक्तिभावानें वाचणारे म्हणजे आमचे धार्मिक प्रवृत्तीचे जुने लोक. त्यांना पवित्र पोथ्या-पुराणांच्या रूपानें असलेलें आपलें हस्तलिखित धार्मिक-वाङ्मय मुद्रित होऊन अपवित्र बनावें, असें मुळींच वाटत नसे. वाटेल तें करून धार्मिक वाङ्मयाचें पावित्र्य रक्षण करण्यावर त्यांचें विशेष लक्ष होतें.

धार्मिक-वाङ्मय मुद्रित झालें म्हणजे तें विटाळलें ! त्यांना असें कां वाटावें ? छापण्याच्या शाईंत चरबीसारखा अपवित्र नि निषिद्ध पदार्थ वापरला जातो, त्यामुळें तत्कालीन धार्मिक लोकांना, सोंवळ्यानें पाटावर बसून वाचा-

१. प्रभाकर : ता १२ डिसेंबर १८४१

वयाच्या पोथ्या मुद्रित झालेल्या चालत नसत. त्या हस्तलिखित असणें, त्यांना अत्यावश्यक वाटत असे.

दृढमूल झालेल्या अशा प्रकारच्या समजुतीपुढें कोणाचें शहाणपण चालणार आहे! त्या काळांतील आचार्य बाळशास्त्री जांभेकर ह्यांच्यापासून तों रावसाहेब मंडलिकांपर्यंत, सर्वांना ह्याच समजुतीनें पूर्णपणें पछाडलें होतें! ह्या समजुतीमुळें होणारी हानि लक्षांत घेऊन कल्पक गणपत कृष्णाजींनीं चरबीऐवजीं तुपाचा उपयोग करून पवित्र शाईची निर्मिती केली. तरीही मुद्रित ग्रंथांसंबंधीं जनतेच्या समजुती दूर व्हायला बराच काळ लोटावा लागला.

अशा ह्या भोळ्या समजुती नि मुद्रण-यंत्राचा अभाव वगैरे कारणांमुळें हस्तलिखित ग्रंथांचा भाव फार वधारलेला होता. ज्यांचें अक्षर सुंदर नि वळणदार, असे लोक हस्तलिखित पोथ्या म्हणजे रामविजय, हरिविजय, भक्तलीलामृत, कथाकल्पतरूसारखे धार्मिक ग्रंथ हातानें लिहून काढून, त्या लेखन-व्यवसायावर चांगला पैसा मिळवीत असत. असे हस्तलिखित ग्रंथ कांखोटीला मारून किंवा खटाऱ्यांत घालून ते गांवोगांव विक्रीसाठीं घेऊन जावयाचे. त्यांची किंमत भारी असल्यामुळें सर्वसाधारण भटभिक्षुकांस किंवा हरिदासांस जरूरी असूनही ते विकत घेणें परवडत नसे. गांवांतील धनिक लोक आपापल्या ऐपतीप्रमाणें असे हस्तलिखित ग्रंथ खरेदी करून ते गरजू भट-भिक्षुकांस दान करीत असत. त्यामुळें आपल्या पदरीं पुण्य पडतें, अशी त्यांची सार्थ समजूत असे. अशा हस्तलिखित धार्मिक-ग्रंथांचा संग्रह आपल्या वाड्यांत करून ठेवण्याचा छंदही त्याकाळीं कित्येक धनिकांस नि राजेरजवाड्यांस असे. सुंदर नि वळणदार अक्षर असलेल्या कांहीं लेखकांस वर्ष, दोन वर्षे, आपल्या पदरीं बाळगून त्यांच्याकरवीं सुंदर हस्ताक्षरांत ग्रंथसंपदा तयार करून घ्यावयाची, हा छंद किती नामी आहे, नाहीं का? त्यामुळें तर आमचें माय-बोलींतील प्राचीन वाङ्मय जीव धरून गुण्यागोविंदानें एकत्र राहूं शकलें. ह्याबद्दल त्यांना द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच होतील.

अशा परिस्थितींत १०।१५ वर्षांचा काळ लोटल्यानंतर १८५४ सालीं परशुरामपंत गोडबोले (१८००—१८७४) ह्यांचें 'नवनीत' प्रकाशांत आलें. हे गोडबोले त्या काळांतील एक पट्टीचे विद्वान् होते. त्यांचा प्राचीन मराठी

संत-वाङ्मयाचा व्यासंग दांडगा होता. विद्वत्ता, रसिकता नि संशोधनप्रवृत्ति ह्या गुणांचा सुंदर संगम त्यांच्याठायीं झालेला होता. मराठी भाषेचा चौकस दृष्टीनें अभ्यास केलेले मेजर टी. कँडी, हे त्याकाळीं पुना कॉलेजचे प्रमुख होते. त्यांच्या हाताखालीं मुख्य पंडित ह्या नात्यानें परशुरामपंत गोडबोले हे होते. त्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांना ( मराठी वर्गाच्या ) मराठी कविता शिकविण्यांत यावी, त्यामुळें त्यांचें मराठी कवितेकडे लक्ष वळलें तर वळेल, अशी एक सूचना कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांनीं कँडीसाहेबांस केली नि ती त्यांना रुचल्यामुळें त्यांनीं जुन्या मराठी कवींच्या वेंच्यांचा एक सुंदर संग्रह तयार करण्याची विनंती परशुरामपंतांना केली. योग्य माणसास अगदीं योग्य ती सूचना करण्यांत आली. कारण ती जबाबदारी पार पाडण्यास सर्वतोपरी तेच लायक होते. मुकुंदराय-ज्ञानदेवांपासून तों तुकाराम-रामदासांपर्यंत अनेक प्राचीन कवींची कविता जितकी मिळवितां आली तितकी मिळवून त्यांतून त्यांनीं निवडक, रसाळ नि प्रासादिक, त्याचप्रमाणें प्रातिनिधिक स्वरूपाच्या काव्यांची निवड केली. त्या काळांत त्यांच्या हातून पार पडलेली ही अत्यंत महत्त्वाची, तशीच भरघोस अशी यशस्वी कामगिरी होय.

सारें मिळेल तेवढें आंबट, गोड नि रुचकर दहीं जमा करून व तें आपल्या सिद्धहस्त हातांनीं घुसळून मिसळून त्या ताकांतून निर्माण झालेलें जें लोणी, तेंच हें मधुर, रुचकर नि पौष्टिक 'नवनीत' होय.

ह्या ग्रंथाच्या शेवटीं रसिक जनांस केलेल्या काव्यमय प्रार्थनेंत परशुरामतात्या म्हणतातः—

'काव्यामृताचा नवनीत भेला
हा गोड लागो तुमच्या जिभेला ॥
याची तुम्ही चाखुनि घ्याल गोडी
तरी सुखाची मिळवाल जोडी ॥ १ ॥'

परशुरामपंत गोडबोले ह्यांनीं ही जी अपेक्षा केली, ती सार्थ ठरलेली आहे. 'नवनीत' ह्या काव्य-ग्रंथाची पहिली आवृत्ति १८५४ सालीं प्रसिद्ध झाली. त्यानंतरच्या काळांत, तो सर्व शाळांतील अभ्यासक्रमांत लावण्यांत आल्यामुळें त्याच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या निघाल्या आणि सुमारें दोन वर्षांपूर्वी त्या ग्रंथाच्या शतसांवत्सरीनिमित्त आमचे विद्वान मित्र अ. का. प्रियोळकर ह्यांच्या संपादकत्वाखालीं महाराष्ट्र सरकारतर्फे त्याची अठरावी आवृत्ति प्रसिद्ध झाली.

परंतु 'नवनीत' ह्या काव्य-सार-संग्रहाचें महत्त्व दुसऱ्या एका दृष्टीनें बहुमोलाचें आहे. त्यामुळें आमच्या प्राचीन संत-वाङ्मयाकडे सर्वसाधारण लोकांचें लक्ष वळलें. आमच्या प्राचीन कवींनीं विविध स्वरूपाची काव्यरचना अपरंपार केली असून ती हुडकून काढली पाहिजे, तिचें संशोधन नि प्रकाशन झालें पाहिजे, असें तत्कालीन कांहीं जाणत्यांस वाटूं लागलें. 'नवनीत' ही एक प्रेरकशक्ति होती. त्या शक्तीनें अनेकांस रिझविलें नि कार्यप्रवृत्त केलें. आपल्या मराठी भाषेंत उच्च प्रकारचें काव्य-वाङ्मय आहे, असा आत्मविश्वास त्यामुळें निर्माण झाला.

ज्यांच्यामुळें ही जागृति घडून आली, ते परशुरामपंत गोडबोले हे कोण नि कुठले? त्यांच्या घराण्याचें मूळ गांव पांवस-गोळप. (जिल्हा रत्नागिरी) त्यांचे आजोबा कोंकणांतून वाईस गेले नि तेथें स्थायिक झाले. परशुरामपंतांना त्यांच्या बंधूंमुळें मराठी काव्याची गोडी लागली. नारायणशास्त्री देव ह्यांच्याकडे त्यांनीं संस्कृत भाषेचें अध्ययन केलें. त्यामुळें त्यांचें भाषाप्रभुत्व वाढलें नि रसिकतेंत मोलाची भर पडली. नंतर ते पुण्यास आले नि आपल्या मामांच्या पेढीवर कारकुनी करूं लागले; परंतु साहित्यप्रेमी माणूस कारकुनींत थोडाच रमणार? त्या सुमारास शिक्षा-मंडळानें महाराष्ट्र-भाषेचा कोश तयार करण्यासाठीं सहा पंडितांची योजना केली, त्यांपैकीं परशुरामपंत हे एक होते. त्यांना आवडीचें नि जीवनांतील उत्कर्षाची पायरी गांठण्याचें काम मिळालें. त्यांची हुषारी नि विद्वत्ता निरखून कँडीसाहेबांनीं त्याना आपल्या हाताखालीं घेतलें. वर सांगितल्याप्रमाणें जुन्या मराठी कवींच्या काव्याचा त्यांचा व्यासंग फार दांडगा होता. तो त्यांचा आवडता छंद होता. त्यांत ते रमत असत नि तन्मय होऊन जात असत. जुन्या कवितांचा अचूक अर्थ लावण्यांत ते खरोखर मोठे पटाईत होते. मोरोपंत हा तर त्यांचा अत्यंत आवडता कवि. एकाद्या कवितेचा नीट अर्थ नाहीं लागला, तर कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांच्यासारखे थोर पंडित त्यांच्याकडे धाव घेत असत. त्यांनीं अनेक संस्कृत नाटकांचीं गद्यपद्यात्मक भाषांतरें केलीं आहेत. गोडबोले ह्या नांवाप्रमाणें त्यांचा स्वभावही मारी गोड होता. दुसऱ्याच्या उपयोगी पडण्याचा नि आपल्या हातून

घडण्यासारखी असेल, ती सेवा तत्परतेनें करण्याचा सद्गुणही त्यांच्याठायीं वास करीत होता.

परशुरामपंतांनीं संपादिलेला 'नवनीत' हा ग्रंथ त्याकाळीं अनेकांस प्रेरणा देणारा ठरला असें वर म्हटलें आहे; परंतु विहिरींत पाणी असेल तर पोहऱ्यांत येणार नाहीं का ?

परशुरामपंत गोडबोले ह्यांना जशी जुन्या काव्य–वाङ्मयाची गोडी होती, तशीच मुंबईत विलायती औषधें विकण्याचा नि फोटोग्रॅफीचा व्यवसाय करणारे माधव चंद्रोबा डुकले ( १८२५–१८८५ ) ह्यांनाही होती. त्यांचा पोटापाण्याचा व्यवसाय नि आवडता छंद, ह्यांची सांगड कशी घालावयाची ? ईश्वराची करणी अगाध आहे. तो कोणाला निमित्तमात्र करून कोणतें कार्य करवून घेईल, हें सांगणें नि समजणें फार कठीण आहे.

हेंच पहा ना, गोमंतकांतील कळंगुट हें आपलें गांव सोडून वडील चंद्रोबा नि बंधु अनंत ह्यांच्याबरोबर माधव मुंबईत आला. वडिलांनीं आपल्या दोन्ही मुलांस शाळेंत घातलें. ४।५ वर्षांनीं वडील वारल्यामुळें माधवला शाळा सोडून टांकसाळींत महिना तीन रुपये पगारावर नोकरी पतकरावी लागली. शाळा सुटली तरी वाचनाचा नाद लागला होता, तो कांहीं सुटला नाहीं. नोकरींत मन रमेना. स्वभाव बाणेदार. त्यामुळें त्यांनीं विलायती औषधांचें दुकान उघडलें नि जोडधंदा म्हणून फोटोग्रॅफीही सुरू केली. आणि हे दोन्ही व्यवसाय संभाळून त्यांनीं काव्य-वाचनाचा व्यासंग सतत चालू ठेविला. त्यासाठीं जुने हस्तलिखित काव्य–ग्रंथ मिळतील तेवढे मिळविण्याकडे त्यांचें लक्ष सतत लागून राहिलेलें असे.

हा विषय त्यांच्या आवडीचा नि आनंदाचा होता; परंतु आनंदाचा उपभोग एकट्यानें घेऊन मनाचें खरें समाधान होत नाहीं. त्यांत इतरांनाही सहभागी करून घ्यावें, असें मानव-प्रेमी व्यक्तीला वाटत असतें. जुन्या कविश्रेष्ठांचें काव्य–वाङ्मय प्रकाशांत आलें पाहिजे नि त्याचा बहुजन-समाजाला लाभ झाला पाहिजे, असें त्यांना वाटूं लागलें. पाऊल पुढें टाकावें असें वाटत होतें; परंतु आपल्या बरोबरीनें वाटचाल करणारा कोणी ना कोणी सहकारी मिळावा नि तो कुठें सांपडेल, ह्या विचारांत माधव चंद्रोबा होते; अशा समयाला परशुरामपंतांचें 'नवनीत' प्रकाशांत आलें ! त्यामुळें

त्यांना किती तरी आनंद झाला. ज्याची मार्गप्रतीक्षा आपण करीत होतों, तो समव्यसनी सहकारी भेटला असें त्यांना वाटलें. 'समसमा संयोग कीं जाहला' असा हा सुंदर संगम होता. आणि तो शेवटीं यदृच्छेनें घडून आला.

माधव चंद्रोबांनीं एक लहानसा छापखाना स्थापन केला, आणि परशुरामपंत गोडबोले ह्यांचा सहकार संपादन करून जुन्या मराठी काव्य-वाङ्मयाचें क्रमशः प्रकाशन करण्यासाठीं 'सर्व-संग्रह' ह्या नांवाचें मासिक सुरू केलें. (१८६०)

त्या काळांत त्यांनीं पतकरलेलें हें केवढें मोठें धाडस होतें! अशा कार्याच्या दृष्टीनें तो काळ कसा प्रतिकूल होता, ह्याची कल्पना वर करून देण्यांत आलेली आहेच; परंतु संत--वाङ्मयाचें महत्त्व पटल्यामुळें व तें नाहींसें होऊं नये ह्या दृढभावनेनें अशा कार्यासाठीं वांट्यास येईल तो त्याग करण्यास ते तयार झाले.

शेठ जावजी दादाजी ह्यांनीं जुन्या काव्य--वाङ्मयाचें मुद्रण, पुनर्मुद्रण नि प्रकाशन ह्या रूपानें भव्य प्रासादाची उभारणी केली; परंतु त्याचा खंबीर पाया जर कोणीं घातला असेल, तर तो म्हणजे माधव चंद्रोबा ह्यांनींच होय. माधव चंद्रोबा हे विद्वान् नि व्यासंगी होते; परंतु त्यांनीं परशुरामपंत गोडबोले ह्यांच्यासारख्या थोर पंडिताचाही जिव्हाळ्याचा सहकार संपादन केला होता, ही विशेष महत्त्वाची घटना आहे.

'सर्वसंग्रह' हें मासिक ७।८ वर्षांपेक्षां अधिक काळ चालूं शकलें नाहीं. त्या कालावधींत त्या मासिकाच्याद्वारें मोरोपंतांची बरीचशी कविता, तुकारामाचे अभंग, तसेंच वामन पंडित, मुक्तेश्वर, एकनाथ, नामदेव वगैरे संतकवींचें उपलब्ध झालेलें वाङ्मय प्रकाशांत आलें.

त्या काळाच्या दृष्टीनें माधव चंद्रोबांच्या सर्वसंग्रहानें बजाविलेल्या कामगिरीची कदर कोणाला? विद्वानांस तिचें महत्त्व. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे मोरोपंतांवरील आपल्या निबंधांत म्हणतातः--"सर्व-संग्रहानें महाराष्ट्र कवितेचा थोडाबहुत जीर्णोद्धार केला. त्याचा आयुर्दाय संपून दहा वर्षे झालीं. त्यानंतर तसा प्रयत्न करणारा कोणी पुढें आला नाहीं.!"

कोणीं पुढें यायचें ? ज्याला त्याची आवड असेल नि ज्याला त्याचें महत्त्व वाटतें त्यानें ! विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांना प्राचीन काव्यवाङ्मय-प्रकाशनाचें महत्त्व पटलेलें होतें; त्यामुळें त्यांना सर्व-संग्रहासारखा सदुद्योग झाला पाहिजे, अशी तळमळ लागून राहिली होती.

प्राकृत संत-वाङ्मयच काय, परंतु प्राचीन संस्कृत-वाङ्मयही प्रकाशांत आलें पाहिजे. तसेंच जुनीं ऐतिहासिक कागदपत्रें, बखरी निरनिराळ्या ठिकाणीं दफ्तरांतून धूळ खात पडलेलीं आहेत, त्यांचाही जीर्णोद्धार नको का व्हायला ? हें सारें बहुमोल वाङ्मय म्हणजे ती आपल्या राष्ट्राची सांस्कृतिक संपदा आहे. तिचा उद्धार होण्यावर जनतेचा उद्धार अवलंबून आहे, अशा विचारसरणीचीं माणसें पुढें येऊं लागलीं. शिक्षणामृताचा आस्वाद घेण्याची सुसंधी मिळाल्यामुळें त्यांना दिव्य दृष्टीचा लाभ झालेला होता. त्यासाठीं वांट्यास येईल तो त्याग करण्याची त्यांची तयारी होती.

आपल्या निबंधमालेच्याद्वारें विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांनीं ह्या बाबतींत जनतेंत जागृति घडवून आणण्याचे प्रयत्न आपल्या परीनें अत्यंत जोमदारपणें सुरू केले. त्या काळांतील त्यांचें लेखन जसें जळजळीत होतें, तसेंच तें प्रत्येकाच्या हृदयास जाऊन भिडणारें, झोंबणारें होतें.

प्राचीन विद्येच्या पुनरुज्जीवनासंबंधीं मालेंतील आपल्या एका लेखांत ते म्हणतात:—"नूतन विद्येनें आमची नजर सगळ्या भूमंडलावर फांकली असून कामश्चाटका कोठें आहे, टिंबक्टू शहराची वस्ती किती आहे, मॅजिलनची सामुद्रधुनी कोणीं शोधून काढली, वगैरे खडान् खडा माहिती आम्हांस पुसून घ्या; पण वस्तीच्या ठिकाणाहून १०।२० कोसांवर नेऊन सोडलेंत तर परत आपल्या जागीं येण्याची आम्हांस मारामार पडेल ! आपल्या आजोबांचें नांव वेळेवर आठवायचें नाहीं. रामायणांतील, महाभारतांतील अति प्रसिद्ध किंवा मराठ्यांच्या इतिहासांतील ठळक ठळक गोष्टीही माहीत नसतील. पण ग्रीस, रोमच्या इतिहासांतील शक विचारा किंवा इंग्लंडची वंशावळ म्हणायला सांगा, ती तोंडपाठ !.......पण मोरोपंतांची सामान्य आर्या लागायची नाहीं, तुकारामाचें साधारण अवतरण लक्षांत यावयाचें नाहीं. पण इंग्रेजी कवितेंतील काय ती सर्व माहिती ! याप्रमाणेंच धर्माचीही गोष्ट. आतां कोणतेंही ज्ञान

संपादन केलें तरी तें प्रशस्तच होय हें खरें............पण आपल्या घरच्या गोष्टींची गैरमाहिती असून, माहिती काय ती हजारों कोसांवरच्या मुलखांची. हें हास्यास्पद होय........ मॉरिस साहेब सांगतील तो आमचा इतिहास, मेकॉलेसाहेब सांगतील ती आमची नीति व डॉ. विल्सन सांगतील तो आमचा धर्म! ही लज्जास्पद स्थिति आजपर्यंत जी चालत आली, तीच पुढें चालू नसावी, असें ज्यांच्या मनांत असेल, त्यांनीं, हल्लीं प्राचीन विद्येच्या पुनरुज्जीवनार्थ जे उद्योग आमच्या कांहीं देशबंधूंनीं हातीं धरले आहेत, त्यांचा चांगला पुरस्कार करणें अत्यंत आवश्यक आहे."[१]

एकादें सत्कार्य नि विशेषतः लोकोद्धाराचें कार्य घडून यावें असें तीव्रतेनें वाटूं लागावें, मनांत त्याची सतत घोकणी सुरू असावी, म्हणजे दैवदयेनें तें घडून आल्याशिवाय रहात नाहीं. जनार्दन बाळाजी मोडक (१८४५–१८९०) व काशिनाथ नारायण साने (१८५०–१९२७) हीं त्याच विचारांचा सतत ध्यास घेतलेलीं दोन विद्वान् माणसें. प्राचीन मराठी कविता हा एकाचा अत्यंत आवडता विषय तर ऐतिहासिक बखरी नि कागदपत्रें हा दुसऱ्याचा आवडीचा विषय. रजेचे दिवस असल्यामुळें हे दोघेही पुण्यास आले होते. विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांचें अंतःकरण जुन्या वाङ्मय-प्रकाशनासंबंधीं विचारांनीं पेटलेलें होतें. समविचारांचीं माणसें एकत्र यावयाचींच. त्याप्रमाणें तीं आलीं. त्यांत आणखी शंकरराव शाळिग्राम यांचीही भर पडली. पूर्वकालीन वाङ्मयाच्या उद्धारासाठीं मासिक सुरू करण्याचा विचार ठरला. विद्वान् माणसें एकत्र जमलीं; परंतु मांडवलाचें काय? पांचांमुखीं परमेश्वर! आरंभीं प्रत्येकानें पन्नास रुपये पुढें करण्याचें नि नंतर जो नफातोटा होईल, तो वांटून घेण्याचें ठरलें.

माधव चंद्रोबांचा 'सर्व-संग्रह' दिवंगत होऊन दहा वर्षांचा काळ मागें पडला होता; परंतु वाचकांच्या डोक्यांत ठाण मांडून बसलेला 'संग्रह' हा शब्द तसाच कायम होता. ह्या नवीन मासिकाचें नांव 'काव्येतिहास-संग्रह' हें ठेवण्याचें मुक्रर झालें.

विष्णुशास्त्री चिपळूणकर, जनार्दन बाळाजी मोडक नि काशिनाथ नारायण साने हीं तीन माणसें ह्या मासिकाच्या निमित्तानें एकत्र आलीं. प्रत्येकाचें आवडीचें

१ निबंधमाला : ३ री आवृत्ति. पृ. ४७२–७३

विषय वेगवेगळे होते. त्याप्रमाणें कामांची वांटणी करण्यांत आली. विष्णुशास्त्री ह्यांनीं संस्कृत काव्य, मोडकांनीं मराठी काव्य नि साने ह्यांनीं ऐतिहासिक बखरी नि कागदपत्रें, ह्याप्रमाणें वांटणी झाली. प्रत्येक अंक ४८ पानी काढावयाचा, असें ठरून त्याप्रमाणें ता. १ जानेवारी १८७८ रोजीं 'काव्येतिहास-संग्रह' मासिकाचा पहिला अंक प्रसिद्ध झाला.

मासिक जोमांत सुरू झालें. तीन जाडे नि पट्टीचे, त्याचप्रमाणें आपापल्या विषयांत पारंगत असे विद्वान एकत्र आल्यावर, ते काय करूं शकणार नाहींत? सुबुद्ध वाचकांस हा उपक्रम फार पसंत पडला. त्याचा परिणाम वर्गणीदार झपाट्यानें वाढण्यांत झाला. त्यामुळें संपादक महाशयाचाही उत्साह वृद्धिंगत होऊं लागला.

असा हा सुंदर उपक्रम जेमतेम चार वर्षें सुरळीत चालला; आणि त्यानंतर माशी कुठें शिंकली कोण जाणे! उपरोक्त तीन विद्वानांतील मुकुटमणि समजले जाणारे जे विष्णुशास्त्री चिपळूणकर, त्यांनीं संपादक-मंडळांतून आपलें अंग काढून घेतलें!

एवढा जाडा, देशप्रेमी नि ज्ञानप्रसारासाठीं सतत धडपडणारा विद्वान् पुरुष! एका उत्तम रीतीनें चाललेल्या उपक्रमास जास्तींत जास्त सहाय्य करावयाचें तें सोडून अवघ्या ३।४ वर्षांतच कंटाळून त्यांनीं त्या कार्याकडे कां बरें पाठ फिरवावी? अशी शंका कोणाच्याही मनांत येणें स्वाभाविक आहे. शास्त्रीबुवांच्या चरित्रकारानें ह्याबाबतींत पुढीलप्रमाणें खुलासा केला आहे:—"हें मासिक पुस्तक सुरू होताना त्यांत विष्णुशास्त्री ह्यांचा पुष्कळ अंशीं भाग होता; परंतु व्यवस्थापक मंडळीच्या स्वभाव-वैचित्र्यामुळें तींतून एक एक इसम गळत गेला. प्रथम बाहेर पडले शाळिग्राम. त्यांच्या मागाहून सहा महिन्यांतच केळकर. विष्णुशास्त्री हे तीन वर्षें टिकले होते. अनेक व्यवसायांमुळें त्यांच्या हातून काव्येतिहास-संग्रहाचा मजकूर वेळेवर मिळत नसल्यामुळें साने यांस तें आवडत नसे. साने याचा स्वभाव तापट व हिशोबी होता. तो विष्णुशास्त्री यांस पसंत नसे. त्यामुळें हळू हळू परस्परांचें पटेनासें होऊन विष्णुशास्त्री यांनीं आपलें अंग काढून घेतलें.

"विष्णुशास्त्री यांस 'काव्येतिहास-संग्रह' माझ्याच मदतीनें बरेंच उदयास आलें, असा कांहीं अंशीं अयोग्य अभिमान वाटे. साने यांसही त्यांत जुन्या बखरींचा जो भाग आहे, त्यामुळें मासिक उदयास आलें म्हणून तितकाच अयोग्य अभिमान वाटे. परस्परांवर दोषारोप करणारा दोघांचा पत्रव्यवहार उपलब्ध आहे. अशा रीतीनें काव्येतिहास-संग्रहांतून शालिग्राम, केळकर व विष्णुशास्त्री हे निघाले व शेवटीं तो बंद पडला !"*

ह्या तिघांनीं संबंध सोडल्यानंतर 'काव्येतिहास-संग्रह' मासिक पुढें ६।७ वर्षे चालू होतें. त्याचा अस्त १८८८ अखेर झाला. परंतु ह्या ठिकाणीं सहज लक्षांत येणारी नि मनाला दुःखदायक वाटणारी घटना म्हणजे आपापल्या विषयांत पारंगत असे तीन पट्टीचे विद्वान् एका उच्च ध्येयानें प्रेरित होऊन एकत्र आले, परंतु त्यांचें ऐक्य दीर्घकाळ टिकूं शकलें नाहीं. कांहीं ना कांहीं कारणामुळें नि मुख्यतः अहंकारी वृत्तीमुळें त्यांच्यांत फाटाफूट झाली ! ह्या वृत्तीवर ताबा मिळवितां आला पाहिजे, तिला मुरड घालतां आली पाहिजे. नाहींपेक्षां कार्यनाश ठरलेला ! ज्यांना आम्ही शहाणे समजतों, अशांनाही कार्याची महती ओळखून अहंकाराला मुरड घालतां येत नाहीं, हें ध्यानीं घेण्यासारखें आहे.

'काव्येतिहास-संग्रह' मासिक सुमारें अकरा वर्षे चाललें. शेवटचा अंक निघाला तो डिसेंबर १८८८ मध्यें. त्या अंकांत 'शेवटची विज्ञापना' प्रसिद्ध करण्यांत आली आहे. संपादक ज. बा. मोडक नि का. ना. साने हे त्या विज्ञापनेंत म्हणतात कीं:—"आरंभीं नावीन्यामुळें पुष्कळ लोक या मासिकाचे वर्गणीदार झाले. वर्गणीही वेळेवर देत असत. त्यामुळें पुस्तक वेळेवर निघत असे. पुढें वर्गणी येण्यास विलंब लागूं लागला, तसतसें हें पुस्तक मागासत चाललें. असें होतां होतां १८८८ च्या डिसेंबरचा अंक आजमितीस निघत आहे. हिशोब पहातां दीड हजार रुपयांवर वर्गणी थकलेली ! अशा स्थितींत पुस्तक चालू ठेवणें प्रशस्त न वाटून आज शेवटचा म्हणजे १८८८ च्या डिसेंबरचा अंक काढून हें पुस्तक बंद करण्याची योजना केली आहे. वर्गणीदारांकडून वक्तशीर वर्गणी आली असती, तर आणखी सुमारें वर्ष दीड वर्ष पुरतील इतके ऐतिहासिक लेख संग्रहीं आहेत.

*विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र, लेखक: ल. कृ. चिपळूणकर, दुसरी आवृत्तिः पृ. २४९-५०

"या मासिकाची अकरा वर्षांतील कामगिरी थोडक्यांत पुढीलप्रमाणें :— या मासिकामुळें ३०।३२ ऐतिहासिक ग्रंथ बाहेर पडले. मराठी कविता :— मुक्तेश्वर, वामन पंडित, मोरोपंत, रामदास वगैरे कवींचे काव्यग्रंथ ११ पुस्तकें. संस्कृत ग्रंथः--वेदांतकेसरी, शिवकाव्य, राजव्यवहारकोश, अमरुशतक वगैरे १२ पुस्तकें."

ह्या निवेदनांत संपादकद्वय शेवटीं निरोप घेतांना म्हणतातः—"वर लिहिलेले ४०।५० ग्रंथ लोकांस ऐकूनही माहीत नव्हते, मग पहाण्यास कुठून मिळणार? या मासिकामुळें ते उपलब्ध झाले व संग्रहीं ठेवणें शक्य झालें. ही यथावकाश व यथामति सेवा आम्हीं ११।१२ वर्षें केली. ती आमच्या प्रिय देशबंधूंपुढें ठेविली आहे. पुढें याप्रमाणें कांहीं दिवस सेवा चालवावी असें आमच्या मनांतून होतें; परंतु इलाज चालेना. तेव्हां हें निवेदन करून वाचकांचा निरोप घेतों."

अशा रीतीनें संस्कृतिसंवर्धनाच्या नि राष्ट्रोद्धाराच्या दृष्टीनें सुमारें एक तपभर महत्त्वाची कामगिरी पार पाडून 'काव्येतिहास-संग्रहानें' वाचकांचा निरोप घेतला.

जनतेला नि राष्ट्राला उपकारक होऊन राहाणाऱ्या कार्याला कधींही मरण नसतें. माणसें कितीही कर्तबगार असलीं नि त्यांनीं निर्माण केलेलीं साधनें कितीही प्रभावी असलीं, तरी तीं कधीं ना कधीं नामशेष व्हावयाचींच; त्यामुळें तात्पुरती हानि झाली तरी कार्य कायमचें थंडावत नाहीं. त्या कार्याची धुरा वहाण्यासाठीं नि त्यासाठीं जरूर तो त्याग करण्यासाठीं यदृच्छेनें कोणी ना कोणी पुढें येतच असतो, हा नेहमींचा अनुभव आहे.

संस्कृत-वाङ्मय, संत-वाङ्मय व बखरीसारखें नि इतर ऐतिहासिक वाङ्मय मुद्रित होऊन त्याचें यथायोग्य संगोपन नि संशोधन झालें पाहिजे, असें विद्वान मंडळीस उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणांत वाटूं लागलें. काव्येतिहास-संग्रहासारखें संस्कृतिसंवर्धनकार्यास वाहिलेलें मासिक बंद पडावें, ही एक मोठी राष्ट्रीय हानि आहे. त्या बाबतींत जरूर ती हालचाल करण्यांत आली पाहिजे, असें तीव्रतेनें वाटणारी नि त्यासाठीं आपल्याकडून शक्य असेल तो त्याग

करण्यास तयार असलेली विद्वान्, वाङ्मयप्रेमी नि देशप्रेमी मंडळी शेठ जावजी दादाजी ह्यांच्या निर्णयसागर-मुद्रण-मंदिरांत ह्या महत्त्वाच्या बावतींत कोणता निर्णय घ्यावा व शेठजींच्या सहाय्यानें पाऊल कसें पुढें टाकावें, ह्याचा विचार साकल्यानें नि सहानुभूतिपूर्वक करूं लागली. त्याचें सुमधुर फळ म्हणजेच 'काव्य-संग्रह' नामक मासिकाचा जन्म !

## ७

## काव्य-संग्रह : जन्म नि कामगिरी

शेठ जावजी दादाजी ह्यांच्या निर्णयसागर-मुद्रणालयानें महाराष्ट्रीयांस ज्या कांहीं बहुमोल, चिरस्मरणीय नि जनतेच्या विकासाला पोषक अशा देणग्या दिल्या, त्यांपैकीं 'काव्य-संग्रह' ही एक अविस्मरणीय देणगी आहे. प्राचीन संत-वाङ्मयाचें मुद्रण, प्रकाशन नि वितरण ही एक महत्त्वाची नि पवित्र कामगिरी आहे. ती पार पाडीत असतां झीज सोसावी लागली, तरी आपल्यांत शक्ति असेपर्यंत ती आपण सोसायची, अशा निर्धारानें त्यांनी ह्या क्षेत्रांत पाऊल टाकलें. त्यांचा हा उपक्रम सुरू होण्यापूर्वीच्या पन्नास वर्षांच्या कालांत संत-वाङ्मय-प्रकाशनासाठीं कोण कोण पुढें आले नि त्या विपरीत कालांत त्यांनीं कुठवर मजल गांठली, ह्याची साधारण कल्पना मागील प्रकरणावरून आली असेलच.

आतां जावजी शेठजींचें लक्ष ह्या उपक्रमाकडे कसें वळलें, तें आपण पाहूंया. जुन्या नि दुर्मिळ वाङ्मयाचें प्रकाशन होऊन सुंदर नि अल्प किंमतींत त्याचें वितरण व्हावें, ही जावजीशेठ ह्यांनीं सतत उराशीं बाळगून ठेवलेली एक आकांक्षा होती. ते श्रद्धावान् होते, त्यांची देवधर्मावर श्रद्धा होती; त्याचप्रमाणें संत-मंडळीकडे नि त्यांच्या कार्याकडे ते त्याच पवित्र भावनेनें पहात असत. कशाचीही अपेक्षा न बाळगतां केवळ लोककल्याणासाठीं प्राचीन संतकवींनीं वाङ्मयनिर्मिती केली. तें काव्य-वाङ्मय जनता-जनार्दनाच्या आटोक्यांत येऊन त्याचें वाचन, मनन व्हावें, ह्यासाठीं यथाशक्ति जें करतां येईल तें झटून करणें नि

कितीही झीज सोसावी लागली तरी तें पार पाडणें, हें आपलें एक पवित्र कर्तव्य आहे, ती एकप्रकारें देव-सेवा नि देश-सेवा आहे, असें ते मानीत असत.

पूर्वीच्या काळीं मोडून पडलेल्या किंवा मोडकळीच्या मार्गावर असलेल्या देवळांचा जीर्णोद्धार करणें, हें देवाला प्रसन्न करून घेण्याचें किंवा देव-कृपेला पात्र होण्याचें साधन आहे, ह्या समजुतीनें भाविक नि धर्मात्मे धनिक पैसा खर्च करीत असत. जवळ जवळ तीच भावना जुन्यापुराण्या नि दुर्मिळ ग्रंथांचा जीर्णोद्धार करण्यांत जावजीशेठजींची होती.

ईश्वरकृपेनें त्यांनीं स्थापन केलेलें निर्णयसागर-मुद्रणालय आतां चांगलें नांवारूपास आलेलें होतें. उत्तम छपाई नि उत्तम ग्रंथप्रकाशन ह्या नात्यानें त्या मुद्रणालयाचा देशभर बोलबाला होऊं लागला होता. त्यांच्या समंजस, गोड, उदार नि प्रेमळ स्वभावामुळें चार विद्वान् मंडळी त्यांना जरूर तें सहाय्य करण्यास तयार होती. त्यांना वेळोवेळीं योग्य तो सल्ला देणें नि स्वपराक्रमानें त्यांनीं जें मुद्रणालय नांवारूपास आणिलें, त्याचा जनतेला फायदा करून देणें, हें आपलें एक कर्तव्य आहे, असें ते मानीत असत. त्या सर्वांना निर्णयसागर-मुद्रणालय ही एक राष्ट्रीय संस्था आहे, असें वाटत असे.

प्राचीन दुर्मिळ किंवा अप्रकाशित संस्कृत-वाङ्मयाच्या प्रकाशनासाठीं जावजी शेठजींनीं आपल्या विद्वान मित्रांच्या नि सहकाऱ्यांच्या सल्ल्यावरून 'काव्य-माला' मासिक ह्यापूर्वीच ( १८८६ जानेवारी ) सुरू केलें होतें. तें सुरू झाल्यानंतर 'काव्येतिहास-संग्रह' मासिकाच्या संपादकांनीं संस्कृत काव्यप्रकाशन बंद करून प्राचीन मराठी संत-वाङ्मय नि ऐतिहासिक कागदपत्रें, जुन्या बखरी हे दोन विषय त्या मासिकाद्वारें प्रकाशांत आणण्याचें धोरण स्वीकारलें. जनतेकडून म्हणा किंवा वर्गणीदारांकडून म्हणा, जरूर तेवढा पाठिंबा न मिळाल्यामुळें संपादकद्वयास तें मासिक निरुपायानें बंद करणें भाग पडलें. एक स्तुत्य, उपयुक्त नि अभिनंदनीय कार्य स्थगित झालें. कोणत्याही दृष्टीनें पाहतां तो राष्ट्रोद्धारक उपक्रम सुरू रहाणें अत्यंत आवश्यक होतें.

जावजीशेठ नि वेळोवेळीं त्यांच्या सान्निध्यांत येणारी वाङ्मयप्रेमी विद्वान् मंडळी, उपयुक्त वाङ्मयप्रकाशनांत ह्या जो खंड पडला, तो अत्यंत हानिकारक आहे, ही मांसळी, नव्हे तो तुटलेला बहुमोल हिऱ्या-मोत्यांचा हार, पुन्हां

बेमालूम साधून तो जनताजनार्दनाच्या कंठीं घालण्यासाठीं कोणी ना कोणी पुढें सरसावलेंच पाहिजे, अशा विचारांत होती. हा विचार सतत दीड दोन वर्षें चालू होता.

शेवटीं आपल्या विद्वान् सल्लागारांच्या अनुमतीनें काव्येतिहास-संग्रहापैकीं प्राचीन संतवाङ्मयास, अर्थात् संतांच्या काव्यप्रकाशनास सर्वस्वीं वाहिलेलें 'काव्य-संग्रह' नांवाचें मासिक सुरू करण्याचा जावजीशेठनीं निर्णय घेतला. ऐतिहासिक विषयांस वाहिलेलें 'इतिहास-संग्रह' नांवाचें मासिकही सुरू करावयाचें; परंतु त्याचा विचार मागाहून करावयाचा, असा त्यांचा बेत होता. 'काव्य-माला' मासिक आपली जबाबदारी पार पाडीत होतें.

'काव्येतिहास-संग्रह' चालू असतां प्राचीन काव्याचें संपादन करण्याची जबाबदारी जनार्दन बाळाजी मोडक ह्यानीं पत्करली होती. त्यानांच नवीन काव्य-संग्रहाचे संपादक होण्याची विनंती करण्यांत आली नि ती जबाबदारी त्यानीं मोठ्या आनंदानें स्वीकारली.

जनार्दन बाळाजी मोडक हे प्राचीन संत-वाङ्मयाच्या क्षेत्रांत हौसेनें वावरून तावून सुलाखून निघालेले एक अनुभवी संपादक होते. जावजीशेठनीं नि त्यांच्या विद्वान सल्लागारांनीं योग्य माणसाची निवड केली होती. त्यांचा जन्म दापोली तालुक्यांतील पंचनदी ह्या गावीं झाला. वडिलांबरोबर पुणें येथें राहून ते १८७० सालीं डेक्कन कॉलेजातून बी. ए. झाले आणि त्यावेळचे मराठी ट्रॅन्सलेटर मेजर कँडीसाहेब ह्यांच्या कचेरींत मासिक चाळीस रुपये पगारावर नोकरी करूं लागले. ते जात्याच हुषार होते. त्यांचें सारें आयुष्य अध्ययन व अध्यापनांत गेलें. नाशिक येथें कांहीं दिवस शिक्षक ह्या नात्यानें घालवून त्यानीं आपली बदली रत्नागिरीस करून घेतली. नंतर ठाणें येथील बैरामजी जिजीभाई हायस्कूलचे हेडमास्तर ह्या नात्यानें ते ठाण्यास आले नि सेवानिवृत्त होईपर्यंत तेथेंच राहिले.

प्राचीन मराठी कविता हा त्यांचा आवडता विषय होता. पुण्यास परशुरामपंत गोडबोले ह्यांचा शेजार लाभल्यामुळें ती आवड वृद्धिंगत होत गेली. त्याशिवाय ज्योतिष-शास्त्र हाही त्यांचा विशेष आवडता विषय होता. त्या विषयाचें कसून अध्ययन केल्यानंतर त्यानीं 'भास्कराचार्य व तत्कृतज्योतिष' आणि

'वेदांगज्योतिषाचें मराठी भाषांतर' हे दोन ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यांचें सारें आयुष्य वर सांगितल्याप्रमाणें, विद्याव्यासंगांत गेलें. तत्कालीन अनेक मासिकांतून नि वृत्तपत्रांतून त्यांनीं आपल्या आवडीच्या विषयांवर लेखन केलें आहे.

'भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास' ह्या नांवाजलेल्या ग्रंथाचे विद्वान् लेखक शं. बा. दीक्षित हे त्यांचे पट्टशिष्य होत. मोडक ह्यांचा स्वभाव निरभिमानी, निर्मत्सरी नि निष्कपटी होता.

जनार्दनपंत मोडक ह्यांच्यासारखा गुणज्ञ नि अनुभवी संपादक काव्य-संग्रहासाठीं लाभला, ही एक अभिनंदनीय घटना होती. ह्या मासिकाचा पहिला अंक जानेवारी १८९० मध्यें प्रसिद्ध झाला. प्रत्येक अंक शंभर पानांचा. वार्षिक वर्गणी साडे चार रु. व किरकोळ अंक आठ आणे.

पहिल्याच अंकांतून प्रकाशक ह्या नात्यानें शेठ जावजी दादाजी ह्यांनीं पुढील विनंती वाचकांस उद्देशून केली आहे :—'महाराष्ट्र काव्य-संग्रहाचा हा पहिला अंक आपलेकडे पाठविला आहे. हा पाहून आपण यास स्वतः आश्रय द्याल अशी आमची खात्री आहेच; परंतु आपल्या मित्रांकडूनही यास आश्रय देववावा, अशी विनंती आहे; कारण अशीं लोकोपयोगी कामें लोकाश्रयावरच अवलंबून असतात.

"आपलेकडे किंवा आपले मित्रांपैकीं कोणाकडे न छापलेलीं महाराष्ट्रीय कवींचीं काव्यें असतील तर तीं आमचेकडे पाठविल्यास आमचेवर फार उपकार होतील."

ह्या मासिकाच्या पहिल्या अंकापासून मोरोपंत, वामन पंडित, मुक्तेश्वर, आनंदतनय नि अमृतराय ह्यांची कविता क्रमशः प्रसिद्ध करण्याचा उपक्रम सुरू झाला.

हा स्तुत्य उपक्रम उत्साहपूर्वक नि निष्ठापूर्वक सुरू झाला. मालक नि संपादक ही जोडगोळी किती नामी होती! सुंदर छपाई, वळणदार टाईप आणि त्यांच्या जोडीला जनार्दनपंत मोडक ह्यांच्यासारख्या चोखंदळ संपादकाचें संपादन-कौशल्य! ह्या विद्वान् संपादक महाशयांच्या बाबतींत आणखी एक विशेष गोष्ट सांगण्यासारखी आहे. प्राचीन मराठी काव्याचा आस्वाद ज्यांनीं

नवनीताच्याद्वारें मराठी वाचकांकडून चाखविला, त्या परशुरामपंत गोडबोल्यांची एक अतृप्त आकांक्षा होती. ती कोणती?

त्यांच्या निधनानंतर त्यांच्या हातचा एक कागद उपलब्ध झाला असून त्यांत ते म्हणतात, "मराठी कवितांचा सुबोध अर्थ लिहावा, असें माझ्या मनांत बहुत वर्षांपासून आलें आहे; परंतु वेळ व द्रव्यबळ यांच्या कमताईमुळें, घडलें नाहीं. आतां असें मनांत येतें कीं, माझ्या आयुष्याचा काल थोडाच उरला आहे. तितक्यांत लोकोपकार बुद्धीनें मराठी कवितांचा सुबोध अर्थ होईल तितका लिहून ठेवावा. प्रतिमासीं एक ६४ पृष्ठांचें पुस्तक छापावें. त्यांत प्रथम वामनी किंवा मोरोपंती कवितांपैकी कांहीं प्रकरणें घेऊन त्यांचा सुबोध अर्थ लिहावा." *

ही त्यांची अंमलांत न येऊं शकलेली आकांक्षा शेठ जावजी दादाजी ह्यानीं जनार्दनपंत मोडक ह्यांच्यासारख्या समर्थ संपादकास हाताशीं धरून पार पाडण्याचा उपक्रम सुरू केला.

मोरोपंत असो वा वामन पंडित असो, त्यांच्या प्रत्येक कवितेतील शब्दार्थ सर्वसाधारण वाचकांस समजेल नि त्यांना काव्यवाचनाची गोडी लागेल, ह्या दृष्टीनें तळटीपांच्याद्वारें जरूर तो खुलासा करावयाचा, असें धोरण, मोडक ह्यानीं प्रथमारंभापासून स्वीकारलें होतें.

प्राचीन कवींची कविता मुद्रण-कलेच्या सहाय्यानें प्रकाशांत आणीत असतां, तिचें शुद्ध स्वरूप बिघडूं द्यावयाचें नाहीं. पाठ बरोबर तपासून नि जुळवून अर्थाचा अनर्थ होणार नाहीं, किंवा कवीला अभिप्रेत असलेल्या अर्थाहून भिन्न अर्थ ध्वनित होईल असें करावयाचें नाहीं. पूर्वकालीन अनेक काव्यें शब्द न तोडतां किंवा विराम चिन्हांचा उपयोग न करतां लिहिलीं गेलीं आहेत. त्या काव्यांच्या नकला करीत असतां लेखकांकरवीं अनवधानामुळें, अज्ञानामुळें किंवा अन्य कारणांमुळें चुका घडणें स्वाभाविक होतें. त्या दुरुस्त करण्याची फार महत्त्वाची जबाबदारी संपादक नि प्रकाशक ह्यांच्यावर होती.

जावजी शेठजींच्या छापखान्यांत ज्या पोथ्या, पुराणें नि प्राचीन कवींच्या काव्यांचे ग्रंथ प्रसिद्ध झाले, त्यांना सुंदर छपाईमुळे महत्त्व प्राप्त झालें, एवढेंच

* मराठी संशोधन पत्रिका : वर्ष १, अंक पहिला, आक्टो. १९५२

नव्हे तर तेथें त्यांचें तज्ज्ञांकरवीं संशोधनपूर्वक शुद्धीकरण झालें; आणि या शुद्धीकरणाचें महत्त्व भारी आहे.

येथें १।२ उदाहरणें नमुन्यादाखल दिल्यास आमच्या म्हणण्याचें महत्त्व पटेल असें वाटतें. श्रीधर कविकृत रामविजय ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. त्यांतील पवित्र कथा बोधपर नि आनंददायक आहेत. भाविक लोक त्या ग्रंथाचें वाचन सामुदायिकरीत्या करण्यांत पुण्यांश आहे, असें मानतात. पूर्वी छापलेल्या ह्या ग्रंथाच्या प्रतींत शब्द तोडून वेगवेगळे लिहिले नसल्यामुळें, कित्येक ठिकाणीं अर्थबोध होत नसे नि कुठें कुठें तर अर्थाचा अनर्थही होत असे! त्या ग्रंथांत 'मार्गी चालला ऋषींचा भार' असा एक चरण आहे; परंतु तो चरण वाचतांना, पूर्वी "मार्गी चालला ऋषी चांभार" असें वाचावें लागत असे! येथें ऋषींच्या घोळक्यांत चांभार कसा घुसला? वाचकानें त्यापासून कोणता अर्थ शोधून काढावयाचा नि कोणता बोध घ्यावयाचा?

ह्या आणखी दुसऱ्या एका ग्रंथांतील एक चरण पहा! 'धृतराष्ट्राच्या वंशवना, कां दावाग्नी लाविशी' ह्या शुद्ध चरणाऐवजीं 'धृतराष्ट्राच्या ऊंसवना, कांदा वांगीं लाविशी!' असा हास्यास्पद नि अशुद्ध पाठ पूर्वी वाचावा लागत असे.

दुर्दैव वाचकांचें आणि दुसरें काय? सध्यांचे दिवस अन्नटंचाईचे आहेत. सध्यां तरी उसापेक्षां कांदा आणि वांगीं ह्यांचें जास्तींत जास्त पीक काढण्याकडे शेतकऱ्यांचें लक्ष वळावें, ह्यासाठीं सरकारकडून जरूर तें उत्तेजन देण्यांत येत आहे. ह्या काळांत ऊंसाच्या वनांत कांदे नि वांगीं लावण्याचीच पाळी आली आहे. तो अशुद्ध चरण मूलभूत अर्थाच्या दृष्टीनें जरी हास्यास्पद असला तरी आज मात्र त्यांतून फायदेशीर अर्थ काढणें शक्य झालें आहे!

अशीं अशुद्ध नि अर्थाचा अनर्थ करणारीं कितीतरी उदाहरणें देतां येण्यासारखीं आहेत; परंतु ह्या १।२ शितांवरून जावजी शेठजींच्या निर्णयसागर मुद्रणालयांत शिजून तयार होणाऱ्या परिपक्व नि पाचक शुद्ध भाताची सहज कल्पना करतां येणार आहे.

आणि खरोखर 'काव्य-संग्रह' म्हणजे काव्यप्रेमी रसिकांस पंचपक्वान्नांप्रमाणें आनंददायक वाटत असे. 'काव्येतिहास-संग्रह' बंद पडून जनार्दनपंत

मोडक ह्यांच्या कार्याला खंड पडल्यामुळें महाराष्ट्रांतील अनेक रसिक वाचक निराश झाले होते; परंतु जावजी शेठजींनीं पुढें येऊन तो तुटलेला सांधा काव्यसंग्रह मासिकाच्या रूपानें पुन्हां जोडून त्याला अखंडत्व आणल्याबद्दल वाचक त्यांच्यावर अभिनंदनाचा वर्षाव करूं लागले; वर्गणीदारांची संख्या झपाट्यानें वाढूं लागली. त्यामुळें जन्मदात्या जावजीशेठजींचा हुरूप वाढीला लागला असल्यास त्यांत नवल कसलें ?

परंतु ह्या आनंद फार दिवस टिकावयाचा नव्हता. त्याच्यावर आकस्मिक आघात व्हावयाचा होता ! जो आघात झाला तो दुर्धर नि जाणवण्यासारखा होता. कार्यारंभ होऊन उणेंपुरे तीन महिने लोटले असतील नसतील, तोंच संपादक जनार्दनपंत मोडक ह्यांच्यावर कठोर काळानें झडप घातली व त्यांना उचलून नेलें !

किती दुर्दैवी घटना होती ही ! घटना कशीही असो. तिला धैर्यानें तोंड देऊन पुढील मार्ग सुधारणें जरूर होतें. हातपाय गाळून कसें चालेल ?

जेव्हां एकाद्या सत्कार्याची जबाबदारी आपण स्वीकारतों तेव्हां तें कार्य आपलें रहात नाहीं. तें जनताजनार्दनाचें नव्हे, देवाचें कार्य होऊन राहात असतें. तें झटून पार पाडीत असतां संकटें आलीं तरी तो परम दयाघन कोणत्या ना कोणत्या मार्गानें तें कार्य पार पाडीत असतो. त्याच्यावर आणि कार्यावर आपली संपूर्ण श्रद्धा मात्र असली पाहिजे.

जावजीशेठना ह्या पवित्र कार्याचें अखंडत्व राखावयाचें होतें व ईशकृपेनें तें राखलें गेलें. त्यांच्या हाताशीं विनायक कोंडदेव ओक, रामभाऊ गुंजीकर ह्यांच्यासारखी त्या कार्यासंबंधीं आत्यंतिक आस्था बाळगणारीं विद्वान माणसें होतीं. त्यांच्या सल्ल्यानें काव्य-संग्रहाचे संपादक ह्या नात्यानें सर्व परीनें योग्य माणसाची निवड त्यांना तडकाफडकी फारसे प्रयास न पडतां करतां आली.

वामन दाजी ओक ( १८४५–१८९७ ) हे त्या काळांतील एक जाडे विद्वान होते. प्राचीन संतवाङ्मयाचा अर्थात् मराठी काव्याचा त्यांचा व्यासंग सखोल नि चतुरस्र होता. ह्या क्षेत्रांतील त्यांच्या विद्वत्तेची धार तीक्ष्ण तशीच

नेत्रदीपक होती. विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांच्यासारख्या तत्कालीन जाड्या विद्वानाशीं मोरोपंती काव्याच्या बाबतींत दोन हात करून त्या वादांत त्यांनीं जय नि लौकिक मिळविला होता. विविधज्ञान–विस्तार, काव्येतिहास–संग्रह, सद्धर्म-दीप, दंभ-हारक वगैरे मासिकांतून प्रसिद्ध झालेले त्यांचे काव्यविवेचनात्मक नि विशेषतः ग्रंथ परिक्षणात्मक लेख त्यांच्या विद्वत्तेची साक्ष पटविणारे होते. काव्यविवेचनांत त्यांचा हातखंडा होता, एवढेंच नव्हे तर ते स्वतः कवि होते. मराठी आणि संस्कृत ह्या दोन्हीं भाषा त्यांच्या घरीं पाणी भरीत होत्या. ते ना. जगन्नाथ शंकरशेठ 'स्कॉलर' होते. संकृत भार्षेतील प्राविण्यामुळें त्यानीं डॉ. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांची मर्जी संपादन केली होती. 'श्रीमन्माघव निघन' व इतर काव्यामुळें त्यांच्या रसिक कविहृदयाची सर्वांना कल्पना झालेली होती. कादंबरीकथासार, वासवदत्ता कथासार नि बेकनचें चरित्र, ह्यासारख्या ग्रंथांमुळें मान्यवर लेखकांत त्यांची गणना होऊं लागली होती.

एकंदरींत कवि, काव्यसमीक्षक नि लेखक ह्या त्यांच्या भूमिका डोळ्यांत भरण्यासारख्या होत्या; परंतु त्याहीपेक्षां त्यांच्या स्वभावांतील नि दैनंदिन यागणुकींतील एक पैलू विशेष झगझगींत नि त्यांच्या जीवनाला सात्वीक शोभा आणणारा होता. असा कोणता तो पैलू? त्यांना विद्वत्तेचा बिलकूल अहंकार नव्हता. आपल्या श्रमाचा पैशाच्या रूपानें योग्य नि भरपूर मोबदला घेईन तेव्हांच काम करीन, हें आजच्या काळांतील बाणेदारपणाचें वारें त्यांच्यांत शिरलें नव्हतें! त्यापासून ते फार दूर होते.

काव्य-संग्रहाच्या मालकाकडून त्यांना आदरपूर्वक आमंत्रण करण्यांत आलें तेव्हां तें काम स्वीकारण्यांत माझा आर्थिक फायदा किती, ह्याचा त्यानीं विचार केला नाहीं. 'काव्य-संग्रह' चालविण्याची जबाबदारी स्वीकारण्यांत लोक-कल्याण आहे, लोकशिक्षणास वाहून घेण्याची नि संत कवींची सेवा करण्याची, ही बहुमोल संधी मिळत आहे व ती आपण स्वीकारणें, हेंच आपलें कर्तव्य. अशा कार्यांत मोबदल्याकडे पहावयाचें नसतें. येथें प्राप्ति कसली होणार? परंतु परिश्रम मात्र भरपूर करावे लागणार, ह्याची त्यांना पूर्ण

जाणीव होती; परंतु आपल्या आवडीच्या विषयासाठीं किंतीही खपावें लागलें म्हणून काय झालें? त्यापायीं प्राप्त होणाऱ्या सात्वीक आनंदाची तुलना कोणत्याही गोष्टीशीं करतां येणार नाहीं. तो आनंद हेंच आपलें पारितोषिक. जो कांहीं थोडा मुशाहिरा मिळेल त्याची भरपाई ह्या आनंदानें साधावयाची, अशी होती त्यांची त्यागी नि उच्च विचारसरणी!

वामनरावांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील हेदवी नामक गावीं १८४५ सालीं झाला. शिक्षणक्रम संपवून त्यानीं शिक्षकी पेशा स्वीकारला नि तो उत्तमप्रकारें शोभविला. नागपूर सिटी हायस्कूलचे नि संबळपूर हायस्कूलचे मुख्याध्यापक ह्या नात्यानें त्यानीं त्या भागांत चांगलें नाव मिळविलें.

एवंगुणविशिष्ट वामनराव ओकानीं जनार्दनपंत मोडक ह्यांच्या निधनानंतर १८९० सालीं काव्यसंग्रह मासिकाची संपादकीय जबाबदारी शिरावर घेतली व ती जबाबदारी त्यानीं आपल्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत अभिनंदनीय रीतीनें सांभाळली. काव्य-संग्रहाचा लौकिक नि उपयुक्तता त्यानीं वाढविली, एवढेंच नव्हे, तर त्यानीं प्राचीन मराठी कवितार्थ किती खोल आहे, ती कविता कशी सालंकृत नि अभ्यासनीय आहे, हें आपल्या विद्वत्तेच्या बळावर सर्वांना पटवून दिलें. 'मराठी भाषेंतल्या कवितांत कांहीं अर्थ नाहीं; त्या उपेक्षणीय आहेत', असा जो ग्रह फार दिवसापासून कांहीं लोकांच्या मनांत घर बांधून राहिला होता, त्या खोट्या ग्रहाला त्यानीं सुरुंग लाविला. आणि त्या जागीं प्राचीन मराठी कविता उपेक्षणीय नाहीं तर ती आदरणीय नि विश्वविद्यालयाच्या उच्च प्रतीच्या परिक्षांसाठीं नेमण्यासारखी आहे, अशी त्यानीं सर्वांची खात्री पटवून दिली.

मराठी काव्यवाङ्मयाच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें त्यांच्या हातून पार पडलेली ही बहुमोलाची कामगिरी होती. मोरोपंत हा तर वामनरावांचा अत्यंत आवडता कवि. त्यांच्या काव्यांतील प्रत्येक शब्दाचें अंतर अधिकाधिक खोलांत शिरून ते शोधीत असत. त्यांच्या ह्या संशोधन-वृत्तीबद्दल लिहितांना एका लेखकानें म्हटलें आहे की, "मोरोपंत हे आपल्या काव्यांवरच्या वामनरावांच्या हातच्या टीपा पहाण्यास आज जिवंत असते तर त्यानींही वामनरावांस मोठ्या

आनंदानें धन्यवाद दिले असते; कारण त्यांच्या जें पोटांत होतें, तेंच वामनरावांच्या ओठांत आलेलें त्यांस आढळलें असतें. "१

काव्य-संग्रहाद्वारें प्रसिद्ध होणाऱ्या प्राचीन काव्यावरील वामनराव ओकांच्या टीपा वाचणें, ही काव्यप्रेमी रसिकांस एक मेजवानीच होती; कारण ते कठीण शब्दांचा सुटसुटीत अर्थ देऊन थांबत नसत. ज्यामुळें सहज रीतीनें वाचकांचें पौराणिक नि वैदिक इतिहासाचें ज्ञान वाढेल नि त्याचबरोबर त्यांचें अलंकार-शास्त्राचें नि शब्दव्युत्पत्तीचेंही ज्ञान हंसत खेळत वाढत जाईल, असें त्यांच्या टीपांचें व्यापक स्वरूप असे.

काव्य-संग्रहाचे संपादक ह्या नात्यानें वामनराव ओक ह्यांनीं काव्यप्रेमी मराठी वाचकांचें लक्ष स्वतःकडे वेधून घेतलें होतें तें उगाच नाहीं. काव्य-संग्रहाचें ध्येय नि धोरण व्यापक होतें. 'सर्व-संग्रह' व 'काव्येतिहास-संग्रह' ह्या मासिकांतून मोरोपंत, वामनपंडित व मुक्तेश्वरादि कवींचीं जीं काव्यें प्रसिद्ध झालीं, त्यांचें सार्थ टीपांसह पुनर्मुद्रण, अप्रसिद्ध काव्यांचें मुद्रण नि संशोधन हें कार्य एकसमयावच्छेदेंकरून चालू झालें. तो ६।७ वर्षांचा काळ काव्यप्रेमीजनांस खरोखर मोठा मजेचा गेला.

'विविधज्ञान-विस्तार', 'इंदु-प्रकाश' नि तत्कालीन इतर मासिकांतून व वृत्तपत्रांतून काव्य-संग्रहाच्या कामगिरीबद्दल प्रशंसापर अभिप्राय प्रसिद्ध होऊं लागले.

काव्य-संग्रहाची ५।६ वर्षांतील अभिनंदीय कर्तबगारी पाहून विविधज्ञान-विस्तारच्या विद्वान संपादकांनीं लिहिलें होतें कीं, "काव्येतिहास-संग्रहासारखें उपयुक्त मासिक बंद पडल्यानंतर शिल्लक राहिलेले ऐतिहासीक लेख व संस्कृत मराठी काव्यें प्रसिद्ध करण्याचा मार्ग खुंटला; परंतु संस्कृत व मराठी काव्यें प्रसिद्ध करण्याचें कार्य जावजी शेठनीं स्वीकारलें. कोणतेंही एकादें कार्य उपयुक्त नि लोकहिताचें आहे, अशी जावजींची एकदां खात्री झाली म्हणजे तात्कालिक फायद्याकडे लक्ष न देतां तें काम अंगावर घेऊन करण्याची त्यांची उत्सुकता मोठी तारीफ करण्यासारखी होती. संस्कृत हस्तलेख शुद्ध करून आणि अवश्य त्या टीपा देऊन तयार करण्याचें काम महामहोपाध्याय पं. दुर्गाप्रसाद

१ बालबोध: जुलै १८९७ ले. वि. कॉ. ओक

यानीं पत्करलें व मराठी काव्यासंबंधानें तें काम जनार्दनपंत मोडक यानीं स्वीकारलें. अशा दोघां विद्वान संपादकांच्या देखरेखीखालीं काव्य-माला व काव्य-संग्रह अशीं दोन मासिकें निर्णयसागर प्रेसमधून बाहेर पडूं लागलीं. पुढें मोडक लौकरच वारले. ज्योतिष हा त्यांचा अत्यंत आवडता विषय. त्याच्या खालोखाल मराठी कविता.

"पुढें जावजीशेठ ह्यांच्या सद्दीचा जोरच असा कांहीं विलक्षण होता कीं, त्यांस ह्या कामासाठीं जो गृहस्थ मिळाला तो मोडकांपेक्षांही कांकणभर सरस असाच मिळाला. मोरोपंतांच्या कवितेसंबंधानें त्यानीं निबंधमालाकाराशीं जो वाद लढविला, त्यावरून त्यांची विद्वत्ता दिसून आली........... चालकांस अलिकडे काव्य-संग्रहापायीं हजार बाराशें रुपयांचा तोटा सोसावा लागत आहे. आम्हीं काव्य-संग्रह जिवंत ठेवणें जरूर आहे."[1]

शेवटी वर्गणीदारांस नि संस्थानिकांस उद्देशून कळकळीची विनंती करण्यांत आली आहे.

काव्य-संग्रहासारख्या प्राचीन मराठी काव्य-प्रकाशनास सर्वस्वीं वाहिलेल्या भारदस्त मासिकाचे वर्गणीदार किंवा वाचक भरमसाट कुठून असायचे? त्यांची संख्या परिमीतच असायची. तरीही वामनराव ओक ह्यांच्या कारकिर्दीत ह्या मासिकाच्या वर्गणीदारांचा आकडा सहाशें पलिकडे गेलेला होता. रसिक, काव्यप्रेमी नि विद्वान वाचकांत मासिकाचा मुक्तकंठानें बोलबाला होऊं लागला होता.

लोकमताचा वारा कोणत्या दिशेनें वहात आहे हें समजून यावें, ह्या हेतूनें मधून मधून वाचकांकडून येणारे अभिप्राय प्रसिद्ध करण्यांत येत असत. जावजी शेठजींना नि त्यांच्या चिरंजीवांना त्यामुळें समाधान वाटणें स्वाभाविक होतें.

नमुन्यादाखल कांहीं अभिप्राय सारांशरूपानें येथें देण्यांत येत आहेतः— उज्जयनी येथून बळवंतराव कमळाकर हे लिहितात कीं—"आपण महाराष्ट्रीय कविवर्गाच्या रमणीय कृतींचा जीर्णोद्धार करण्याचें काम चालविलें आहे, ह्याबद्दल

१ विविधज्ञानविस्तारः पुस्तक २८ वें जाने. फेब्रु. १८९६

आपली जितकी प्रशंसा करावी तितकी थोडीच होईल. आपल्यासारख्यानें हें कार्य हातीं घेतलें नसतें तर महाराष्ट्र कविवर्गाच्या कृतींचा अस्तच होण्याचा समय आला होता. तो आपल्या ह्या सद्‌ुद्योगानें चुकला, हे आपले आम्हां महाराष्ट्रीयांवर, आमच्या भाषेवर व देशावर चिरस्मरणीय उपकार आहेत."[१]

श्रीधरपंत (नागपुर, हिस्लाप कॉलेज) हे लिहितात कीं, "आपलें काव्य-संग्रह पुस्तक वाचून व त्यांतील मकरंद सेवून तल्लीन झाल्यामुळें, होणाऱ्या आनंदाची वार्ता आपणास कळवावी असें वाटून हें पत्र लिहित आहें. तुम्हीं प्रमुख महाराष्ट्र कवींच्या उद्धाराचें जें कार्य हातीं घेतलें आहे व जें तुम्ही प्रतिमासीं उत्तमप्रकारें पार पाडीत अहांत, त्याबद्दल आपले अखिल महाराष्ट्र मंडळावर चिरस्मरणीय उपकार आहेत. त्याची फेड प्रत्येक रसिक व स्वत्वाचा अभिमान बाळगणारा महाराष्ट्र-पुत्र स्वपरहस्तें आपल्या पुस्तकास आश्रय देऊन करीलच. ह्या आपल्या 'संग्रह' वाचनानें मजप्रमाणें माझ्या इतर पुष्कळ विद्यालयीनबंधूंत महाराष्ट्र कवींविषयीं आदरबुद्धि उत्पन्न होईल व स्वभाषेविषयीं त्यांच्या मनांत प्रेम उत्पन्न होऊन तिच्या उन्नत्यर्थ ते कायावाचामनेंकरून झटतील अशी पूर्ण आशा आहे."[२]

'काव्य-संग्रह' म्हणजे त्रिवेणी संगम. मालवण येथून अनंत सी. देसाई ह्यानीं अभिनंदनपूर्वक लिहिलें होतें कीं, "कविवर्यांची वाणी, ओकांची टिप्पणीसह तपासणी व निर्णयसागरची सुंदर छापणी, हीं एके ठिकाणीं जुळल्यावर तेथें दोषांचें नावच घ्यायला नको. आपल्या नुमला छपाईकडे पहातच रहावें असें वाटतें."[३]

काव्य-संग्रहाच्या वाचनानें कित्येकांस काव्यरचनेची स्फूर्ति होऊं लागली. व्यंकटेश यशवंत गिंगवळ, नवीन गोवें, ह्यांचा काव्यमय अभिप्राय पहाः—

"नोहे पुस्तक काव्यसंग्रह गमे गंभीर रत्नाकर
या सद्‌ग्रंथ परीक्षणासि लिहितां साशंक होतो कर
उड्डाणें करितां विहंगम परी आत्मानुरूपें नभीं
तैसा हा जनही परीक्षण यथामत्या कराया न भी
जैसा पूर्ण सुधांशुचा उदय तो प्रत्येक मार्सी जना

१ काव्यसंग्रह: नोवेंबर १८९१
२ ,, जुने १८९२
३ ,, जुने १८९३

यादे नूतन सुधारसा प्रसरितां संतोषदायी मना
हाही निर्णयसागरीं प्रकटुनी प्रत्येक मासीं तसा
भेटे उत्सुक वाचकां रिझवी जो काव्यामृतें मानसा
पूर्वी आदि कवी निजाश्रमिं जसा संरक्षि सीता सती
तैसा तीसहि जावजीसुत तुकारामाख्य तो संप्रतीं
अर्थालंकृत भूपवी नटवि सद्रंगीं सदा वामन
ऐशा सत्कृति सुंदरीस मग कां लोभें न पाहे जन' ?

काव्यामृताचा आणखी एकादा गोड घुटका घ्यावा असें नाहीं वाटत आपणाला ? मग हा घ्या :—बापूजी लक्ष्मण कुळकर्णी, विंचूर, ह्यानीं आपल्या काव्यमय अभिप्रायांत वाचकांस विनविलें होतें कीं—

"' काव्यार्थाचा बोधक वामनसा, तेंवि काव्यसंग्रहसा
संग्रह, मुद्रणयंत्रालयहि असें नच मिळेल हो सहसा
यास्तव अनर्घ्य संधी दवडूं नये ही गुणज्ञ लोकांनीं
हा संग्रह निजसंग्रहिं ठेवावा खाउ जेंवि तोकांनीं "

आणखी एकच अभिप्राय देऊन हें पुराण संपवायचें आहे. रघुनाथ रामचंद्र मुजूमदार ( पुणें ) ह्यानीं लिहिलें होतें कीं, " कै. शेठ जावजीनीं महाराष्ट्र भाषेवर व तिचें अध्ययन लक्षपूर्वक करणाऱ्यांवर, तिच्यांतील अत्युत्तम कवींनीं रचलेल्या .ग्रंथांचा जीर्णोद्धार करण्याचा उपक्रम केल्यापासून कधींही न फिटणारे उपकार केले आहेत, असें म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होईल असें वाटत नाहीं. 'मराठी भाषेंत काव्येंच नाहींत. मग ती विश्वविद्यालयांतल्या फ्रेंच, जर्मन, पोर्तुगीज इत्यादि भाषांच्या जोडीस बसण्यास कशी योग्य होईल !'–असें म्हणणाऱ्या आंधळ्या फेलोंच्या डोळ्यांत आपल्या काव्य-संग्रहानें चांगलेंच अंजन घातलें आहे."[३]

अशारीतीनें काव्यसंग्रहाच्या मालकांचें व संपादकांचें ज्ञाल्या रसिकांकडून सर्वत्र अभिनंदन होऊं लागलें. पहिलीं दोन वर्षें त्या अभिनंदनाचा नि कौतुकाचा आस्वाद जावजी शेठजीनीं मनमुराद घेतला. त्यानंतर त्यांचे चिरंजीव तुकारामशेट नि पांडुरंगशेट ह्या उभयतांनीं 'काव्य-संग्रह' हा आपला पाठचा भाऊ आहे असें मानून त्याला कोणत्याही प्रकारची उणीव भासूं दिली नाहीं.

१ काव्य संग्रहः जुलै १८९२
२ ,, ऑगष्ट–१८९२
३ ,, जुलै–१८९३

ह्या मासिकाचे संपादकीय सूत्रधार होते वामनरावजी ओक. तेही त्यांच्या उत्कर्षासाठीं आपला सारा जीव आटवीत होते. आपली सारी बुद्धिमत्ता नि विद्वत्ता ह्या अंगीकृत कार्यासाठीं ते राबवीत होते. काव्य-संग्रहाला एवढी वैभवश्री प्राप्त झाली ती उगाच नाहीं.

'काव्य-संग्रह' आतां चालता, बोलता नि आपल्या लीलांनीं सर्वांना रंजविता झाला होता. परंतु सगळे दिवस कांहीं सारखे नसतात. काव्यसंग्रहाचा सर्वत्र बोलबाला चालू असतां १८९७ च्या जून महिन्यांत वामनरावजींना देवाघरचें बोलावणें आलें !

एक देदिप्यमान् रत्न एकाएकीं दृष्टीआड झालें ! आपल्या आवडत्या कार्यांत गुंतले असतां त्यांना नवज्वरानें गांठलें ! त्याचें असें झालें. ह्यापूर्वीच सांगितल्याप्रमाणें मोरोपंत हे त्यांचे आत्यंतिक आवडते कवि. त्यांचीं कांहीं दुर्मिळ काव्यें पंढरपुरांत असल्याचें समजल्यावरून ते तिकडे धांवत गेले. वाटेंत थंडीवाऱ्याचा त्रास झाला. त्यांतूनच नवज्वराची निर्मिती झाली.

काव्य-संग्रहाचे जनक जावजीशेठ ह्यांच्या निधनानंतर कविवर्य केशवराव फणसे ह्यांनीं त्यांच्या चिरंजीवांस कांहीं सांत्वनपर व गौरवपर आर्या रचून पाठविल्या होत्या. त्यांत त्यांनीं अशी अपेक्षा प्रगट केली होती कीं,

"एका जावजिबद्दल प्राप्त जाहले अम्हां जनां दोन
ऐसें म्हणतिल जेणें, जनीं असा तेंवि आज नांदोन
जो हेतुसंघ राहे, अपूर्ण तो करुनि पूर्ण जावजिचा
मिळवा अखंड कीर्ति उद्योगि नरावरीच भाव जिचा"

जावजीशेठजींचें धोरण नि वळण त्यांच्या दोन्हीं पुत्रांनीं बरोबर आत्मसात् केलें होतें. त्यामुळें त्यांचीं पावलें त्यानीं आखून दिलेल्या मार्गानें सरळ पडत होतीं. कुठें जरा पाय घसरलाच तर सावरायला जावजीशेठच्या काळचे सल्लागार जवळ होतेच. ती तर त्यांची मोठ्यांत मोठी कमाई होती आणि ती तुकारामशेठ व पांडुरंगशेठ ह्यांना वेळोवेळीं जागवीत होती. त्यामुळें सर्वांना वाटे कीं, एक जावजीशेठ गेले तरी त्यांच्यामागें एकाऐवजीं दोन जावजीशेठजींचा आपणास लाभ झालेला आहे.

परंतु वामनराव ओकांच्या बाबतींत तसें म्हणतां येण्यासारखें

परिस्थिति नव्हती. विद्वत्तेच्या, व्यासंगाच्या नि काव्यार्थ निरूपणाच्या बाबतींत वामनरावांसारखे वामनरावच होऊन गेले!

आतां त्यांची जागा भरून काढण्यासाठीं त्याच तोलामोलाचा संपादक कुठें शोधायचा? वामनराव ओकानीं 'काव्य-संग्रह' मासिकाचें यशस्वी संपादन सुमारें सात वर्षें केलें आणि आपल्या अजोड कर्तृत्वाच्या बळावर प्राचीन काव्य-वाङ्मयाकडे पहाण्याच्या जनतेच्या दृष्टींत त्यानीं क्रांतिकारक थोरपालट घडवून आणिला.

त्यानंतर वर्षानुवर्ष वाढत्या प्रमाणांत नुकसान सोसावें लागत होतें तरीही आपल्या पूज्य वडिलानीं लोकशिक्षणाचें नि जनता-उद्धाराचें एक पुण्यकार्य म्हणून जें झीज सोसून चालविलें तें कार्य स्थगित न करतां त्यांच्या चिरंजीवानीं उणींपुरीं बारा वर्षें पुढें चालविलें. नारायण चिंतामण केळकर बी. ए., बाळकृष्ण अनंत भिडे बी. ए, दामोदरपंत ओक ( वामनरावांचे पुतणे ) ह्यांच्यासारखे विद्वान त्या काळांत संपादक ह्या नात्यानें वेळोवेळीं लाभले; परंतु वामनराव ओक ह्यांच्या निधनामुळें काव्य-संग्रहाचें जें वाळसें एकदां नाहींसें झालें, तें कांहीं त्याच्या वाट्यास पुनरपि आलें नाहीं! मागें सांगितल्याप्रमाणें वामनरावांच्या कारकिर्दीत वर्गणीदारांचा आकडा सहाशेंच्या पलिकडे गेलेला होता, तो घटत घटत दोनशेंवर येऊन ठेपला! आणि त्यांतही वर्षेंच्या वर्षें वर्गणी न पाठविणारे महाभाग बहुसंख्य होते! माणसानें कुठवर त्याग करायचा? धीर कुठवर धरायचा? प्रत्येक गोष्टीला कांहीं ना कांहीं मर्यादा असते.

निर्णयसागर-मुद्रणालय ही कांहीं धर्मार्थ उघडलेली पाणपोई नव्हती. स्वार्थ साधून त्याचबरोबर साधल्यास परमार्थही साधावा, ही होती चालकांची दृष्टि. तेथें लोकशिक्षणाचीं व लोकोद्धाराचीं दुसरीं अनेक कार्यें चालू होतीं. वर्षानुवर्ष खर्चाचें प्रमाण नि कारखान्याचा पसारा वाढत चालला होता. अशा स्थितींत व्यवहाराचें गाठोडें खुंटीवर गुंडाळून ठेऊन कसें चालेल? आंतबट्ट्याचा नि अंत पहाणारा व्यवहार आणखी किती दिवस चालू ठेवायचा?

काव्य-संग्रहानें आतां चौदा पंधरा वर्षांची मजल गांठली होती. तत्पूर्वी त्याच ध्येयानें निघालेलीं 'सर्व-संग्रह' नि 'काव्येतिहास-संग्रह' ह्या मासिकांचें वयोमान लक्षांत घेतां, काव्य-संग्रहानें बरीच मोठी नि पुढची मजल मारलेली होती

काव्य, परिस्थिति नि लोकाभिरुची बदलत चालली होती. अशा मासिकाची उपयुक्तता नि महत्त्व लक्षांत घेऊन सरकारनें शाळा किंवा वाचनालयें ह्यांच्यासाठीं तीन चारशें प्रती घेण्याचें मनावर घेतलें असतें किंवा एखाद्या संस्थानिकानें ह्या कार्याकडे आपली कृपादृष्टि वळविली असती तर तुकाराम शेठजींनीं हें कार्य बंद न पाडतां तें पुढें दीर्घकाळ चालू ठेविलें असतें. सरकार बोलून चालून परकी! त्याला आमच्या प्राचीन नि मौल्यवान् वाङ्मय-ठेव्याचें कांहींच सुयरसुतक नव्हतें! आणि संस्थानिक? त्यांना स्वतःच्या ऐषआरामापुढें व चैनबाजीपुढें काव्य-वाङ्मयप्रकाशन-कार्य तुच्छ वाटत होतें!

एकट्या तुकाराम शेटजींनीं सत्कार्याचा भार कुठवर नि कशारीतीनें वहावयाचा? त्यांचा नाइलाज झाला. त्यांनीं नाना प्रयत्न करून पाहिले. परंतु जरूर तो प्रतिसाद मिळूं शकला नाहीं आणि शेवटीं १९०९ सालीं त्यांनीं 'काव्य-संग्रह' बंद करण्याचा निर्णय घेतला! हा निर्णय घेतांना त्यांना पराकाष्ठेचें दुःख झालें! १९०९ सालच्या जानेवारींत काव्य-संग्रहाचा १६१ वा अंक प्रसिद्ध झाला. त्या अंकांत आपल्या वेदना त्यांनीं पुढील शब्दांत प्रगट केल्या आहेतः—"आतांपर्यंत आश्रयवृद्धीची वाट पाहून पाहून दमलों आहोंत; आणि पैशांच्या अतिशयांत घर्षानें अगदीं टेकीस आलों आहोत........'काव्य-संग्रह' यापुढें चालविणें म्हणजे कसरीच्या खायास भर घालणें आणि विनाकारण खर्चाम्लालीं येणें आहे. तें आम्हांस आतां पुरवत नाहीं. झालें तेंच अतिशयित जीवाभारी झालें आहे. ह्याकरितां तें आतां बंद करणें आम्हांस भाग पडत आहे. येथें आमचा निरुपाय आहे............घस अल्पस्वल्प असती तर तीही सोशिली असती; परंतु ती अल्पस्वल्प नाहीं; फार मोठी आहे. सहन होण्यासारखी नाहीं. अशा स्थितीमध्यें आम्हीं 'काव्य-संग्रह' बंद करण्याचा खरोखर अत्यंत दुःखप्रद निश्चय मोठ्या संकटानें केला आहे."

त्यानंतर आणखी शेवटचा एक म्हणजे १६२ वा अंक प्रसिद्ध होऊन, 'काव्य-संग्रह' काव्यप्रेमी नि रसिक वाचकांच्या दृष्टीआड झाला! हा वियोग अनेकांस परोपरीनें जाणवला. त्यांपैकीं अनेकांनीं आपला दुःखावेग गद्याच्या व पद्याच्याद्वारें प्रगट केला.

'मुकुंदराय' ह्या नावाचे एक थोर कवि महाराष्ट्रांत होऊन गेले. त्यानीं 'काव्य-संग्रह-वियोग' ह्यावर अत्यंत रसाळ नि काव्य-संग्रहाच्या कामगिरीची थोडक्यांत यथायोग्य जाणीव करून देणाऱ्या पन्नास आर्या रचिल्या आहेत. त्यांपैकीं केवळ नमुन्यादाखल ५।१० आर्या येथें देण्याचा मोह ह्यावेळीं आवरणें आम्हांला कठीण झालें आहे.

ते म्हणतात:—

* "आजवरी अमित कवी आणियले त्वां महोद्यमें उदया
सरलें पुण्यचि असुचें यास्तव नुपजे दया तुला सदया
दुर्लंघ्य मयूराचा भारतसागर गभीर विस्तीर्ण
तव टीकासेतु करी अबलांसहि त्यामधून उत्तीर्ण
परकीय भारतीनें ज्यांचीं उन्मत्त जाहली दृष्टी
अवमानी निज पूर्वज तीतें त्वां दाविली नवी सृष्टी
विद्वत्पूज्य रसिकवर अतंद्रितें[1] वामनाख्य ओकानें
केले श्रम भाषोन्नति होण्याला शारदांक-तोकानें
साहित्य शास्त्रवर्ती शब्दार्थालंकृती यथासमर्थी
प्राकृत लोकां दावुनि केली तद्बुद्धि तूंचि सारमयी[2]
काव्योद्धारक अद्यावधि कितिक ग्रंथ थोर अवतरले
परि अज्ञ लोक सखया! साहाय्यानें तुझ्या भवधि तरले
श्रेष्ठि श्रेष्ठ न कैसा मान्य तुकाराम जावजी मजला
प्रेमें पाळी चवदा वर्षें जो काव्यसंग्रहा तुजला
सत्पात्रिं दान करुनी जोडिसि तूं सुकृत हे तुकारामा
श्री गुणलुब्धा न तुला त्यजि जेंवी विलास हे तुका रामा"

काव्य-संग्रहाच्या कामगिरीसंबंधानें जितकें लिहावें तितकें थोडेंच आहे. ह्या प्रकरणांत मधून मधून तत्संबंधी दिग्दर्शन करण्यांत आलें आहेच. आरंभापासून निर्णयसागर-मुद्रणालयाचीं कांहीं विशिष्ट ध्येयें ठरून गेलेलीं आहेत. त्यांपैकींच जुन्या संतकवींचें वाङ्मय-प्रकाशन हें एक ध्येय आहे. पांडुरंगशेट चौधरी ह्यांच्याच शब्दांत त्या ध्येयाचें नि काव्य-संग्रहाच्या कामगिरीचें विशदीकरण येथे करणें योग्य होईल.

* विविध ज्ञान विस्तार जून १९०९ वर्ष ४० वें
१ अतंद्रित—चपळ, सावध   २ सारमयी-सारयुक्त

ते एका ठिकाणीं म्हणतात-'काव्य-संग्रहांत'[1] प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांस आम्हीं आपलीं भावंडें समजतों. त्यांतील कोणताही ग्रंथ नष्ट होऊं देणें आम्हांस इष्ट वाटत नाहीं. एकादि व्यक्ति गत झाल्यास ती सजीव करणें कोणाच्याही हातीं नाहीं पण कोणत्याही पुस्तकाचें पुनर्मुद्रण करून त्यास पुनर्जन्म देणें, ईश्वराच्या कृपेनें व वडिलांच्या पुण्याईनें, थोडेंसें आमच्या हातीं आहे. ह्याखेरीज आमचे प्राचीन कवि हे जसे काव्यकर्ते होते, तसेच ते संत व सत्पुरुषही होते, तेव्हां त्यांच्या अमोल काव्यांचें प्रकाशन हें जुन्या, मोडकळीस आलेल्या देवालयांच्या जीर्णोद्धाराइतचेंच पवित्र कार्य आहे, अशी आमची भावना असल्यामुळें, आम्हीं यथावकाश महाराष्ट्रांतील प्राचीन ग्रंथांचें पुनर्मुद्रण करीत असतों. 'काव्यसंग्रहांत' इ. स. १८९९ मध्यें छापलेल्या मुक्तेश्वरकृत विराट-पर्वाची नवीन आवृत्ति गेल्या वर्षी (१९३९) म्हणजे चाळीस वर्षांनंतर रा. दामोदरपंत ओक यांच्याकडून तयार करवून आम्हीं छापिली. वामन पंडितांच्या कवितांचा हा भाग देखील सुमारें ४४ वर्षांनीं पुनर्मुद्रित होत आहे. याप्रमाणें कोणत्याही पुस्तकाच्या प्रती संपतांच—त्या कितीही वर्षांनीं संपोत !—नवीन आवृत्ति काढून ती वाचनेच्छु सज्जनांच्या सेवेस आम्हीं सादर करीत असतों. मूळ आवृत्ति कितीही वर्षांनीं खलास होवो, ती कसरीचें खाद्य होऊं नये, एवढेंच आमचें पहाणें असतें."

त्यानंतर पुढें काव्य-संग्रहाचें अपूर्ण राहिलेलें ध्येय नि कामगिरी ह्यासंबंधीं पांडुरंगशेठ लिहितात कीं, "महाराष्ट्र काव्यप्रकाशनासंबंधीं ती. कै. जावजी व तुकारामजी यांचा व आमचा सगळा सकल्प सिद्धिस गेला नाहीं, याबद्दल आम्हांस वारंवार खेद होतो; परंतु प्रत्येक अंक १०० पृष्ठांचा असे १६२ अंक प्रसिद्ध झाले आहेत. त्यांत ६०।६२ जुने काव्य-ग्रंथ प्रसिद्ध करून आणि काव्यांवर अर्थ-निर्णायक टीपा वगैरे देऊन मोरोपंत, वामन, मुक्तेश्वर, आनंदतनय, अमृतराय, अनंत विठ्ठल इत्यादि श्रेष्ठ कवींच्या मुकृतींची अमोलिक भर काव्यसंग्रहाच्याद्वारें किती घातली गेली आहे, हें सुज्ञ जन-विश्रुत आहे. ही जी अल्पशी कामगिरी आमच्याकडून झाली आहे, तींतच आम्हीं समाधान मानून घेत आहों."

१ वामन पंडितकृत कवितासंग्रह—प्रकाशकाचें हृद्गत, ले. पांडुरंग जावजी चौधरी.

'काव्य-संग्रह' दिवंगत होऊन आतां ५०।५५ वर्षांचा काळ मागें पडला आहे. त्या कालखंडांत व सध्यांही प्राचीन काव्य-प्रकाशनाचे प्रयत्न कुठें ना कुठें चालू आहेत. आणि त्यांत नवल कसलें ? 'मागच्यास ठेंच पुढचा शहाणा'! शहाणपणाचें व सुधारणेचें पाऊल उत्तरोत्तर पुढें पुढें पडत जावें, हा नियतीचा नियमच आहे. आणि शिवाय आज ज्यांना आपल्या प्राचीन संत-वाङ्मयाचा अभिमान वाटतो व त्याच्या जपणुकीसाठीं नि प्रकाशनासाठीं हातभार लावणें हें ज्यांना आपलें कर्तव्य वाटतें, अशा स्वकीय सरकारच्या अमदानींत आपण वावरत आहोंत. तसेंच पुराण-काळाबद्दल नि त्या काळांतील वाङ्मयाबद्दल आज प्रत्येक महाराष्ट्रीयास अभिमान वाटत आहे. हा काळाचा महिमा आहे. अशा अनुकूल काळांत जराजीर्ण व दुर्मिळ प्राचीन वाङ्मयाचें मुद्रण, प्रकाशन सुलभ होऊन राहिलें असल्यास त्यांत नवल कसलें ? परंतु ज्या काळांत परकीय सत्तेकडून नि स्वकीय बांधवांकडून उपेक्षा-वृत्तीशिवाय दुसरें कांहीं पदरांत पडण्याची आशा नव्हती, व पडलेंही नाहीं, त्या काळांत छातीठोकपणें पुढें सरसावून नि सतत १४।१५ वर्षे स्वार्थत्यागपूर्वक खपून, काव्यसंग्रहाच्या चालकांनीं संतवाङ्मयाचा नेत्रदीपक डोंगर मराठी वाचकांपुढें उभा केला. सुंदर छपाई, काळजीपूर्वक संशोधन नि अर्थालंकारांच्या साद्यंत टिपणांसह प्रत्येकीं शंभर पानांचीं १६२ पुस्तकें (अंक) म्हणजे १६२०० पृष्ठें, एवढें उपयुक्त नि काळाच्या उदरांत गडप होऊं पहाणारें प्राचीन संत-वाङ्मय निर्णयसागर मुद्रणालयानें मराठी वाचकांस उपलब्ध करून दिलें.

निर्णयसागर-मुद्रणालयाच्या ह्या कामगिरीचें यथायोग्य मोजमाप करणें कठीण आहे. परंतु आम्हांला खात्रीपूर्वक वाटतें कीं, प्रत्येक महाराष्ट्रीय वाचक ह्या सत्कृतीबद्दल निर्णयसागरचा सदैव ऋणीच राहील.

८

# 'इतिहास - संग्रह' मासिकाचें महत्त्व

शेठ जावजी दादाजी ह्यांच्या जीवनांत ठळकपणें आढळून येणारी एक गोष्ट म्हणजे त्यांनीं रोजगार-धंद्यास शुभारंभ केल्यापासून तों आयुष्याच्या अखेरीपर्यंत त्यांना सतत थोरामोठ्यांचा नि देशहिताबद्दल कळकळ बाळगणाऱ्या बुद्धिवंतांचा सहवास अखंड घडत राहिला.

न्या. मू. काशीनाथ त्र्यंबक तेलंग ( १८५०–१८९३ ) हे अशा थोर लोकांपैकीं एक होत. त्यांची बुद्धि सर्वगामी तशीच अत्यंत तल्लख होती. आपला समाज सर्व क्षेत्रांत पुढें आला पाहिजे नि त्याची सर्वांगीण उन्नति झाली पाहिजे, असें त्यांना तीव्रतेनें वाटत असे व त्यासाठीं त्यांच्या कांहीं ना कांहीं हालचाली सतत चालू असत. आमच्या प्राचीन नि ऐतिहासीक वाङ्मयाबद्दल त्यांना सार्थ अभिमान वाटत असे. त्यांच्या आवडीचे विषय अनेक होते. इतिहास - संशोधन हा त्यांपैकींच त्यांचा एक आवडता विषय होता. त्या विषयाचा त्यांचा व्यासंगही दांडगा होता. ते कायदे-पांडित्याकडे वळले नसते तर ते एक थोर इतिहास-संशोधक ह्या नात्यानें जगापुढें आले असते.

ज्यांचा पूर्वेतिहास उज्वल असतो, त्यांच्या वाट्यास वर्तमान नि भविष्य काळही उज्वलतर आल्याशिवाय रहाणार नाहीं; परंतु त्या पूर्वेतिहासाकडे आम्हीं लक्ष पुरविलें पाहिजे. आपले शूर पूर्वज त्या काळांत कसे वागले, प्राप्त प्रसंगास त्यांनीं कशारीतीनें तोंड दिलें नि त्यांच्या वाट्यास जे जय-पराजय

आले, त्याचीं कारणें कोणतीं होतीं, ह्याचें संशोधन व्हावें, असें त्या काळांतील थोर नि नामवंत नेते न्या. मू. माधवराव रानडे (१८४२–१९०१) ह्यांच्याप्रमाणें न्या. मू. तेलंग (१८५०–१८९३) ह्यानांही तेवढ्याच तीव्रतेनें वाटत असे. ह्या बाबतींत दोघांचेंही एकमत होतें. आणि अशा ह्या थोर इतिहास-भक्ताचा कार्यकारणपरत्वें जावजीशेठ ह्यांच्याशीं निकट संबंध आलेला होता. दोघांनाही एकमेकांबद्दल सार्थ आदरभाव वाटत असे.

शंभर वर्षांपूर्वीच्या काळांत ग्रँट डफ किंवा कर्नल टॉड ह्या राज्यकर्त्यांच्या वर्गांतील गोऱ्या इतिहास-संशोधकांनीं आपल्या चष्म्यांनीं आमच्या ऐतिहासिक घटनांकडे किंवा इतिहासकालीन पुरुषांकडे पाहून जो इतिहास लिहून प्रसिद्ध केला, त्याच इतिहासावर आमचें पोषण नि वाढ झाली. परंतु तें परावलंबी पोषण होतें.

त्या काळाच्या दृष्टीनें ती त्यांची कामगिरी खरोखर अभिनंदनीय नि अनुकरणीय होती. आमच्या गतेतिहासाची त्या काळांत आम्हांला जाणीव तरी कुठें होती? ती त्या काळांत प्रथमारंभीं त्यानीं करून दिली, ह्याबद्दल त्यांना कृतज्ञतापूर्वक द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच होतील. त्यांची ती कामगिरी हीन लेखण्याचा आमचा मुळींच इरादा नाहीं. आमच्या इतिहासाबद्दलच काय? परंतु आमचीं ऐतिहासिक स्थळें, इतिहासकालीन वास्तु नि वस्तु ह्यांच्याबद्दल अभिमान बाळगून त्यांचा संग्रह कसा करावा नि त्यांची निगा कशी राखावी, ह्याचे धडे आम्ही कोणाकडून शिकलों?

ही कृतज्ञताबुद्धि बाळगूनही आम्हांला म्हणावयाचें आहे कीं, अनेक बाबतींत ते (इंग्रज) आमचे गुरुजी असले तरी आम्हीं सदासर्वकाळ ते सांगतील ती पूर्वदिशा असें मानून स्वस्थ रहाणें शक्य नव्हतें नि योग्यही नव्हतें. वाढत्या शिक्षण-प्रसाराबरोबर आमची मूढावस्था व परावलंबीपणा कमीं कमीं होत गेला नि आम्हांला आमचें कल्याण कशांत आहे, हें समजूं उमजूं लागलें. दाईचें दूध नि आईचें दूध, ह्यांची तुलना करतां येईल का? दाईचें दूध परवडलें, परंतु ग्रँट डफसारख्या राज्यकर्त्यांच्या जातभाईंकडून त्या काळांत आम्हांला जे ऐतिहासिक घटनांचे घुटके पाजण्यांत येत होते, ते गोऱ्या राज्यकर्त्यांचे गोडवे गाऊन आमच्या स्वाभिमानाला नि पुरुषार्थाला जबरदस्त धक्का देणारे होते, हें तितकेंच खरें आहे.

विष्णुशास्त्री चिपळूणकर, न्या. रानडे, न्या. तेलंग, साने, राजवाडे ह्यांच्यासारख्या स्वदेशाभिमानी नि आपल्या देशबांधवांच्या कल्याणाची अहर्निश चिंता बाळगणाऱ्या विद्वानांना ती गोष्ट खटकल्याशिवाय कशी राहील ?

ऐतिहासिक बखरी, कागदपत्र नि पत्रव्यवहार ह्यांच्या वाचनाकडे नि त्यांचें संशोधन करण्याकडे आमच्या तत्कालीन उपरोक्त नि इतर विद्वानांचें लक्ष, देशप्रेमामुळें उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणांत वळूं लागलें होतें.

त्या दृष्टीनें पहातां सर्वसाधारणपणें १८७० सालापासून गतेतिहासाकडे आमच्या विद्वानांचें विशेष लक्ष बारकाईनें वळूं लागल्याचें दिसून येतें. ग्रँट डफसाहेबानें कथन केलेल्या इतिहासाचे घुटके आमच्या कर्तव्यशून्यतेमुळें आम्हांला निरुपायानें प्राशन करावे लागले असले तरी खरा इतिहास वेगळाच आहे नि तो तत्कालीन कागदपत्रें नि बखरी ह्यांत गडप होऊन राहिलेला आहे. तो मुद्रण-यंत्राच्या सहाय्यानें प्रकाशांत आणणें नि वाचकांपुढें खराखुरा इतिहास ठेवणें जरूर आहे, असें ज्या विद्वान लेखकांस नि संशोधकांस वाटूं लागलें, त्यानीं 'विविधज्ञान-विस्तार' (१८६९) किंवा 'काव्येतिहास-संग्रह' (१८७८) ह्यासारख्या तत्कालीन नियतकालिकांचा आश्रय घेऊन, ह्या महत्त्वाच्या विषयाला वाचा फोडण्याचें कार्य सुरू केलें.

इतिहास-संशोधनाच्या दृष्टीनें तो जागृतीचा काळ होता. परकीय सत्तेच्या अंमलाखालीं नाना प्रकारचीं बंधनें संभाळून वावरावें लागत असलें तरी महाराष्ट्रानें छत्रपति शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत स्वातंत्र्याची गोडी चाखलेली आहे, त्या किंवा तत्पूर्वीच्या काळावर प्रकाश टाकणारीं साधनें शोधून काढणें, त्यांची यथायोग्य अर्थसंगती लावणें व तीं साधनें मुद्रित स्वरूपांत वाचकांपुढें ठेवणें, हें राष्ट्रोन्नतीचें नि संस्कृतिसंवर्धनाचें एक महत्व कार्य आहे, ह्या भावनेनें अनेक विद्वान, ऐतिहासिक कागदपत्रांकडे पाहूं लागले. त्यामुळेंच काव्येतिहास-संग्रह, ऐतिहासिक लेख-संग्रह, भारतवर्ष, महाराष्ट्र-इतिहास ह्यासारखीं ऐतिहासिक विषयांस वाहिलेलीं मासिकें जन्मास आलीं.

तीं उगाच नाहीं जन्माला आलीं. त्यांची जरूरी होती नि त्यांना पुरून उरणारें ऐतिहासिक साहित्य विद्वानापाशीं जमा होऊं लागलें होतें.

उपलब्ध होणारें ऐतिहासिक वाङ्मय हस्तलिखित स्वरूपांत कोनाकोपऱ्यांत पडून न रहातां तें मुद्रित व्हावें नि जनतेच्या हातीं पडावें, ही होती साने, राजवाडे वगैरे तत्कालीन इतिहास-संशोधकांची दूरदृष्टी.

संस्कृत-वाङ्मय, संत-वाङ्मय नि ऐतिहासिक कागद-पत्र ह्यांच्या प्रकाशनास वाहिलेलें 'काव्येतिहास-संग्रह' मासिक बंद पडल्यानंतर त्या तिहेरी प्रकाशनाचें महत्त्व ओळखून त्यांतील एकेक विभागाच्या प्रकाशनासाठीं स्वतंत्र मासिक सुरू करण्याचें उदात्त धोरण जावजीशेठ ह्यानीं स्वीकारलें नि त्या धोरणास अनुसरून त्यानीं 'काव्य-माला' व 'काव्य-संग्रह' हीं दोन मासिकें संस्कृत नि संत–वाङ्मय नियमीतपणें प्रसिद्ध करण्याच्या सद्हेतूनें सुरू केलीं.

उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक कागदपत्रांचें प्रकाशन हाही देशकल्याणाच्या नि संस्कृति-संवर्धनाच्या दृष्टीनें तितकाच महत्त्वाचा नि अत्यावश्यक विषय आहे व तोही हाताळणें जरूर आहे, ही भावना जावजीशेठ ह्यांच्याठायीं वास करीत होती. शिवाय न्या. मू. तेलंग ह्यांच्यासारख्या इतिहास--प्रेमी विद्वानाच्या सहवासांत आल्यापासून त्या विषयास वाहिलेलें स्वतंत्र मासिक सुरू करून काव्येतिहास-संग्रह-कार्याची पूर्तता करावी, असें त्यांना विशेष तीव्रतेनें वाटूं लागलें.

त्यासाठीं त्यांचे प्रयत्न चालू होते. जावजीशेठ ह्यांच्याजवळ सर्व साधनांची सिद्धता होती. 'काव्य - माला' व 'काव्य - संग्रह' ज्यानीं नफा नुकसानीचा विचार न करतां भरघोस स्वरूपांत सुरू केला, त्यांना ऐतिहासिक विषयांत वाहिलेलें मासिक सुरू करणें मुळींच कठीण नव्हतें; परंतु त्यांच्या मार्गांत एक फार मोठी अडचण होती. 'बाल-बोध' मासिकाची संपादकीय जबाबदारी विनायक कोंडदेव ओक ह्यानीं स्वीकारली, 'काव्य-माला' मासिकाची जबाबदारी पं. दुर्गाप्रसाद व काशिनाथपंत परब ह्यानीं स्वीकारली नि 'काव्यसंग्रह' मासिक वामन दाजी ओक ह्यांच्या हातीं सुरक्षित होतें. ह्या तिन्हीं मासिकांसाठीं जी संपादकीय निवड करण्यांत आली किंवा यदृच्छेनें झाली, ती सर्वपरीनें यशस्वी ठरली. तीं विद्वान माणसें आपापल्या कार्याला सर्वस्वीं वाहिलेलीं नि आपापली जबाबदारी ओळखून कार्यरत झालेलीं होतीं.

## ॐ इतिहास-संग्रह मासिकाचें महत्त्व

इतिहास हा ज्यांच्या आवडीचा विषय होता नि त्या विषयाचा ज्यांचा व्यासंग दांडगा होता, अशीं माणसें त्या काळीं होतीं; परंतु मासिकाची जबाबदारी शिरावर घेऊन त्याच कार्याला सर्वस्वीं वाहिलेल्या अशा संपादकाच्या शोधांत जावजीशेठ नि त्यांचे विद्वान सल्लागार होते. त्यांना मनापासून ह्या कार्याला आरंभ करायचा होता. जावजीशेठजींची ती एक फार मोठी नि महत्त्वाची आकांक्षा होती. ती पूर्ण व्हावी, ह्यासाठीं त्यांची जी हालचाल सतत चालू होती, ती त्यांचे कर्तबगार चिरंजीव सतत पहात होते.

कोणतेंही कार्य अर्धवट करायचें नाहीं. त्याची उभारणी भक्कम पायावर करावयाची, हा पितापुत्रांचा स्वभावगुण होता. ध्येयावर सतत नजर ठेवायची, त्याच्याकडे दुर्लक्ष होऊं द्यावयाचें नाहीं; परंतु त्याचबरोबर घाईनें कोणतेंही कार्य उरकून मोकळें व्हायचें नाहीं, हें त्यांचें ब्रीद होतें. त्यामुळें वर्षामागून वर्षे लोटत होतीं; परंतु उराशीं बाळगलेलें ध्येय कांहीं सिद्धीस जात नव्हतें.

१८९२ सालीं जावजीशेठ ह्यांनीं इहलोकींची यात्रा संपविल्यानंतर त्यांचे सुपुत्र तुकारामशेठ ह्यांच्याकडे त्यांच्या सर्व कार्यांचा वारसा आला नि तो त्यांनीं कोणीही वाखाणणी करावी नि तोंडांत बोटें घालावीं, इतक्या यशस्वी रीतीनें नि जाणीवपूर्वक सांभाळला.

समाज-हित नि देश-हित सतत लक्षांत बाळगून वडिलांनीं जीं कार्ये हाताळलीं किंवा नफानुकसानीची पर्वा न करतां चालू ठेविलीं, तीं तशींच पुढेंही चालू रहावीं, ह्यासाठीं तुकारामशेठ नि त्यांचे सहकारी उत्साहपूर्वक झटले, एवढेंच नव्हे तर जावजीशेठ ह्यांच्या ज्या ज्या आकांक्षा कांहीं ना कांहीं कारणांमुळें किंवा प्रतिकूळ परिस्थितीमुळें पूर्णत्वास येऊं शकल्या नाहींत, त्या पूर्णत्वास आणण्यासाठीं तुकारामशेठ त्याच तळमळीनें नि उत्साहानें अहर्निश झटले. त्यांच्या स्वभावगुणांतील हा एक तेजस्वी नि महत्त्वाचा पैलू आहे.

ऐतिहासिक कागद-पत्रांचें महत्त्व पटल्यामुळें त्यांचा शोध नि संशोधन विशेष वेगानें सुरू झालें होतें. साने, राजवाडे, पारसनीस नि सरदेसाई ह्यांच्या सारखे त्यागी नि त्याच कार्याला वाहिलेले देशहितैषी इतिहास-प्रेमी विद्वान आपल्या तेजानें चमकूं लागले होते.

'इतिहास-संग्रह' मासिक सुरू करण्याची कल्पना व्यवहारांत कशी आणतां येईल, ह्याचें चिंतन तुकारामशेठ ह्यांनीं सतत चालविलें होतें. योग्य नि त्या कार्याला सर्वस्वी वाहिलेला संपादक मिळवून आपल्या पूज्य वडिलांची मागें राहिलेली इच्छा पूर्ण करण्याच्या दृष्टीनें त्यांचे प्रयत्न सतत चालू होते. वर्षांमागून वर्षे लोटत होतीं तरीही तो प्रश्न त्यांनीं कधीं दृष्टीआड केला नाहीं. वडिलांप्रमाणें त्यानांही इतिहास-विषयाचें महत्त्व पूर्णपणें पटलें होतें. इतर अनेक साधनांप्रमाणें निर्णयसागर-मुद्रणालयानें ही साधना साध्य करून दाखविली पाहिजे. ती देश-कल्याणाला पोषक होऊन राहाणारी आहे. ती पार पडल्याशिवाय तरणोपाय नाहीं, अशी त्यांची भावना होती.

एकाद्या पवित्र भावनेच्या आहारीं गेल्यानंतर ती पूर्णत्वास येईपर्यंत तुम्हीं बेचैन होतां. तो बेचैनपणाच तुमच्याकडून जरूर तें कार्य पार पाडवून घेत असतो.

जावजीशेठजींचें निधन होऊन पंधरा वर्षांचा काळा मागें पडला. त्या काळांत किती तरी स्थित्यंतरें घडून आलीं. चढउतार झाले. 'काव्य-संग्रह' मासिकाला मिळणारा लोकाश्रय अनेक कारणांमुळें उत्तरोत्तर कमी कमी होत चालला होता; तरीही 'इतिहास-संग्रह' मासिक सुरू करण्याची तुकाराम शेठजींची उमेद तीळभरही कमी झाली नव्हती. कारण तें एक संस्कृति-संवर्धक नि राष्ट्रोद्धार-पोषक कार्य होतें व शिवाय जावजीशेठजींच्या अंतिम इच्छा आकांक्षांपैकीं तें एक महत्त्वाचें कार्य होतें.

त्यासाठीं जरूर त्यांच्याशीं पत्र व्यवहार नि भेटीगांठी चालू होत्या. त्याना कधींही खंड पडला नव्हता. म्हणतां म्हणतां १९०८ साल उजाडलें. एक इतिहास-प्रेमी नि इतिहास-संशोधक ह्या नात्यानें विसूभाऊ राजवाडे व दत्तात्रय बळवंत पारसनीस (१८७०–१९२६) ह्यांचीं नावें त्याकाळीं विशेष प्रामुख्यानें ऐकू येऊं लागलीं होतीं. पारसनीस ह्या आडनावालाच मुळीं इतिहास चिकटलेला आहे. मुसलमानी राज्यांचा पत्रव्यवहार फारशी भाषेंत चालत असे. पारसनीस-फारशीनवीस म्हणजे फारशी पत्रव्यवहार करणारा मुन्शी असा आहे. त्यांच्या कुळांत त्या अधिकारावर कोणी ना कोणी पूर्वज असावा. त्यामुळें

फारशी नवीस-पारसनवीस म्हणतां म्हणतां पारसनीस हें आडनांव रूढ झालें असावें.

दत्तात्रय बळवंत पारसनीस यांचें मराठी नि इंग्रजी शिक्षण (सातवीपर्यंत) सातार्‍यास झालें. लेखन-वाचनाचा नाद लहान वयापासून जडला होता. लेखनाची आवड असली म्हणजे माणूस मासिकांकडे नि वृत्तपत्रांकडे धांव घेतो; किंवा कधीं कधीं स्वतःही त्या जंजाळांत सांपडतो. आरंभ काळांत दत्तोपंतांनीं तो जंजाळ स्वतःच्यामागें लावून घेतला होता.

त्यांचें इतिहास-विषयाकडे लक्ष वळलें तें त्यानीं 'झांशीच्या लक्ष्मीबाई-साहेब ह्यांचें चरित्र' लिहायला घेतलें त्या वेळेपासून. हें चरित्र त्यानीं आत्यंतिक समरसतेनें लिहिलें आहे. त्यासाठीं त्यांना ऐतिहासिक कागदपत्र शोधावे नि वाचावे लागले.

तें चरित्र-लेखन हातावेगळें झालें तरी ऐतिहासिक कागद-पत्र चाळण्याची नि चिंतनपूर्वक तपासण्याची हाताला जी एकदां संवय जडली ती कांहीं सुटली नाहीं! ती आयुष्यभर पुरवली नि तीच त्यांचा जीवनाधार ठरली.

त्यानंतर सुमारें तीस वर्षांचा बहुमोल काळ त्यानीं इतिहास-संशोधन नि ऐतिहासिक वस्तु-संग्रह जवळ करण्यांत घालविला. सातारा येथील 'पारसनिस-वस्तु संग्रहालय' हें त्यांच्याच कर्तृत्वाचें, आवडीचें नि दीर्घ परिश्रमांचें सुंदर फळ आहे.

असे हे इतिहास-वेडे दत्तात्रय बळवंत पारसनीस नि निर्णयसागरचे चालक तुकारामशेठ ह्यांचा कार्यकारणपरत्वें संबंध जुळून आला. (१९०८)

पारसनीस हे ऐतिहासिक कागद-पत्रांच्या सृष्टींत वावरत होते. त्यांत पूर्णपणें तल्लीन होऊन गेले होते. त्या कागद-पत्रांना प्रसिद्धि मिळणें देशहिताच्या दृष्टीनें जरूर होतें; आणि त्यामुळेंच तुकारामशेठजींचा नि त्यांचा संबंध जुळून आला.

सर्व सिद्धता झाल्यानंतर 'इतिहास-संग्रह' मासिकाचा पहिला अंक ऑगष्ट १९०८ मध्यें प्रसिद्ध झाला. दत्तात्रय बळवंत पारसनीस हे संपादक असले तरी आरंभापासून इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे ह्यांच्यासारख्या तत्कालीन श्रेष्ठ इतिहासज्ञाचें त्यांना सहकार्य लाभलें होतें.

त्यांच्याजवळही मुबलक ऐतिहासिक कागदपत्राचा संग्रह जमा झाला होता. तो मुद्रित होऊन प्रकाशांत येण्याची जरूरी होती.

ह्या कार्यांतील आपल्या सहकाऱ्यांसंबंधीं उल्लेखांत इतिहासाचार्य राजवाडे ह्यांच्या सहकाराचा अभिमानपूर्वक उल्लेख करून संपादक पहिल्या अंकांतील आपल्या प्रास्ताविकांत म्हणतात; "आम्हांस कळविण्यास विशेष आनंद वाटतो कीं, स्वदेशाच्या इतिहासाचा निस्सीम अभिमान बाळगणारे व तत्संशोधनार्थ रात्रंदिवस अश्रांत परिश्रम करणारे असे कित्येक सन्मान्य मित्र आम्हांस सहाय्य करण्यास तयार झाले आहेत. त्यामध्यें रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे हे अग्रेसर आहेत, ही एक संतोषाची गोष्ट होय. त्यांचीं कित्येक मतें यद्यपि आमच्याहून भिन्न असलीं तरी त्यांची इतिहास-प्रकाशनार्थ दिसून येणारी उत्कट इच्छा व सहकार्य करण्याविषयींची प्रवृत्ति प्रशंसनीय होय, असें म्हटल्याशिवाय आमच्यानें रहावत नाहीं. अर्थात् सद्धेतुप्रेरित सज्जनांची खरी सहानुभूति व निस्सीम इतिहास-भक्तांचें नाना प्रकारचें प्रोत्साहन यांची जोड मिळाली म्हणजे तेथें यशःसिद्धि होण्यास फारसा विलंब लागत नाहीं. रा. राजवाड्यांप्रमाणेंच स्वदेशाच्या इतिहासाची अभिवृद्धि करूं इच्छिणारे इतर सद्गृहस्थ आम्हांस पूर्ण सहाय्य करतील अशी उमेद आहे."

संपादक पारसनिस ह्यानीं बाळगलेली ही उमेद नंतरच्या काळांत सफळ झाल्याशिवाय राहिली नाहीं.

मागें सांगितल्याप्रमाणें इतिहास-संग्रह मासिक ही त्या काळची एक जरुरी होती. ती भागविणें हें संस्कृति-संवर्धनाचें नि राष्ट्र-कल्याणाचें एक आवश्यक कार्य आहे, ह्या भावनेनें वडिलांच्या पावलांवर पाऊल टाकून निर्णय-सागरचे चालक तुकारामशेठ हे मोठ्या हौसेनें पुढें सरसावले होते. त्या काळांत ह्या मुद्रणालयानें इतिहास-संग्रह मासिकाच्याद्वारें जी कामगिरी पार पाडिली तिचें आजच्या काळाच्या दृष्टीनें अपरंपार महत्त्व आहे. तें शब्दांनीं वर्णन करतां येण्यासारखें नाहीं.

ह्या मासिकाची वार्षिक वर्गणी अवघी चार रुपये ठेवण्यांत आली. प्रत्येक अंकाच्या मुखपृष्ठावर पुढील श्लोक असे.

धर्मार्थ काममोक्षाणामुपदेश समन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥

पहिल्या अंकांतील प्रास्ताविक लेखांत म्हटलें होतें कीं, "लोक व सरकार ह्यांना इतिहास प्रकाशनाचें मारखेंच अगत्य वाटण्याचा सुप्रसंग एकसमयावच्छेदेंकरून सांप्रत प्राप्त झाला आहे. अशावेळीं 'काव्येतिहास-संग्रह' यासारखें एक स्वतंत्र मासिक पुस्तक सुरू करून, मराठ्यांच्या इतिहासाची राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक वगैरे सर्व दिशेनें माहिती मिळवून देणारें अस्सल व मूल्यवान् कागदपत्र प्रसिद्ध करण्याची कोणास स्फूर्ति होणार नाहीं? आजपर्यंत निरनिराळ्या ठिकाणीं उपलब्ध झालेले ऐतिहासिक कागद-पत्र व दुर्मिळ माहिती इतकी विपूल प्राप्त झाली आहे कीं, ती लोकांपुढें आणण्यास इतिहास विषयास वाहिलेल्या एका स्वतंत्र मासिकाची जरूरी आहे. काव्य-प्रकाशनाचें काम स्वतंत्र रीतीनें जसें 'काव्य-संग्रह' मासिकानें बजावलें आहे, तसेंच इतिहास-प्रकाशनाचें कार्य इतिहास-संग्रहानेंच सिद्धीस नेणें इष्ट आहे; आणि त्यास प्रस्तुतसारखी उत्तम संधी प्राप्त होणें हें शुभचिन्ह आहे. अशावेळीं आम्हीं 'इतिहास-संग्रह' ह्या नावाचें मासिक पुस्तक प्रतिमासीं प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे, तर त्यास रसिक व इतिहासप्रिय वाचकांची सहानुभूती व त्यांचा उदार आश्रय यांची उणीव पडेल अशी भीती वाळगण्याचें मुळींच कारण नाहीं.

"यावेळीं दुधांत साखर या न्यायानें घडून आलेली अतीशय आनंददायक अशी एक गोष्ट कळविणें अवश्य आहे. ती ही कीं, ज्या निर्णयसागर छापखान्याच्या मालकांनीं महाराष्ट्र कवींच्या रसाळ काव्यांचा जीर्णोद्धार करण्याचा संकल्प करून काव्येतिहास-संग्रहांतील 'काव्य-संग्रह' प्रसिद्ध करण्याचें पवित्र कर्तव्य स्वीकारलें व तें उत्कृष्ट रीतीनें तडीस नेलें, त्यानींच इतिहास-संग्रहाचेंही प्रकाशकत्त्व मोठ्या आनंदानें स्वीकारलें आहे; अर्थात्, ह्या एकाच गोष्टीवरून इतिहास-संग्रहाची योजना चांगल्या भरभक्कम पायावर झाली आहे, हें वाचकांच्या निदर्शनास येईल."

पूर्वकालीन इतिहासासंबंधानें जनतेंत जागृति झालेली दिसून येत आहे ह्याचा उल्लेख केल्यानंतर सरकारचेंही ह्या महत्त्वाच्या प्रश्नाकडे कसें लक्ष वळूं लागलें आहे ह्याची जाणीव करून देतांना आपल्या प्रास्ताविकांत संपादक महाशय लिहितात: "सध्यां सरकारचेंही लक्ष ह्या विषयाकडे वेधलें आहे. तसेंच प्रांतिक सरकारांसही, जुनीं ऐतिहासिक स्थळें रक्षण करण्याचें महत्त्व वाटूं लागलें आहे. जुने ऐतिहासिक कागदपत्र व लेख, प्रत्येक प्रांतिक सरकारकडून

प्रसिद्ध होऊं लागले आहेत. मुंबई सरकारकडून पुणें येथील पेशव्यांच्या दप्तरांतील रोजनिशा व इतर ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध करण्याचें धोरण स्वीकारण्यांत आलें आहे. मद्रास, बंगाल यांतील सरकारांनींही तेंच धोरण स्वीकारलें आहे. त्याचबरोबर हिंदुस्थानच्या इतिहासाचें प्रसिद्धिकरण करण्याचें कार्य स्तुत्य व लोकमान्य कार्य हिंदुस्थान सरकारच्या आश्रयाखालीं विद्वान आंग्ल-पंडितांनीं चालविलें आहे."

ह्याप्रमाणें वाचकांस विश्वासांत घेतल्यानंतर त्याच पहिल्या अंकांत वाचकवर्गाच्या अभिरुचींत कसकसें स्थित्यंतर घडून येत आहे, ह्याची कल्पना करून देतांना संपादक पुढें लिहितात कीं, "३०।४० वर्षांपूर्वी, ग्रँटडफ साहेबानीं लिहिलेला मराठ्यांचा इतिहास व इतर दुसरे ग्रंथ हेच आमच्या इतिहासांची मुख्य साधनें मानिलीं जात असत. तो काळ सांप्रत अगदीं बदलून जाऊन, मराठ्यांच्या इतिहासाचे अस्सल कागद–पत्र व त्यांवरून लिहिलेले साधार व सविस्तर ग्रंथ आतां इतिहास–भक्तांची जिज्ञासा तृप्त करण्यास महाराष्ट्र-सारस्वत-भांडारांत अनेक निर्माण झाले आहेत. प्रथमतः मराठ्यांच्या पराक्रमाच्या कथा मनोरंजक रीतीनें निवेदन करून लोक-हृदयामध्यें इतिहासाभिरुचि उत्पन्न करण्यास कारणीभूत झालेल्या बखरी व पोवाडे ह्यांच्या प्रकाशनास सुरुवात झाली; नंतर क्रमशः लोकाभिरुचीचा ओघ सत्य-शोधनाकडे किंवा तत्त्वशोधनाकडे वळून अस्सल जुने लेख शोधून काढण्याकडे व त्यांची प्रसिद्धि करण्याकडे लोकप्रवृत्ति झाली; हें मनुष्य-स्वभावास अनुरूपच आहे........तीस वर्षांपूर्वी जी अभिरुची होती, ती आतां पुष्कळ बदलून जाऊन अस्सल कागदपत्र आणि अस्सल लेख यांचें महत्त्व लोकांस अधिक समजूं लागलें आहे."

'इतिहास-संग्रह' मासिकानें आपल्या शिरावर घेतलेली जबाबदारी फार मोठी तशीच महत्त्वाची होती; परंतु ह्याची जाणीव कोणाला? इतिहासप्रेमी विद्वानांस. त्या वर्गांतील निवडक लोकांचा अशा मासिकास आश्रय मिळावयाचा. त्यांची संख्या केव्हांही अल्पच असावयाची. सर्वसाधारण लोकांस त्याचें काय?

ह्या मासिकाच्या पहिल्या अंकांत पुढील ऐतिहासिक विषयांचा समावेश करण्यांत आला. १ महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें. (अहल्याबाई होळकर-कारकिर्द), २ ऐतिहासिक स्फुटलेख, ३ परराष्ट्रांच्या दरबारांतील मराठ्यांचे वकील, ४ ऐतिहासिक टिपणें, ५ ऐतिहासिक चरित्रें, वगैरे.

सर्वसाधारणपणें हेंच धोरण शेवटपर्यंत ठेवण्यांत आलें.

त्याशिवाय थोरांच्या आख्यायिका नि दंतकथा, ऐतिहासिक पुरुषांचे विचारतरंग, यासारखे विषयही मधून मधून हाताळण्यांत आले. या सर्वांच्या जोडीला ऐतिहासिक भूगोल नि ऐतिहासिक नकाशे यासारख्या विषयांकडेही लक्ष पुरविण्यांत आलें.

या मासिकास एक वर्ष झाल्यानंतर आपल्या 'साल अखेरचे दोन शब्द' या स्फूट-लेखांत संपादक लिहितात कीं, "इतिहास-संग्रहासारखीं केवळ जुन्या इतिहासाचीं साधनें प्रसिद्ध करणारीं मासिक पुस्तकें हीं निव्वळ करमणुकीचीं साधनें नसून, त्यांची योग्यता चिरकाल टिकणारी आहे व त्यांस आश्रय देणें म्हणजे जुन्या मूल्यवान् कागदपत्रांचा जीर्णोद्धार करण्याचें श्रेय घेणें होय. त्याप्रमाणें आश्रय मिळत आहे, ही समाधानाची गोष्ट आहे."

मासिकाच्या चालकांनीं नि संपादकांनीं हें समाधान मानून घ्यायचें असतें. स्वतःचा नि वाचकवर्गाचा उत्साह सतत वाढत जाईल, याबद्दल दक्षता बाळगायची असते. त्या दृष्टीनें हें संपादकीय स्फूट लिहिलें गेलें असावें. कारण 'इतिहाससंग्रह' मासिक स्वावलंबी कधींच होऊं शकलें नाहीं. निर्णयसागरचे मालक त्याकडे एक राष्ट्रोन्नतीचें उदात्त कार्य या दृष्टीनें आरंभापासून पहात असत.

या मासिकानें सात वर्षांची आयुर्मर्यादा गांठली नि आठव्या वर्षाचे तीन अंक प्रसिद्ध करून आपली कल्याणकारी कारकीर्द संपविली; परंतु त्या मुदतींत या नियतकालिकानें इतिहासवाङ्मयाच्या समृद्धिला बहुमोलाचा हातभार लाविला आहे. हा हातभार साधासुधा नाहीं. आजच्या नि भावी काळांतील इतिहास-संशोधकांनीं मुक्त कंठांनीं गोडवे गावे, अशा महत्तम स्वरूपाचा तो हातभार आहे.

इतिहासाचार्य राजवाडे यांचे १६, १९ व २२ हे इतिहास-खंड याच मासिकाच्याद्वारें प्रथम प्रकाशांत आले. त्याशिवाय जोधपूरकडील नि दिल्लींतील कारस्थानें, महेश्वर-दरबारचीं बातमीपत्रें, अली बहाद्दराचा पत्रव्यवहार, गोमंतकाच्या इतिहासाची साधनें, सवाई माधवरावाच्या कारकिर्दीवर प्रकाश टाकणारें साहित्य, नाना फडणविसांचें मेणवली-दप्तर, त्याचप्रमाणें वरील असल

पत्रव्यवहार व कागदपत्रांशिवाय ऐतिहासिक टिपणें, संपादकीय स्फुट लेख, ऐतिहासिक पुरुषांचीं चरित्रें, तंजावरचा इतिहास, भोसल्याचा जाबता, पेशवाईंतील सनदा-पत्रांतील निवडक भाग वगैरे महत्त्वाचा किती तरी मजकूर ह्या मासिकामुळें योग्यवेळीं प्रकाशांत आला व भावी काळांतील इतिहास-संशोधकांपुढें नाना प्रकारच्या बहुमोल रत्नांचें एक ऐतिहासिक भांडार उघडण्यांत आलें.

ह्याशिवाय 'इतिहास-संग्रह' मासिकानें दुसरी एक फार महत्त्वाची कामगिरी त्याकाळीं पार पाडिली. तिचें मोल करणें फार कठीण आहे. कोणती ती अनन्यसाधारण कामगिरी ?

ह्या मासिकाच्या संपादकांचें लक्ष केवळ मजकुराकडे, पत्रव्यवहाराकडे, किंवा लेखांची नि पत्रांची संगती लावण्याकडेच होतें असें कोणीही समजूं नये. ऐतिहासिक पुरुषांचीं दुर्मिळ चित्रें नि इतिहास काळांतील नाना प्रकारच्या वस्तूंच्या आकृत्या व चित्रें महत् प्रयासानें मिळवून त्यांना ह्या मासिकानें प्रसिद्धि दिली व त्या काळांत तेंही दालन उत्तमप्रकारें शोभविलें.

- त्याकाळीं शेठ पुरुषोत्तम विश्राम मावजी हे एक थोर चित्र-संग्राहक होऊन गेले. ऐतिहासिक वस्तूंचा नि चित्रांचा प्रयत्नेंकरून नि वाटेल तेवढी आर्थिक झीज सोसून संग्रह करावयाचा, हा त्यांचा अत्यंत आवडता छंद होता. आपल्या संपत्तीचा विनियोग आपला आवडता छंद भागविण्यासाठीं त्यानीं मुक्त हस्तांनीं केला. 'इतिहास-संग्रह' मासिकावर त्यांची पूर्ण कृपादृष्टि होती. त्याच्या बहुमोल सहकाराचा संपादकानीं नि निर्णय-सागर मुद्रणालयाच्या चालकांनीं भरपूर उपयोग करून घेतला.

'इतिहास-संग्रह' मासिकाच्याद्वारें जी विविध प्रकारची ऐतिहासिक माहिती वाचकांस नि इतिहास-संशोधकांस उपलब्ध करून देण्यांत आली तिचें येथेंकेवळ संक्षिप्त रीतीनें समालोचन करण्यांत आलें आहे.

ह्या मासिकानें व ज्या निर्णय-सागर मुद्रणालयानें वर्षानुवर्ष झीज सोसून तें राष्ट्र-कल्याणाच्या दृष्टीनें चालविलें, त्यानीं महाराष्ट्रावर फार मोठें ऋण करून ठेविलें आहे. कोणत्याही दृष्टीनें पहातां तें ऋण फेडतां येण्यासारखें नाहीं.

## ९

## राणूजी आरूंचें आत्मसमर्पण

राणू रावजी आरू (१८४८-१९२२) हे मुद्रिका-निर्मितीच्या क्षेत्रांत एक असामान्य कोटींतील कलावंत होऊन गेले. कोणत्याही भाषेतील मुद्रिका तयार करायच्या असोत; आरूंचा हस्तस्पर्श होतांच त्यांना सौंदर्य प्राप्त होत असे. जणूं काय त्यांच्या हाताचीं बोटें जादूनें मारलेलीं होतीं. एकादा अभिजात प्रतिभासंपन्न शिल्पकार दगडाला किंवा मातीला स्पर्श करतांच तिला हां हां म्हणतां जीवन-कला आणतो नि प्रेक्षकांना थक्क करून सोडतो; त्याचप्रमाणें मुद्रिकांसाठीं लागणाऱ्या धातूच्या तुकड्याला आरूंचा हस्तस्पर्श होतांच त्यांतून नयनरम्य, बोलक्या नि हंसऱ्या मुद्रिका सहजासहजीं निर्माण होत असत.

कविवर्य केशवसुत ह्यांनीं 'आम्हीं कोण ?' ह्या आपल्या काव्यांत कविरायांची कैफियत पुढें मांडतांना म्हटलें आहे कीं,

" पाणिस्पर्शेंचि आमुचा शकतसे वस्तूंप्रती द्यावया ।
सौंदर्यातिशया अशी वसतसे जादू करांमाजि या ॥"

कवि म्हणजे शब्द-सृष्टीचे ईश्वर ! आणि आरू कोण होते ? तेही शब्द सृष्टीचे, सुंदर अक्षरांचे-मुद्रिकांचे निर्माते होते; आणि म्हणूनच वरील काव्यपंक्तींचा अहेर आरूनाही सार्थतेनें करतां येण्यासारखा आहे.

मुद्रिका, मग त्या मराठी, गुजराथी, इंग्रजी, कानडी किंवा हिब्रू भाषेला शोभविणाऱ्या असोत; त्यांची घडवणूक आरूंच्या हातीं येतांच, त्या घाटदार नि ऐटदार व्हावयाच्याच, हा संकेत ठरून गेलेला होता.

राणू रायजी आरू



मुद्रिका क्षेत्रांतील ह्यांचें स्थान अनन्यसाधारण आहे.
(पान २१–२३ ३०–३१ व १५८–१७०)

९

## राणूजी आरूंचें आत्मसमर्पण

राणू रावजी आरू (१८४८-१९२२) हे मुद्रिका-निर्मितीच्या क्षेत्रांत एक असामान्य कोटींतील कलावंत होऊन गेले. कोणत्याही भाषेंतील मुद्रिका तयार करायच्या असोत; आरूंचा हस्तस्पर्श होतांच त्यांना सौंदर्य प्राप्त होत असे. जणूं काय त्यांच्या हाताचीं बोटें जादूनें भारलेलीं होतीं. एकादा अभिजात प्रतिभासंपन्न शिल्पकार दगडाला किंवा मातीला स्पर्श करतांच तिला हां हां म्हणतां जीवन - कला आणतो नि प्रेक्षकांना थक्क करून सोडतो; त्याचप्रमाणें मुद्रिकांसाठीं लागणाऱ्या धातूच्या तुकड्याला आरूंचा हस्तस्पर्श होतांच त्यांतून नयनरम्य, बोलक्या नि हंसऱ्या मुद्रिका सहजासहजीं निर्माण होत असत.

कविवर्य केशवसुत यांनीं 'आम्हीं कोण ?' या आपल्या काव्यांत कविरायांची कैफियत पुढें मांडतांना म्हटलें आहे कीं,

" पाणिस्पर्शेचि आमुचा शकतसे वस्तूंप्रती द्यावया ।
सौंदर्यातिशया अशी वसतसे जादू करांमाजि या ॥"

कवि म्हणजे शब्द-सृष्टीचे ईश्वर ! आणि आरू कोण होते ? तेही शब्द सृष्टीचे, सुंदर अक्षरांचे-मुद्रिकांचे निर्माते होते; आणि म्हणूनच वरील काव्यपंक्तींचा अहेर आरूनाही सार्थतेनें करतां येण्यासारखा आहे.

मुद्रिका, मग त्या मराठी, गुजराथी, इंग्रजी, कानडी किंवा हिब्रू भाषेला शोभविणाऱ्या असोत; त्यांची घडवणूक आरूंच्या हातीं येतांच, त्या घाटदार नि ऐटदार व्हावयाच्याच, हा संकेत ठरून गेलेला होता.

राजी होते का ? नाहीं ! अजूनही त्या क्षेत्रांत मला पुष्कळ शिकायचें आहे, अजूनही मी विद्यार्थि आहें, असें आयुष्याच्या अखेरीपर्यंत ते म्हणत राहिले. मधुमक्षिका ज्या ज्या ठिकाणाहून मधाचे थेंब मिळवितां येतील, त्या त्या ठिकाणीं जाऊन मधाचा संग्रह करीत असते. कितीही मध जमा केला तरी तिचें कांहीं केल्या समाधान होत नाहीं. तसेंच होतें आरूंचें. ज्या ज्या ठिकाणीं अक्षरमाधुरी आढळून येई, त्या त्या ठिकाणीं ते खेचले जात नि ती टिपून घेऊन तिचा गोडवा अधिकाधिक वाढविण्यासाठीं ते झटत असत.

आरूनीं मुद्रिका-क्षेत्रांत जें असामान्य यश मिळविलें त्याचें रहस्य ह्या त्यांच्या असमाधानी वृत्तींत शोधावें लागेल.

राणूजी आरूनीं अहर्निश नि एकनिष्ठ तपस्या करून आवडती कला आपलीशी करून घेतली नि ती आपले जिवलग स्नेही शेठ जावजी दादाजी ह्यांच्या चरणीं अर्पण केली. केवढा हा त्यांचा थोरपणा ! एवढंच करून ते थांबले नाहींत, तर आपलें कर्तबगार व्यक्तिमत्त्वही त्यांनीं जावजींच्या व्यक्तिमत्वांत विलीन करून टाकिलें !

राणूजी आरू हे श्रेष्ठ प्रतीचे प्रतिभासंपन्न कलावंत होते आणि शिवाय एक व्यक्ति ह्या नात्यानें ते त्याहीपेक्षां श्रेष्ठ होते. एका श्रेष्ठ कोटींतील कलावंतानें स्वतःचें प्रफुल्ल नि प्रासादिक व्यक्तिमत्त्व, कांहींना कांहीं कारणामुळें आपणास श्रेष्ठ वाटणाऱ्या व्यक्तींत विलीन करावें, ही घटना सर्वसामान्य नसून असामान्य आहे,

ह्या जगांतील प्रत्येक माणूस आपलें व्यक्तिमत्त्व सांभाळण्यासाठीं. आपला स्वार्थ शाबूत ठेवण्यासाठीं नि स्वतःच्या लौकिकासाठीं अविरत धडपडत असतो. असें हें आम्हां सर्वसामान्यांचें जीवन आहे. तेंच जगण्यांत आम्हांला भूषण वाटतें. त्याच्या पलिकडे दिव्यत्वानें नटलेलें अनन्यसाधारण असें वांछनीय जग आहे, ह्याची बहुतेकांस कल्पनाही नसते; परंतु आरूंचें तसें नव्हतें. त्यांनीं आपले मित्र नि जीवन-साथी जावजीशेठ ह्यांच्यासाठीं जगण्यांत नि आपली कष्टानें संपादन केलेली बहुमोल कला, त्यांच्यासाठीं परोपरीनें राबविण्यांत जीवन-साफल्य मानिलें.

रामायणांत महाकवि वाल्मिकींनीं विविध स्वभावाचीं नि गुणांचीं अनेक पात्रें सफाईदारपणें रंगविलीं आहेत. त्यांतील राम-लक्ष्मणाचें स्वभावचित्रण

त्यानीं किती सुंदर रीतीनें केलें आहे? लक्ष्मण का कमी पराक्रमी नि कर्तबगार होता? परंतु त्यानें स्वतःचें व्यक्तिमत्त्व साफ धुवून पुसून टाकिलें आणि त्यानें आपले वडील बंधू श्रीरामचंद्र ह्यांच्या व्यक्तिमत्वांत विलीन होण्यांत जीवनसाफल्य मानिलें. गंगा आणि यमुना ह्यांच्या सुंदर संगमाप्रमाणें दोघांचेंही जीवन-प्रवाह एकमेकांत विलीन झाले; एकजीव झाले. दोघांच्याही जीवनांत त्यामुळें केवढी माधुरी नि मोहकता निर्माण झाली आहे! हजारो वर्षें मागें पडलीं तरी राम आणि लक्ष्मण ही जोडी हिंदवासीयांच्या हृदयसिंहासनावर कायमची विराजमान झालेली आहे.

जावजीशेठ आणि राणूजी ह्या दोघांच्याही जीवन-प्रवाहाकडे बारकाईनें पहाणान्यास त्याच प्रसन्न प्रचीतीची जाणीव होईल. राणूजीसंबंधानें स्वतंत्रपणें लिहिणें थोडें अवघड आहे. जावजीशेठच्या जीवनांत ज्या ज्या प्रमुख घडामोडी घडून आल्या, त्यांत राणूजींचाही प्रमुख भाग असल्यामुळें, ही जावजीशेठची कर्तबगारी नि ही राणूजींची कर्तबगारी, असा भेदभाव करतां येण्यासारखा नाहीं. शिवाय दोघेही जीवनभर एकमेकांस पूरक होऊन राहिले होते. त्यांना कसे वेगळे करणार?

कारागीर आणि त्यांतल्या त्यांत अत्यंत हुषार कारागीर म्हटला म्हणजे तो कुठेंही एका ठिकाणीं टिकून रहाण्याची शक्यता जवळ जवळ नसतेच म्हणा ना. त्याला स्वतःकडे खेचूं पहाणारे स्वार्थी मालक पुष्कळ असतात. त्याच्यापुढें नानाप्रकारचीं मोहक प्रलोभनें ठेविलीं जातात. त्याचाही नाइलाज होत असतो. त्याची सतत ओढाताण सुरू असते. शिवाय जास्त मिळणारा पैसा नि सवलती कोणाला नको असतात? परंतु निष्ठा, मित्रप्रेम नि ज्याला एकदां आपला म्हटला त्याचा त्याग कोणत्याही परिस्थितींत करायचा नाहीं, हे गुण सर्वसाधारण नसून ते अनन्यसाधारण नि दैवी स्वरूपाचे आहेत. त्या गुणांचा सुंदर विलास राणूजींच्या जीवनांत आपणास पहायला सांपडतो, म्हणूनच त्याचें महत्त्व.

आरूंच्या उन्नत जीवनाला शोभा आणणारा त्यांच्या स्वभावांतील आणखीही एक तेजस्वी पैलू आहे. जावजीशेठ हयात असेपर्यंत त्यांना आरूंनीं एकनिष्ठपणें साथ दिली. ती साथ त्यांच्या निधनाबरोबर संपुष्टांत आली नाहीं.

शाळेंत जाऊन अक्षर ओळख करून घेण्याचें वय संपून गेलें आणि पोटाची सोय करण्यासाठीं अक्षर-मुद्रिका घांसीत बसण्याचा उद्योग आरूंच्या वाट्यास आला. त्या मुद्रिका घासतां घासतां त्यांची अक्षरांशीं दाट मैत्री जडली आणि त्याच मैत्रीच्या पायावर सुंदर मुद्रिका बनविण्याचा सुरम्य आरसेमहाल त्यानीं उभा केला.

ह्या आरसे-महालांत राणूजीना राज-वैभवांत राहातां आलें असतें; परंतु त्या वैभवाकडे वळण्याचें त्यानीं जाणून बुजून नाकारलें. आपले जीवनसाथी नि आरंभकाळांतील मार्गदर्शक शेठ जावजी दादाजी ह्यांच्याशीं संपूर्ण सहकार करण्यांत नि ते वैभवाच्या शिखरावर चढत असलेले डोळेभरून पहाण्यांत त्यांनीं जीवन-साफल्य मानिलें.

जेथें प्रतिमा मुक्तहस्तांनीं पाणी भरत असते, नि नवनव्या उन्मेषांनीं जगाकडून मानाचे मुजरे मिळवीत असते, तेथें अहंकाराला आश्रय नाहीं मिळाला तरच नवल! आणि तो अहंकार सहसा कोणाच्याही डोळ्यांत सलणारा नसतो. प्रशंसनीय प्रतिभा-संपन्नतेमुळें तो कोणाच्याही पचनीं पडूं शकतो. परंतु राणूजी आरूना अहंकाराची बाधा कधींही झाली नाहीं. त्यांची अक्षरमुद्रिका क्षेत्रांतील प्रतिभा कुणालाही प्रसन्न करणारी, बिनतोड नि असामान्य कोटींत मोडणारी होती. ती त्यांच्या ठायीं ईश्वरदत्त होती कीं प्रयत्नदत्त होती हें सांगणें कठीण आहे. कारण त्या प्रतिभेच्या प्राप्तीसाठीं त्यानीं आपलें सारें ऐन उमेदीचें आयुष्य खर्ची घातलें; ज्या काळांत पैशांची जरुरी फार होती, त्या ऐन तारुण्याच्या काळांत त्यानीं जाणून बुजून पैशांकडे पाठ फिरविली आणि कलेची साधना एकनिष्ठपणें करण्यांत त्यानीं आपल्या आयुष्याचीं अनेक बहुमोल वर्षें घालविलीं.

आरूना सुंदर मुद्रिका बनविण्याचें जणूं काय वेड लागलें होतें. ती कला हस्तगत करण्यासाठीं ते वणवण हिंडले. जेथें प्रवेश करून घेणें जरूर आहे, असें वाटलें तेथें पगाराची पर्वा न करतां त्यानीं प्रवेश करून घेतला, आणि आपल्या गुरूची एकनिष्ठपणें सेवा केली. कोणत्याही कलेच्या प्राप्तीसाठीं वाट्यास येईल तो त्याग करायला तुम्हीं तयार झाल्यानंतर ती तुमच्यावर कां नाहीं प्रसन्न होणार?

परंतु आपण जन्मभर कष्ट करून जी कला संपादन केली तिच्यावर ते

शेठजींच्या मागें आपल्या शिरावरील जबाबदारी दुष्पटीनें वाढली आहे आणि ती पार पाडूनच सुटका, असें आरूनीं मानिलें. जावजीशेठजींच्या मागें त्यांच्या चिरंजीवांस आरूनीं जो पितृतुल्य सहकार दिला, तो व्यवसायाच्या दृष्टीनें बहुमोलाचा होता. त्यामुळें तुकारामजी नि पांडुरंगजी ह्या बंधुद्वयांस प्रेमळ पित्याचें छत्र आपल्यावर कायम आहे, असें वाटून उमेदीनें उद्योगास लागणें शक्य झालें.

जीवनांत आर-पार जाऊन पोहोंचलेली आरूंची केवढी ही प्रखर निष्ठा!

राणूजी आरूंचें पूर्वायुष्य समजून घेण्यासारखें आहे. त्याचा जन्म जुन्नर तालुक्यांतील आळें नावाच्या खेड्यांत १८४८ सालीं झाला. घरची फार गरिबी. थोडीशी शेती होती. तिच्यावर कशीबशी गुजराण करावयाची. राणूजींकडे बालपणापासुन रानावनांत जाऊन गुरें राखण्याची कामगिरी आली. जावजी शेठना त्यांच्या नावाचीं अक्षरें तरी लिहितां येत असत; परंतु राणूजींना बालवयांत तेवढेंसुद्धां शिक्षण संपादन करण्याचें भाग्य लाभलें नाहीं! आई शेतांत नि घरांत कष्ट करायची; त्यामुळें पोटभर जेवायला तरी मिळायचें. ती निधन पावल्यानंतर जेवणाखाण्याचे हाल होऊं लागले. राणूजींचें वय त्यावेळीं १२।१३ वर्षांचें होतें. वडील आपल्या ह्या मुलास घेऊन पोटापाण्याचा उद्योग शोधण्यासाठीं मुंबईंत आले. भायखळ्यावर रेल्वेस्टेशनजवळ त्यांनीं एक लहानशी जागा भाड्यानें मिळवून तेथें रहाण्यासाठीं एक लहानशी झोपडी बांधिली. तेथें राहून वडील बिगारी काम करूं लागले. धाकट्या राणूजीलाही हेलकऱ्याचें काम मिळालें.

तेथून जवळपास बनारसी नावाचा कोणी एक पारशी दुकानदार रहात असे. त्याचें दारू-दुकान होतें. तेथें दारूचीं ग्लासें धुणें, साफसुफी करणें, हें काम संभाळून शिवाय त्याच्या वाड्यास दुसरेंही एक काम आले होतें. त्या दुकानदाराचे दोन्हीं मुलगे स्टेशनांत फिटरचें काम करीत असत. त्यांचा जेवणाचा डबा राणूजीला पोहोंचवावा लागत असे नि त्या कामाबद्दल त्याला दरमहा तीन रुपये मिळत असत. ते त्याकाळीं एकट्याच्या पोटाला पुरण्यासारखे होते.

राणूजी आपल्या छोट्या आत्मवृत्तांत म्हणतात:[१]

---

१ मुद्रण-प्रकाश : जानेवारी व एप्रील १९३८

तसेंच तेथें जाण्याचा हा बहुमोलाचा नि जीवनसाफल्याचा सल्ला त्यांना जावजीशेठकडून मिळाला. मुद्रिका उत्तमप्रकारें तयार करण्यांत प्रावीण्य मिळविणाऱ्यांचें भवितव्य उज्वल आहे, ह्याची जावजीशेठना चांगली कल्पना होती. विशिष्ट परिस्थितीमुळें आपण जो मार्ग चोखाळला, त्याच मार्गानें आपल्या मित्रानेंही जावें, असें जावजीशेठना वाटणें स्वाभाविक होतें.

एज्युकेशन सोसायटीच्या छापखान्यांत राणूजीना थॉमस ग्रॅहॅम ह्यांच्या हाताखालीं चांगला वाव मिळाला. गणपत कृष्णाजी, जावजी दादाजी आणि आतां राणूजी. थॉमस ग्रॅहॅमची ही उज्वल शिष्यपरंपरा आहे. एकाहून दुसरा आपल्या कामांत चलाख! येथें राणूजीनीं आपलें सर्व लक्ष टाईप पाडण्याच्या कामाकडे लाविलें. थॉमस ग्रॅहॅमची मर्जी त्यानीं संपादन करून घेतली. गुरुकृपा झाल्यावर तुम्हांला कशाची उणीव भासणार?

आपल्या ह्या गुरुजीबद्दल राणूजी आत्मवृत्त-कथनांत म्हणतात, "टाईप पाडण्याच्या व पंच घासण्याच्या कामांतील माझे गुरुजी म्हणजे थॉमस ग्रॅहॅम. त्यांच्या हाताखालीं त्यांच्या सांगण्याप्रमाणें मी मन लावून काम केलें. त्यावेळीं त्यांचें वय पंचावन वर्षांचें असावें. त्यांना पोलादी पंच घासण्यासाठीं माझ्या-सारख्या घाटी माणसाची जरूरी होती. ती मीं भागविली. आणि त्याबरोबर ती कलाही हस्तगत केली. मी ही ईश्वरी कृपा समजतों. थोड्याच कालावधींत मी त्यांचा पट्टशिष्य बनलों.

"थॉमस ग्रॅहॅम याच देशांत जन्मलेला हिंदी गृहस्थ. तो ख्रिस्ती होता. त्याला बायको पोरें होतीं. त्यांपैकीं हलीं (१९३८) दोन मुली व एक मुलगा हयात असावीं. त्यांचें व माझें फारच सख्य होतें. मी त्यांच्या घरांतील एक कुटुंबीय झालों होतों. मराठी, गुजराथी वगैरे सर्व प्रकारचे पंच करण्यांत तो प्रवीण होता.

"ह्या थॉमस ग्रॅहॅमचा मूळ गुरू वेबस्टर म्हणून अमेरिकन मिशनरी होता. तो १८३० ते १८३३ काळांत या देशांत होता. मिशन-प्रेस त्याच्या सोसायटीनें त्याच्याकडे सोपविला, त्यावेळीं थॉमस ग्रॅहॅम हा त्याच्या हाताखालीं नोकरीस होता. भारतांत पोलादावर प्रथम मराठी अक्षरें कोरणारा वेबस्टर व त्याच्यानंतर थॉमस ग्रॅहॅम. त्यावेळीं त्याच्याबरोबर जीवन लोहार नावाचा एक हुषार

कारागिर होता. तोही मराठी, गुजराथी ह्या दोन भाषांचे पोलादी अक्षरांचे ठिळे (पंच) कोरण्यास व त्यांवरून टाईप पाडण्यास शिकला. अर्थात् जीवन हा माझा गुरुबंधू लागतो.

"तिकडे जावजीही इंदुप्रकाशमध्यें पंच व मेट्रिसा करीत असे. मीही तेंच करी. पुढें त्यांच्या व माझ्या वारंवार भेटीगांठी होऊं लागल्या. पुढें पैसे मिळविण्यासाठीं आम्हीं उभयतां असलीं कामें खंडून घेऊं लागलों. चाकरी संभाळून आम्हीं घरीं हें काम करूं लागलों. जावजी माझ्यापेक्षां सहा वर्षांनीं वडील. त्याला इंदुप्रकाशमध्यें पंचवीस रुपये पगार मिळे. तेथें दोन वर्षें राहून तो नंतर ओरिएंटलच्या फाऊंड्रीमध्यें तीस रुपयांवर गेला. तेथें तो सुमारें दीड वर्षें होता. त्याचें धोरण व्यापारी होतें. नोकरी करीत असतांच त्यानें घरीं टाईप पाडण्याचें धाडस केलें. पुढें वर्ष सहा महिन्यांत त्याला आत्मविश्वास वाढूं लागला........ मीही त्याच नादांत व विचारांत होतों. तेव्हांपासून आम्हीं एकमेकांचे फार विश्वासू व जणूं काय एका शरीराचे दोन हात बनलों व एकमेकांच्या विचारानें वागूं लागलों.

"मागें सांगितल्याप्रमाणें जावजीशेठनीं टाईप फांऊंड्री काढली. परंतु त्यानीं नोकरी सोडण्यापूर्वी प्रथम मीच नोकरी सोडली व कांहीं माणसें बरोबर घेऊन भाड्यानें घेतलेल्या एका जागेंत काम करूं लागलों. जावजी व मी मिळून इंदुप्रकाश, समाचार व प्रभाकर या छापखान्यांचें कांहीं फुटकळ काम प्रथम करीत असूं. हळुहळु जम बसूं लागला. कामाची व तें पार पाडण्याची खात्री वाढूं लागली, तसतसा एकमेकांचा विचार घेऊन जावजीनें १८६४ सालीं स्वतःची टाईप फाऊंड्री स्थापन केली. तेथें प्रथमारंभीं मी एकटाच काम पहात असें. काम वाढत चाललें तशी जावजीनें नोकरी सोडली व याच कामास सर्वस्वीं वाहून घेतलें. त्या वर्षांपासून तों आजतागायत म्हणजे १९२१ अखेर, मी त्यांचेच फाऊंड्रींत काम करीत आहें.

"मी जावजीच्या टाईप फाऊंड्रींत असतां मला पंच घासण्याविषयींचा फार निदिध्यास लागला होता. परंतु येथें इतर कामेंच फार असल्यामुळें फारसा वेळ मिळत नसे. म्हणून पंच घासण्याचें काम मी स्वतः घरींच करूं लागलों.

"या कामाची संधी माझे आद्य गुरु थॉमस मॅहॅमकडून मला मिळाली होती; खरोखर त्यानें मला दिलेला हा प्रसादच होय. पुढें पुढें तर त्याचें स्मरण

करून मी आपलें काम येईल तसें करूं लागलों. आणि कामानेंच मला तें काम शिकविलें. काम कामाचा गुरू म्हणतात, त्याची प्रचीति मला आली. मनुष्याचा निर्धार असला पाहिजे; म्हणजे त्याचा अमूर्त गुरू त्याचा तोच होतो. तेव्हां मी थॉमस ग्रॅहॅमला मनोमन गुरू करून त्या विद्येंत प्रावीण्य संपादन केलें.

"पुढें त्या कामाची मला फार गोडी वाटूं लागली. पंच करण्याचा अभ्यास जास्तींत जास्त वाढवावा, असें वाटूं लागलें. म्हणून जावजींची नोकरी सोडून मी मुंबई समाचारमध्यें ३० रु. पगारावर गेलों. तेथें वर्ष सहा महिने होतों. त्या काळांत टाईप पाडणें, घासणें, मेट्रिसा फिट करणें वगैरे कामावर मी होतों. तेथेंही माझें जें आवडीचें पंच करण्याचें काम तें करण्यास वेळ मिळेना; म्हणून ती नोकरी सोडून मी पुण्यास गेलों व तेथें ज्ञानप्रकाश छापखान्यांत टाईप फाऊंड्रींत वीस रुपये पगाराची नोकरी पत्करली. (१८७१) तेथें काम शिकण्यास मिळावें ही फार इच्छा होती. मालक काशिनाथ त्र्यंबक रानडे हे होते. त्यानंतर सखाराम रामचंद्र फडके होते व संपादक बाबाजी कृष्ण गोखले होते. तेथें ठसेदार कोणी नव्हता. जीवन लोहारकडून मेट्रिसा करवून घेऊन काम चालवीत. तेथें मी स्वतंत्रपणें पंच करण्याचें काम करूं लागलों. तेथें मी आपल्या हातानें बालबोध देवनागरीचे ग्रेट प्रायमरचे एक जाडा व एक बारीक असे दोन फॉंट तयार करून ठेविले. रावजी श्रीधर गोंधळेकर हे त्यावेळीं माझे मित्र व सल्लागार होते. त्यांचें हस्ताक्षर सुंदर व वळणदार असे. माझेंही वळण त्यांना आवडत असे. मी स्वतःच्या बुद्धीनें अक्षरांचीं वळणें बसविलीं असलीं तरी कुठें मोहक व नवें वळण दिसल्यास मी त्याचा आवडीनें स्वीकार करीत असें. मी अजूनही या कामांत उमेदवारच आहें असें मला वाटतें. दुसऱ्यांकडून घेण्यासारखें असेल तें जरूर घ्यावें हीच माझी वृत्ती.

"मी अगदीं निर्व्यसनी म्हणून गोंधळेकर मला फार मानीत व व्यवसायबंधू या नात्यानें माझा आदर करीत. अनेक विद्वानांकडे माझी वाखाणणी करीत. त्यांच्यामुळें अनेक विद्वानांशीं माझ्या ओळखी झाल्या. केरू नाना छत्रे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, सार्वजनिक काका, गोविंदराव अभ्यंकर, न्यायमूर्ति रानडे वगैरे थोर गृहस्थांचा या दृष्टीनें उल्लेख करतां येईल. मधून मधून जावजींच्या फाऊंड्रींत अडीअडचणीच्या वेळीं महिना दोन महिने मी जाऊन

रहात असें. मी ( ज्ञान-प्रकाश प्रेसमध्यें ) दोन फौंट पुरे केले; त्यावेळीं रानडे यानीं मला दिवाळींत पागोटें व धोतर जोडी बक्षीस दिली. त्यानंतर सुमारें एक वर्षानेंच जावजीनें आपल्याकडे येऊन रहाण्याबद्दल मला गळ घातली व पगारही जास्त देऊं केला. त्यामुळे माझें मन पूर्वीच्या प्रेमानें जावजीकडे ओढ घेऊं लागलें. मी मग ज्ञानप्रकाशला रामराम ठोकला."[१]

जावजीशेठजींच्या जीवनांत नि मराठी मुद्रण कलेच्या क्षेत्रांत राणूजी रावजी आरू ह्यांचें स्थान फार महत्त्वाचें असल्यामुळें त्यांच्या जीवन-कार्यांची यथायोग्य कल्पना करतां यावी, ह्या हेतूनें त्यांच्या आत्मवृत्तांतील विस्तृत गोषवारा येथे देण्यांत आला आहे.

राणूजी हा एका गरीब शेतकऱ्याचा अशिक्षीत म्हणजे शिक्षणाचा गंधही न लागलेला मुलगा. मुंबईंत येऊन मांडीं घासण्याची नि हेलपाटे घालण्याची अत्यल्प वेतनाची नोकरी त्याला पत्करावी लागली. पुढें कांहीं तरी शिकलें पाहिजे असें वाटून जावजीशेठप्रमाणेंच टाईप घासण्याचें काम त्यानें पत्करलें. त्याच्या नशिबीं शेतकरी किंवा हेलकरी होऊन रहावयाचें नव्हतें. लोखंडाला परिसाचा स्पर्श झाला असतां त्याचें सोनें होतें असें म्हणतात. त्याचप्रमाणें राणूजीला जावजीशेठचा स्पर्श होतांच त्यांच्या जन्माचें सोनें झालें ! राणूजी नि जावजी ह्या दोघांमध्यें अनेक बाबतींत साम्य दिसून येतें. एका प्रकरणांत ह्या साम्याचा उल्लेख ह्यापूर्वी करण्यांत आलेला आहेच. ह्या दोघांनीं एकत्र येऊन देवनागरी टाईपांत क्रांति घडवून आणिली. टाईप पाडण्याची, मेट्रिसा ठोकण्याची किंवा टाईपांचें पंच तयार करण्याची कला शिकण्याची संधी राणूजींना थॉमस ग्रॅहमसारख्या तज्ञाच्या हाताखालीं मिळाली असली तरी ते अर्ध्या हळकुंडानें पिवळे होणारे नव्हते. त्या कलेचा त्यानीं सतत ध्यास घेतला. तिच्यासाठीं ते वणवण हिंडले व शेवटपर्यंत त्या कलेंतील एक विद्यार्थि ह्या नात्यानें वावरले. ह्यांतच त्यांच्या थोरवीचें रहस्य आहे. १

संस्कृत ग्रंथांच्या छपाईसाठीं विशिष्ट प्रकारच्या मुद्रिका लागतात. त्या भाषेंतील काहीं कांहीं अक्षरें शब्दोच्चाराबरहुकुम तयार करणें हें कौशल्याचें नि

---

१ मुद्रण-प्रकाश: जानेवारी व एप्रील १९३८

त्रासाचें काम आहे. वेदविषयक ग्रंथांत कांहीं अक्षरें डमरूसारख्या आकाराचीं तयार करावीं लागतात. निर्णयसागर–मुद्रणालयानें ह्या क्षेत्रांत जागतीक स्वरूपाची कीर्ति संपादन केलेली आहे. त्याला प्रमूख कारण राणूजी आरूंचें हस्त-कौशल्य.

जागतिक कीर्तीचे सुप्रसिद्ध संस्कृत पंडित मोक्षमुल्लर ह्यानीं विलायतेंत ऋग्वेद छापिला. त्या प्रकारच्या टाईपांत अथर्व–वेदाचें मुद्रण करावें असा जेव्हां मुंबई सरकारचा विचार ठरला तेव्हां तशा प्रकारचा टाईप नि छपाई कुठें उपलब्ध होईल, ह्या बाबतींत शोध करण्यांत आला. मुंबई, मद्रास, कलकत्ता वगैरे शहरांतून त्यावेळीं जे मोठमोठे परदेशी नि देशी छापखाने होते, त्या सर्व ठिकाणीं तपास करण्यांत आला; परंतु त्या काळीं ती अवघड जबाबदारी स्वीकारण्यास कोणीही तयार होईना. रा. ब. शंकर पांडुरंग पंडित ( १८४०–१८९४ ) ह्या विद्वानाकडे अथर्व-वेदाचें संपादन सोपविण्यांत आलें होतें. त्यांचा जावजी शेठजींच्या निर्णयसागर मुद्रणालयाशीं संबंध असल्यामुळें त्यानीं नंतर तेथें चौकशी केली. ती कामगिरी शेठजींनीं स्वीकारली. कारण राणूजीसारखा मुद्रिकाक्षेत्रांतील प्रवीण मोहरा त्यांच्याजवळ होता. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे राणूजींनीं अथर्व-वेदासाठीं जरूर असलेल्या मुद्रिका मेहनत घेऊन तयार करून दिल्या व छापखान्याचें नांव राखलें, एवढेंच नव्हे तर कोणताही संस्कृत ग्रंथ असो; तो बिनचूक छापायचा असल्यास खास खात्रीचें मुद्रणालय म्हणजे निर्णयसागर, हा लौकिक मिळवून दिला आणि तो लौकिक आजवर कायम टिकून राहिला आहे. छापखान्याच्या इतिहासांत ही घटना फार महत्त्वाची आहे. रा. ब. शंकर पांडुरंग पंडित हे सूक्ष्म दृष्टीचे विद्वान गृहस्थ होते. त्यांच्या पसंतीला कोणतीही गोष्ट उतरणें ही साधी गोष्ट नव्हती. निर्णयसागरच्या कामगिरी-मुळें त्यांचें समाधान होऊन त्यानीं जावजीशेठची व राणूजींची पाठ थोपटली.

कोणत्याही प्रकारच्या लहान मोठ्या मराठी, संस्कृत, गुजराथी, कानडी, हिंदु, सिंधी, फारशी, वगैरे कोणत्याही भाषेंतील मुद्रिका असोत; त्या तयार करण्यांत राणूजींचा हातखंडा होता. ह्याचें मुख्य कारण म्हणजे त्या क्षेत्रांतील त्यांची तपश्चर्या तशीच दांडगी होती. ‘ चणे खावे लोखंडाचे, मग ब्रह्मपदीं नाचे ।’ मुद्रिकाक्षेत्रांत राणूजींनीं खरोखर ‘ ब्रह्मपद ’ प्राप्त करून घेतलें होतें.

एकदां त्रिशांत रहाण्याजोगें अत्यंत छोटें बायबल तयार करावें, असा बायबल सोसायटीनें विचार केला. तो विचार अमलांत कसा आणावयाचा ? त्यासाठीं अतीशय लहान टाईप तयार करणें जरूर होतें. सोसायटीच्या चालकांनीं जावजीशेठपुढें हा आपला विचार ठेविला तेव्हां त्यांनीं राणूजींच्या बळावर होकार दिला नि राणूजींनींही जरूर ती मेहनत घेऊन ती कामगिरी यशस्वी रीतीनें पार पाडून दाखविली. अशीं उदाहरणें किती सांगावीं ?

मुद्रिकांच्या बाबतींत कोणतीही बिकट समस्या असो, ती सुलभ रीतीनें सोडविण्याची किमया राणूजींचे हात करून दाखवीत असत.

निर्णयसागर-मुद्रणालयाचा मुद्रिकांच्या बाबतींत जो लौकिक झाला त्याला प्रामुख्यानें जर कोणी कारण झाला असेल तर ते राणूजीच होत, असें जावजीशेठ व तुकारामशेठ हे नेहमीं म्हणत असत.

राणूजींची ग्रहणशक्ति दांडगी होती. हा अक्षरशः निरक्षर माणूस ! अक्षर-मुद्रिका घासतां घासतां त्यांना अक्षर ओळख झाली, हें सांगण्यांत आलें आहेच. मराठीच नव्हे तर गुजराथी, कानडी वगैरे भाषांचेंही ज्ञान, त्यांना त्या त्या भाषेंतील मुद्रिका तयार करीत असतां नि घासीत असतां झालें. तें कुठवर ? त्या त्या भाषेंतील ग्रंथ ते सहज रीतीनें वाचूं नि समजूं शकत असत. त्याना वाचनाची आवड होती. आयुष्यांतील एक क्षणही वायां दवडायचा नाहीं, हें बंधन त्यांनीं स्वतःवर शेवटपर्यंत लादून घेतलें होतें. गीता, गीतेवरील वेगवेगळ्या टीका, तुकारामाची गाथा, दासबोध, ज्ञानेश्वरी हे ग्रंथ ते जसे भक्तिभावानें फावल्यावेळीं वाचीत असत, त्याचप्रमाणें लोकहितवादी, थोरले चिपळूणकर, धाकटे चिपळूणकर, आगरकर ह्यांचेही लेख त्यांना मनापासून आवडत असत.

म. भा. चि. म. कृष्णाजी नारायण आठल्ये हे त्यांच्यासंबंधीं लिहितात कीं, "नवे नवे पंच करण्यामध्यें राणू रावजी आरू ह्यांचा लौकिक सर्वत्र आहेच; पण त्यांचें सौजन्यही जावजीशेठजींच्या तोडीचें आहे. आणि इतकें असूनही त्यांचा विद्याव्यासंगही मोठा जबरा आहे. आमच्यावर त्यांची फार भक्ति आहे. केरळ-कोकिळमध्यें आलेली 'विद्युन्मानस-शास्त्र' ह्या विषयावरील लेख-माला त्यांना फार आवडली होती. केव्हाही भेट झाली कीं, त्याचें स्वतंत्र पुस्तक काढा, नाहीं तर मला सांगा, मी काढतों, ही त्यांची इच्छा पुढें यावयाचीच ! तात्पर्य

तुकारामशेठ आणि राणूजी ह्या निर्णयसागरांतील सौजन्याच्या दोन मूर्ति आहेत व त्यांच्याच पुण्याईच्या बळावर सर्व कांहीं भरभराटींत चाललें आहे. राणूजींस तर तुकारामजी वडिलांप्रमाणें पूज्य मानतात व तेही त्यांस मुलाप्रमाणें प्रेमानें 'तुकाराम' म्हणतात. तुकारामशेठ त्यांचा परामर्ष वडिलांप्रमाणें घेतात, हा त्यांचा गुणही पार तारीफ करण्यासारखा असून इतर होतकरू मंडळींनीं ध्यानांत ठेवण्यासारखा आहे."

राणूजींच्याठायीं दीर्घोद्योग, सौजन्य, सत्याचरण, सच्छीलता नि सत्समागमाची आवड, हे सुंदर गुण प्रकर्षानें वास करीत होतो. संकटप्रसंगीं दुसऱ्याच्या मदतीस धांऊन जाणें, हा परोपकाराचा गुणही त्यांच्याठायीं होता. १८९३ सालीं झालेल्या हिंदु-मुसलमान दंग्यांत स्वतःचा जीव धोक्यांत लोटून शांतता घडवून आणण्याची अभिनंदनीय कामगिरी त्यांच्या हातून पार पडली. त्या कामगिरीबद्दल नि त्यांच्याठायीं असलेल्या इतर बहुमोल गुणांबद्दल सरकारनें त्यांना बहुमानपुरस्सर शाल-जोडी व जे. पी. पदवी अर्पण केली.

असें होतें राणूजी आरूंचें जीवन, सुसंपन्न, समाधानी नि समर्पित.

# १०

# जावजीशेठजींचा इतर मित्र—परिवार

जावजीशेठ ह्यांच्या मित्रपरिवारांत तत्कालीन बहुतेक विद्वानांची गणना करतां येईल. विद्वान मंडळी त्यांच्याकडे कां बरें आकर्षिली गेली? ह्याला मुख्य कारण म्हणजे जावजीशेठजींचा गोड, विनम्र, शालीन नि निरभिमानी स्वभाव होय. गुणी माणसें त्यांना बहुमोलाचीं वाटत असत. आणि त्यामुळें त्यानी त्या काळांतील अनेक विद्वान माणसें जोडलीं व उपरोक्त गुणांच्या बळावर तीं राखिलीं नि ज्ञानप्रसारार्थ त्यांचा सदुपयोग करून घेतला.

विद्वान माणसें त्यांच्याजवळ यायला दुसरेंही एक कारण होतें. मागें सांगितल्याप्रमाणें त्यांच्याजवळ प्रभावी असें मुद्रणालय होतें. त्यांच्या जवळपास वावरणाऱ्यांत अशीं बहुतेक माणसें होतीं कीं, ज्यानीं लोकशिक्षणाच्या नि ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें मुद्रणालयाचें महत्त्व ओळखलें होतें. त्या यंत्राचें सामर्थ्य फार मोठें आहे. त्या सामर्थ्याचा उपयोग लोककल्याणासाठीं व्हावा, असें त्यांना वाटे नि त्यांच्या इच्छेनुरूप तो तसा करून द्यायला जावजीशेठजींची पूर्ण तयारी होती.

निर्णयसागर-मुद्रणालयानें नि जावजीशेठजींच्या स्नेहाळ स्वभावानें तत्कालीन अनेक विद्वान मंडळीला एकत्र नि एका छत्राखालीं आणिलें. शाळागृहीन किंवा पुस्तकी शिक्षणाचा लाभ जावजीशेठना जरी घडला नाहीं, तरी ती उणीव विद्वानांशीं घडत गेलेल्या वाढत्या सहवासामुळें उत्तमप्रकारें भरून निघाली. मोठ्या प्रमाणांत नि दीर्घकाळ विद्वानांचा सहवास लाभणें ही साधी

का गोष्ट आहे ? जावजीशेठजींचें पूर्व-सुकृत थोर म्हणूनच त्यांना हा अलभ्य लाभ झाला, असें म्हटल्याशिवाय रहावत नाहीं.

जावजीशेठ ह्यांचा निकट संबंध जीवनभर अनेक विद्वान नि कर्तृत्ववान् माणसांशीं आला हें खरें असलें, तरी त्यांच्या जीवनाकडे बारकाईनें पहातां दोन व्यक्तींनीं त्यांच्या जीवनाला नि मुद्रण–प्रकाशन व्यवसायाला परिपूर्णता आणण्याच्या नि त्यांचें जीवन सर्वपरीनें सुसंपन्न करण्याच्या बाबतींत विशेष महत्त्वाचा भाग घेतला असल्याचें आढळून येतें. त्यापैकीं एकानें त्यांना बौद्धिक खुराक पुरविला तर दुसऱ्यानें हस्तकौशल्याचा खुराक पुरविला.

विनायक कोंडदेव ओक नि राणू रावजी आरू हेच ते त्यांचे दोन जिव्हाळ्याचे मित्र नि मार्गदर्शक होत. निरनिराळ्या प्रकरणांतून प्रसंगोपात ह्या दोघांचाही उल्लेख आलेला असला तरी द्विरुक्तीचा दोष पत्करूनहि मागील व ह्या प्रकरणांत त्यांचा थोडा विस्तारानें परिचय करून देण्यांत आला आहे. आजच्या पिढींतील लोकांना त्यांच्या कामगिरीची फारशी माहिती नाहीं. ह्या दोघांशिवाय जावजींच्या इतर विद्वान मित्रांचाही अल्प परिचय करून दिल्यास तो अनाठायीं होणार नाहीं.

**विनायक कोंडदेव ओक ( १८४०–१९१४ )**

ह्यांची आठवण होतांच त्यानंतरच्या काळांत केवळ लेखन-व्यवसायावर जगणारे नि विपूल वाङ्मयनिर्मिती करणारे नाथमाधव, मामा वरेरकर ह्यांच्यासारख्या वाङ्मयजीवि लेखकांचें स्मरण झाल्याशिवाय रहात नाहीं. विनायकराव ओक ह्यांनीं जन्मभर मोठ्या हौसेनें, आवडीनें नि लोकसेवेच्या भावनेनें लेखन–व्यवसाय अखंड केला.

जनतेंत ज्ञानप्रसार फार मोठ्या प्रमाणांत झाला पाहिजे, त्याशिवाय देशाची सुधारणा होणार नाहीं, हें तत्त्व विनायकराव ओकांच्या मनावर पूर्णपणें बिंबल्यामुळें त्या दिशेनें त्यांचा उद्योग अविश्रांतपणें आयुष्याच्या अखेरच्या क्षणापर्यंत चालू होता. वाचन आणि लेखन हाच त्यांचा नित्याचा छंद होता. ज्ञानकण जियून तिथून मिळवायचे नि आपल्या सुबोध भाषेंत ते जनतेपुढें ठेवायचे, हाच त्यांचा एकमेव ध्यास होता. तत्कालीन सरकारनें नि जावजी शेठजीनीं त्यांची ही आवड पूर्ण केली.

विनायकरावांची लिहिण्याची हौस दांडगी असली तरी लिहिलेलें प्रकाशांत आणण्याची सोय झाली पाहिजे ना ? त्या काळांतील सरकारी शिक्षणखातें नि जावजीशेठ ह्यांचें सुसंपन्न मुद्रणालय, हीं दोन्हीं विनायकरावांच्या पाठीशीं सातत्यानें असल्यामुळें त्यांना प्रकाशनासंबंधीं कधींही चिंता करावी लागली नाहीं.

विनायकरावजींचें शिक्षण फारच तुटपुंजें झालेलें होतें. त्यांना बालपणीं प्रतिकूल परिस्थितीशीं झगडावें लागलें. त्यांचा जन्म चिपळूण तालुक्यांतील हेदवी या गावीं १८४० सालीं झाला. वयाच्या पांचव्या वर्षी आई-वडील ह्यांच्या निधनामुळें चुलत चुलते दाजी काशीनाथ ओक ह्यांनीं त्यांचा प्रतिपाळ केला. घरीं मुलांच्या शिक्षणासाठीं एक पंतोजी येत असत. वयाच्या बाराव्या वर्षी ते चिपळूण येथील शाळेंत जाऊं लागले. तेथें मराठी शिक्षण पूर्ण केल्यानंतर त्यांना सातारा येथील इंग्रजी शाळेंत इंग्रजी शिक्षण ३।४ इयत्तांपर्यंतच घेतां आलें. विवाह लहानपणींच झाला. नोकरीकडे वळणें जरूर होतें. इंग्रजी शाळेंत असतां तेथील एक गुरुजी पांढरकामे ह्यांच्या परिचयाचा लाभ त्यांना घडलेला होता. त्यांची नेमणूक अहमदनगर जिल्ह्याचे डे. ए. इन्स्पेक्टर ह्या नात्यानें झाली तेव्हां विनायकरावांची परिस्थिति माहित असल्यामुळें त्यानीं प्राथमिक शिक्षक म्हणून महिना आठ रुपये पगारावर त्यांची भिंगार गावीं नेमणूक केली.

विनायकराव शिक्षणखात्यांतून १८९५ सालीं डे. ए. इन्स्पेक्टर ह्या नात्यानें सेवानिवृत्त झाले, त्यावेळीं त्यांना मासिक शंभर रु. पगार मिळत होता.

हें झालें ओकांच्या नोकरीसंबंधानें; परंतु नोकरीस लागण्यापूर्वी किंवा नोकरीवर असतां, त्यानीं ज्या साहित्यिक हालचाली केल्या, त्या फार महत्त्वाच्या होत्या. त्यांचें स्वरूप काय होतें तें आपण पाहूं या.

काय असेल तें असो. विनायकरावांना लहान वयापासून दोन व्यसनें जडलीं. एक वाचनाचें नि दुसरें लेखनाचें ! सातारा येथें शिक्षण घेत असतां तेथील 'शुभसूचक' नामक साप्ताहिकांत ते नित्यनेमानें लिहीत असत. ज्ञान संपादन करण्याची नि तें दुसऱ्यांना मुक्त हस्तानीं देण्याची त्यांना दांडगी हौस होती. ती त्यांना स्वस्थ बसूं देत नसे. शिक्षक नि शिक्षणाधिकारी ह्या नात्यानें त्यानीं मिळविलेले अनुभव बहुमोलाचे होते. त्यांत वाचनाची नि सतत व्यासंगाची भर पडली.

जावजीशेठना जशी सज्जन सहवासाची आत्यंतिक आवड, तशीच विनायकरावांना होती ग्रंथ-वाचनाची आवड. जावजीशेठ ह्यांची प्रत्यक्ष भेट होऊन त्यांचे जीवनसाथी होण्याचा सुयोग जुळून येण्यापूर्वी त्यांचा पत्रव्यवहार सुरू होता. आयुष्याच्या उत्तरार्धांत दोघांनीं एकमेकांस पूरक नि प्रेरक सहाय्यक होऊन रहावें; असा ईश्वरी संकेत होता.

मनसुराद वाचायचें, तें पचवायचें नि प्रसववेदना होऊं लागल्या म्हणजे ग्रंथरूपानें विचारांस वाट मोकळी करून द्यावयाची, हा त्यांचा उपक्रम शिक्षकी पेशा शोभवींत असल्यापासून चालू होता.

दीर्घकालीन वाचनाच्या सहाय्यानें विनायकरावानीं इंग्रजी नि संस्कृत भाषेवर चांगलें प्रभुत्व संपादन केलें. संतकाव्य-वाङ्मयाचाही त्यांचा व्यासंग दांडगा होता. अभ्यासावर त्यांची निस्सीम श्रद्धा होती. त्या श्रद्धेच्या बळावर त्यानीं आपलें ज्ञान-भांडार सुसंपन्न केलें आणि जेव्हां वेळ आली व ईश्वर कृपेनें संधी प्राप्त झाली, तेव्हां त्या भांडारांतील रत्नांची खैरात त्यानीं लोककल्याणार्थ मुक्तहस्तें केली.

ही खैरात करणें त्यांना शक्य झालें ह्याचें मुख्य कारण त्याच विचारांनीं भारला गेलेला जावजीशेठसारखा मुद्रण-कलानिपूण उदार सहकारी त्यांना लाभला हेंच होय.

त्यापूर्वीच विनायकराव ओक ह्यानीं सरकारी शिक्षणखात्याचाही उदार आश्रय संपादन केलेला होता. ह्याला प्रमुख कारण म्हणजे तत्कालीन मराठी नि संस्कृत भाषा-पंडित, पुणें पाठशाळेचे मुख्याधिकारी नि सरकारनें मराठी भाषांतरकार ह्या नात्यानें ज्यांच्याकडून शालोपयोगी पुस्तक-निर्मितीच्या बाबतींत सतत तीस वर्षें सेवा करून घेतली, असे मेजर टी. कँडी ह्यांचें मार्गदर्शन त्यांनीं प्रामाणिकपणें स्वीकारलें, हेंच होय.

ह्या दोघांचा संबंध जडायला तसेंच एक कारण घडलें. 'The *Bee*' ह्या इंग्रजी ग्रंथाच्या धर्तीवर विनायकरावानीं 'मधुमक्षिका' ह्या नावाचें एक पुस्तक लिहून तें सरकारकडे पाठविलें. त्यावेळीं विनायकराव हे नेवासें (नगर जिल्हा) येथील शाळेंत शिक्षक होते. कोणत्याही पुस्तकास सरकारी आश्रयाची अपेक्षा असल्यास त्याकाळीं तें पुस्तक मेजर कँडी ह्यांच्या पसंतीस

उत्तरावें लागत असे. मेजर कँडी ह्यांच्या नजरेखालून गेल्याशिवाय मराठी भाषेत लिहिलेलें कोणतेंही पुस्तक छापायचें नाहीं, असा त्याकाळीं दंडकच होता. तसेंच ते ज्या दुरुस्त्या सुचवितील त्या निमूटपणें मान्य कराव्या लागत असत.

दैवयोग असा कीं ओकानीं पाठविलेलें पुस्तक ( मधुमक्षिका ) कँडी साहेबांस आवडलें. त्यावेळीं त्यांचे चिरंजीव नगर जिल्ह्याचे असिस्टंट कलेक्टर होते. त्यांच्यामार्फत मेजर कँडी ह्यानीं ओक ह्यांस पुस्तक आवडल्याचा निरोप पाठविला.

लेखकास उत्तेजनाची फार जरूरी असते. आरंभकाळांत दक्षिणा प्राईज कमिटीकडून तसेंच मेजर कँडीकडून विनायकराव ओक ह्यांस जरूर असलेलें उत्तेजन मिळालें नि नंतरच्या काळांत त्यांनीं लेखन-व्यवसायास सर्वस्वीं वाहून घेतलें.

हे युरोपीयन गृहस्थ ! ह्यांना मराठी भाषेचें ज्ञान तें कसलें असणार ? हे कोण आम्हांला शिकविणारे ? असें म्हणून त्यांचीं मतें धुडकाऊन लावणारे भाऊ महाजन, रामभाऊ गुंजीकर, ह्यांच्यासारखे फार थोडे लोक त्याकाळीं होते हें खरें असलें, तरी मेजर कँडी ह्यांचा त्या क्षेत्रांतील अधिकार बहुतेकांस मान्य होता नि सरकारी आश्रयासाठीं तो मान्य करावा लागत असे.

विनायकराव ओक हे त्या काळांतील एक नावाजलेले लेखक नि ग्रंथकार होते. ते मेजर कँडी ह्यांस आपले गुरु मानीत असत, हें लक्षांत वाळगण्यासारखें आहे. 'ग्रंथकर्तृत्व' नामक आपल्या एका लेखांत ओक लिहितातः—

* " माझ्या लिहिण्याच्या पद्धतीविषयीं कोणी कांहीं म्हणोत. परंतु मी प्रांजलपणें आणि मोठ्या कृतज्ञतेनें कबूल करतों कीं, मला मराठी लिहिण्यास मेजर कँडी साहेबानीं शिकविलें. वास्तविक पाहिलें असतां, त्यांचें प्रत्यक्ष दर्शन मला कधींच झालें नाहीं. परंतु त्यांचे जे अभिप्राय-लेख पाहण्यास शाळा खात्याच्या अधिकाऱ्यांनीं मजकडे पाठविले, त्यांवरून पुष्कळ चांगल्या चांगल्या सूचना मला मिळाल्या आणि माझ्या चुका मला कळल्या........चांगल्या गुरूनें आपल्या आवडत्या विद्यार्थ्यास जसें आस्थेनें शिकवावें—त्याचा हात धरून

* विविधज्ञानविस्तार पुस्तक ३६ वें, १९०५ पृ. ४३

त्यास सुमार्गास लावावें---त्याप्रमाणें, मेजर कँडीसाहेबानीं मला मराठी लिहिण्याच्या मार्गास लाविलें. हे त्यांचे उपकार मी यावज्जीव आठवीन."

विनाकराव ओक ह्यांस मेजर कँडी ह्यांची यावज्जीव कृतज्ञतापूर्वक आठवण रहावी, ह्याला दुसरेंही एक कारण होतें. सरकारला त्याकाळीं शालोपयोगी पुस्तकांची निर्मिती करायची होती. शिक्षणखात्याशीं संबंध आल्यामुळें कोणत्या पुस्तकांची जरूरी आहे हें बरोबर हेरून ओक यांस तें ग्रंथलेखन करून तें सरकारला सादर करतां येत असे नि मेजर कँडीकडून त्यांच्या ग्रंथांस पसंती मिळत असे.

विनायकरावांचें बरेंचसें लेखन चरित्रविषयक आहे. चरित्र लेखनावर त्यानीं विशेष भर दिलेला आहे. मुलांच्या नि थोरांच्याही वाचनांत नेहमीं कर्तबगार पुरुषांचीं चरित्रें यावीं. "मोठ्या लोकांचीं चरित्रें वाचणें हें मनुष्याची दानत सुधारण्यास सहाय्यभूत होतें," असें त्यांचें म्हणणें असे. त्यांनीं अनेक चरित्र-ग्रंथ लिहिले, शालोपयोगी पुस्तकें लिहिलीं नि इतरही लेखन केलें; परंतु विनायकरावांची कृतज्ञतापूर्वक आठवण प्रत्येकास होते नि व्हावी, ती जावजीशेठ ह्यांच्या सहाय्यानें 'बालबोध' मासिक सुरू करून तें त्यानीं एकनिष्ठपणें नि एक टांकी सतत चौतीस वर्षें चालविलें, ह्यामुळेंच होय. ह्यासंबंधींच्या त्यांच्या संस्मरणीय कामगिरीचा आढावा 'बालबोध'—प्रकरणांत विस्तृतपणें घेण्यांत आलेला आहेच.

विनायरावजीनीं जावजीशेठ ह्यांचा प्रेमादरभाव नि विश्वास संपादन करून त्यांना वाङ्मय-प्रकाशनाच्या बाबतींत वेळोवेळीं जरूर नि योग्य तो सल्ला दिला व जावजींच्या जीवनकार्याला निष्ठापूर्वक हातभार लाविला, ह्या त्यांच्या कार्याची महती गावी तेवढी थोडीच होईल.

**रामचंद्र भिकाजी गुंजीकर (१८४४–१९०१)**

'विविधज्ञानविस्तार' ह्या ज्येष्ठ नि श्रेष्ठ मासिकाचे एक जन्मदाते, मराठी वाङ्मयसेवक, टीकालेखक अनेक भाषाकोविद नि मोचनगडसारख्या सुरस कादंबरीचे लेखक, ह्या बहुविध नात्यांनीं रामभाऊ गुंजीकर ह्यानीं मराठी वाङ्मयक्षेत्रांत मानाचें स्थान मिळविलें आहे. जावजी शेठजींचा नि त्यांचा मित्र, सल्लागार नि हितचिंतक ह्या तिहेरी नात्यानें निकट संबंध होता. कोणताही ग्रंथ

प्रसिद्ध करावयांचा तर त्याला ज्या विद्वान मंडळीच्या नजरेखालून जावें लागत असे, त्या मंडळींत रामभाऊंचें स्थान महत्त्वाचें होतें.

रामभाऊंचा जन्म बेळगांवजवळ जांबोटी ह्या गांवीं झाला. त्यांचें मूळ आडनांव होतें केंकरे; परंतु वतन गांवावरून गुंजीकर हें नांव पडलें. ते १८६४ सालीं मॅट्रिक झाले. न्या. काशीनाथपंत तेलंग व गजाननराव भाटवडेकर हे एल्फिन्स्टन महाविद्यायांत त्यांचे सहाध्यायी होते. घरच्या अडचणींमुळें महाविद्यालयांतील पहिल्या वर्षाचा अभ्यासक्रम पूर्ण करून त्यांना महाविद्यालयीन शिक्षणास रामराम ठोकावा लागला. त्यानंतर त्यांनीं एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें उपगुरु ह्या नात्यानें नोकरी पतकरली. तेथें ते सुमारें बावीस वर्षें होते. तेथून ते हुबळीस हेडमास्तर ह्या नात्यानें गेले. शिक्षणखात्यांत डे. ए. इन्स्पेक्टरच्या हुद्यापर्यंत चढून १८८९ मध्यें सेवानिवृत्त झाले.

सेवानिवृत्तीनंतर ते कायमचे मुंबईंत रहाण्यासाठीं आले. त्यांनीं १८६७ सालीं उच्च हेतूंनीं प्रेरित होऊन 'विविध-ज्ञानविस्तार' मासिक सुरू केलें. त्यांचे टीकालेख महत्त्वाचे असत. मराठी, संस्कृत, प्राकृत, इंग्रजी, बंगाली, कानडी, गुजराती नि उर्दू इतक्या भाषा त्यांना अवगत होत्या. मोचनगड (कादंबरी), कौमुदी महोत्साह (संस्कृत व्याकरण), कन्नड परिज्ञान, लाघवी लिपी, वगैरे वाङ्मयाच्या विविध शाखांतील ग्रंथ लिहून त्यांनीं मराठी वाङ्मय-भांडारांत मोलाची भर घातली.

रामभाऊंच्या सल्लामसलतीला जावजीशेठ फार मान देत असत. काव्य-संग्रहाचे संपादक वामनराव ओक निधन पावतांच रामभाऊ गुंजीकर ह्यांची त्या जागीं तात्पुरती योजना करण्यांत आली, ह्यावरून त्यांची योग्यता समजून येणार आहे. प्रकृति ठीक नसल्यामुळें त्या मानाच्या जागीं फार दिवस रहाणें त्यांना शक्य झालें नाहीं.

**हरी महादेव पंडित (१८४९–१८९९)**

लोकसेवेच्या दृष्टीनें निःस्वार्थपणें वाङ्मयसेवेस वाहून घेणारी वाङ्मयसेवकांची एक मालिकाच त्या काळीं निर्माण झालेली होती. महाराष्ट्राचें नि मराठी भाषेचें भाग्य थोर, म्हणून ही विद्वान् मंडळी जावजीशेठजींच्या निर्णयसागर छत्राखालीं आली आणि त्यांनीं आपली विद्वत्ता सत्कारणीं लाविली.

## ३५ जावजीशेठजींचा इतर मित्र-परिवार

हरी महादेव पंडित हे अशा मंडळींपैकीं एक होते. त्यांचें मूळ गांव वेंगुर्लें. वडील पुराण सांगत असत. त्यांचें इंग्रजी शिक्षण मुंबईंत झालें. एल्फिन्स्टन महाविद्यालयांतून बी. ए. च्या परीक्षेला बसले; परंतु त्या परीक्षेंत त्यांना यश मिळालें नाहीं. घरच्या परिस्थितीमुळें त्यांना पुढील शिक्षण थांबवावें लागून नोकरी धरावी लागली. ते नागपूर येथील सिटी-हायस्कूलचे कांहीं वर्षे हेडमास्तर होते. उत्तम नि आदर्श शिक्षक ह्या नात्यानें त्यांनीं नांव मिळविलें. नागपूरकर भोंसले जानोजीराजे ह्यांचे ते कांहीं काळ कारभारी होते. १८९२ मध्यें नागपूरला 'देशसेवक' पत्र निघालें, त्याचे संपादक हरीभाऊ होते. दोन वर्षांनंतर त्या पत्राशीं असलेला संबंध त्यांनीं सोडला. ते कांहीं वर्षे 'विविधज्ञान-विस्तार' मासिकाचे संपादक होते. तिसऱ्या वर्षापासून ह्या मासिकाशीं त्यांचा जडलेला संबंध आयुष्याच्या अखेरीपर्यंत कायम होता. जावजीशेठजींच्या 'काव्य-संग्रह' मासिकाचे संपादक वामनराव ओक ह्यांना त्यांनीं बहुमोलाचें सहाय्य केलें. ते आपलें नांव कोठेंही सहसा येऊं देत नसत. भरीव स्वरूपाची वाङ्मयसेवा करायची; परंतु कशी? गुपचूप! त्या सेवेची किंवा दिलेल्या सहकाराची सहसा कोणाला जाग लागूं द्यावयाची नाहीं. काव्य-संग्रहास त्यांनीं जो सहकार दिला, तो अनन्य-साधारण स्वरूपाचा होता. त्यांनीं कीर्तीचा, नांवलौकिकाचा, त्याचप्रमाणें धनाचाही हव्यास कधीं बाळगला नाहीं. त्यांनीं वि. ज्ञा. विस्तारमधून पुस्तकपरीक्षणपर लिहिलेले लेख बहुमोलाचे नि त्यांच्या विद्वत्तेची साक्ष पटविणारे आहेत. भवभूतीचें 'महावीरचरित' ह्याचें मराठी भाषांतर, नागपूरकर भोंसले ह्यांचा इतिहास, चंडकौशिक नाटक, श्रीमन्नारायणराव पेशवे नाटक, वगैरे ग्रंथांनीं त्यांनीं मराठी वाङ्मय-भांडार सजविलें आहे.

अनेक वर्षांच्या सहवासामुळें जावजीशेठ ह्यांची त्यांना फार चांगली ओळख झालेली होती. जावजीशेठ ह्यांची गणना विद्वानांत करतां येण्यासारखी नसली, तरी अत्यंत श्रेष्ठ अशा कर्त्या पुरुषांत त्यांची गणना करतां येते. आपलें हें मत स्पष्ट करतांना हरीभाऊ पंडित वि. ज्ञा. विस्तारमधील आपल्या लेखांत म्हणतात, "देशाचीं[१] ऊर्जितावस्था येण्यास कर्ते पुरुष पाहिजेत. कर्त्या पुरुषांचीच जिकडेतिकडे वाण आहे. कार्ये करायचीं पुष्कळ आहेत; पण तीं करणाऱ्या

१ विविधज्ञान विस्तार : पुस्तक २४, अंक ६ वा-जून—१८९२

पुरुषांचीच फार तूट आहे. आमचे सुदैवानें जावजी हे एक चांगले कर्ते पुरुष होते. जावजींना जर विद्या असती, तर ते पुढारी झाले असते. तसा योग आला असता तर कर्तृत्व व पुढारीपण यांची एकेच ठिकाणीं उत्कृष्ट सांगड झाली असती. तथापि जावजींना कर्ते, शाते पुरुष फारच उत्कृष्ट मिळाले. त्यांनींच जावजींस बऱ्याचशा अंशानें इतक्या उच्चत्वास चढविलें असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं; पण जावजींचे अंगीं जर कर्तृत्व गुण नसता, तर या नेत्या लोकांच्या हातून काय उपयोग झाला असता? 'कीं नामस्पर्शमणि स्पर्शों परि काय करिल खापर मी', असें जें पंतांनीं मोठ्या मार्मिकतेनें म्हटलें आहे, तोच प्रकार, जर जावजी कर्ते नसते तर या नेत्यांच्या खटपटीचा झाला नसता काय? तेव्हां आम्ही या कर्त्या व नेत्या अशा उभयविध पुरुषाची मनोभावें तारीफ करतों. अंधपंगुन्यायानें या कर्त्या व नेत्या पुरुषांचा संयोग आम्हां सर्वांस मोठा लाभदायी झाला आहे. जावजींच्या या कर्तृत्वशक्तीचीं उदाहरणें अन्य गुणांसंबंधानें बरीचशीं सांगण्यांत आलीं आहेत. विलायतेंत जशा ग्रंथकारांकडून पुस्तकें घेऊन प्रसिद्ध करणाऱ्या कंपन्या आहेत, तसला प्रकार आमच्याकडे जावजींनीं प्रथमतः सुरू केला, असा आमचा समज आहे. जावजींच्या कर्तेपणाचें दुसरें उदाहरण—व यांतील यशाचे भागीदार फार कोणी नसावे—म्हटलें म्हणजे मुद्रण कलेंत व प्राच्य भाषाक्षर-घटनेंत जी अपूर्व हृदयाल्हादक व अत्यंत अभीष्ट सुधारणा केली आहे, ती होय."

**काशीनाथ पांडुरंग परब (१८५३-१९०४)**

हे संस्कृत भाषेचे अभिमानी नि त्या भाषेंतील ग्रंथांचे दांडगे व्यासंगी होते. प्रपंचाचा पसारा नि नोकरी संभाळून केवळ एक आवडता छंद ह्या नात्यानें ते संस्कृत वाङ्मयाकडे वळले. त्यांनीं आपला सारा रिकामा वेळ संस्कृत ग्रंथांच्या वाचनांत, संशोधनांत नि प्रसिद्धीकरणांत घालविला. जावजीशेठजींनीं सुरू केलेल्या 'काव्य-माला' ह्या संस्कृत मासिकाचे ते आरंभापासून अनेक वर्षेपर्यंत सह-संपादक होते. निर्णयसागर-मुद्रणालयाशीं त्यांचा सतत तीन तपें निकट संबंध होता. स्वभाव शांत, मनमिळाऊ, निष्कपटी नि निःस्वार्थ होता. जावजी शेठजींच्या सहकारानें त्यांनीं संस्कृत-ग्रंथ-प्रकाशनांत बहुमोलाची भर घातलेली आहे.

## डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे ( १८४४-१८९६ )

ह्यांचा जन्म सातारा जिल्ह्यांतील माहुली येथें झाला. शिक्षण आरंभीं कोल्हापुरांत नि नंतर मुंबईंत झालें. एल्फिन्स्टन महाविद्यालयांतून बी. ए. झाल्यानंतर एल्. एम्. नि १८७४ सालीं एम्. डी. झाले. मुंबई प्रांतांतील ते पहिले एम्. डी. होत. वैद्यकशास्त्रांत ते पट्टीचे विद्वान होते. तसेंच चिकित्सेंत अत्यंत निष्णात होते. जावजीशेठजींची त्यांच्यावर निस्सीम निष्ठा होती. दोघेही एकमेकांची योग्यता ओळखून होते. वाग्भट ( अष्टांगहृदय ) ह्यासारख्या आयुर्वेदशास्त्रांतील महत्त्वाच्या ग्रंथाचें परिश्रमपूर्वक संशोधन करून जावजीशेठ ह्यांच्या सहकारानें त्यांनीं तो नि इतर अनेक उपयुक्त ग्रंथ प्रकाशांत आणिले. 'ज्ञानेश्वरी' नि 'अमृतानुभव' ह्या महनीय ग्रंथांचा त्यांचा फार दांडगा व्यासंग होता. परिश्रमपूर्वक परिशीलन करून हे ग्रंथही त्यांनीं अर्थ-निर्णायक टीपांसह प्रसिद्ध केले. डॉ. अण्णा कुंटे हे बरींच वर्षे मुंबईंतील ग्रँट मेडिकल कॉलेजांत शारीरशास्त्राचे प्राध्यापक होते. ह्याशिवाय त्यांच्याठायीं एक विशेष गुण होता. ते स्वदेशीचे भोक्ते नि स्वदेशीसाठीं झटणारे होते. त्यांनीं त्या काळीं आगकाड्या तयार करण्याचा कारखाना, जरूर ती जमवाजमव करून काढला होता, ह्यावरून त्यांच्या स्वदेशी-प्रेमाची कल्पना करतां येईल.

जनार्दन बाळाजी मोडक व वामन दाजी ओक ह्यांचा जावजीशेठशीं संबंध 'काव्य-संग्रह'मासिकाचे आद्य नि विद्वान संपादक ह्या नात्यानें आला. ह्या उभयतांचाही अल्प परिचय 'काव्य-संग्रह' प्रकरणांत करून देण्यांत आलेला आहेच.

ह्या व तत्कालीन इतर अनेक विद्वान मंडळीचा सहकार जावजीशेठ संपादन करूं शकले व त्यामुळें वाङ्मय-क्षेत्रांत त्यांना भरीव नि उपयुक्त कार्य पार पाडतां आलें, हें उघडच आहे.

११

# मनोहारी मुद्रिकांचें माहेर–घर

शेठ जावजी दादाजी ह्यांचा हस्तस्पर्श ज्या ज्या गोष्टीला झाला, तिला अत्यंत उन्नत, उत्कृष्ट नि सर्वांगसुंदर स्वरूप प्राप्त झालें. १८६४ सालीं त्यांनीं टाईप फाऊंड्रीची स्थापना करून निरनिराळ्या भाषेंतील मुद्रिका तयार करण्यास सुरुवात केली. त्या पूर्वीच्या काळांत भारतापुरतें सांगायचें झाल्यास कलकत्त्यांत डॉ. विल्यम कॅरे, सर चार्लस विल्किन्स, पंचानन, मनोहर वगैरे कुशल कारागिरांनीं, तसेंच मुंबईत वेबस्टर, थॉमस ग्रॅहॅम, जीवन लोहार, गणपत कृष्णाजी वगैरे लोकांनीं टाईप पाडण्याच्या क्षेत्रांतील कर्तबगारी प्रगट केली होती. त्यामुळें मुद्रणाचें कार्य चालू झालें होतें. ल्हानमोठीं पुस्तकें, वृत्तपत्रें, पत्रकें वगैरे छापून बाहेर पडत होतीं.

त्याच परंपरेंत वाढलेले नि टाईप पाडण्याच्या कलेंत पारंगत झालेले शेठ जावजी दादाजी ह्यांचा ह्या विशिष्ट क्षेत्रांतील उदय केवळ मराठी ग्रंथप्रकाशनालाच नव्हे तर संस्कृत, हिंदी, गुजराती, जैनी, कानडी, इंग्रजी, हिब्रू वगैरे विविध-भाषा वाङ्मयालाही उपकारक होऊन रहाणारा होता.

नयनरम्य, सुंदर, ठाकठीक नि जुळान्यांच्या दृष्टींनीं सोयिस्कर असा देवनागरी टाईप ही जावजी शेठजींची मुद्रण–व्यवसायाला मिळालेली मोठ्यांत मोठी च संस्मरणीय देणगी होय.

आज सारखेपणा, सफाईदारपणा, अचूकपणा किंवा आकर्षकपणा साधण्यासाठीं आपण यंत्रांचा वाटेल तेवढा नि वाटेल त्या परिस्थितींत जरूरीप्रमाणें

म्हटल्यास अतिशयोक्ति होईल, असें वाटत नाहीं. कारण त्या क्षेत्रांतील त्यांची कर्तबगारी तशीच अजोड आहे; आणि विशेष म्हणजे एक शतक मागें पडलें तरी आजवर ती टिकून राहिली आहे.

गेल्या शेंपाऊणशें वर्षांपूर्वीच्या काळांत जावजीशेठनीं देवनागरी मुद्रिकांच्या बाबतींत ज्या सुधारणा घडवून आणिल्या, त्यांना जो सौंदर्यसाज चढविला नि आपल्या नेत्रदीपकतेमुळें त्या मनोहर मुद्रिकांनीं वाचकांच्या मनाची एकदां जी पकड घेतली, ती ढिली न होतां आजही तशीच कायम आहे आणि हेंच निर्णयसागर टाईप फाऊंड्रीच्या धवल यशाचें मुख्य गमक आहे.

देवनागरी-टाईप यंत्रारूढ होण्याच्या नि जुळवणीच्या दृष्टीनें सुटसुटीत नि सोयिस्कर व्हावे ह्यासाठीं त्यांत आवश्यक वाटणाऱ्या सुधारणा घडवून आणण्याचे प्रयत्न गेल्या ६०।६५ वर्षांपासून सतत चालू आहेत. आजवर अनेक लिपी-सुधारकांनीं आपापल्या सुधारणांनीं युक्त असा साजशृंगार देवनागरी मुद्रिकांस देऊन त्या प्रचारांत आणण्याचा आटोकाट प्रयत्न करून पाहिला नि सध्यांही त्या मार्गानें अनेकांचे प्रयत्न चालू आहेत; परंतु जन-मनाची पकड घेण्याच्या दृष्टीनें निर्णयसागरी मनोहर मुद्रिकांवर आजवर तरी कोणीही यशस्वी रीतीनें मात करूं शकला नाहीं.

जसें निर्णयसागरी पंचांग, त्याचप्रमाणें, किंबहुना त्याहीपेक्षां जास्त, निर्णयसागरच्या देवनागरी-मुद्रिका, जनमनांत बहुमानाचें नि आजवर तरी कायमचें ठाण मांडून बसल्या आहेत.

जावजीशेठ ह्यांच्या निधनानंतर एका कवीनें मुद्रिका-क्षेत्रांतील त्यांच्या नैपुण्याचें उपमालंकारांनीं युक्त असें जें वर्णन केलें आहे, तें त्यांच्या बाबतींत तरी आजतागायत कायम आहे. कवि म्हणतात :—

**"भावेला विष्णु जसा, कवितेला मोगरा खुलवि नीट ॥**
**रविवर्मा चित्रकले, वर्णशलाकांस जावजी शेट ॥**

हें खरें आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर असोत, कविवर्य गंगाधरपंत मोगरे असोत, किंवा चित्रकार राजा रविवर्मा असोत. मराठी वाङ्मय, काव्य नि चित्रकला ह्या क्षेत्रांत ह्या तिघांनींही जी कर्तबगारी आपापल्या काळांत गाजविली, ती कितीही अभिनंदनीय नि अविस्मरणीय असली तरी नंतरच्या काळांत त्या

त्या क्षेत्रांत आपल्या कर्तृत्वाचा सखोल ठसा उमटविणारे नि सवाई प्रताप गाजविणारे अनेक लेखक, कवि नि चित्रकार पुढें आले; परंतु वर्ण-शलाकांस, अर्थात् मुद्रिकांस शेठ जावजी दादाजी ह्यांच्यापेक्षां अधिक मोहक नि लोकमान्य स्वरूप देणाऱ्या लिपिसुधारकाची जनता आजही वाट पहात आहे.

ही आजची वस्तुस्थिति सांगितली. ह्याचा अर्थ देवनागरी लिपीचें वळण आज आहे तसेंच रहावें, त्यांत कालानुरूप किंवा जरूरीप्रमाणें बदल होऊं नये, किंवा होण्याची जरुरी नाहीं, असें कोणीही म्हणणार नाहीं, आणि म्हणून चालणारही नाहीं.

देवनागरी-लिपींत सुधारणा घडून आल्या पाहिजेत. त्या घडून येत आहेत. अनेक लिपि-सुधारक त्यासाठीं मनोमार्वें नि मुद्रण-व्यवसायाला अधिकाधिक उन्नत स्वरूप यावें, ह्या सद्धेतूनें मनोमावें झटत आहेत. त्याचा परिचय अल्पांशानें पुढें करून देण्यांत आलेला आहे.

फार कशाला ? निर्णयसागर मुद्रणालयाच्या चालकांनाही चालू यंत्र-युगांत देवनागरी-लिपींत कालानुरूप जरूर त्या सुधारणा घडून आल्या पाहिजेत, असें नेहमीं वाटत असे व त्या सुधारणा-कार्यांत त्यांनीं प्रत्यक्षपणें यथाशक्ति भागही घेतलेला आहे.

काळ झपाट्यानें पुढें पुढें जात आहे. तो प्रत्येक क्षेत्रांत उपयुक्त नि आवश्यक ते थारेपालट घडवून आणीत आहे. सुधारणेचें सुदर्शन-चक्र अविरत फिरत आहे. त्यांत कोणत्या चालीरीतींचा, रूढ कल्पनांचा नि रुळलेल्या मार्गांचा चक्काचूर होऊन जाईल आणि त्या जागीं कोण मानाची बैठक मारून बसेल, हें कोणीही सांगूं शकणार नाहीं.

परंतु एक गोष्ट मात्र निश्चितपणें सांगतां येण्यासारखी आहे. ती कोणती ? जावजीशेठ ह्यांनीं देवनागरी मुद्रिकांना जो सौंदर्याचा नि सुकरतेचा लाभ करून दिला, त्यानें जनमनावर एक प्रकारची मोहिनी घातलेली आहे. हें मोह-जाल अद्यापपर्यंत तरी परिणामकारक रीतीनें कोणीही तोडूं शकलेला नाहीं. पुढचें कोणीं सांगावें ?

कोणत्याही क्षेत्रांत पहा. अनुकरण केलें जातें तें चांगल्या नि लोकप्रिय गोष्टींचें. जावजीशेठ ह्यांच्या निर्णयसागर टाईप फाऊंड्रींतून नवनव्या घाटाच्या

दोनशें वर्षांपूर्वींच्या काळांत देवनागरी मुद्रिकांचे
मुखवटे असे होते

*Symbolum Fidei.*

Ego credo unum Deum

हम मानतेहे ऐक परमे

*Ham mantahe ek Parme-*

Patrem in omnipotentem,

स्वर बाप पर सब्ब सक्ता:

*ſuor Bap par ſabh Saktà,*

Caeli, & Terrae

अस्मान और जमीन का

*Aſman avor Giamin Ka*

Creatorem. Et excelſum

पेदा करनेवाला: और स्री

*peeda Karnevalà. Aor ſri*

Je-

2. Earliest specimen of the Devanagari Types. *Alphabetum Brammhanicum Seu Indostanum*, Rome 1771.

रोममध्यें १७७१ साली देवनागरी मुद्रिका तयार करण्यांत आल्या त्यांचा हा दुसरा एक नमुना

रोममध्यें तयार झालेल्या देवनागरी मुद्रिकांचे आणखी एक स्वरूप

म्रा
ग्रारोसो - रेमानुरेन
ग्रोर
मारात्रा · ग्रलोबोनिडे - ग्राडेलखेडे
दमत्तोगा · ग्रो · वंवावो · मरपावर
जो - शिद्र - दो - रेक्र - दरेम
ग्रसमान · ग्रौर · जमीन · का · हुम्दौद
नीव · दौलदानो · दाजाको
ग्रोर · तुम्दारा · हुकुम
ग्रोर · ग्रस्दरव · को · जमीन · मो
शादो · तुगा · ग्रावदि
दोवे · तुनेग्रो ।

TYPOGRAPHIC EVOLUTION 4
ALPHABETUM BRÂMMHANICUM SEU INDOSTANUM, ROME VATICAN
(PRODUCED AT TYPOGRAPHIA POLYGLOTA, 1771).

१७७१ मध्यें रोम येथें देवनागरी मुद्रिका तयार करण्यांत आल्या त्यांचा हा नमुना. सुमारें दोनशें वर्षांपूर्वी युरोपांत तयार झालेल्या देवनागरी मुद्रिकांचें असें स्वरूप होतें.

त्यानंतर कलकत्ता येथें मिशनऱ्यांनीं त्या क्षेत्रांत हालचाल केली

दाश्रा ॥

हिंदूस्तान में काननाई के लीऐ हिंदी
ज़वान ऋौन ज़वानों से जीश्रादः दन
कान है

हिंदूस्तानी ज़वान कि जिसका ज़िक्र
मेने दाश्रे में है उसको हिंदी – उरदू
ऋौन नेख़ः भी कहते हैं ऋौन यिह
मुतक्रुब ऋनवी ऋौन फ़ानसी ऋो संस्कृत
या भाषा से है ऋौन यिह पिछली
ऋगले ज़माने में तमाम हिंद में
नाऐज थी

ऋनन

7. Essays (thesis) by the students of the College of Fort William, Bengal, Calcutta 1802

१८०२ सालीं कलकत्ता येथें देवनागरी मुद्रिका तयार झाल्या, त्याचें स्वरुप असें होतें.

श्रीभगवानुवाच ऊर्ध्वमूलमधःशाख
मश्वत्थंप्राहुरव्ययं छंदांसियस्यपर्णानि
यस्तंवेदसवेदवित् १ अधश्चोर्ध्वंप्रसृ
तास्तस्यशाखागुणप्रवृद्धाविषयप्रवा 13
लाः अधश्चमूलान्यनुसंततानिकर्मानु

बंधीनिमनुष्यलोके २ नरूपमस्येह
तथोपलभ्यतेनांतोनचादिर्नचसंप्रतिष्ठा
अश्वत्थमेनंसुविरूढमूलमसंगशस्त्रे
णदृढेनछित्वा ३ ततःपदंतत्परिमार्गि
तव्यंयस्मिन्गतानिवर्तंतिभूयः तमे

१८०५ साली मिरज येथें तांब्याच्या पत्र्यावर देवनागरी अक्षरांत गीतेचे श्लोक कोरून गीताईची छपाई करून पहाण्याचा उपक्रम सुरू झाला. मुद्रणाचा महाराष्ट्रांतील हा पहिला प्रयत्न. या उपक्रमाचे मूळ प्रेरक होते नाना फडणवीस (पान २६५ पहा).

पहिले महाराष्ट्रीय मुद्रक-प्रकाशक गणपत कृष्णाजी
ह्यांचा देवनागरी मुद्रिका क्षेत्रांतील उद्योग

# BODH SAUGUR.

पुस्तक १ | बोधसागर | अंक ५.



माहे सपटेंबर

सन इसवी १८४१

मुकाम मुंबई

गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यांत छापलें

---

गणपत कृष्णाजींच्या छापखान्यांत १८४१ सालीं 'बोधसागर' नावाचें मासिक प्रसिद्ध होत असे, त्याचें मुखपृष्ठ.

त्याच काळांतील देवनागरी मुद्रिका

# बोधसागर

पुस्तक १ — अंक ५

मुंबईत सध्या कितीएक पुरातन कुळांतील लोक वसत आहेत त्यांचा वृतांत, व इसवी सन १४०० शें वर्षांमागें या मुंबई टापूचीं दोन चार बेटें होतीं असें अनुमान करण्याचीं कारणें; या विषयीं, मेहेरवान मर्फि साहेबानें लिहिलें, तें असें.

अंक २

पळशे जोशी, आपणास ब्राह्मण ह्मणवितात, परंतु ब्राह्मण लोक त्यांजबरोबर अन्न व्यवहार ठेवीत नाहींत, आणि त्यांचें ब्राह्मणत्वहि कबूल करीत नाहींत, परंतु पुष्कळ दिवसांपासून मुंबईमध्यें त्यांस ब्राह्मण असें ह्मणतात यांत संशय नाहीं. कारण, रघुनाथ जोशी याजकडे रिकार्डर कोर्टाच्या शिक्याचा कागद आहे, त्याजवरून असें दिसतें कीं, त्यावेळीं इंग्रज सरकार त्यांस ब्राह्मण ह्मणत होतें, आणि हल्लींहि कित्येक परभू लोकांमध्यें ते उपाध्ये आहेत.

सोम सूर्य वंशी क्षत्रिय राजानीं पैठणाहून पळून येऊन कोंकणांतील कांहीं देश जिंकून, तेथें आपलें राज्य स्थापिलें, आणि माहीम बेट राजधानी केलें, त्या सूर्य वंशी राजाचे आ-

पण

सव्वाशें वर्षांपूर्वीच्या मुद्रिकांचा नमुना

315

72 Point Pica

७२ पाइंट पैका

# निर्णयसागर छापखान्याचे मालक १ २ ३

316

48 Point Pica

४८ पाइंट पैका

## जावजी दादाजी हे अगदीं तीन रुप-यांच्या नोकरीपासून आपल्या १ २ ३

317 36 Point Great Primer Black

३६ पाईंट ग्रेट प्रायमर ब्लॅक

उद्योगानें व श्रमानें भरभरा-
टीस आले होते. मुंबईस मराठी
टाईप तयार करण्याचा १ २ ३

318 24 Point Pica No. 1

२४ पाईंट पैका नं. १

कारखाना पहिल्यानें मिशनरी लोकांनीं
घातला, व या मिशनरी लोकांच्या
कारखान्यांतच थॉमस ग्रेहाम म्हणून १२

319 24 Point Pica No. 2

२४ पाईंट पैका नं. २

एक इंग्रजी टाईपकटर होता त्याचे हाता-
खालीं जावजी यानीं टाईप तयार करण्याची
विद्या संपादन केली.

१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ ०

320 One Nick Great Primer Black No. 1

वन् निक ग्रेट प्रायमर ब्लॅक नं. १

प्राण्यांच्या मनाचे जे अनेक व्यापार नेहमीं चालत असतात, त्यांतलाच विचार करणें हा एक व्यापार आहे १२३४५६७८९०

321 One Nick Great Primer Black No. 2

वन् निक ग्रेट प्रायमर ब्लॅक नं. २

व्यसनी पुरुष असतात ते पाहिजे तसें दुराचरण करितात, त्यामुळें त्यांच्या घरांतील माणसांस चांगलें शिक्षण न मिळून तींही बिघडतात.

322 One Nick Great Primer

वन् निक ग्रेट प्रायमर

नेटिवांत जावजी दादाजी यांच्या तोडीचे बडे छापखानेवाले फार थोडे आहेत. छापखान्याच्या देशी कलेला यांच्या परिश्रमानें सांप्रतचें उत्तम स्वरूप आलें आहे. मनुष्य आपल्या उद्योगानें व बुद्धिसामर्थ्यानें केवढा धनसंपन्न व लोकमान्य होऊं शकेल, याचें उत्कृष्ट उदाहरण रा. जावजींचें चरित्र होय.

वऱ्हाडसमाचार (अकोला) १०।४।९२.

323 Great Primer Black No. 1

ग्रेट प्रायमर ब्लॅक नं. १

भापेला विष्णु जसा, कवितेला मोगरा खुलवि नीट ॥
रविवर्मा चित्रकले, वर्णशलाकांस जावजी शेट ॥ १ ॥
द्राक्षापाकसम सुलभ, बहु सुंदर रम्य लेख ओक रची ॥
रमणीय मातृकांना, करुनि बहू जावजी धना खरची ॥ २ ॥
काळानें ह्या अमुचा, लिपीसुधारक पहा हरविला हो ॥
यास्तव लेख मराठी, प्रस्तुत बहु फोडितात कीं टाहो ॥ ३ ॥

324 Great Primer Black No. 2

ग्रेट प्रायमर ब्लॅक नं. २

प्रत्येक मनुष्यास, लोकांनीं आपणांस चांगलें म्हणावें, आपली वाहवा व्हावी, अशी साहजिकच इच्छा असते. परंतु नुसती इच्छा असून काय उपयोग? ज्या कलेंत आपणांस पारंगतता मिळविण्याची इच्छा असेल त्या कलेचें कमींत कमी एक तप तरी कायावाचामनेंकरून आचरण केलें पाहिजे. तपाचरणाशिवाय सर्व व्यर्थ आहे. १२३४५६७८९०

469 Great Primer Black No. 3

ग्रेट प्रायमर ब्लॅक नं. ३

श्रीमंती इष्ट आहे किंवा नाहीं, याची बऱ्याच लोकांस शंका येते; आणि खरोखर पहातां, जे गर्भश्रीमंत आहेत ते निश्चयानें अधिक सुखी आहेत, असेंच केवळ म्हणतां येणार नाहीं; कारण, दरिद्रावस्थेंत जसे मनुष्यास कष्ट करावे लागतात तसेच संपन्नावस्थेंतही करावे लागतात.

*Annexture D*

**Book Faces issued by the Nirnaya-sagar Type Foundry**

1 **8 Point Marathi**

विज्ञान, शास्त्र की वरदानें; तर्के पाहिले तर हा ग्रंथच होऊ शकत नाही. एके काळी संमिश्रत.च गति-
शाळ असलेल्या हा मानवप्राणी निसर्गाशी वर्मेतरी समजून घेऊन आपल्या जगत होता. त्यानंच समाधानः
मुंबई.काँग्रेस अधिवेशनांत कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यात आले. ०००

2 **8 Point Marathi black**

भीतीच्या भावनेने स्वरक्षणासाठी उपाय शोधण्याला माणसाला प्रवृत्त केलें. "स्वरक्षणाची ही
गरज " विज्ञानशास्त्राची आदिमाता आहे. ........ मुंबई काँग्रेस अधिवेशनांत कर्तृत्वपूर्ण
मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. १२३४५६७८ ०००

3 **Long Primer (338)**

निर्णयसागर हें महाराष्ट्रमुद्राणकलेचें, महाराष्ट्रमुद्रणकलेचें एक भूषण आहे. हें भूषणावह स्थान
कायम राखण्याचे कार्य शेट तुकाराम जावजी ह्यांनी पारच उत्कृष्ट रीतीनें पार पाडलें. मुंबई
काँग्रेस अधिवेशनात कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले.

4 **Pica No. 1 (334)**

टाईप तयार करण्याच्या कामांत मुंबईस जावजी दादाजी व गणपत कृष्णाजी या
दोघांनींच नांव मिळविलें. (केसरी—१२-४-९२) मुंबई...... काँग्रेस अधिवेशनात
कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. ०००

5 **Pica Black No. 1 (332)**

गौतमबुद्ध हा विहारप्रांताचा राजा शुद्धोदन ह्याचा पट्टराणीपासून झालेला एक पुत्र
होता. ...... मुंबई काँग्रेस अधिवेशनांत कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे
एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. १२३४५६ ०००

6 **Pica Black No. 2 (333)**

निर्णयसागर छापखान्याचे मालक कैलासवासी जावजी दादाजी हे आपल्या
उद्योगानें व श्रमानें भरभराटीस आले होते. ...... मुंबई काँग्रेस अधिवेशनांत
कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. ०००

7 **Pica Italic (384)**

मुंबई काँग्रेस अधिवेशनांत कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन
घडविण्यांत आले. १२३४५६७८९० ०००

8 **English No. 1**

एका श्रीमंत गृहस्थानें आपल्या खजिन्यावर पाहारा करण्यास एक शिपाई ठेविला,
मुंबई काँग्रेस अधिवेशनांत कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन
घडविण्यांत आले. १२३४५६७८९ ०००

9 **New Face 12 Point English No. 1**

विश्वशांतीचे श्रेष्ठ पुरस्कर्ते होते आणि तिचा प्रसार करण्यासाठींच जणु
त्यांचा अवतार होता. मुंबई काँग्रेस अधिवेशनात कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे
एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. १२३४५६७८९ ०००

10 Great Primer No. 1 (325)

थोडें नुकसान झालें तरी होवो पण खरा सरळपणा राहो असे ते वागत. मुंबई कॉंग्रेस अधिवेशनात कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. १ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ ० [०|००

11 Great Primer Black No. 1 (323)

रविवर्मा चित्रकले, वर्णशलाकांस जावजी शेट ॥ १ ॥ मुंबई कॉंग्रेस अधिवेशनात कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. १ २ ३ ४ ५ ६ ०००

12 Great Primer Black No. 2 (324)

लोकांनीं आपणांस चांगलें म्हणावें, आपली वाहवा व्हावी, अशी साहजिकच इच्छा असते . . . . मुंबई कॉंग्रेस अधिवेशनांत कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले.

13 Great Primer No. 3 (327)

'बादरायणसंबंध' हा शब्द अनेकदां येतो. ज्या गोष्टींचा संबंध मुळींच नसतो, त्या गोष्टींचा संबंध....मुंबई कॉंग्रेस अधिवेशनांत कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. १ २ ३

14 Great Primer Black No. 3 (469)

मुंबई कॉंग्रेस अधिवेशनांत कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. १ २ ३ ४ ५ ०००

15 One-Nick Great Primer (322)

मुंबई कॉंग्रेस अधिवेशनात कर्तृत्वपूर्ण मराठी रंगभूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले. १ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ ० ०००

16 One-Nick Great Primer Black No. 2 (321)

मुंबई कॉंग्रेस अधिवेशनांत कर्तृत्वपूर्ण मराठी रंग-भूमीचे एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले.

## Swara (Vedic Accent) Types
## स्वरांचा (वेदिक खुणांचा) टाईप

Two Line Great Primer Black

टु लाईन ग्रेट प्रायमर ब्लॅक

ये त्रिंशति त्रयस्परो बर्हिरासं-
दन् । विदन्नहं द्वितासनम् ॥ १ ॥

Two Line Pica No. 2

टु लाईन पैका नं. २

तुग्रो ह भुज्युमश्विनोदमेघे रयिं न क-
श्चिन् ममृवाँ अवाहाः ॥ तमूहथुर्नौभिरा
त्मन्वतीभिरन्तरिक्षप्रुद्भिरपोदकाभिः ॥ १ ॥

One Nick Great Primer Black No. 1

वनिक ग्रेट प्रायमर ब्लॅक नं. १

देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो
हस्ताभ्याम् ॥ अश्विनोर्भैषज्येन तेजसे ब्रह्मवर्चसा-
याभिषिञ्चामि ॥ इन्द्रस्येन्द्रियेण बलाय श्रियै
यशसेऽभिषिञ्चामि ॥ ४ ॥ कोऽसि कतमोऽसि कस्मै
त्वा काय त्वा ॥ सुश्लोक सुमङ्गल सत्यराजन् ॥५॥

६० जावजी दादाजी ह्यांचें चरित्र.

**वडोदावत्सल**—हे पूर्वी अगदीं गरीब स्थितींतील असतांही आपल्या बुद्धिचातुर्यानें, दृढउद्योगानें आणि मनमिळाऊ स्वभावानें फार मोठ्या योग्यतेस चढले...यांच्या अंगीं व्यवहारज्ञान व विचारशक्ति इतकी उत्तम होती कीं, ते जें जें काम हातीं घेत, तें ते फार सावधगिरीनें व काळजीपूर्वक करीत असत....हाताखालच्या लोकांस वागवून घेण्याची यांची रीत वर्णनीय होती. ...दुष्ट काळानें हजारांचें भूषण जे जावजी शेट त्यांस जगांतून नाहींसे केलें.

**चिकित्सक**—यांनीं केवळ गरीब स्थितींत वाढून आपल्या उद्योग, दृढनिश्चय व चातुर्यबलावर लक्षाधीशांमध्यें आपली गणना करविली; मुंबई इलाख्यांतीलच नव्हे, परंतु आज हिंदुस्थानांतील मुद्रणकलेस त्यांनीं अजिंत दशेस आणिलें. ..शांतता, लोकप्रियता, गंभीरपणा, सचोटी या गुणांविषयीं मि॰ जावजींनीं आपलें जगाकडून वर्णन करून घेतलें आहे. जावजींच्या मरणानें आज मुंबई इलाख्यांतील छापखानेवाल्यांचें भूषणच गेलें म्हणण्यास हरकत नाहीं.

**बांबे ग्याझेट**—त्यांस थोड्या दिवसांमागें मुंबईसरकारानें जस्टिस आफ् दि पीस हा मानाचा किताब दिला. त्याचा उपभोग घेण्यास व तत्संबंधानें लोकांस उपयोगी पडण्यास ते फार दिवस राहिले नाहींत. जावजी मेल्यामुळें मुद्रणकलेच्या धंद्यांतला एक मोठा धंदा व सत्पशील मनुष्य नाहींसा झाला आहे. ह्यांनीं अनेक उपयुक्त संस्कृत, हिंदुस्थानी, मराठी आणि गुजराथी ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. ह्यांचा टैप पाडण्याचा आणि छापण्याचा कारखाना फार मोठा आहे.

**सुधारक**—आमच्या इकडे छापखान्यांस जी अजिंत दशा आली आहे, ती बऱ्याच अंशानें याच्या मेहनतीचें फळ होय. याच्या आयुष्यक्रमांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे त्याची मूळची स्थिति फार गरीबीची असून केवळ आपल्या उद्योगाच्या व नेकीच्या बळावर तो इतक्या प्रसिद्धीस आले. आजपर्यंत त्याच्या साह्यानें जे अनेक संस्कृत मराठी ग्रंथांचें प्रकाशन झालें आहे, तें मनात आणिता त्याच्या हातून विद्यावृद्धीच्या प्रसारास किती मदत झाली आहे हें कोणासही दिसून येणार आहे.

**अरुणोदय**—तीन रुपये दरमहा घेऊन दगडावर टैप पाडीत बसणारें हा पोरगें तें पोर पुढें अशा योग्यतेस येईल, असें कोणाच्या स्वप्नांतही नव्हतें. हें बुद्धीनें निघ्ट होते म्हणून छापखान्याच्या धंद्याच्या हरएक कामांत ते इतके मर्मज्ञ झाले होते कीं या इलाख्यांतील छापखान्यांचे मूळ पुरुष जे टामस ग्राहाम त्यांनींही पुढें पुढें मि॰ जावजींच्या पुढें हात टेकले होते. त्यांची जरी इतकी भरभराट झाली तरी आरंभीच्या आपल्या गरी-

Fig. 36. A page from the Biography of Jaoji Dadaji set in 8 pt. degree face cut by Aru

*Table 38* : Comparative study of the matter set up by hand and on Mechanical Composing Machines

### Handset 12 pt., 2 pt. leaded

महाराष्ट्रांच्यां भक्तिसंप्रदायात भागवत पंथ, लिंगायत पंथ, वारकरी पंथ, महानुभावी पंथ इत्यादी पंथ निर्माण झाले. त्या सर्वांत जुना नाथपंथ आहे. या नाथपंथाची गाणी गाणारा एक खेड्डत कलावार महाराष्ट्रात ज्ञानेश्वरांच्या पूर्वीपासून संचार करीत आहे. त्याचे नाव कानफाट्या किंवा कोकेवाला.

खेड्यातील हा कलावंत रानावनात राहणारा गोसावीच असतो. एक भगवी कफनी किंवा अंगाभोवती फिरवून मानेमागे गाठ मारलेला भगवा फडका आणि अंगभर फासलेली राख हे त्याचे स्वरूप. हे गोसावी रानमांजराची शिकार करतात. त्या रानमांजराच्या हाडाच्या मोठमोठ्या बाळ्या करून त्यांनी कानात घातलेल्या असतात. त्या चांगल्या बसाव्यात म्हणून कानाच्या पाळ्याला ते एवढी मोठी मोठी भोके पाडतात की त्याचमुळे त्यांचे नाव समाजाने कानफाट्या ठेवले.

कल्पना, कर, स्मारक, केवळ
कुमाराप्पा, कुशाग्र, कुर्सी, गई
प्रदेश, कार्मुक, कूट, चौराहेपर,
दौड, है, शैली, सजावट, दुखी,
बुढा, दादा, उर्दु, पण्डित, सिंग,
बुद्धि, पंक्ति, तालियां, जिंदगी,
किंकर्तव्य, जाति, साहित्य,
आणि, पाणी, गिर्वाण, अघटित,
टिटवी.

### Monotype 12 on 14 pt.

महाराष्ट्राच्या भक्तिसंप्रदायात भागवत पंथ, लिंगायत पंथ, वारकरी पंथ, महानुभावी पंथ इत्यादी पंथ निर्माण झाले. त्या सर्वांत जुना नाथपंथ आहे. या नाथपंथाची गाणी गाणारा एक खेडूत कलाकार महाराष्ट्रात ज्ञानेश्वरांच्या पूर्वीपासून संचार करीत आहे. त्याचे नाव कानफाट्या किंवा कोकेवाला.

खेड्यातील हा कलावंत रानावनात राहणारा गोसावीच असतो. एक भगवी कफनी किंवा अंगाभोवती फिरवून मानेमागे गाठ मारलेला भगवा फडका आणि अंगभर फासलेली राख हे त्याचे स्वरूप. हे गोसावी रानमांजराची शिकार करतात. त्या रानमांजराच्या हाडाच्या मोठमोठ्या बाळ्या करून त्यांनी कानात घातलेल्या असतात. त्या चांगल्या बसाव्यात म्हणून कानाच्या पाळ्याला ते एवढी मोठी मोठी भोके पाडतात की त्याचमुळे त्यांचे नाव समाजाने कानफाट्या ठेवले.

कल्पना, कर, स्मारक, केवळ
कुमाराप्पा, कुशाग्र, कुर्सी, गई
प्रदेश, कार्मुक, कूट, चौराहेपर,
दौड, है, शैली, सजावट, दुखी
बुढा, दादा, उर्दु, पण्डित, सिंग
बुद्धि, पंक्ति, तालियां, जिंदगी
किंकर्तव्य, जाति, साहित्य
आणि, पाणी, गिर्वाण, अघटित
टिटवी.

### Linotype 12 on 13 Pt.

महाराष्ट्राच्या भक्तिसंप्रदायात भागवत पंथ, लिंगायत पंथ, वारकरी पंथ, महानुभावी पंथ इत्यादी पंथ निर्माण झाले. त्या सर्वांत जुना नाथपंथ आहे. या नाथपंथाची गाणी गाणारा एक खेडूत कलाकार महाराष्ट्रात ज्ञानेश्वरांच्या पूर्वीपासून संचार करीत आहे. त्याचे नाव कानफाट्या किंवा कोंकेवाला.

खेड्यातील हा कलावंत रानावनात राहणारा गोसावीच असतो. एक भगवी कफनी किंवा अंगाभोवती फिरवून मानेमागे गाठ मारलेला भगवा फडका आणि अंगभर फासलेली राख हे त्याचे स्वरूप. हे गोसावी रानमांजराची शिकार करतात. त्या रानमांजराच्या हाडाच्या मोठमोठ्या बाळ्या करून त्यांनी कानात घातलेल्या असतात. त्या चांगल्या बसाव्यात म्हणून कानाच्या पाळ्याला ते एवढी मोठी मोठी भोके पाडतात की त्याचमुळे त्यांचे नाव समाजाने कानफाट्या ठेवले.

कल्पना, कर, स्मारक, केवळ कुमाराप्पा, कुशाग्र, कुर्सी, गई प्रदेश, कार्मुक, कूट, चौराहेपर, दौड, हैं, शैली, सजावट, दुखी, बुढा, दादा, उर्दू, पण्डित, सिंग, बुद्धि, पंक्ति, तालियां, जिंदगी, किंकर्तव्य, जाति, साहित्य, अग्नि, पाणी, निर्वाण, अघटित, टिटवी.

### Intertype 12 Pt.

महाराष्ट्राच्या भक्तिसंप्रदायात भागवत पंथ, लिंगायत पंथ, वारकरी पंथ, महानुभावी पंथ इत्यादी पंथ निर्माण झाले. त्या सर्वांत जुना नाथपंथ आहे. या नाथपंथाची गाणी गाणारा एक खेडूत कलाकार महाराष्ट्रात ज्ञानेश्वराच्या पूर्वीपासून संचार करीत आहे. त्याचे नाव कानफाट्या किंवा कोंकेवाला.

खेड्यातील हा कलावंत रानावनात राहणारा गोसावीच असतो. एक भगवी कफनी किंवा अंगाभोवती फिरवून मानेमागे गाठ मारलेला भगवा फडका आणि अंगभर फासलेली राख हे त्याचे स्वरूप. हे गोसावी रानमांजराची शिकार करतात. त्या रानमांजराच्या हाडाच्या मोठमोठ्या बाळ्या करून त्यांनी कानात घातलेल्या असतात. त्या चांगल्या बसाव्यात म्हणून कानाच्या पाळ्याला ते एवढी मोठी मोठी भोके पाडतात की त्याचमुळे त्यांचे नाव समाजाने कानफाट्या ठेवले.

कल्पना, कर, स्मारक, केवळ कुमाराप्पा, कुशाग्र, कुर्सी गई प्रदेश, कार्मुक, कूट, चौराहेपर, दौड, हैं, शैली, सजावट, दुखी, बुढा, दादा, उर्दू, पण्डित, सिंग, बुद्धि, पंक्ति, तालियां, जिंदगी, किंकर्तव्य, जाति, साहित्य, अग्नि, पाणी, निर्वाण, अघटित, टिटवी.

नि सुंदर मुखवट्याच्या मुद्रिका बाहेर पडाव्या नि त्या मुद्रिकांवरून इलेक्ट्रिक मेट्रिसा तयार करून त्यांची हुबेहुब नक्कल प्रचारांत आणावी, असें वेळोवेळीं घडत आलें आहे; परंतु कांहीं झालें तरी नक्कल ती नक्कलच ! मूळ आकृतींतील सौंदर्य नि श्रेष्ठपणा त्यांत कसा येईल ?

ह्या नकलीपणास उद्देशून निर्णयसागर टाईप फाऊंड्रीचे चालक म्हणतातः— "आम्ही तयार करतों त्याप्रमाणें पंचावरून मेट्रिसा तयार करून पाडलेल्या मुद्रिका व इलेक्ट्रो मेट्रिसांच्या सहाय्यानें तयार केलेल्या मुद्रिका ह्यांमध्यें धारकाईनें पहाणाऱ्यास केवढें तरी अंतर दिसून आल्याशिवाय रहाणार नाहीं."

अंतर दिसून आलें तरी देवनागरी मुद्रिकांस निर्णयसागरनें जें वळण दिलें, मुद्रिकांच्या ज्या लहान मोठ्या मूर्ति बनविल्या, त्याच वळणाच्या मूर्तींना आजकाल सर्वत्र लोकमान्यता प्राप्त झालेली आहे, त्यांचें अनुकरण सर्वत्र होत आहे.

अक्षरांस आकर्षक वळण देऊन व त्यांच्या मुखवट्यांत सौंदर्य ओतून निर्णयसागरनें मुद्रण व्यवसायांत अत्यंत महत्त्वाची नि ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें कौतुकास्पद अशी क्रांति घडवून आणिली.

जुळाऱ्यांस सुलभतेनें अक्षरांची जुळवणी करतां यावी नि छपाईचें कार्यही सुगमतेनें व्हावें, ही मुद्रण-व्यवसायांतील महत्त्वाची बाब आहे. ह्या दोन्ही गोष्टी साध्य कशा होतील ह्याचाही विचार जावजीशेठ नि त्यांचे कलावंत सहकारी राणूजी आरू ह्यांनीं केला. हेंच पहा ना. एका ओळींत मात्रा किंवा वेलांटी ह्यांनीं युक्त अशीं कांहीं अक्षरें येतातच कीं नाहीं ? ज्या अक्षरांवर मात्रा किंवा वेलांटी नसेल त्या अक्षरांच्या माथ्यावर तेवढ्या आकाराची एकेक डिग्री लावून ठेवायची ही पूर्वीची योजना. ती टाईप जुळविणाऱ्यांच्या दृष्टीनें त्रासदायक होती. शिवाय देवनागरी अक्षरांची रुंदी प्रत्येकीं सारखी नाहीं. प्रत्येक अक्षराच्या रुंदींत फरक पडतो. तेव्हां तेवढ्या प्रकारच्या डिग्र्या तयार कराव्या लागत असत. त्याशिवाय शब्दांत एकाद्या नवीन अक्षराचा फेरफार करावयाचा झाल्यास आजूबाजूच्या डिग्र्या बदलाव्या लागत असत. केवढा हा त्रास !

हा त्रास वांचविण्यासाठीं निर्णयसागरच्या चालकांनीं दीर्घ विचारांतीं 'अखंड' टाईप प्रचारांत आणण्याची अत्यंत महत्त्वाची सुधारणा घडवून आणिली.

ह्या अखंड-टाईप सुधारणेचें स्वरूप काय होतें ? ह्या सुधारणेमुळें प्रत्येक अक्षराच्या बाराखडींतील प्रत्येक अक्षर अखंड तयार झालें. आणि ज्या अक्षराला मात्रा वेलांटी वगैरे कांहीं नसेल, त्या अक्षराच्या माथ्यावर तेवढ्याच आकाराचा पण अक्षरापेक्षां कमी उंचीचा भाग टाईपाला जोडलेलाच म्हणजे अखंड असावयाचा, अशी सोयिस्कर रचना करण्यांत आली. मराठींत जोडाक्षरांनाही 'इ' कार, 'उ' कार वगैरे ज्या विकृति होतात, तेवढ्यापुरतीच अगदीं कमी डिम्यांची जरूरी राहिली. त्यामुळें काय झालें ? टाईप ठेवण्याच्या केसीमध्यें पूर्वी आठ-घरी केसीस चालत होत्या, त्याऐवजीं अखंड पद्धतीनें अक्षरांची वाढ झाल्यामुळें दहा घरी केसीस तयार कराव्या लागल्या; त्याशिवाय कांहीं कांहीं घरांत दोन दोन प्रकारचे टाईप ठेवावे लागत असत ते वेगळेच.

ह्या सुधारणेमुळें जुळाऱ्यांचें टाईप जुळविण्याचें काम पूर्वीपेक्षां सुलभ झालें. जुळवणी पूर्वीहून कमी वेळांत होऊं लागली. परंतु अक्षरांत वाढ झाली. ती कमी कशी करावी, त्यासाठीं कोणत्या सुधारणा करणें जरूर आहे, ह्या विषयीं जाणकार लोकांत विचार सुरू झाले.

अक्षरांची संख्या जितकी कमी होईल तेवढी फायदेशीर असें वाटूं लागण्यास विशेषतः २।३ यंत्रें कारण झालीं. टाईप रायटर, मोनोटाईप नि लायनो टाईप यंत्र. हीं यंत्रें सोयीच्या दृष्टीनें फार उपयुक्त आहेत. मराठी अक्षरें ह्या यंत्रांवर बसवावयाचीं तर त्यांची संख्या जितकी कमी होईल तेवढें फायदेशीर व सुकर होणार हें उघडच आहे. अक्षरांची संख्या कशा रीतीनें कमी करतां येईल हा प्रश्न जावजीशेठ ह्यांच्या काळांत पुढें आला नव्हता. त्यांचे चिरंजीव तुकारामशेठ ह्यांच्या कारकीर्दीत तो प्रामुख्यानें पुढें आला. त्यांनीं मुद्रिकानिर्मितीचें पायाशुद्ध शिक्षण काळजीपूर्वक घेतलें होतें. बदलत्या काळाचें माहात्म्य नि जरूरी ओळखून त्यांनींही त्या दृष्टीनें लिपि-सुधारणेच्या चळवळींत सक्रिय भाग घेतला. त्यांचे गुरुजी राणूजी आरू ह्यांचा संपूर्ण सहकार त्यांच्या पाठीशीं नेहमींप्रमाणें होताच.

तुकारामशेठजींच्या काळांत इतर अनेक लिपि-सुधारकांप्रमाणें काशीनाथ वामन लेले ह्यांनीं देवनागरी लिपींतील अक्षरांची संख्या कमी करण्याच्या दृष्टीनें आपल्या सूचना विचारासाठीं सर्वांपुढें ठेविल्या होत्या. त्या काळीं

(१९१४) त्यांच्या सूचनांवर साधक बाधक चर्चा चालू होती. त्यांनीं अक्षरांची संख्या १०५ ते ११० पर्यंत आणून ठेविली होती.

राणूजी आरू ह्यांच्या संपूर्ण सहकारानें तुकारामशेठजींनीं ह्या लेलेशास्त्रीसुचित सुधारलेल्या देवनागरी-लिपीचा एक फाऊंट तयार करवून तो विचारवंतांपुढें ठेविला.

तो पुढें ठेवतांना तुकारामशेठजींनीं पुढील मुद्यांकडे विचारवंतांचें लक्ष वेधविलें: (१) "हे टाईप इंग्रजी पद्धतीला अनुसरून असल्यामुळें अर्थातच टाईपांचीं अक्षरें अगदीं थोडीं म्हणजे १०५–११० पर्यंत झालीं आहेत.

(२) कंपोज करतांना वेलांटी, काना, मात्रा, यासंबंधीं होणारा त्रास चुकतो व फाऊंट करतांना एका अक्षराचीं अनेक अक्षरें करण्याची आवश्यकता रहात नाहीं. फक्त पूर्ण आणि अपूर्ण (मूळ आणि अर्धीं) अक्षरें केल्यानें सर्व कार्यभाग साधतो.

(३) खालींवर उकारादि मात्रा जोडतांना होणारा त्रास चुकतो.

(४) प्रेसवर छापण्याकरितां फार्म गेला असतां डिङ्या वगैरे पडण्याचा संभव नसतो.

(५) क्वचित् प्रसंगीं एकच अक्षर उठून त्यास जोडलेल्या मात्रा, वेलांट्या वगैरे नीट न उठण्याची भीति नसते."

अशा रीतीनें तयार करण्यांत आलेल्या टाईपांत छापलेल्या कांहीं मजकुराचा पुढील नमुना पहाण्यासारखा आहे:—

पउरतइ चएाकशइ कएल्याशइवाय. एखाद्यास अपराधइ मानऊन शइक्षा करणएं फार वाइट आहए. या पकारच्या न्याय कर-णाराञ्च्या उताञ्ळपणाम्उळएं खरए गउन्हएगार अजइबात सउ-टऊन कइत्यएक वएळां न्इरपराध्यांस व पउष्कळ वएळ हइतक-रत्यांस दएखइल इनाकारण मएाठ्या शइक्षा झाल्या आहएत.

आपल्या नेहमींच्या सरावाच्या देवनागरी टाईपांत हाच मजकूर पुढील प्रमाणें मुद्रित करतां येईल:—"पुरती चौकशी केल्याशिवाय एखाद्यास अपराधी मानून शिक्षा करणें फार वाईट आहे. या प्रकारच्या न्याय करणारांच्या उतावीळपणामुळें खरे गुन्हेगार अजिबात सुटून कित्येक वेळां निरपराध्यांस

व पुष्कळ वेळ हितकर्त्यांस देखील विनाकारण मोठाल्या शिक्षा झाल्या आहेत."

तुमचे विचार कितीही बोधप्रद, मनोरंजक नि ज्ञानसंवर्धक असोत. ते लिपिबद्ध झाल्यानंतर वाचकांस न अडखळतां सहज रीतीनें वाचतां आले पाहिजेत. पदोपदीं अडखळण्याची पाळी आली तर संशोधकाशिवाय ते वाचण्यासाठीं कोण पुढें सरसावणार आहे ? तेव्हां वाचकांची सोय पहाणें ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. ह्या बाबतींत वाचक हा महत्त्वाचा घटक आहे. वरील मजकूर वाचतांना वाचकांची तिरपीट उडाल्याशिवाय रहाणार नाहीं.

'लिपि-सुधारणेच्या प्रश्नाकडे' सर्वप्रथम लोकमान्य टिळक ह्यांचें लक्ष गेलें, असें आढळून येतें. ( १९०४ ) त्यांनीं स्थापन केलेल्या 'केसरी' पत्राचा खप उत्तरोत्तर वाढत चालला. १८८८ सालीं वर्गणीदारांचा आंकडा पांच हजारांपलीकडे गेला. टाईपांची झीज होऊं लागली. त्यामुळें टाईप बदलण्याची पाळी वारंवार येऊं लागली. त्या परिस्थितीस तोंड देण्यासाठीं टाईप-फाऊंड्री सुरू करविणें त्यांना भाग पडलें. 'केसरी' पत्र त्याकाळीं आर्य-भूषण मुद्रणालयांत छापलें जात असे. त्याच्या चालकांनीं सदाशिवराव पिंपळे ह्या पंचमेकरच्या सहकारानें गणपत कृष्णाजीच्या पायका टाईपांच्या धर्तीवर टाईप तयार करवून केसरी साप्ताहिकासाठीं ते उपयोगांत आणण्याचा उपक्रम सुरू केला. ( १८९१ ) त्यानंतर कांहीं वर्षांनीं केसरीचें स्थलांतर गायकवाड वाड्यांत झालें. ( १९०५ ) तेथें लो. टिळकांनीं केसरीसाठीं स्वतःची टाईप-फाऊंड्री सुरू केली. त्यावेळीं निर्णयसागर-मुद्रणालयांत राणूजी रावजी आरू ह्यांनीं आपल्या कलाकुशल हातांनीं ज्या टाईपांच्या मेट्रिसा तयार केल्या होत्या, त्या उपयोगांत आणायला त्यांनीं सुरुवात केली; अशा रीतीनें गणपत कृष्णाजी नि निर्णयसागर ह्या दोन्ही मुद्रणालयांत तयार झालेल्या मुद्रिकांचा वापर केसरीसाठीं त्या काळांत होऊं लागला.

त्यादरम्यान लायनो-टाईप नि मोनो-टाईप हीं छपाईच्या क्षेत्रांत क्रांति घडवून आणणारीं यंत्रें पुढें सरसावूं लागलीं होतीं. त्या यंत्रांवर इंग्रजीप्रमाणें

1 Typography of Devanagari by Bapurao Naik, Page-273

मराठी मुद्रिकांना सुकरतेनें बैठक ठोकतां आली तर ती सर्व दृष्टींनीं फायदेशीर होण्यासारखी आहे हें बरोबर हेरून लो. टिळक ह्यांनीं देवनागरी लिपींत आपल्या दृष्टीनें जरूर वाटल्या त्या सुधारणा निर्णयसागरचे राणूजी आरू ह्यांच्याकडे सुपूर्द केल्या व तदनुसार त्यांच्याकडून मेट्रिसा तयार करवून घेतल्या. ह्या सुधारलेल्या नागरी लिपीचें स्वरूप पुढील मजकुरावरून समजून येईल.

हल्लींच्या अबकारी कमिस्यांपुढें विचारार्थ आलेल्या सूचनांची वासलात कशी लागते याचा मासला म्हणून आम्हीं पुणें शहरच्या कमिटीच्या कामाची त्रोटक हकीकत ता० ३० जानेवारीच्या अंकांत दिली होती त्या हकीकती-वरून कमिटीपुढें आलेल्या सूचना सरकारी अधिकाऱ्यांकडून कशा फेटाळून दिल्या जातात हें उघड होतें अर्थात् वस्तुस्थिति अशीच आहे.

लो. टिळक ह्यांनीं देवनागरी लिपींत आवश्यक त्या सुधारणा घडवून आणण्याचें महत्त्व बरोबर ओळखलें होतें. त्यांच्यामागें इतर महत्त्वाचे व्याप का थोडे थोडके होते ? परंतु तरीही त्यांनीं हा प्रश्न अत्यंत जिव्हाळ्याचा मानिला होता. मुद्रिका-तज्ञ राणूजी आरू ह्यांच्याकडून त्यांनीं आपल्या कल्पनेनुसार मुद्रिकांचा जो संच तयार करवून घेतला, त्यांत त्यांनीं नंतर आणखी सुधारणा घडवून आणिल्या. ( १९१४ ) विलायतेस जातांना देवनागरी मुद्रिकांचा आपल्या दृष्टीनें सुधारलेला तो संच ते बरोबर घेऊन गेले. त्या क्षेत्रांतील तंत्रज्ञांकडून त्यांनीं तेथील एका मोनोटाईप कारखान्यांत पुन्हां नवीन टाईप पाडवून घेतले; परंतु त्यावेळीं तरी त्यांच्या अपेक्षेप्रमाणें ते टाईप यंत्रारूढ करण्याच्या दृष्टीनें त्यांना यावें तसें यश आलें नाहीं.

त्यानंतर कांहीं वर्षांनीं ( १९२६ ) साहित्यसम्राट् न. चिं. केळकर ( संपादक केसरी ) ह्यांनीं नारायणराव पिंपळे ह्यांच्या सहकारानें त्या सुधारणांत आणखी भर घातली.

अशा रीतीनें ह्या अत्यंत महत्त्वाच्या लिपि-सुधारणाकार्यास ह्यानंतरच्या काळांतही अनेकांचे हात अनेक परीनें लागले. देवनागरी-लिपी यंत्रारूढ झाली, कामचलाऊ झाली, तरी अजूनही तिला जितकें उन्नत लोकप्रिय स्वरूप आलें

पाहिजे तितकें तें आलेलें नाहीं. तें यावें ह्यासाठीं आजही तज्ज्ञांचे प्रयत्न चालू आहेत.

लायनो-टाईप यंत्राच्या दृष्टीनें देवनागरी लिपींत सुधारणा घडवून आणण्यास ज्यांचे परिश्रम कारणीभूत झाले, त्यांत हरी गोविल ह्या लिपि-सुधारकाचा उल्लेख अत्यादरपूर्वक करणें जरूर आहे. त्यांना जरूर तो सहकार देण्यासाठीं पुनरपि निर्णयसागर-मुद्रणालयाचे चालक पुढें आले. त्यांनीं गोविल ह्यांनीं सुचविल्याप्रमाणें जो देवनागरी मुद्रिकांचा नवीन संच तयार केला, त्याचें स्वरूप पुढील मजकुरावरून ध्यानीं येईल.

> *तीन रुपये दरमहा घेऊन दगडावर टाइप घांशीत बसणारे त्या वेळचे ते पोर पुढे अशा यांत्रिक यंत्रांल असे कोणाच्या स्वप्नातही नव्हते आणि त्या वेळच्या त्यांच्या बरोबरच्या पोरांत दुसरे कोणी असे पुढे आलेही नाहीं.*

आपल्या कारखान्यांत तयार झालेल्या देवनागरी मुद्रिका सर्वोत्कृष्ट आहेत नि त्यांनीं लोकप्रियतेच्या बाबतींत उच्चांक गांठला आहे, अशा प्रकारच्या समजुतीनें निर्णयसागर मुद्रणालयाचे चालक सभोंवार चाललेल्या लिपि-सुधारणेच्या उपयुक्त चळवळीकडे उपेक्षादृष्टीनें पहात स्वस्थ राहिले नाहींत. आतां यंत्र-युग सुरू झालें आहे; जावजीशेठजींच्या काळांतील हस्त-कौशल्याचा जमाना मागें पडला. ह्यापुढें कालानुरूप जरूर त्या सुधारणा घडून आल्या पाहिजेत व त्या बाबतींत आपलेंही कांहीं ना कांहीं कर्तव्य आहे, हें मुद्रणालयाचे चालक तुकारामशेठ नि पांडुरंगशेठ ह्यांनीं अचूक ओळखलें व त्या चळवळींत त्यांनीं कसा सक्रिय भाग घेतला हें ह्यावरून दिसून येईल.

देवनागरी-लिपींत जनतेच्या पचनीं पडतील अशा आवश्यक त्या सुधारणा घडून आल्या पाहिजेत व त्या येतही आहेत. गेल्या ५०।६० वर्षांच्या काळांत वरील लिपिसुधारकांशिवाय स्वातंत्र्यवीर सावरकर, आचार्य विनोबा भावे, मामाराव दाते, विजापुरे, आचार्य काकासाहेब कालेलकर, सुंदरराव वैद्य वगैरे अनेक लिपि-सुधारकांनीं ह्या सुधारणा-कार्यास यथाशक्ती हातभार लाविला असून, उत्तरोत्तर सुधारणेचें पाउल पुढें पुढें पडत चाललें आहे.

ह्या ठिकाणीं ज्यांच्या नांवांचा उल्लेख करण्यांत आला आहे, त्यांपैकीं प्रत्येकाचें कांहीं ना कांहीं वैशिष्ट्य आहे. त्यांतही मामाराव दाते ह्यांची ह्या क्षेत्रांतील तपश्चर्या नि कार्यावरील अनन्यसाधारण निष्ठा निश्चितपणें वाखाणण्याजोगी आहे. गेल्या अनेक वर्षांपासून ह्या कार्याशीं ते सातत्यानें समरस झाले आहेत हें त्यांना तसेंच मुद्रण-व्यवसायाला भूषणावह आहे. देवनागरी लिपी यंत्रारूढ करण्याच्या दृष्टीनें श्री. विजापुरे ह्यांनींही अभिनंदनीय यश संपादन केलें. ह्या क्षेत्रांतील त्यांच्या कौशल्यपूर्ण कामगिरीला योग्य तें महत्त्व देऊन महाराष्ट्र-सरकारनें त्यांच्या ज्ञानाचा उपयोग करून घेतला आहे. अशा निष्ठावंत नि सातत्यानें सुधारणा कार्याचा ध्यास घेणाऱ्या लिपि-सुधारकांच्या प्रयत्नांमुळें देवनागरी लिपीला च यंत्रारूढ झालेल्या देवनागरी मुद्रिकांना उत्तरोत्तर वाढतें उन्नत नि लोकप्रिय स्वरूप प्राप्त होऊं लागलें आहे.

ज्या लिपि-सुधारकांचा निर्णयसागर-मुद्रणालयाशीं प्रत्यक्ष संबंध आला, त्यांच्या कार्याचा येथें अल्प परिचय करून देण्यांत आला आहे.

देवनागरी लिपि-सुधारणा-कार्याकडे केवळ कांहीं विद्वान नि तळमळीच्या कार्यकर्त्यांनीं आपलें लक्ष पुरविलें असें नसून भारत सरकार व बिहार, बंगाल, मध्यप्रदेश, महाराष्ट्र वगैरे प्रांतिक सरकारांनींही ह्या जिव्हाळ्याच्या प्रश्नाकडे आपापलें लक्ष गेल्या कांहीं वर्षांपासून वळविलें आहे. त्याचप्रमाणें महाराष्ट्र साहित्य परिषद, हिंदी साहित्य संमेलन, नागरी प्रचारिणी सभा वगैरे संस्थाही ह्या महत्तम कार्यांत आपापला वांटा यथाशक्ति उचलीत आहेत.

आज आपण मोनो टाईप, लायनो टाईप ह्यांसारख्या यंत्रांच्या युगांत वावरत आहोंत. एवढेंच नव्हे तर युरोप अमेरिकेंत सध्यां फोटो कंपोझिंगचें युग सुरू झालें आहे. ती सुधारणा भारतावरही आज नाहीं उद्यां आपला पगडा बसविल्याशिवाय रहाणार नाहीं. एकंदरींत मुद्रण-व्यवसायांत अलीकडच्या काळांत फार महत्त्वाची क्रांति घडून आली आहे.

मुद्रणव्यवसायांत ह्या सुधारणा कालानुक्रमें घडून येत असल्या तरी शंभर वर्षांपूर्वीच्या यांत्रिक सुधारणांचा मागमूस नसलेल्या काळांत शेठ जावजी दादाजी नि राणूजी आरू ह्यांनीं त्या व्यवसायाला नि देवनागरी

मुद्रिकांना जें सुंदर नि उन्नत स्वरूप प्राप्त करून दिलें, त्याचें महत्त्व आजही प्रकर्षानें प्रत्येकाला जाणवत आहे.

विशेषतः संस्कृत वाङ्मय-प्रकाशनाच्या क्षेत्रांत सुयोग्य मुद्रिकानिर्मितीच्या रूपानें निर्णयसागर मुद्रणालयानें जी कामगिरी पार पाडिली, ती तशीच अनन्यसाधारण स्वरूपाची आहे. तिचे गोडवे कर्नल जेकब, डॉ. किलॅहार्न, डॉ. हिलब्रँट (जर्मनी) ह्यांच्यासारख्या पाश्चात्य विद्वान पंडितांनींही मुक्तकंठानीं गायिले आहेत.

कर्नल जेकब ह्यांनीं दीर्घ व्यासंगानें लिहिलेले आपले अनेक संस्कृत ग्रंथ (इंग्रजी टीपांसह) निर्णयसागर-मुद्रणालयांत छापिले. त्यांच्याप्रमाणें, इतर अनेक युरोपीयन संस्कृत पंडितांनाही निर्णयसागरचा आश्रय घेणें सुकर वाटलें. त्या सर्वांनीं ह्या मुद्रणालयाबद्दल व संस्कृत मुद्रिकांबद्दल प्रशंसोद्गार काढिले आहेत.

विस्तारभयास्तव येथें फक्त कर्नल जेकब ह्यांचाच तेवढा अभिप्राय देण्यांत येत आहे.

"निर्णयसागर मुद्रणालयानें केलेल्या उत्कृष्ट कामगिरीविषयीं गौरवाचे दोन शब्द लिहिल्याशिवाय ही प्रस्तावना संपविणें शोभून दिसणार नाहीं. प्रुफें वाचणाऱ्यानें आपलें कर्तव्य इतक्या कौतुकास्पद रीतीनें बजावलें आहे कीं, माझ्या वांट्यास जवळ जवळ कांहींच काम शिल्लक राहिलें नाहीं. छपाईविषयीं म्हणाल तर ती पहिल्या दर्जाची आहे."[१]

"निर्णयसागर मुद्रणालयाचे संस्थापक जावजी दादाजी ह्यांनीं संस्कृत ग्रंथछपाईला उत्कृष्ट दर्जा प्राप्त करून देण्याच्या कामीं जेवढी कामगिरी केली आहे, तेवढी भारतांतील अन्य कोणाही व्यक्तीनें बहुधा केलेली नाहीं; तसेंच त्यांच्या मुद्रणालयांत तयार झालेल्या मुद्रिका अवघ्या जगांत पहिल्या प्रतीच्या ठरलेल्या आहेत"[२].

निर्णयसागर मुद्रणालयानें केवळ देवनागरी मुद्रिकांपुरता व्याप संभाळला असें नसून इंग्रजी, हिब्रू, कानडी ह्यांसारख्या भाषा-भगिनींकडेही आपलें लक्ष वळवून त्यांनाही सुंदर कोंदणांत बसविलें.

१ एकादश अथर्वण उपनिषदें, ह्या ग्रंथाची प्रस्तावना, नोव्हेंबर १८९०.
२ ॲकॅडेमी-त्रा. १६ एप्रील, १८९२; कर्नल जेकब ह्यांचा लेख.

आपल्या कारखान्यांत कोणत्याही भाषा-भगिनीशीं संबंध जोडणारा मुद्रक किंवा साहित्यिक येवो. त्याला मुद्रिकांची जरुरी असो वा मुद्रणाची जरुरी असो, आपल्याकडे येऊन त्यानें विन्मुख जातां कामा नये, ही होती ह्या मुद्रणालयाच्या चालकांची सर्वव्यापी दृष्टि.

संस्कृत, जैनी, मराठी, गुजराती, हिंदी, किंवा इंग्रजी भाषेतील मुद्रण-प्रकाशन आपल्याकडे होऊं शकतें, मग कानडी कां होऊं नये ? तेंही झालें पाहिजे, ह्या हेतूनें तुकारामशेठजींनीं अनंताचार्य जाराप्पाचार्य ह्या नांवाच्या कानडीभाषामिज्ञ पंचमेकरास आपल्या कारखान्यांत ठेवून घेऊन त्यांच्याकडून कानडी मुद्रिकांचे पंच तयार करवून घेतले व कानडी भाषेतील ग्रंथ-प्रकाशनाचा मार्ग मोकळा केला. कानडी लिपीच्या सर्व प्रकारच्या लहान मोठ्या मुद्रिका तयार करवून त्यांचा देवनागरी व इंग्रजीप्रमाणें सतंत्र कॅटलॉग छापण्यांत आला. म्हैसूर राज्यांत एका काळीं ह्या कानडी मुद्रिकांना मोठ्या प्रमाणांत मागणी होती व आजही आहे.

# १२

## मालक आणि कामगार

जावजीशेठनीं मुद्रिका-निर्मितीच्या व्यवसायानें आपली कारखानदारी सुरू केली. त्यांनीं सुरुवातीस अवघीं २।३ माणसें आपल्याबरोबर काम करण्यासाठीं ठेविलीं नि जसजसा व्याप वाढत चालला व व्यवसायांत वाढतें यश मिळूं लागलें, तसतशी नोकरवर्गांत वाढ करीत करीत तो आंकडा त्यांनीं चार साडेचारशेपर्यंत पोहोंचविला.

जावजीशेठ स्वतः दोन रुपये पगारावर टाईप घासण्याच्या कामावर रुजू झाले आणि त्याच जावजीशेठनीं दरमहा चार ते पांच हजार रुपये पगार वाटण्याचा पुरुषार्थ गाजवून दाखविला. केवळ मोडकीतोडकी सही करण्यापुरती अक्षरओळख झालेल्या एका साध्या परंतु उद्योगी नि कर्तबगार महाराष्ट्रीय माणसानें मारलेली ही आश्चर्यकारक मजल आहे !

ज्या काळांत जावजीशेठ वावरले तो काळ त्याना कांहीं बावतींत प्रतिकूल तर कांहीं बावतींत अनुकूलही होता. ईश्वरकृपेनें त्यांच्या वांट्यास जो व्यवसाय आला व ज्यांत त्यांनीं असामान्य स्वरूपाचें कौशल्य प्रगट केलें, त्या व्यवसायाला तो काळ फार अनुकूल होता. मुद्रण नि प्रकाशन व्यवसाय नुकताच सुरू झालेला होता. चिरस्मरणीय आद्य मुद्रक-प्रकाशक गणपत कृष्णाजी ह्यांचें उदात्त उदाहरण जावजीशेठजींसमोर होतें.

उदाहरण दृष्टीसमोर असलें तरी तें यशस्वी रीतीनें गिरविण्यासाठीं जरूर ते गुण अंगीं असावे लागतात. शेठजींना पुस्तकी शिक्षणाचा लाभ होऊं शकला नाहीं तरी त्यांच्याठायीं उपजत चौकसबुद्धि होती. आपण शाळेंत जाऊन शिक्षण घेऊं शकलों नाहीं, त्याची भरपाई होण्यासाठीं ज्या धंदेशिक्षणाशीं किंवा

कलाशिक्षणाशीं आपली सांगड घातली गेली, त्या कलेची तरी आराधना आपण एकनिष्ठपणें केली पाहिजे, त्याशिवाय ह्या जगांत मानानें जगतां येणार नाहीं, असें वाटल्यामुळें म्हणा किंवा मुद्रणकलेंतील त्यांचे गुरुजी थॉमस ग्रॅहॅम ह्यांच्या कृपेमुळें म्हणा, मुद्रिका घांसतां, यांसतां, त्यांची निर्मिती करण्याचें कसब त्यांना साध्य करून घेतां आलें.

जावजीशेठ यांच्या जीवनाकडे आरंभापासून बारकाईनें पहाण्याचा प्रयत्न केला असतां असें दिसून येतें कीं, त्यांच्या दृष्टीपुढें निदान आरंभीं तरी कांहीं योजनाबद्ध कार्यक्रम होता असें म्हणतां येत नाहीं. काम करतां करतां त्यांचें मुद्रण-कलेवर प्रेम जडलें व नंतर निरनिराळ्या ठिकाणीं राहून त्यांनीं आपलें ज्ञान नि हस्तकौशल्य वाढविलें.

मुद्रिका-व्यवसायाला महत्त्व प्राप्त होण्याचा तो काळ होता. हातांत कला होती. त्या कलेच्या बळावर आपले मालक भरपूर पैसा मिळवितात आणि आपणास मात्र मुशाहिरा मिळतो तो तुटपुंजा ! ही स्थिति असह्य होऊन जावजीशेठ स्वतंत्र व्यवसाय करण्याच्या मार्गास लागले.

भांडवलाचा प्रश्न त्यांनीं कशा रीतीनें सोडविला तें आपण पाहिलें; परंतु आपल्या व्यवसायासाठीं जरूर तीं माणसें जोडण्याचा प्रश्न त्यांनीं ज्या यशस्वी रीतीनें सोडविला, त्याबद्दल त्यांचें कौतुक करावें तेवढें थोडेंच होईल. धंद्यांत पैशांची जरुरी असते हें खरें असलें, तरी योग्य वेळीं योग्य माणसें जोडून त्यांच्याकडून हौसेनें काम करून घेणें नि तीं मिळविलेलीं माणसें कायम टिकविणें, ही बाब औद्योगिक क्षेत्रांत फार महत्त्वाची आहे. जावजीशेठनीं हें महत्त्व ओळखलें व त्या तत्त्वाची अंमलबजावणी आपल्या कारखानदारींत त्यांनी कसून नि मोठ्या हुशारीनें केली.

आपला कारखाना म्हणजे आपलें घर व त्या कारखान्यांत वावरणारीं लहानथोर माणसें म्हणजे आपल्या कुटुंबांतील नात्यागोत्यांचीं माणसें, ह्या प्रेमळ भावनेनें ते त्यांच्याशीं वागत असत. ज्यांच्या श्रमावर नि हस्तकौशल्यावर आपण पैसे मिळवितों, त्यांची आपण जास्तींत जास्त कदर केली पाहिजे, त्यांचें समाधान नि संतोष सदैव सांभाळला पाहिजे, ही जाणीव त्यांच्या अंतःकरणांत तीव्रतेनें वावरत होती. कारखान्यांतील लहानथोर कोणीही कामगार असो, त्याची अडचण जाणून घेऊन त्याला जरूर तें सहाय्य करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें

ते मानीत असत. प्रत्येक माणसाच्या आयुष्यांत कोणत्या ना कोणत्या प्रकारच्या अडचणी मधून मधून येतच असतात. त्या यावयाच्याच, परंतु अडचण आली असतां तिचें निवारण करणारा आपला पाठीराखा कोणी ना कोणी आहे, एवढी जाणीवही माणसाचा उत्साह द्विगुणित करीत असते. कारखान्यांतील प्रत्येक लहानथोर कामगारास जावजीशेठसंबंधीं नेहमीं फार मोठा आधार वाटावयाचा. आपल्या दैनंदिन वागणुकीनें ती आधाराची भावना त्यांनीं निर्माण करून ठेविली होती. त्यामुळें प्रत्येक कामगारास जावजीशेठचा कारखाना हा आपला कारखाना आहे, असें वाटत असे.

व्यक्ति तितक्या प्रकृति. सारीं माणसें सारख्या प्रवृत्तीचीं नसतात. कांहीं माणसें अज्ञानामुळें भांडणतंटा करून कधीं कधीं कारखाना सोडून दुसरीकडे जात असत. जावजीशेठ त्यांची समजूत घालण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न करीत. कधीं यश मिळे, कधीं मिळत नसे. अशा रीतीनें हुज्जत घालून कारखाना सोडून गेलेलीं माणसें कधीं कधीं पश्चात्ताप पावून परत येत. तशा वेळीं पूर्वीचें त्यांचें वागणें विसरून जावजीशेठ मातेच्या ममतेनें त्यांना पुन्हां कामावर घेत असत. त्यांच्याठायीं सूडबुद्धि नव्हती; तर प्रत्येकाबद्दल ममतेची भावना होती.

कारखान्याचें कोणतेंही खातें असो. कोणत्या ना कोणत्या खात्यांत मधून मधून यांत्रिक बिघाड व्हावयाचा किंवा त्यापायीं आपसांत बोलाचाली व्हावयाची. अशा वेळीं शेठजींच्या कानापर्यंत तक्रार जावयाची. यांत्रिक बिघाड असो वा व्यक्तिगत बिघाड असो. जावजीशेठ तावडतोब तेथें जाऊन जरूर ती दुरुस्ती घडवून आणीत असत. त्यांना जशी यंत्रांची जुळवाजुळव साधली होती, तशीच माणसांचीं मनें जुळविण्याचें कसबही साधलें होतें. ते देतील तो निर्णय मान्य करणें नि त्यांच्या सांगण्याप्रमाणें वागणें, हें प्रत्येकाला आपलें कर्तव्य आहे, असें वाटत असे.

छापखान्यांतील यंत्रांची त्यांना खडान् खडा माहिती होती. ती त्यांनीं कशी प्राप्त करून घेतली, ह्याचें सर्वांना नवल वाटत असे. 'यांत्रिक दुरुस्तीसाठीं एखाद्या वाकबगार माणसास बोलवा' असें म्हणण्याची पाळी त्यांनीं आपल्या कारकीर्दीत कधींही येऊं दिली नाहीं. यांत्रिक दुरुस्ती करतांना हातांना नि कपड्यांना तेल लागेल, शाई लागेल, हा विचार त्यांच्या मनांत कधीं आला नाहीं. अशा वेळीं मालकपणाचा त्यांना साफ विसर पडत असे.

मुद्रिका खातें ( टाईप फाऊंड्री ) हें तर त्यांचें अत्यंत आवडतें खातें. त्या खात्यांत फिरत असतां लहान मोठ्या मुद्रिका हातांत घेऊन ते चौकस दृष्टीनें पहात असत नि जरूर वाटतील त्या सूचना करीत असत. मुद्रिका हातांत घोळविल्यानें हात, बोटें मलिन होत; परंतु त्या मलिनपणाकडे त्यांचें लक्ष नसे. मुद्रिका म्हणजे त्यांना सुवर्ण-मोहरा वाटावयाच्या. ती त्यांची लक्ष्मी होती. मुद्रिका हातांत घेतल्यानें हात काळे झाले तरी जनतेला ज्ञानाचा प्रकाश देण्याचें नि कारखान्याला भरपूर करभार देण्याचें सामर्थ्य त्यांच्याठायीं आहे; त्या ज्ञानदात्या व ऐश्वर्यदात्या आहेत; त्यांचा कंटाळा करून कसें चालेल ? त्याचप्रमाणें आपणास जें कांहीं यश मिळालें नि धंद्यांत पाऊल पुढें पडलें, तें कशामुळें ? आपण सुखाचे दोन घांस खातों नि आपल्यामुळें शेंकडों कुटुंबांना भाकर मिळत आहे, ती कोणामुळें ? आपल्या व्यवसायाचा पाया कोणीं घातला ? मुद्रिकांनींच ना ? मग त्यांचें कोडकौतुक नाहीं तर दुसऱ्या कोणाचें करायचें ? अशी होती त्यांची साधीभोळी परंतु हृदयस्पर्शी विचारसरणी.

कारखान्यांतील कामगारवर्गाबद्दल, वर सांगितल्याप्रमाणें जावजीशेठजींच्या मनांत कमालीचें प्रेम वास करीत असे. कृतज्ञताभाव जणूं काय त्यांच्या बारशाला पुजला गेला होता. आपली सारी मदार कामगारांवर आहे. तो वर्ग सुखी तर आपण सुखी, ह्या भावनेनें ते त्यांच्याशीं वागत. आपल्या कारखान्यांतील कोणी कामगार आजारी पडल्याचें समजतांच जावजीशेठ जातीनें त्याच्या बिऱ्हाडीं जाऊन त्याच्या औषधपाण्याची नि खाण्यापिण्याची नीट व्यवस्था लावीत असत. त्याला कोणतीं फळें चालतील ह्यासंबंधींही चौकशी करून त्याच्याकडे निवडक फळांची करंडी पाठवून देत असत. त्यावेळीं ते पैशांकडे पहात नसत. जणूं काय आपल्या घरांतील आपला एकादा नातलग आजारी पडल्यासारखे ते त्या कामगाराची सर्व प्रकारची काळजी वहात असत.

छापखान्यांतील कोणी एक 'कंपॉझिटर' एकदां आजारी पडून कोंकणांतील आपल्या गांवीं निघून गेला. त्याला मासिक पंधरा रुपये पगार त्या काळीं मिळत असे. तो कामगार दुर्दैवानें त्या आजारांत निधन पावला. त्याचा कांहीं दिवसांचा पगार द्यावयाचा राहिला होता. थोडे दिवस लोटल्यानंतर त्या कामगाराचे वयोवृद्ध वडील छापखान्यांत मुलाचा राहिलेला पगार नेण्यासाठीं आले. पगाराचा हिशेब ठेवणाऱ्या कारकुनानें त्या बाबतींत जावजीशेठजींची

परवानगी विचारली तेव्हां ते म्हणाले, "शिल्लक राहिलेल्या पगाराचा हिशेब करून जें कांहीं देणें असेल तें देऊन टाका नि शिवाय आणखी वर एक महिन्याचा पगार मदत म्हणून द्या."

शेठजींचा तो दयाळूपणा पाहून त्या वृद्ध गृहस्थाचे डोळे पाणावले! असल्या दयाळु मालकाच्या हाताखालीं काम करण्याचें आपल्या मुलाच्या नशिबीं नव्हतें, ह्याबद्दल त्याला वाईट वाटलें. शिवाय मध्येंच काम सोडून गेल्यामुळें कांहीं दिवसांचे पगाराचे पैसे मिळतील कीं नाहीं, ह्याबद्दल तो गृहस्थ साशंक होता. परंतु 'आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन्ही डोळे' असल्या प्रकारचें हें औदार्य अनुभवास आल्यामुळें त्याला समाधान वाटलें.

कारखान्यांतील लहान थोर किंवा कोणत्याही दर्जाचा कामगार असो. जावजीशेठना प्रत्येक कामगाराच्या परिस्थितीची खडान् खडा माहिती असे. चौकस दृष्टीनें ते प्रत्येकाची माहिती करून घेत असत. त्यामुळें कामगारांग एक प्रकारची आपुलकी वाटावयाची. हा आपलेपणा ते स्वार्थापायीं करीत नसत. त्यांत त्यांचा स्वार्थ साधत असे हा प्रश्न वेगळा; परंतु अशी चौकशी करण्यांत त्यांचा हेतु होता. त्यांनीं एका काळीं कामगार ह्या नात्यानें अत्यंत कष्टाचें जीवन घालविलें होतें; त्यामुळें त्या वर्गाबद्दल त्यांना सहाजिक जिव्हाळा वाटत असे.

एकदां छापखान्यांतील विष्णुपंत गोखले ह्या नांवाचे एक कारकून निधन पावले. त्यांची गरिबीची स्थिति जावजीशेठना माहीत होती. अंत्यविधीसाठीं लागणारा पैसा घरांत असेल कीं नाहीं कोण जाणे! ह्या विचारानें जावजीशेठ दुःखीकष्टी झाले! त्या दिवशीं मुसळधार पाऊस कोसळत होता. बाहेर पडणें मुष्कीलीचें होतें; परंतु शेठजींच्यानें रहावेना. कारखान्यांतील १।२ माणसें बरोबर घेऊन ते गोखल्याच्या घरीं गेले. घरातील माणसांना धीर दिला नि मार्गांतील साऱ्या अडचणी निभावून त्या मृत कारकुनाचा अंत्यविधि त्यांनीं यथासांग पार पाडायला लाविला!

अशा गोष्टींकडे जावजीशेठजींचें नेहमीं लक्ष असे. तो आपला परम धर्म आहे, असें त्यांना वाटत असे. प्रत्येक कामगारास त्यामुळें जावजीशेठबद्दल कमालीचा प्रेमादरभाव वाटत असे.

कारखान्यांतील कामगारांकडून अनवधानामुळें कधीं कधीं चुका घडावयाच्या. हातून घडलेल्या चुकीबद्दल मालकाकडून बोलून घ्यायचें व शिवाय नुकसानभरपाईही करून द्यायची, हा सरळ व्यवहार आहे. त्याबद्दल कोणी कोणाला दोष देण्याचें कारण नाहीं. मात्र असले व्यवहार जावजीशेठजींच्या कारखान्यांत सहसा चालत नसत. तेथें माणुसकीला भरपूर अवसर होता. एकाद्या कामगाराकडून कांहीं चूक घडली तर त्याला समजुतीच्या भाषेत पुन्हां असें घडूं न देण्याबद्दल सांगायचें नि तेवढें सांगणें पुरेसें होत असे.

एकदां सरकारकडून निर्णयसागरकडे ग्रंथ छपाईचें कांहीं काम आलें. जावजीशेठ ह्यांच्या चिटणिसानें कागद, छपाई वगैरेचा हिशेब करून सरकारकडे अंदाज पाठवून दिला. त्या अंदाजांत बेरीज करतांना चिटणिसाच्या नजरचुकीनें दोन हजार रुपये कमी लागले. ती चूक कांहीं दिवसांनीं नंतर उघडकीस आली. परंतु जावजीशेठ त्या चुकीबद्दल चिटणिसास तोडून बोलले नाहींत. ते एवढेंच म्हणाले, "ती चूक जाणून बुजून घडली नाहीं. घाईत असं कधीं कधीं घडतें! ती चूक माझ्या हातून घडली असती तर मीं काय केलं असतं!"

मालकाच्या बाबतींत अशा प्रकारची माणुसकी मनन व अनुकरण करण्यासारखी नाहीं असें कोण म्हणेल ?

जावजीशेठनीं उद्योगाच्या नि इतर अनेक गुणांच्या बळावर फार मोठें ऐश्वर्य संपादन केलें. छापखान्याच्या व्यवसायांत इतकें भरघोस यश दुसऱ्या एकाद्या महाराष्ट्रीयाच्या वांट्यास क्वचित् आलेलें आढळून येईल. जन्मभर उद्योग केला, हालअपेष्टा भोगल्या नि मनस्वी श्रम केले; आता आणखी श्रम कशाला ? राजासारखें उचासनावर बसून आतां देखरेख ठेवण्याचें काम करीत गेलें म्हणजे बस्स! अशा प्रकारचा विचार त्यांच्या मनाला कधीही शिवला नाहीं. रिकामपण त्यांना माहीत नव्हतें. जेव्हां पहावें तेव्हां जावजीशेठ उद्योगांत मग्न असायचे. माणसानें नेहमीं कांहीं ना कांहीं उद्योगांत असावें. आयुष्याचा एक क्षणही वायां दवडूं नये, असा उपदेश करून न थांबतां स्वतः त्याप्रमाणें त्यांचें आचरण अहर्निश चालू असे. त्यामुळें कामगारांसही तेंच वळण लागलें होतें. मालकाच्या वागणुकीचें अनुकरण कामगार आपोआप न सांगतां करीत असतात. जावजीशेठजींच्या कारखान्याला भरघोस ऊर्जितदशा प्राप्त झाली त्याचें हें एक प्रमुख कारण आहे.

# १३

## शेठजींचें परोपकारी जीवन

जावजींचा स्वभाव परोपकारी तसाच उदार होता. त्यांच्यापुढें लोककल्याणासंबंधीं कोणताही प्रश्न ठेवला असतां तो सर्व बाजूंनीं समजून घेण्याचा ते प्रयत्न करीत नि जें करणें योग्य वाटेल तें तावडतोब करीत असत. आपलें नांव प्रसिद्ध व्हावें, अशी इच्छा त्यांनीं कधीं बाळगली नाहीं. उलटपक्षीं जर कांहीं परोपकार हातून घडला तर त्याची कुठेंही जाहिरात होऊं नये, ह्याबद्दल आपल्याकडून घेतां येईल तेवढी खबरदारी ते घेत असत.

ते म्हणत असत कीं, लोकांच्या उपयोगी पडणें हें प्रत्येकाचें कर्तव्यच आहे व तें प्रत्येकानें यथाशक्ति पार पाडलेंच पाहिजे. हें आचरण त्यांच्या अगदीं अंगवळणीं पडलें होतें.

ज्या कार्यांत किंवा ज्या उद्योगांत आपण गुंतलों आहोंत, तो उद्योग नीटनेटका करावयाचा, त्यांत नाव ठेवायला जागा ठेवायची नाहीं, आणि तो उद्योग करीत असतां जीं जीं माणसें व्यवहारापायीं आपल्या संनिध येतील त्यांचें सर्वतोपरी समाधान होईल, अशी वर्तणूक त्याच्या बाबतींत ठेवायची, हें धोरण त्यांनीं शेवटपर्यंत चालविलें.

जावजीशेठजींचा व्यवसाय मुद्रण-प्रकाशनाचा होता. त्या व्यवसायामुळें त्यांचा संबंध अनेक छापखानेवाल्यांशीं, विद्वान लेखकांशीं, पुस्तकविक्रेत्यांशीं, विद्यार्थ्यांशीं नि गिऱ्हाईकांशीं आला. त्यांपैकीं सर्वांचाच मार्ग सरळ नि सुकर असतो असें नाहीं. अनेकांच्या मार्गांत आर्थिक अडचणी असतात. कुठेंही असो,

पैशांचा प्रश्न पुढें आला म्हणजे वादविवाद सुरू होतो. घासाघीस करावी लागते. परंतु जावजीशेठ यांच्या स्वभावांत एक प्रकारचें मार्दव होतें. ते कोणत्याही व्यवहारांत सहसा कटुता येऊं देत नसत. जे जे आपल्यासमोर येतील त्यांची सोय पहाणें, त्यांना शक्य त्या सवलती देणें नि आपल्याकडे आलेल्यांना खूश करून पाठविणें, हा आपला धर्म आहे असें समजून तो धर्म पालन करण्यासाठीं जावजीशेठ जिवापाड जपत असत.

ही साधी गोष्ट नाहीं. ती फार महत्त्वाची तशीच प्रत्येकानें आचरणांत आणण्यासाठीं झटण्यासारखी गोष्ट आहे. ह्या जगांत प्रत्येकानें जर जावजीशेठप्रमाणें वागण्याचा निर्धार केला, तर सध्यां जग आहे त्यापेक्षां कितीतरी पटीनें सुखी नि समाधानी होईल.

ही साधीसुधी माणुसकी आहे. आणि जीवनभर शेठजींच्या सान्निध्यांत जे जे आले त्यांच्यावर त्यानीं मुक्तहस्तें तिचा वर्षाव केला. ह्या माणुसकीच्या साध्या प्रेमबंधनानें त्यांनीं छापखानेवाले असोत, मासिक-प्रकाशनकार असोत, कोणत्याही नियतकालिकाचे संपादक असोत, शास्त्री-पंडित असोत, लेखक असोत वा इतर कोणीही असोत, त्या सर्वांना त्यानीं जखडून टाकिलें होतें.

स्वतःचें कितीही नुकसान झालें तरी हरकत नाहीं. परंतु दुसऱ्याचें नुकसान होऊं द्यावयाचें नाहीं. दुसऱ्यांच्या मनाची हळहळ फार वाईट आहे. ती आपण टाळलीच पाहिजे. ह्या बाबतींत त्यांचा फार कटाक्ष होता. 'दुसऱ्यास सुखी करावें, तेणें आपण सुखी व्हावें । दुसऱ्यांस कष्टवितां कष्टावें लागेल स्वयें ॥' ही समर्थ रामदासांची शिकवण त्यांच्या चांगली अंगवळणीं पडलेली होती. दैनंदिन वागणुकींत उठतां बसतां ती प्रत्येकाच्या नजरेस येत असे.

सार्वजनिक जीवनाच्या व्यापांत जावजीशेठ पडले नाहींत. तो व्याप सांभाळणारे सांभाळताहेत. त्यांच्याबद्दल त्यांना प्रेमादरभाव वाटत असे. त्यांना सहाय्य करण्याची संधी मिळाली असतां ती ते वाया जाऊं देत नसत. आपली ताकद नि आपल्या मर्यादा ते पूर्णपणें ओळखून होते. त्यामुळें 'आपण जाणपण कांहींच न घ्यावें । लीनता धरूनि जावें । जेथें तेथें' हा त्यांचा स्वभावधर्म बनलेला होता.

आपण जो कारखान्याचा पसारा मांडला आहे, तो उत्तम प्रकारें

सांभाळावयाचा; तेंच आपलें कार्यक्षेत्र. तेथें वावरत असतां जें कांहीं सत्कार्य हातून घडेल तें सहज रीतीनें घडूं द्यावयाचें, त्याचा कधींही टेंभा मिरवायचा नाहीं किंवा त्याबद्दल अभिमानही बाळगायचा नाहीं, असें जणूं काय त्यांनीं स्वतःवर बंधन लादून घेतलें होतें.

आपल्यामुळें कोणालाही त्रास किंवा दुःख होऊं नये, उलट सुख व्हावें, एवढें सत्कार्य आपल्या हातून घडलें तरी तें पुरेसें असतें; परंतु या धोरणानें वागणारीं माणसें आपणास फारशीं आढळून येत नाहींत. जावजीशेठ हे अशा दुर्मिळ लोकांत मोडणारे होते.

जावजीशेठकडे निरनिराळे प्रश्न किंवा अडीअडचणी घेऊन गरजू लोक नेहमीं यायचे. त्यांत स्वजातीय असायचे, त्याचप्रमाणें परजातीयही असायचे. कोणालाही नाखूश न करतां पाठवायचें, हें त्यांचें नेहमींचें धोरण होतें.

वक्तृत्वकला ही एक उपयुक्त कला आहे. त्या कलेंत प्रवीण असलेलीं माणसें जनतेवर प्रभाव पाडून लोकशिक्षणाचें नि प्रचाराचें कार्य उत्तम प्रकारें पार पाडूं शकतात, हें आपण पहातों. वक्तृत्व-गुण कित्येकांत उपजत असतो; परंतु सरावानें नि शिक्षणानेंही ती कला हस्तगत करतां येते.

ह्या कलेची उपयुक्तता जाणून मुंबईंत प्रथमतः सुप्रसिद्ध सुधारक विष्णु पर्शरामशास्त्री पंडित ( १८२७–१८७६ ) ह्यांनीं १८६६–६७ सालीं एका वक्तृत्वोत्तेजक सभेची स्थापना केली. अनेक तत्कालीन तरुणांचें त्या संस्थेनें मार्गदर्शन केलें. वर्षानुवर्ष त्या संस्थेतर्फे वक्तृत्वाच्या चढाओढी नि बक्षिससमारंभही होत असत. सुमारें दहा वर्षेंपर्यंत ह्या संस्थेचा कारभार ठीक चालू होता; पुढें तिला कांहीं ना कांहीं कारणामुळें उतरती कळा लागून शेवटीं १८७८ नंतर त्या संस्थेचें कार्य थंडावलें !

अशा प्रकारची उपयुक्त संस्था नामशेष व्हावी नि तिची जागा भरून काढायला दुसरी एखादी संस्था निर्माण होऊं नये किंवा त्या संस्थेचें पुनरुज्जीवन होऊं नये, ह्याबद्दल अनेकांस दुःख होत असे; परंतु दुःख होऊन त्याचा काय उपयोग? तो खर्चाचा प्रश्न होता. प्रत्येक बाबतींत नडतें तें तेथेंच. त्यामुळें कोणीही पुढाकार घ्यायला पुढें सरसावत नसे. असा हा प्रकार ७८ वर्षे चालू होता.

त्यानंतर ह्या प्रश्नाचा एकदांचा सोक्षमोक्ष लावलाच पाहिजे, असें देशकल्याणाच्या दृष्टीनें विचार करणाऱ्या कांहीं मंडळींस वाटूं लागलें. त्यांत विनायक कोंडदेव ओक हेही होते. नेहमीं जावजीशेठ ह्यांच्या सान्निध्यांत वावरत असल्यामुळें त्यांना त्यांचा स्वभाव चांगला माहीत होता. योग्य संधी पाहून जावजीशेठजवळ तो प्रश्न काढावयाचा नि त्यांचें सहकार्य संपादन करावयाचें, असा बेत त्यांनीं ठरविला.

त्या संस्थेचें नांव होतें 'महाराष्ट्र वक्तृत्वोत्तेजक सभा.' एके दिवशीं सायंकाळीं सहज गप्पागोष्टी चालल्या असतां जावजीशेठना उद्देशून विनायकराव ओक म्हणाले, "शेटजी ! एका उपयुक्त परंतु दिवंगत झालेल्या संस्थेचा थोडासा परिचय आपणांस करून द्यायचा आहे. आमच्यापैकीं पुष्कळांना त्या संस्थेचा उद्धार व्हावा असं वाटत आहे."

"मग तुमचं काय म्हणणं आहे तें सांगा ना. ऐकूं या तरी !" जावजीशेठ म्हणाले.

नंतर वक्तृत्व म्हणजे काय, त्या कलेचा उपयोग देशकल्याणासाठीं कसा करून घेतां येतो, वक्तृत्वोत्तेजक सभेमुळें तो उद्देश कसा सफल होत असे, हें सारें विनायकराव ओक ह्यांनीं त्यांना समजावून दिलें व म्हणाले, "अहो ! अहमदनगर, नाशीक, ह्यासारख्या ठिकाणीं वक्तृत्वोत्तेजक सभा असाव्या आणि मुंबईसारख्या शहरांत तशी उपयुक्त संस्था नसावी, ही लाजिरवाणी गोष्ट आहे, नाहीं का ?"

"असं का ?" जावजीशेठ म्हणाले, "तुम्ही वक्तृत्वोत्तेजक सभा कीं काय जें मला सांगत आहांत, तें कार्य चांगले आहे, असं वाटतं. ती करण्यासाठी किती पैसे खर्च करावे लागतील ?"

"त्यासाठीं किती खर्च येईल ह्याचा आम्हीं साधारण अंदाज ढोकळ मानानें केलेला आहे. बक्षिसें देण्यासाठीं दीडसें रुपये नि इतर खर्चासाठीं दीडसें मिळून एकंदर खर्च तीनशें रुपयांपेक्षां जास्त लागणार नाहीं." ओक म्हणाले.

तो आंकडा ऐकून जावजीशेठ क्षणभर थांबले व नंतर म्हणाले, "ठीक आहे. तीनशें रुपये खजानजीकडून घेऊन जा. आणि तुमची ती सभा एकदांची होऊं द्या. काय गंमत करून दाखवितां ती पाहूं या तरी !"

अशा प्रकारचें होतें जावजीशेठजींचें औदार्य. ह्या एक नमुना सांगितला. प्रत्येक सत्कार्याच्या बाबतींत त्यांचें हेंच धोरण असे.

ह्या प्रोत्साहनामुळें वक्तृत्वोत्तेजक सभेचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं धडपडणाऱ्या मंडळीचा उत्साह द्विगुणित झाला. सभेची ती 'गंमत' आपण जावजीशेठना करून दाखवायची, ह्या निर्धारानें मंडळी कामास लागली. जावजीशेठनीं दिलेल्या उत्तेजनामुळें १८८६ सालीं महाराष्ट्र वक्तृत्वोत्तेजक सभेचें पुनरुज्जीवन झालें. 'इंदुप्रकाश' पत्रांत काशीनाथ त्र्यंबक खरे नि नारायण नरसिंह साठे ह्या तत्कालीन दोन चिटणिसांच्या नांवें, १४५ रुपये बक्षिसाची जाहिरात प्रसिद्ध झाली,[१] व अशा रीतीनें ८।१० वर्षें स्थगित झालेलें एक उपयुक्त कार्य सुरू झालें, आणि तें त्यानंतर वर्षानुवर्ष चालू राहिलें.

ह्या संस्थेचा सहावा वार्षिक समारंभ १८९२ (एप्रिल) सालीं साजरा झाला. त्या वेळीं जावजीशेठनीं इहलोकींची यात्रा संपविली होती. सुरवातीलाच संस्थेच्या चालकांनीं शेठजींचें पुण्यस्मरण करून दुःखप्रदर्शक ठराव पास केला. त्यांत म्हटलें आहे कीं, "महाराष्ट्र वक्तृत्वोत्तेजक सभेचें उज्जीवन करण्याचें आमच्या मंडळीनें मनांत आणिलें. तथापि अशा गोष्टी नुसत्या मनांत आणूनच कार्याची सिद्धता होत नाहीं. अशा कार्यास द्रव्याची अपेक्षा असते. परंतु ह्याप्रसंगीं लोकप्रिय जावजी दादाजी शेठ ह्यांनीं आपल्या अत्यंत उदारपणानें आणि विलक्षण धैर्यानें मंडळीस लागेल तेवढी रक्कम देण्याचें कबूल केलें, आणि ह्या त्यांच्या अभिवचनावर सांप्रतची सभा उपस्थित झाली आहे. तेव्हां ज्यांच्या औदार्यावर ह्या सभेचें उज्जीवन झालें आहे आणि ज्यांनीं दरसाल ह्या वक्तृत्वसभावृक्षाचें द्रव्यरूपी उदकानें सिंचन केलें आहे, त्या गृहस्थांचे मृत्यूनें मंडळीस किती दुःख होत आहे, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं."[२]

जावजीशेठजींचे ज्ञातीय समाजबंधु नाना प्रकारच्या अडचणी किंवा समाजोन्नतीचीं कामें घेऊन त्यांच्याकडे सल्लामसलतीच्या नि मदतीच्या आशेनें नेहमीं येत असत. त्यांनीं कोणालाही कधीं निराश करून पाठविलें नाहीं. समाजाचा तो एक मोठा खात्रीचा आधार होऊन राहिला होता. कोणताही समाज असो.

१ इंदुप्रकाश : ता. ११ आक्टोबर १८८६
२ „ : ता. १८।४।९२

त्याच्या उन्नतीचा आधार जावजीशेठ ह्यांच्यासारख्या उदारात्म्यावर अवलंबून असतो. शेठजींचें उदाहरण त्यांच्या पुत्रांनींही तंतोतंत गिरविलें हें येथे सांगणें जरूर आहे.

सध्यांप्रमाणें धवधवीत नि डोळ्यांत भरणाऱ्या रकमांची खैरात करून औदार्य प्रगट करण्याचा तो काळ नव्हता आणि असला तरी तशा प्रकारचें धवधवीत औदार्य त्यांनीं प्रगट केलेलें दिसत नाहीं. परंतु इतर मार्गांनीं व विशेषतः प्रकाशन-क्षेत्रांत त्यांनीं जीवनभर जें औदार्य प्रगट केलें, त्याची महती कमी का होती ?

त्यांनीं ज्ञानदानाचें यज्ञकुंड पेटवून त्यांत वर्षानुवर्ष वाढत्या नुकसानीच्या ज्या आहुत्या टाकल्या, त्या औदार्याचें महत्त्व कमी का आहे ? स्वतःसाठीं आंखून घेतलेल्या आपल्या कार्य-क्षेत्रांत त्यांनीं जो त्यागाचा डोंगर उभा केला, त्याचें मोजमाप रुपये-आणे-पैंनीं करतां येण्यासारखें नाहीं. किंवा शब्दालंकारांतही तें योग्य प्रकारें बसवितां येण्यासारखें नाहीं.

आपण लोकांसाठीं पुष्कळ झटावें नि त्यांना शक्य तेवढें वर आणण्यासाठीं आपल्याकडून होईल तेवढें करावें, ही इच्छा त्यांच्या अंतःकरणांत सदैव जागी असे. आपल्या कारखान्याची घडी नीट बसली म्हणजे त्यांतून अंग काढून घ्यावयाचें नि स्वतःला लोककल्याणाच्या कार्यास वाहून घ्यावयाचें, ही त्यांची आकांक्षा होती. तिचा उल्लेख वेळोवेळीं त्यांच्या बोलण्यांत येत असे. परंतु दुर्दैवानें काळानें त्यांच्यावर अकालीं झडप घातल्यामुळें त्यांची ती आकांक्षा फळास येऊं शकली नाहीं.

जावजीशेठ ह्यांच्या सहवासांत दीर्घकाळ आलेले नि त्यांच्या विचारांची बरोबर कल्पना असलेले विनायक कोंडदेव ओक ह्यांनीं त्यांचें जें छोटेखानी चरित्र त्यांच्या निधनोत्तर लिहून प्रसिद्ध केलें, त्यांत एके ठिकाणीं ते म्हणतात, "त्यांचा उदारपणा नुकतासा उदयास येऊं लागला होता, इतक्यांत त्यांस मृत्यूनें गांठिलें, त्यास उपाय नाहीं. आम्हीं स्वतःच्या अनुभवावरून खचित असें म्हणतों कीं, संपत्तीचा उपयोग जावजीशेठ यांस उत्तम प्रकारें कळत होता. आणखी ते जर दहावीस वर्षे जगते, तर त्यांचें औदार्य परिपक्व होऊन,. त्यांचें नांव युनिव्हर्सिटीच्या आश्रयदात्यांत येऊन गरीबगुरिबांस त्याचा

फार उपयोग झाला असता. परंतु त्यांच्या अकालिक मृत्यूनें सगळ्या गोष्टी जागचेजागीं राहिल्या."[१]

सर्वसाधारण नि गोरगरीब लोकांच्या अडीअडचणींकडे जावजींचें नेहमीं लक्ष असे. ते स्वतः गरिबींतून वर आलेले असल्यामुळें त्यांच्या दुःखांची त्यांना तीव्र जाणीव होती. त्यामुळें न सांगतां किंवा न मागतां गोरगरिबांस ते नेहमीं मदत करीत असत.

ज्या संस्कारांत ते बालपणापासून वावरले, त्या संस्कारांचा नि परिस्थितीचा पगडा त्यांच्या मनावर बसणें स्वाभाविक होतें. त्यांना ईश्वरकृपेनें नंतर सत्संगतीचा लाभ घडला; त्यामुळें धार्मिक नि सामाजिक बाबतींत त्यांना व्यापक दृष्टि आलेली होती. धार्मिक नि सामाजिक बाबतींत देशकालवर्तमानानुरूप फेरबदल हे व्हावयाचेच व ते झालेही पाहिजेत. केवळ जुन्याला चिकटून चालणार नाहीं असें ते सांगत असत नि त्याप्रमाणें वागत असत. धर्म हा कर्मकांडांत नाहीं तर कालानुरूप आपल्या मतांना मुरड घालून तदनुरूप वागण्यांत आहे, असें ते सर्वांना सांगत. 'बोले तैसा चाले' ह्या तत्त्वाला ते भारी महत्त्व देत असत.

स्वधर्माप्रमाणें वागणारे ते खरे हिंदु होते. खऱ्या हिंदूचा धर्म कोणता? 'पुण्य परोपकार, पाप तें परपीडा' ह्या धोरणानें वागणारा तो खरा हिंदु-धर्माभिमानी आणि अक्षरशः ह्या तत्त्वानुरूप त्यांचें आचरण असे. नेहमीं दुसऱ्यांच्या उपयोगीं पडण्यासाठीं झटावयाचें, कोणाचें उणें पडूं द्यावयाचें नाहीं. जेथें म्हणून उणेपणा दिसेल तेथें जाऊन तो भरून काढावयाचा. कोणी आजारी असला तर त्याच्या घरीं जाऊन त्याची सेवा नीट होत आहे कीं नाहीं, त्याला औषधपाणी मिळत आहे कीं नाहीं; हें पहावयाचें व जेथें जरूरी असेल तेथें आपला उदार हात वर करावयाचा, ह्या मानव-धर्माचें पालन त्यांच्याकडून जीवनभर घडलें.

मृत मनुष्याचे अखेरचे संस्कार यथास्थित व्हावे, ह्याबद्दल त्यांचा फार कटाक्ष असे. गोरगरिबांना द्रव्याभावीं त्या बाबतींत चालढकल करावी लागते, ती लागूं नये, असें त्यांना वाटत असे. एकादा मृत माणूस स्वजातीयच नव्हे तर परजातीय जरी असला तरी त्याच्या अंत्य-संस्कारांची जरूर ती तरतूद झाली

१ जावजी दादाजी चौधरी यांचें त्रोटक चरित्र ले वि कों ओक (१८९२) पृ. ३२

पाहिजे, ह्या दृष्टीनें ते वागत नि जरूर तें सहाय्य कर्तव्यबुद्धीनें करीत असत. त्या कार्यांत हेळसांड झालेली त्यांना मुळींच आवडत नसे.

आपल्या समाजांतील लोकांच्या निकृष्टावस्थेची त्यांना पूर्ण जाणीव होती. दुसऱ्यांचें दुःख निवारण करण्यासाठीं झटणें, हा त्यांना सर्वांत मोठा धर्म वाटत असे. स्वतः त्याप्रमाणें वागून इतरांसही त्या बाबतींत ते शक्य तेवढें प्रोत्साहन देत असत.

शेठजींच्या ज्ञातींत तात्या बाबाजी राऊत ह्या नांवाचे कोणी एक सुस्वभावी नि संपन्न सरकारी कामदार होऊन गेले. त्यांनीं आपल्या मृत्युपत्रांत ज्ञातीच्या सुखसोयीसाठीं आपल्या मागें कांहीं ना कांहीं कार्य व्हावें, ह्या सद्हेतूनें कांहीं रक्कम ठेविली होती. त्याप्रमाणें त्या रकमेंतून ज्ञातिहितासाठीं एक धर्मशाळा बांधण्यांत आली. पुढें अशी परिस्थिति निर्माण झाली कीं, त्या धर्मशाळेची नीट व्यवस्था ठेवणें किंवा तिची डागडुजी करणें जड वाटूं लागलें. पैशांच्या अभावी तीं कामें पार पडावीं कशीं ?

तो प्रश्न जावजीशेठपुढें आला तेव्हां त्यांनी सर्वांना सोयिस्कर असा मार्ग सुचविला. 'दसका लकडी, एकका बोजा.' जातींतील गोरगरिबांची सोय तर झाली पाहिजे. जावजीशेठनीं असें सुचविलें कीं, जातींतील प्रत्येक कुटुंबानें दर वर्षी एक आण्यापासून दोन रुपयांपर्यंत यथाशक्ति जें देतां येईल तें नियमितपणें वर्गणीच्या रूपानें द्यावें. अशा रीतीनें जमा होणारा पैसा सेव्हिंग बँकेंत ठेवण्यांत यावा; आणि पंचांनीं जातीच्या अनुमतीनें जरूर तेवढी रक्कम त्या धर्मशाळेच्या डागडुगीला खर्च करण्यासाठीं काढावी. तसेंच जातींत कोणी अनाथ मरण पावल्यास त्याच्या प्रेतदहनासाठीं दहा रुपये देण्यांत यावे.

जावजीशेठ केवळ ही सूचना करून थांबले नाहींत. तर वेळ मोडून व स्वतः आर्थिक झीज सोसून त्यांनीं जरूर ती व्यवस्था घडवून आणिली आणि तेव्हांच त्यांच्या मनाला स्वस्थता मिळाली.

जावजीशेठ ह्यांचे ज्येष्ठ चिरंजीव विठोबा हे अकालीं निधन पावले; त्यामुळें त्यांना असह्य नि दारुण दुःख झालें. विठोबांचें कांहीं ना कांहीं स्मारक असावें असें त्यांना वाटूं लागलें. तेव्हां त्यांनीं काय करावें ? आपल्या लोकांची

सोय व्हावी ह्या दृष्टीनें चार पांच हजार रुपये खर्च करून एक लहानशी धर्मशाळा त्यांनीं महालक्ष्मीस बांधविली. तींत कांहीं गरीब कुटुंबें रहाण्याची सोय करण्यांत आली. त्यांच्याकडून जें कांहीं अल्पसें भाडें येतें त्याचा विनियोग त्या व दुसऱ्या एका धर्मशाळेची नीट व्यवस्था ठेवण्याकडे व्हावा, अशी तजवीज त्यांनीं करून ठेविली आहे.

लोकांच्या सुखसोयींसाठीं आपल्याकडून जें जें करतां येईल तें तें करावें हीच त्यांची नेहमीं दृष्टि असे.

मनांत असूनही अकालीं निधनामुळें जावजीशेठ ह्यांना ज्या गोष्टी पार पाडतां आल्या नाहींत, त्यांची पूर्तता, त्यांच्या पावलांवर पाऊल टाकून चालणारे त्यांचे चिरंजीव तुकारामशेठ नि पांडुरंगशेठ ह्यांनीं नंतरच्या काळांत यथाशक्ति केली.

## व्यवस्थापक मंडळ व खाते-प्रमुख.



निर्णयसागर संस्थेचें व्यवस्थापक मंडळ.



निर्णयसागर प्रेस व जावजी दादाजी टाईप फौण्ड्री या संस्थांचे खातेप्रमुख.



शास्त्री खात्यांतील मुख्य पंडीत नारायण राम आचार्य व श्री. सायनेकर प्रुफे तपासीत असतांना.



[illegible] िम [illegible] चे [illegible] व श्री [illegible] त व इतर सहकारी.

आरंभ-काळांत शेठ जावजी दादाजींनीं स्वतः बनविलेले टाईप पंच.

(हे जतन करून ठेवण्यांत आले आहेत)



कै० जावजी दादाजी यांनीं स्वहस्तें टाईप पंच बनविलेल्या पंचांच्या डब्यांचे तिजोरींतील दृश्य. (एक बाजू)



कै० जावजी दादाजी यांनीं स्वहस्तें टाईप पंच बनविलेल्या पंचाच्या डब्यांचें तिजोरींतील दृश्य. (दुसरी बाजू)



मुद्रणाचे टाइंप पाडले जातात तें टाईप-कास्टिंग खातें व त्यांतील कामगार.



टाईपांच्या मेझरमी-तपासणीचें काम श्री. मारुतीराव शेडगे करीत आहेत.



जावजी दादाजी टाईप फौण्ड्रीमधील कामगार वर्ग.



ट्रेडल मशीनवर मोरेश्वर व मयेकर काम करीत असतांना



छपाई यंत्रावर मुकादम श्री. शिवरामभाऊ काम करीत असतांना.



मोनो सुपर कास्टर मशीनवर मोनो ऑपरेटर
श्री. मंजीत काम करीत असतांना



टाईप कास्टिंग् खात्यांत कास्टर टाईप पाडीत असतांना; शेजारीं श्री. चौधरी–फौण्ड्री खात्याचे मुख्य उभे आहेत.



टाईप फौण्ड्रीच्या व्यवस्थापन विभागाचे प्रमुख (मधें बसलेले) श्री. पाटकर, (प्रथम) श्री. पाठक व (शेवटचे) श्री. नारकर व ऑफिस बॉय दत्ताराम पाडोळे.



फौण्ड्री खात्यांत टाईप फिनिशिंगचें काम करीत असतांना कामगारवर्ग.



फौण्ड्री खात्यांत टाईप मोल्ड साफ करीत असतांना.



फिटर खात्यांतील श्री. महादेव कंटे व भडवलकर लेथवर काम करीत असतांना.



फिटर खात्यांत ड्रिल मशिनवर श्री. मोडक व आवा काम करीत असतांना.



कम्पोझिंग खात्यांतील कामगार काम करीत असतांना.



कम्पोझ झाल्यावर त्या कामाचीं प्रुफें काढीत असतांना.



फोल्डिंग खात्यांतील कामकाज चालू असतांना.



बाइंडिंग खात्यांतील शिलाई मशीन ऑपरेटर मशीन चालवीत असतांना.



पुस्तक-बांधणी खातें व त्यांतील कामगार.



निर्णयसागर प्रेसचे वर्क्स मॅनेजर श्री. वैदूर हे कम्पॉझिटर श्री. पट्टे यांना कॉपी देत असतांना, शेजारीं मुकादम श्री. धर्मा भाऊ उभे आहेत.



संस्थेच्या टाईम ऑफिसमध्यें श्री. कंटे व श्री. देसाई. उभे दत्ताराम पाटोळे



श्री. नारायण सुतार मशीनवर फळ्या कापीत असतांना

## संस्थेच्या जीवनांतील दोन संस्मरणीय प्रसंग.



सन १९४५ सालीं मुंबईमध्यें ओरीएंटल संस्कृत कॉन्फरन्स भरलेली असतांना कांहीं विद्वान प्राध्यापकांनीं निर्णयसागर संस्थेला भेट दिली. त्यावेळीं घेतलेला फोटो. बसलेले डावीकडून–(१) प्रो. डी. डी. कोसंबी, ३ प्रो. गांगुली, ४ प्रो. व्ही. राघवन, सत्यभामाबाई चौधरी. उजवीकडून बसलेले–(१) श्री. शेडगे, (२) डॉ. सेन



हार्वर्ड युनिव्हर्सिटी Oxford ( USA. ) चे चॅन्सलर प्रो. डॅनियल एच. एच. इन्गॉल, यांनीं संस्कृत सुभाषित कोशाचें काम चालू असतांना निर्णयसागर प्रेसला सन १९५२ मध्यें भेट दिली. त्यावेळीं बसलेले श्री तारे, प्रो. कोसंबी, श्रीमती लक्ष्मीबाई चौधरी, प्रो. डॅनियल इन्गॉल, श्री. राजाराम शेठ, प्रो गोखले, श्री. ठाकरे.

# १४

## आयुष्याची अखेर

मनुष्य कितीही कर्तृत्वसंपन्न, लोकसेवापरायण नि लोकमान्य असला, तरी त्याच्यावर हें जग सोडून जाण्याची पाळी कधीं ना कधीं यावयाचीच. मृत्यूचें बोलावणें कधीं येईल नि आपण मांडलेला पसारा सोडून परलोकीं कधीं प्रयाण करावें लागेल, ह्याचा नेम नाहीं. त्यासाठीं जीव असेतोंपर्यंत आपल्या हातून जितकीं म्हणून सत्कृत्यें पार पडतील तेवढीं पार पाडण्यासाठीं झटावयाचें, हेंच ध्येय प्रत्येकानें आपल्यापुढें सतत ठेवून त्याप्रमाणें वागण्याचे शिकस्तीचे प्रयत्न अहर्निश करीत राहिलें पाहिजे. जावजीशेठ ह्यांचें सारें जीवन बारकाईनें पहाणाऱ्यास असें दिसून येईल कीं, त्यांनीं सज्जनांच्या सहवासामुळें जीवनोद्देश बरोबर ओळखला होता. त्यांनीं आळसांत एकही क्षण कधीं घालविला नाहीं. परोपकार करण्याची किंवा दुसऱ्याची अडचण दूर करण्याची आलेली एकही संधी वायां दवडली नाहीं. आपणास ईश्वरानें जो जन्म दिला तो केवळ स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठीं नसून इतर जनांच्या बाबतींतही आपलें कांहीं ना कांहीं कर्तव्य आहे नि तें पार पाडण्यासाठीं आपण तत्परतेनें झटलें पाहिजे, ह्याची जाणीव त्यांच्या अंतःकरणांत सतत तीव्रतेनें वावरत होती.

जावजीशेठ आपल्या सभोंवार सुखी, त्याचप्रमाणें दुःखीकष्टी माणसेंही नेहमीं पहात असत. मनुष्याच्या वांट्यास सुख किंवा दुःख ह्यांपैकीं कांहीं तरी यावयाचेंच. कोणीही असो. त्याच्या वांट्यास निर्भेळ सुख अखंड आलें किंवा सतत दुःखानेंच त्याचा पाठपुरावा केला, असें सहसा आढळून येत

नाहीं. प्रत्येकाच्या मार्गे ईश्वरानें सुख-दुःखाचें राहाटगाडगें लावून दिलेलें आहे. आणि त्यामुळेंच माणसाला माणुसकीची कसोटी लावून पहातां येते.

जन्म आणि मृत्यु हे दोन प्रसंग मानवी जीवनांत क्रांति घडवून आणणारे आहेत. एक आनंदाचा नि दुसरा आपण अज्ञानापायीं मानीत आलों म्हणून दुःखाचा! सुख-दुःखाच्या ह्या दोन प्रसंगीं माणसाची मति स्थिर राहूं शकत नाहीं. त्यामुळें त्याच्या मनाला जबरदस्त हेलकावे खावे लागतात; धक्के बसतात!

जावजीशेठनीं मुद्रण-प्रकाशनाचा रोजगार-धंदा मोठ्या हिंमतीनें सुरू केला. सतत पंचवीस वर्षे त्यांनीं त्या व्यवसायाच्या भरभराटीसाठीं अपरंपार मेहनत घेतली. अनेकांचें सहकार्य संपादन करून आपल्या व्यवसायाला उन्नत स्वरूप आणून दिलें. ह्या जगांत कायमचें वास्तव्य करण्यासाठीं आपलें आगमन झालेलें नाहीं. देवाघरचें आमंत्रण कधीं येईल ह्याचा नेम नाहीं. त्यासाठीं आपण सदैव तयार राहिलें पाहिजे, ह्या जाणिवेनें आपल्या जीवनाच्या उत्तरार्धांत ते वावरूं लागले होते.

सुदैवानें त्यांना तीन सुपुत्रांचा लाभ घडलेला होता. जरूर तें शिक्षण देऊन आपल्या व्यवसायांत त्यांना पूर्ण तरबेज करण्याची कामगिरी ज्या प्रमाणांत आपल्याकडून पार पडेल, त्या प्रमाणांत आपण मांडलेला उद्योगधंद्याचा पसारा नावारूपाला येईल, ह्याची त्यांनीं खूणगांठ बांधून ठेविली होती.

तुकाराम (ज. १८६४), विठोबा (ज. १८६७) आणि पांडुरंग (ज. १८७४) ह्या आपल्या तिन्ही चिरंजीवांच्या मनावर बालपणापासून सुसंस्कार घडावे, त्यांना चांगलें वळण लागावें नि आपण महत्प्रयासानें उभारलेला रोजगार-धंदा समर्थपणें चालविण्याचें कर्तृत्व त्यांच्या अंगीं यावें, ह्यासाठीं जावजीशेठजींचे प्रयत्न सतत जाणीवपूर्वक चालू असत. मुलांच्या मनावर जरूर ते सुसंस्कार घडविण्याची एकही संधी ते वायां दवडीत नसत.

सत्समागमाचें महत्त्व ते पूर्णपणें ओळखून होते. जावजीशेठ ह्यांचें जीवन सुवर्णमोलाचें झालें, ह्याचें मुख्य कारण म्हणजे सत्समागम. त्यानेंच त्यांच्या शिक्षणाची संपूर्ण भरपाई केली. सत्समागमाची संजीवनी जशी आपल्या बाबतींत

तारक ठरली तशीच ती मुलांच्याही वांट्यास यावी नि त्यांनीं आपापल्या जीवनास शोभा आणावी ह्यासाठीं जावजीशेठ मुलांच्या बाबतींत बालपणापासून मनोभावें झटले.

आपल्या मुलांनीं खूप खूप शिकावें, विद्यालयाची मर्यादा ओलांडून महाविद्यालयांत जावें नि बुद्धिवंतांच्या जगांत चमकावें असलीं धोरणें बांधीत नि अव्यवहारी स्वप्नें रंगवीत जावजीशेठ गुंतले नाहींत. लोकांनींही त्या मोहजालांत त्यांना खेचलें नाहीं! मुलांनीं व्यवहारदक्ष व्हावें, आपण उभारलेला कारखाना सुव्यवस्थितपणें चालवावा नि सर्वांकडून 'भला रे भला' म्हणवून घ्यावें, हीच त्यांची एकमेव आकांक्षा होती. तीन पुत्रांच्या रूपानें देवानें आपणांस त्रैमूर्तीचा लाभ घडविला, ही त्याची केवढी तरी कृपा आहे. ह्या विचारानें जावजीशेठ नेहमीं भारावून जात असत.

जसें बीं पेरावें नि त्याची मशागत करावी, तशीं फळें मिळायचीं. तिघांही बंधूंनीं एकमेकांशीं प्रेमानें नि सलोख्यानें वागावें, तिघांत सतत एकजूट रहावी नि तिघांनीं एकमेकांच्या हातांत हात घालून चालावें नि वागावें, ह्यासाठीं जावजीशेठनीं करायचें असें बाकी कांहीं ठेविलें नाहीं; कारण गृहसंसाराची नि कारखान्याची घडी विस्कळित होणें न होणें, हें तिघांच्याही एकजुटीवर नि तिघांनीं एकविचारानें चालण्यावर सर्वस्वी अवलंबून आहे, याची त्यांना जाणीव होती.

हें पुढील धोरण टेहळून त्याचा नीट बंदोबस्त लावण्याची जी कामगिरी जावजीशेठनीं धोरणपूर्वक बजावली, तिचें महत्त्व कारखान्याची उभारणी करण्याइतकेंच मोठें नि महत्त्वाचें आहे.

आयुष्यभर खपून नि रक्ताचें पाणी करून आपण कारखाना उभारला आणि आपल्यामागें कोणत्या ना कोणत्या कारणामुळें त्याला अवनत दशा प्राप्त झाली तर काय आहे त्या कर्तृत्वाचा उपयोग? कर्तृत्व तेंच खरें कीं, जें सततःबरोबर संपुष्टांत न येतां, आपल्यामागें दीर्घकाळपर्यंत टिकाव धरून त्याचा सुगंध चारी दिशांस दरवळत राहील नि जगाला आनंद देत राहील.

आम्ही घोडक्यावर राजी होऊन रहाणारीं माणसें. आमच्या नजरेचा टप्पा दूरवर पोहोंचूं शकत नाहीं. मीं माझें कर्तव्य केलें. जी कांहीं कर्तबगारी

गाजवायची ती मीं गाजविली! पुढें काय होईल, त्याची चिंता मीं कां बाळगावी? पुढें कांहीं कां होईना. ही अविवेकी विचारसरणी अत्यंत घातुक नि कर्तृत्वाची परंपरा चालू न ठेवतां तिची खच्ची करणारी आहे.

व्होलकार्ट ब्रदर्ससारख्या परदेशी कंपन्या किंवा परदेशीयांनीं चालविलेल्या कारखान्यांचा इतिहास पहा. शेंकडों वर्षांचा काळ लोटला, तरी त्यांच्या कर्तृत्वाचें अखंडत्व संतुष्टांत येत नाहीं. त्यांची परंपरा नि सातत्य कसोशीनें सांभाळलें जातें. आम्हांला तें कां सांभाळतां येऊं नये? कारण योजनाबद्धतेंत, शिस्तींत नि दूरवरचें धोरण सांभाळण्यांत आम्ही अत्यंत तोकडे पडतों नि तेथेंच आमच्या प्रयत्नांचा नि कर्तृत्वाचा पराभव होतो.

जावजीशेठजींचें मोठेपण जसें लोकसंग्रह करून कारखान्याची वाढ करण्यांत आहे, त्याचप्रमाणें भावी काळाकडे नजर पोहोंचवून त्या काळासाठी जरूर ती योजना करून ठेवण्यांतही आहे. जावजीशेठजींनीं आपले हात जेथपर्यंत पोहोंचूं शकतील, तेथपर्यंत पोहोंचविण्याची शिकस्त केली.

पुस्तकी-शिक्षण नसलें तरी सत्संगामुळें सुसंस्कार पावलेला एक महाराष्ट्रीय माणूस आपल्या अजोड कर्तृत्वाची परंपरा, आपल्या मागें ५०।६० वर्षेपर्यंत यशस्वी रीतीनें अव्याहत चालू ठेवूं शकतो, हें का थोडें झालें?

जावजीशेठनीं आपल्या नजरेसमोर तिन्ही मुलांना शिस्तींत वाढविलें. त्यांना जरूर तेवढें व झेपतां येईल तेवढें शिक्षण देऊन त्यांना धंदे-रोजगाराची गोडी लाविली; प्रत्येकावर जबाबदारी सोंपवून ती त्यांना पार पाडायला लाविली. तसेंच देव, धर्म नि वाडवडील यांच्या बाबतींत त्यांच्या अंतःकरणांत सतत प्रेमादराची भावना खेळत राहील, ह्याबद्दल दक्षता बाळगिली.

आपल्या व्यवसायाचीं मुख्य अंगें दोन. एक टाईप फाऊंड्री नि दुसरें ग्रंथ-प्रकाशन नि वितरण. त्यांपैकीं पहिल्या अंगाची जबाबदारी तुकारामजींवर सोंपवून त्यांत जितकें कौशल्य संपादन करण्याची शक्यता होती तेवढें त्यांना संपादन करायला लाविलें. दुसरे चिरंजीव विठोबा हे प्रकृतीनें फारसे धट्टेकट्टे नव्हते. त्यांच्यावर ग्रंथप्रकाशन कार्याची जबाबदारी सोंपवून त्यांना त्या कार्यांत तरबेज होण्याची संधी त्यांनीं दिली. तिसरे चिरंजीव पांडुरंग हे त्यावेळीं वयानें

लहान नि विद्यार्थिदशेंत होते; परंतु त्यांनाही आपल्या व्यवसायधंद्याचें बाळकडू मिळत जावें, अशी सोय त्यांनीं करून ठेविली.

आपण योजना करतों नि भावी काळाच्या दृष्टीनें कार्याची आंखणी करतों. आपले हेतु फार चांगले नि स्तुत्य असतात; परंतु ईश्वरी योजना कांहीं तरी वेगळीच असते. आपणास ती अगम्य असते.

कर्तबगारीचा काळ सुरू झाल्यापासून सतत पंचवीस वर्षें जावजीशेठ वैभवश्रीची एकेक पायरी धीमेपणानें चढत चालले होते. सतत आगे कूच. थांबणें नाहीं किंवा मागें वळून पहाणें नाहीं. दृष्टीची झेंप सतत पुढची. ह्या पंचवीस वर्षांच्या काळांत त्यांच्यावर सुखदुःखांचे प्रसंग अनेक आले नि गेले. त्यांची फारशी तमा त्यांनीं बाळगली नाहीं. कोणताही सुखदुःखाचा प्रसंग असो, त्याला सहज रीतीनें बगल देऊन आपल्या ध्येयाकडे धांव घ्यायची; त्या ध्येयसिद्धीच्या तंद्रींत मनाला सदासर्वकाळ जखडून ठेवायचें; इतर विचारांना सहसा थारा द्यायचा नाहीं, हें वळण त्यांनीं आत्मसात् केलें होतें. तो त्यांचा सहजधर्म नि स्वभावगुणच बनला होता. त्यामुळें दुःखभाराबरोबर ते जसे दबले गेले नाहींत, तसेच सुख-समृद्धीच्या काळांत मनाचा समतोलपणा कधींही गमावून बसले नाहींत. हें केवळ सत्संगाचें फळ होतें.

परंतु आयुष्याच्या अखेरच्या काळांत जावजीशेठवर असा एक दुर्धर नि त्यांच्या मनाला जबरदस्त धक्का देणारा दारुण प्रसंग ओढवला कीं, त्या परिस्थितींत ते नित्याचा समतोलपणा सांभाळूं शकले नाहींत.

तो दुर्धर प्रसंग म्हणजे हातातोंडाला आलेला नि कारखान्याचा कारभार सांभाळूं लागलेला द्वितीय पुत्र विठोबा ह्याच्यावर काळानें घातलेली झडप होय. ऐन तारुण्यांत त्याला क्षयरोगानें ग्रासलें नि वयाच्या तेविसाव्या वर्षी ( ता. ४ डिसेंबर १८९० ) त्या रोगानें त्याचा बळी घेतला! घरीं दारीं नि कारखान्यांत आपल्या वडिलांच्या नजरेखालीं तो प्रत्येक काम मोठ्या हुशारीनें हातावेगळें करूं लागला होता. त्यानें कधीं कोणाला दुखविलें नाहीं किंवा कोणाचीही अवज्ञा केली नाहीं.

विठोबाच्या निधनानें जावजीशेठजींच्या विचारी नि धैर्यशाली मनाला जो धक्का बसला, त्यानें अखेरपर्यंत त्यांचा पाठपुरावा केला. कर्त्या सवरत्या नि

ज्याच्या बाबतींत फार मोठ्या आकांक्षा बाळगण्यांत आल्या होत्या, तो मुलगा कायमचा दृष्टीआड झाल्यामुळें जावजीशेठ बेचैन झाले. विठोबाची आठवण त्यांना रात्रंदिवस सतावूं लागली. त्यांच्या निकटवर्ति मित्रांनीं त्यांच्या वांट्यास आलेला हा दुःखभार हलका व्हावा ह्या दृष्टीनें नाना प्रयत्न केले; परंतु त्या प्रयत्नांचा परिणाम जेवढ्यास तेवढा; पुन्हां ये रे माझ्या मागल्या! विठोबाची आठवण झाली म्हणजे त्यांचे डोळे भरून येत नि त्यांचें देहमान हरपे! त्यामुळें नेहमींच्या सहवासांतील जिव्हाळ्याच्या मित्रांना नि सहकाऱ्यांना त्यांना भेटणें फार कठीण वाटूं लागलें. कारण त्यांना भेटणें म्हणजे त्यांच्या दुःखसागराला भरती आणणें असें घडूं लागलें! 'विठोबा गेला. आतां मला जगून काय करायचं आहे! जगण्यांत आतां मौज राहिली नाहीं, राहिलेले दिवस कसेबसे ढकलायचे! काय करायचं आहे असलं आयुष्य!' अशा प्रकारचे निराशेचे उद्गार त्यांच्या मुखांतून वारंवार बाहेर पडूं लागले!

धीरोदात्त नि जगरहाटीचें यथायोग्य आकलन झालेल्या थोर पुरुषांच्या सतत सहवासांत असलेल्या जावजीशेठसारख्या विचारी नि व्यवहारचतुर माणसावर पुत्रशोकाचा पगडा एवढ्या प्रमाणांत बसावा नि दीर्घकाळपर्यंत त्याची पकड ढिली होऊं नये, हें कोडें ज्यानें त्यानें अनुभवावरून सोडवावयाचें आहे. सर्वसाधारण नि अननुभवी माणसाची मति येथें गुंग होते, एवढें मात्र खरें.

ह्या दुःखद घटनेस कांहीं दिवस लोटले. आपलें मन कांहीं ना कांहीं कामधंद्यांत गुंतविण्याचा प्रयत्न जावजीशेठ करूं लागले. दुःखावेग आटोक्यांत येण्यास काळासारखें दुसरें रामबाण औषध नाहीं. जसजसा काळ लोटत जातो तसतशी दुःखाच्या विकाळ स्वरूपावर विस्मृति मात करूं लागते!

जगणें आणि मरणें ही का आपल्या हातांतील गोष्ट आहे? गेलेल्याबद्दल वृथा शोक करीत बसूं नये. त्यामुळें काय होतें? शोक कितीही केला तरी जो गेला तो कायमचा गेला. तो परत येणार नाहीं. जो घरांतील वडील नि कर्ता पुरुष आहे, त्याला ह्या गोष्टीची जाणीव असली पाहिजे.

जावजीशेठ ह्यांच्याठायीं ती जाणीव नव्हती असें नाहीं; परंतु पुत्र–निधन ही घटनाच अशी आहे कीं, ती कांहीं काळ कां होईना, धीर, गंभीर

नि विचारी पुरुषाच्या मनावरही आपला पगडा बसविल्याशिवाय रहात नाहीं. तसेंच झालें जावजीशेठजींचें !

जसजसा काळ लोटत चालला, तसतसा दुःखभार हलका होऊं लागला; परंतु जिव्हारीं झालेली जखम मात्र कायमची बरी होऊं शकली नाहीं. ती मधून मधून चिघळायची. कुटुंबांतील नि कारखान्यांतील असंख्य माणसांशीं जावजीशेठजींचें जीवन निगडित झालेलें होतें. दुःख करीत बसायचें म्हणजे चालत्या गाड्याला खीळ पाडायची! गाडा तर चालू राहिला पाहिजे. तो असंख्य कुटुंबांच्या पोटापाण्याचा प्रश्न होता.

जावजीशेठना दुःख गिळून टाकणें प्राप्त होतें. त्याप्रमाणें त्यांनीं केलें; परंतु तें दुःख त्यांना कायमचें पचवितां येणें शक्य नव्हतें. नित्याप्रमाणें रोजचे व्यवहार चालू झाले. परंतु आतां त्यांत चैतन्य राहिलें नव्हतें. पूर्वीचा उत्साह पार मावळून गेला होता! आपल्या वागण्याचा इतरांवर परिणाम होऊं नये, ह्यासाठीं जावजीशेठना आतां जपावें लागत होतें. मन दुःखी, कष्टी असलें तरी उसनें अवसान आणून घरांत नि जनांत वावरावें लागत होतें. त्यामुळें त्यांच्या मनाचा कोंडमारा होऊं लागला.

जावजीशेठना बऱ्याच दिवसांपासून कफाची नि खोकल्याची व्यथा जडली होती. शरीरांत अस्वस्थतेनें नि असह्य दुःखानें घर केल्यामुळें त्या पूर्वीच्या व्यथेंत दिवसेंदिवस अधिकाधिक भर पडत चालली. शरीराला वाढत्या प्रमाणांत थकवा जाणवूं लागला.

जावजीशेठजींची पन्नाशी उलटून गेलेली होती. वागण्यांत खाण्यांत नि उद्योगधंद्याचे व्याप करीत असतां जपून वागण्याचे ते दिवस होते; परंतु जपायचें केव्हां नि कोणीं? देहाच्या अंतर्गत भागांत काय चाललें आहे, ह्याचा कोणाला पत्ता होता? शरीर खंगत चालल्यामुळें नेहमींचे विश्वासांतील डॉक्टर नि वैद्य येऊन जावजीशेठना तपाशीत होते नि त्यांच्या रोगाचें निदान नक्की करून औषधोपचाराची योजना करीत होते.

जावजीशेठनीं हवापालट करावा, अशी सूचना पुढें येतांच त्यांची माथेरान येथें रहाण्यासवरण्याची सोय करण्यांत आली. तेथें कांहीं दिवस वेगळ्या नि निसर्गरम्य वातावरणांत राहिल्यानें त्यांना तात्पुरता आराम वाटला. तेथून

मुंबईत आल्यानंतर नेहमीप्रमाणें रोजचें कामधंद्याचें नि भेटीगांठीचें रहाट-गाडगें चालू झालें.

जावजीशेठजींची आयुर्वेदिक औषधी-पद्धतीवर आरंभकाळांत श्रद्धा होती; ती शेवटपर्यंत टिकून राहिली असली तरी डॉ. अनंत चंद्रोबा ह्यांच्या परिचयांत आल्यानंतर नि त्यांच्या औषधोपचारांशीं संबंध आल्यानंतर पाश्चात्य वैद्यक पद्धतीबद्दलही त्यांना आदर वाटूं लागला.

डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे ह्यांचा नि जावजीशेठजींचा विशेष घरोबा होता. त्यांच्यावर नंतरच्या काळांत जावजीशेठ ह्यांची असीम श्रद्धा बसली नि त्यांना शेवटपर्यंत त्यांचेंच औषध चालू होतें; कारण दुसऱ्या कोणाचेंही औषध घेण्यास ते तयार नव्हते. डॉ. अण्णा कुंटे म्हणजे जावजीशेठना प्रति धन्वंतरी वाटायचे ! 'अण्णांसारखा डॉक्टर झाला नाहीं नि पुढें व्हायचा नाहीं,' असें ते म्हणत असत.

१८९२ साल उजाडलें आणि तें साल जावजीशेठना नि सर्वांना दुःखाचा संदेश घेऊन आलें. वर सांगितल्याप्रमाणें जावजीशेठजींचें शरीर आंतून पोखरत चाललें होतें. एके दिवशीं त्यांत जलोदरानें प्रवेश केल्याचें डॉक्टरी तपासाअंतीं आढळून आलें ! त्यामुळें घरांत नि बाहेर सर्वत्र दुःखाची छाया पसरलेली स्पष्ट दिसूं लागली.

जावजी शेठजींचे स्नेही, सोबती नि सहकारी आतां वाढत्या प्रमाणांत त्यांच्या भेटीला येऊं लागले. सारेच त्यांचे हितचिंतक; साऱ्यांना त्यांच्याबद्दल चिंता वाटूं लागलेली; आणखी कांहीं वर्षें त्यांचा लाभ आपणांस घडला पाहिजे, हीच प्रत्येकाची भावना.

जावजीशेठ ह्यांच्या एका हितचिंतकानें त्यांना नम्रपणें सुचविलें कीं, "शेठजी ! आमचें थोडें ऐका. कांहीं दिवस अण्णांचें औषध बंद ठेवून मी सुचवितों त्या माझ्या विश्वासाच्या डॉक्टरचें औषध थोडे दिवस घेऊन तर पहा ! त्यासाठीं आपण अण्णांची संमती वाटल्यास घेऊं या ! "

ह्या सल्ल्याचा जावजीशेठना राग आला. "आमच्या अण्णांबद्दल कोण संशय घेईल ! त्यांच्यावर माझी संपूर्ण श्रद्धा आहे. मला दुसऱ्या कुणाचंही औषध घ्यावयाचं नाहीं ! अण्णांनीं विष दिलं तरी तें मी आनंदानं पिईन; परंतु

मला दुसऱ्याचं अमृत नको! मरायचेंच आहे तें टळत नाहीं! मला अण्णांच्याच हातून सुखानें मरूं द्या!"

ह्यावर कोण काय बोलणार! जावजीशेठजींची अण्णांवर अढळ निष्ठा होती. दोघेही एकमेकांचे जिवलग स्नेही होते. निष्ठा हा गुण जावजीशेठजींच्या बाबतींत परमोच्च कोटीला पोहोंचलेला होता. त्याचें हें एक उदाहरण आहे. ज्याच्यावर एकदां निष्ठा जडली ती कायमची.

१८९२ च्या फेब्रुवारींत जावजीशेठना जलोदरानें ग्रासायला सुरुवात केली. त्यांनीं कांहीं म्हटलें तरी तो रोग आटोक्यांत आणण्यासाठीं ज्यांचा ज्यांचा सहकार घेणें जरूर वाटलें, त्या वैद्य डॉक्टरांचा सहकार डॉ. अण्णा कुंटे ह्यांच्या सल्ल्यानें घेण्यांत आला. करायचें असें कांहीं बाकी ठेवण्यांत आलें नाहीं.

मार्च महिना फारच कठीण गेला. उदराचा व्यास वाढत चालला. पायांना सूज आलेली दिसूं लागली! त्यांच्या समोंरार भेटीस येणाऱ्यांची गर्दी उत्तरोत्तर वाढत चालली. त्यांना निवांतपणा हवा होता; परंतु तो मिळण्याची आशा दिसेना.

जावजीशेठजींनीं अशा परिस्थितींत आपलें भवितव्य ओळखलें. ते निरवानिरवीची भाषा बोलूं लागले नि शक्य तेवढा वेळ नामस्मरणांत घालवूं लागले. त्यांना महालक्ष्मीची ओढ जबरदस्त होती. महालक्ष्मीला जाऊन तिचें दर्शन घेणें हें त्यांना आपलें एक पवित्र कर्तव्य आहे, असें वाटत असे. तिच्या कृपेनें लक्ष्मी वश झाली अशी त्यांची दृढ श्रद्धा होती.

विठोबाच्या निधनानंतर त्यांची आठवण चिरंतन काळपर्यंत मागें रहावी ह्या हेतूनें त्यांनीं छोटेंसें स्मारक घडवून आणिलें तें महालक्ष्मीच्या परिसरांत. तेथें एक जमीन खरेदी करून सुमारें पांच हजार रुपये खर्चून त्यांनीं विठोबाच्या नांवें एक लहानशी धर्मशाळा बांधविली. तेथें कांहीं कुटुंबांस आश्रय मिळाला असून ज्ञातिकार्यार्थही तिचा उपयोग आजतागायत होत आहे.

आजाराचें प्रमाण वाढत चाललें, तसतशी महालक्ष्मीची आठवण त्यांना एकसारखी होऊं लागली. त्यांनीं महालक्ष्मीच्या भेटीचा ध्यास घेतला. त्यांची

ही मनःस्थिति लक्षांत घेऊन आपल्या पूज्य आराध्य दैवताच्या सान्निध्यांत त्यांना रहातां यावें, ह्या सद्धेतूनें ता. १६ मार्च रोजीं त्यांना महालक्ष्मीस नेण्यांत आलें. त्यांची कोणतीही इच्छा असो; ती तात्काळ पूर्ण करायची, असें योग्य धोरण त्यांच्या पुत्रांनीं नि कुटुंबीयांनीं स्वीकारलें होतें.

जावजीशेठ ह्यांस जडलेले कफ नि उदर हे दोन्ही विकार दिवसेंदिवस वाढत चालले होते. ते महालक्ष्मीला शांतपणें रहायला आले; परंतु तेथेंही त्यांच्या वांट्यास शांतता येऊं शकली नाहीं. त्यांच्या आजाराची वार्ता मुंबईंत नि मुंबईबाहेर सर्वत्र झपाट्यानें पसरली. आपल्या गुणसंपदेच्या बळावर जावजीशेठनीं सर्वांना आपलेंसें करून ठेविलें होतें. त्यांच्याबद्दल सर्वांच्या अंतःकरणांत प्रेमादराची भावना होती. त्यामुळें महालक्ष्मीस त्यांच्या निवासस्थानीं असंख्य लोक दाटीवाटीनें त्यांची भेट घेण्यासाठीं येऊं लागले.

शेवटीं शेवटीं त्यांना बोलणें कठीण झालें. एकादा दुसरा शब्द मोठ्या कष्टानें मुखावाटे बाहेर पडायचा. त्या केविलवाण्या स्थितींतही ते खुणेनें 'या बसा' म्हणून आलेल्यांचें स्वागत करीत होते.

जावजीशेठ ह्यांच्या वांट्यास आलेले हे अखेरचे दिवस मोठे कठीण नि संस्मरणीय होते. वेदना होत होत्या, तरीही देवाचें नामस्मरण सतत चालू होतें. त्यामुळें त्यांना शारीरिक दुःख हलकें झाल्यासारखें वाटत असावें.

शेवटीं पुण्य-पावन रामनवमीचा दिवस उजाडला. (चैत्र शुद्ध नवमी, ता. ५ एप्रिल १८९२) दिवसभर त्यांच्या सभोंवार राम-नामाचा अखंड गजर चालू होता. उदबत्त्यांचा मधुमधुर सुगंध सर्वत्र दरवळला होता. त्या पवित्र वातावरणांत त्याच दिवशीं रात्रीं अकरा वाजतां शेठजींचा पुण्यात्मा पंचत्वांत विलीन झाला! 'मातेचें-लक्ष्मीचें बोलावणें आलें आहे. आम्ही त्यांच्या भेटीस चाललों!' अशा अर्थाचे अस्पष्ट शब्द त्यांच्या मुखावाटे बाहेर आले आणि तेच त्यांचे अखेरचे शब्द होते!

ह्या शेवटच्या हृदयस्पर्शी प्रसंगाचें वर्णन आम्हीं कोणत्या शब्दांनीं करावें? जावजीशेठ ह्यांचे एक परम स्नेही नि चहाते 'महाराष्ट्रभाषाचित्रमयूर' कृष्णाजी नारायण आठल्ये ह्यांनीं त्या गंभीर प्रसंगाची गुंफण काव्यरूपानें

करून ठेविली आहे. त्यांच्या काव्यपंक्ति वाचकांपुढें ठेवून मोकळें होणें ह्याप्रसंगीं श्रेयस्कर वाटतें ।

'होती शुद्ध मनाला हळु हळु परि शब्द चालला खोल ।
लक्ष्मीसन्निध जातों, परलोका हे अखेरचे बोल ॥
पाहोनियां दशा ती मित्र तसे, इष्ट आप्त हळहळती ।
तळमळती दुःखानें सांगावी आज काय कळकळ ती ॥
हां हां म्हणतां नेला काळानें हाय ! साधिली वेळ ।
तारा तुटोनि पडला संपविला मृत्युलोकिंचा खेळ ॥
किति पुण्य पुरुष तो कीं, ठेवियला देह रामनवमीतें ।
दिवसहि मंगल होता, काय वदूं इष्ट आप्तरव मी ते ॥
दुःसह दुःखद वार्ता पाण्यावरि तैलबिंदुशी पसरे ।
न सरेल दर्शनाला कोण तयाच्या गुणांस हो विसरे ॥
प्रातःकालीं लोटे, लोकांचा तेथ दर्शनास थवा ।
वाटे आला सागर प्रेमाचा जावजींकडे अथवा ॥
दिसती उदास सारे खिन्नमनें म्लान जाहलीं वदनें ।
नेत्राश्रुपूर वाहे, दुःखानें बांधिलीं जणों सदनें ॥
शतसंख्य लोक आले, शेटविणें शून्य भासलें भवन ।
रव न निघे तोंडांतुनि कोणाचें करिल कोण सांत्वन ॥
मग एकदांचि उकळी फुटली केला विलाप लोकांनीं ।
ढळढळ कितीक रडले, करुणारव ऐकवे न तो कानीं ॥

ज्यांनीं आपल्या कर्तबगारीच्या बळावर मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांत नवयुग निर्माण केलें आणि आजच्या व उद्यांच्या मुद्रक-प्रकाशकांपुढेंच नव्हे तर अखिल जनतेपुढें थोर कर्तृत्वाचा नि माणुसकीचा उच्च आदर्श ठेविला, अशा त्या वंदनीय महाभागाला आमचे कोटि कोटि प्रणाम ।

'मरावें परी कीर्तिरूपें उरावें.'

आपल्या निरहंकारी नि उदार वृत्तीमुळें जावजीशेठजींनीं आपल्या सभोंवार सज्जनांचा मेळावा जमविला व तो उत्तम प्रकारें संभाळलाही. कारण सज्जन–सहवासाचें महत्त्व ते पुरेपूर ओळखून होते. आपल्या सभोंवारच्या सर्व सज्जनांवर जावजींची असीम श्रद्धा होती. ती असली तरी आपले दैनंदिन व्यवहार सुरळीत चालावे, ते चालवीत असतां मनाचा तोल सांभाळतां यावा नि आपल्या हातून योग्य प्रकारें कर्तव्याचरण घडावें, ह्यासाठीं एकाद्या सज्जन व्यक्तीची निवड करून तिला श्रद्धास्थान करून ठेवणें जरूर होतें.

त्यासाठीं आपल्या अनेक सज्जन मित्रांतून जावजीशेठनीं त्या काळांतील स्वदेश नि स्वभाषाप्रेमी नामवंत लेखक विनायक कोंडदेव ओक ह्यांची निवड केली. ते त्या काळांतील मोठे जाडे विद्वान होते अशांतला भाग नाहीं. त्यांच्याहीपेक्षां फार जाडे विद्वान, शेठजींचे स्नेही नि वाङ्मय-प्रकाशन कार्यांतील सहकारी होते; पण जावजीशेठ नि ओक ह्यांचा ऋणानुबंध असा कांहीं होता कीं, ते एकमेकांना अखेरपर्यंत पूरक होऊन राहिले. शेठजींच्या बाबतींत गुरुजी, सन्मित्र, सहकारी नि मार्गदर्शक हीं सारीं महत्त्वाचीं नातीं सांभाळण्याची कसरत विनायक कोंडदेव ओक ह्यांनीं जन्मभर इमानेंइतबारें पार पाडिली. जावजीशेठ ह्यांनींही त्यांच्यावर अढळ श्रद्धा ठेवून त्यांना कोणत्याही बाबतींत कमी पडूं दिलें नाहीं.

जावजीशेठ सदासर्वकाळ उद्योगाच्या व्यापांत गुंतलेले; तो त्यांचा छंद होता. 'कष्टेंवीण फळ नाहीं, कष्टेंवीण राज्य नाहीं, केल्यावीण होत नाहीं, साध्य जनीं;' त्याचप्रमाणें '"आधीं कष्टाचें दुःख सोशिती । ते सुखाचें फळ भोगिती।' हीं समर्थांची वाणी जावजीशेठ ह्यांच्या जिव्हेवर नेहमीं खेळत असे. एवढेंच नाहीं, तर ती आचरणांत आणण्यासाठीं त्यांची अहर्निश धडपड चाललेली असे.

ही त्यांची सारी धडपड विनायकराव ओक हे नेहमीं जवळून पहात असत. अविरत धडपड करून कसें चालेल ? मनुष्याच्या वांट्याला शांततेचे नि दिवसभर चाललेली धडपड विसरण्याचे विसाव्याचे कांहीं क्षण येणें आवश्यक असतें. भक्तिभावाच्या ओलाव्याचा अंतःकरणाला, थोडा वेळ का होईना, स्पर्श घडला पाहिजे, ह्याची काळजी शेठजींच्या बाबतींत विनायकराव ओक अत्यंत दक्षतेनें घेत असत. मोरोपंत, रामदास, तुकाराम नि वामन पंडित हे संतकवि

ओकांच्या विशेष आवडीचे. ह्या आवडीचा फायदा प्रसंगविशेषीं जावजीशेठना करून देणें, हें आपलें एक कर्तव्य आहे, असें ओक मानीत असत व जावजीशेठही यथेच्छ मिळेल त्याप्रमाणें ह्या क्षेत्रांतील त्यांच्या ज्ञानाचा लाभ मोठ्या आवडीनें करून घेत असत.

जावजीशेठनीं उद्योगाच्या बळावर अर्थ-संपदा आपलीशी केली. त्याचप्रमाणें सज्जनसहवासाच्या बळावर गुण-संपदाही जवळ केली, हें अनेक वेळां सांगूनही पुन्हां येथें सांगावयाचें आहे. अर्थ-संपदा हां हां म्हणतां हातावेगळी होते; परंतु गुण-संपदा चिरंतनकाळ टिकून रहाणारी असते. ह्यासाठीं प्रत्येक माणसानें तिच्यासाठीं झटायचें असतें. ह्या गुणसंपदेच्या बळावर जावजीशेठजींनीं आपलें सारें जीवन सुसंपन्न केलें.

माणसांची पारख करतां येणें, हा एक बहुमोल गुण आहे. शिक्षणानें किंवा अनुभवानें हा गुण थोडाफार अंगीं येऊं शकतो, परंतु जावजीशेठ ह्यांच्या अंगीं तो स्वाभाविक होता. एकाद्या माणसाशीं संबंध येतांच प्रथमदर्शनींच त्याची नीट पारख त्यांना करतां येत असे. माणूस पारखून त्याला जवळ करावयाचा नि एकदां जवळ केल्यानंतर त्याला सहसा गमावून बसायचें नाहीं, हें होतें त्यांचें धोरण. मिळविलेलीं माणसें राखावीं कशीं, ह्या कलेंत ते तरबेज होते. एकाद्या कामाची जबाबदारी ज्या माणसावर टाकली, त्याच्यावर पूर्ण विश्वास टाकावयाचा ह्या त्यांच्या धोरणामुळें प्रत्येकाला आपली जबाबदारी सांभाळण्यासाठीं जास्तींत जास्त झटावें लागत असे.

विनायक कोंडदेव ओक ह्यांचा उल्लेख केला, त्याचप्रमाणें टाईप फौंड्रीच्या विभागाच्या बाबतींत राणू रावजी आरू ह्यांचा उल्लेख करतां येईल. राणूजी हे त्या खात्याचे सर्वेसर्वा होते. *किती खास माणूस! कलेच्या, त्याचप्रमाणें व्यापारीच्या* दृष्टीनें आपल्या हातून सुंदर नि मनाला आल्हाद देणाऱ्या मुद्रिका तयार व्हाव्या, ह्यासाठीं त्यांनीं जावजीशेठ ह्यांच्या कारखान्यांत आपल्या जिवाचा आटापिटा केला. मुद्रिकांना सुंदर घाट देण्याच्या बाबतींत ते प्रति विश्वकर्माच होते, यांत अतिशयोक्ति नाहीं. त्यांच्या हस्तकौशल्यामुळें नि दक्षतेमुळें मफाईदार नि सुबक मुद्रिका ठरलेल्या दिवशीं ग्राहकांना मिळायच्याच. त्याचप्रमाणें व्यवस्थापकीय व छपाईच्या कामाकाजाकडे जावजींनीं रामचंद्र अमृत मोरे ह्यांची योजना केली

## १५

## स्वभाव–दर्शन व गुण–संपदा

"आपलं राज्य इंग्रजांनीं बळकावलं ! आणि आपल्या वाट्यास पराधीनता आली आहे ! किती दुर्दैवी आहोंत आपण !" एके दिवशीं सायंकाळच्यावेळीं जावजीशेठजींच्या भेटीस आलेले त्यांचे एक मित्र त्यांना सहज बोलत असतां म्हणाले. त्यावेळीं जावजीशेठनीं त्यांना दिलेलें उत्तर मार्मिक, तसेंच वस्तुस्थितीचें अचूक दर्शन घडविणारें होतें. ते म्हणाले,–"अहो ! इंग्रजांना आपलं राज्य तुम्हीं कां बळकावूं दिलं ? आपलं राज्य परक्यांच्या हातीं गेलं; तें तुमच्या जवळ राहिलं नाहीं, ह्याचें कारण तुम्ही आम्हीच ! इंग्रजांचा त्यांत कांहीं दोष नाहीं. खरा प्रकार असा आहे कीं, आम्ही आमचं राज्य सांभाळूं शकलों नाहीं ! आम्ही कमकुवत बनलों. त्यांनीं चिन्यांचे किंवा अफगाणांचे राज्य कां बळकावलें नाहीं ? कारण ते लोक आपापलं राज्य संभाळण्यास समर्थ होते. आमच्यासारखे कमकुवत नव्हते. कमकुवत लोकांच्या वांट्यास गुलामगिरीच यावयाची !"

"आमचं राज्य गेलं ! व्यापार धंदा तरी आमच्या हातीं रहायला हवा होता. तोही परक्यांनीं बळकाविला !" त्याच गृहस्थांनीं दुसरा प्रश्न उपस्थित केला.

"ह्या तुमच्या तक्रारींत तरी काय अर्थ आहे ?" जावजीशेठ म्हणाले. "व्यापारधंद्याच्या बाबतींतसुद्धां परक्यांना दोष देण्याचें कांहीं कारण नाहीं. आमच्या हातचा व्यापार गेला ह्याला कारण, तोही आपण सांभाळूं शकलों नाहीं. आम्ही दुसऱ्यांना दोष देऊन मोकळे होतों. स्वतःचे दुर्गुण आम्हांला दिसत

नाहींत। राज्य इंग्रजांचं असलं, तरी ज्यांच्या अंगीं हिंमत आहे व इतर जरूर ते गुण आहेत, ते लहानमोठे उद्योगधंदे आपापल्या कुवतीप्रमाणें करीत आहेत ना? आमच्यांत नाहीं ऐक्य, नाहीं धाडस। आमची वृत्ति सदा सर्वकाळ संशयी व मत्सरी. परस्परांवर विश्वास टाकण्याचं महत्त्व आम्हांला वाटत नाहीं! मग अशा स्थितींत व्यापारधंदा कसा बरं करणार ? ”

“मला वाटतं, आमची गरीबीच आम्हांला नडते.” आपली अडचण पुढें मांडतांना ते गृहस्थ म्हणाले.

“या बोलण्यांत तरी काय अर्थ आहे ? मी तरी तें मान्य करायला तयार नाहीं! जावजीशेठ पुढें निक्षून म्हणाले, “अहो! भांडवल नाहीं, भांडवल नाहीं! अशी ओरड करण्यांत कांहीं अर्थ नाहीं! मोठें भांडवल मिळवीन आणि मग मी व्यापार करीन, असें म्हणणाऱ्याकडून व्यापारधंदा कधींही होणार नाहीं. हें पहा! मी अनुभवाची गोष्ट सांगत आहें. ज्याला धंदा मनापासून करायचा आहे, त्यानं कोणाचीही वाट न पहातां आटोक्यांत येईल त्या तुटपुंज्या भांडवलावर आपल्या आवडीच्या व्यवसायास एकदम हात घालावा. इमान संभाळावं. खूप मेहनत करावी. लोकांचीं मनं राखावीं. म्हणजे आस्ते आस्ते धंदा वाढत जाईल.”

अशी होती उद्योगधंद्यासंबंधीं जावजीशेठजींची सडेतोड विचारसरणी. ते राजकारणांत कधीं पडले नाहींत. धंदा, व्यवसाय, हेंच होतें त्यांचें राजकारण नि समाजकारण. जो व्यवसाय स्वीकारला तो इमानेंइतबारें करतां करतां जें शिकतां आलें व सज्जनांच्या सहवासापासून जो कांहीं लाभ झाला, तेंच त्यांचें शिक्षण. परंतु जावजींनीं टक्केटोणपे खाऊन अनुभवांतीं मिळविलेलें हें शिक्षण बहुमोली होतें.

जावजीशेठ स्वतः गुणी होते, तसेच गुणीजनांचे फार भोक्ते होते. ह्या जगांत शिकण्यासारखें पुष्कळ आहे. प्रत्येकाकडून आपण कांहीं ना कांहीं शिकूं शकतों; मात्र मीच शहाणा, अशी घमेंड न बाळगतां आपण सदासर्वकाळ शिकण्याची व जो जो सद्गुण दिसेल तो तो टिपून घेण्याची संवय ठेवली पाहिजे, असें जावजीशेठना वाटत असे नि त्याप्रमाणें ते वागत असत.

होती. फौंड्रीची नि निर्णयसागर मुद्रणालयाची ख्याति वाढविण्यांत ह्या दोघांनीं जावजीशेठ ह्यांना दिलेला सहकार शब्दांनीं व्यक्त करण्यापलीकडचा नि फार मोलाचा आहे.

बरोबर पारख करून एकेका कामाची जबाबदारी सुयोग्य माणसावर सोंपवावयाची नि त्याच्या कामांत कोणत्याही प्रकारें ढवळाढवळ करावयाची नाहीं, ह्या धोरणानें जावजीशेठ शेवटपर्यंत वागले. पं. दुर्गाप्रसाद, काशीनाथपंत परब, न्या. काशीनाथ त्र्यंबक तेलंग, रा. ब. शंकर पांडुरंग पंडित, प्रो. राजाराम शास्त्री भागवत, रामचंद्र भिकाजी गुंजीकर, जनार्दन आबाजी मोडक, वामनराव ओक, चित्रकार श्रीरंग रामचंद्र ह्यांच्यापैकीं प्रत्येकाबद्दल हेंच सांगतां येईल. हीं व इतर तत्कालीन थोर, विद्वान माणसें कारणपरत्वें जावजींच्या सान्निध्यांत आलीं नि त्यांनीं उभारलेल्या मुद्रण-प्रकाशन मंदिराला यथाशक्ति हातभार लावून गेलीं.

जावजीशेठजींनीं आपल्या धंद्यांत यश मिळविलें नि कीर्ति संपादन केली, ह्याला कारण केवळ ते एकटेच नाहींत. अनेक थोरामोठ्यांचा नि निष्ठावंतांचा सहकार ते आपल्या अंगभूत गुणांच्या बळावर संपादन करूं शकले होते. कोणीही असो; केवळ एकटा स्वतःच्या बळावर फारसें कांहीं करूं शकत नाहीं. अनेकांचें पाठबळ मिळविण्यासाठीं कांहीं बहुमोल गुण अंगीं असावे लागतात; ते शेठजींच्या ठायीं होते.

छपाईचें असो कीं टाईप पाडण्याचें काम असो; तें उत्कृष्ट व्हावें, ह्यासाठीं जावजीशेठ फार झटत असत. आपल्या कारखान्यांतील लोकांस त्यांची हीच शिकवण असे. निर्णयसागर-मुद्रणालयांतून जें जें छपाईचें काम बाहेर जाईल तें तें सर्व दृष्टींनीं सुंदर असावें; त्यांत कोणत्याही प्रकारें नांव ठेवायला जागा राहूं नये, ह्यासाठीं ते फार जपत असत. यंत्रावर छपाई चालू असली म्हणजे ते स्वतः फिरून बारकाईनें चौफेर पहात असत. कोणत्याही कारणामुळें छपाई चांगली वाटली नाहीं तर छापलेले कागद रद्द करून रद्दछपाई होण्यास जें कारण घडलें असेल तें दूर करायला लावीत. टाईप सुंदर, छपाई सुंदर नि टाकठीक, तशीच बांधणीही सुंदर; एवढ्या सर्व बाबतींत दक्षता बाळगल्यानंतर कां नाहीं काम चांगलें होणार? आणि त्यामुळेंच निर्णयसागरची छपाई म्हणजे सर्वांगसुंदर

छपाई, असा लौकिक ह्या मुद्रणालयानें मिळविला. एकाद्या ग्रंथाचा उत्कृष्टपणा दर्शविणारे अनेक गुण असतात. त्यांचें जाहिरातींतही खपाच्या दृष्टीनें वर्णन केलें जातें. 'हें पुस्तक निर्णयसागर छापखान्यांत छापिलें,' असें जाहीर करतां येणें हें त्या पुस्तकाचें मोठें भूषण मानण्याचा प्रघात पडून गेला होता.

हा लौकिक सहजसाध्य नाहीं. त्यासाठीं फार मेहनत घ्यावी लागते. पैसाही खर्च करावा लागतो. आणि सतत लक्ष पुरवावें लागतें. 'कष्टेंविण फळ नाहीं, कष्टेंविण राज्य नाहीं, केल्याविण होत नाहीं, साध्य जनीं' हा जावजीशेठजींचा उद्योगधंद्यांतील महा-मंत्र होता व तो त्यांच्याबरोबर इतरांनाही गिरवावा लागत असे.

माणसाच्या अंगीं विविध प्रकारचे गुण असलेच पाहिजेत. गुणांनीं शोभा येते तशी दुसऱ्या कशानेंही येत नाहीं. जावजीशेठना हें तत्त्व मान्य होतें. परंतु त्याचबरोबर त्यांचें असेंही म्हणणें असे कीं, गुणाबरोबर माणसाजवळ पैशांचीही जोड जरूर असली पाहिजे. आपल्या अंगीं असलेल्या गुणांचें संरक्षण करण्यासाठीं व त्यांचें तेज पाडण्यासाठीं पैसा जवळ पाहिजे आणि माणसानें उद्योगधंदा करून तो जरूर मिळविला पाहिजे. त्याशिवाय तुम्ही बोलल्याप्रमाणें वागूं शकणार नाहीं, तसेंच इष्टमित्रांस अडचणीच्या प्रसंगीं सहाय्य करूं शकणार नाहीं, किंवा गोरगरीबांवर दया करूं शकणार नाहीं. माणसाजवळ पैसा नसल्यास त्याची स्थिति केविलवाणी नि परावलंबी होते. त्याच्यावर कधीं कधीं खोटें बोलण्याचे प्रसंग ओढवतात व त्या एका दुर्गुणामागोमाग दुसरे अनेक दुर्गुण त्याचा पाठलाग करीत येतात; आणि शेवटीं माणसाची अधोगति होते. ती आपल्या वांट्यास येऊं नये, ह्यासाठीं आपण जपलें पाहिजे. विनायक कोंडदेव ओक यांच्यासारख्या विश्वासू मित्रांशीं जावजीशेठ कधीं एकांतीं बोलूं लागले म्हणजे त्यांच्या मुखांतून हे विचार बाहेर पडत असत:

**'धनवंतालागीं, सर्व मान्यता हे जगीं**
**मातापिता बंधुजन, सर्व मानिती वचन ।**
**जंव चाले मोठा धंदा, तंव वहीण म्हणे दादा**
**सदा शृंगार-भूषणें, कांता लवे बहु मानें' ॥**

हा तुकोबारायांचा सर्वपरिचित अभंग, अशा प्रसंगीं ते हटकून म्हणायचे. आणि मग ओक थोडेच गप्प राहाणार? त्यांच्याजवळ संत-वाणीचा सांठा

भरपूर होता. मग त्यांनीं म्हणावें, "शेठजी ! खरं आहे तुमचं म्हणणं ! प्रत्येक जण त्याचा अनुभव घेत आहे; परंतु त्या अनुभवानें तो शहाणा मात्र होत नाहीं, एवढंच वाईट ! संपदेसंबंधीं वामन पंडितांनीं म्हटलें आहे कीं:–

द्रव्यासि हे गमनमार्ग यथावकाश
कीं दान, भोग अथवा तिसरा विनाश ।
जो घे न भोग, जरि पात्र करीं न देई
त्याच्या धनास मग केवळ नाश पाहीं ॥"

मग जावजीशेठनीं म्हणावें, "अगदीं खरं आहे. पैसा हा आपला परमेश्वर नाहीं. सचोटीचा उद्योग हाच आपला परमेश्वर. पैसा खूप मिळवावा आणि लोककल्याणासाठीं सढळ हातानें त्याचा विनियोग करावा."

ह्या तत्त्वाला अनुसरून जावजीशेठनीं केवळ सचोटीच्या मार्गानें पैसा मिळविला; आणि जसजशी संधी मिळत गेली, तसतसा त्याचा विनियोग लोककल्याणासाठीं केला. त्यांच्या औदार्यासंबंधीं इतरत्र लिहिण्यांत आलें आहे. शिवाय ग्रंथ-प्रकाशन कार्यासाठीं त्यांनीं आर्थिक दृष्ट्या जो त्याग केला त्याचा बरोबर अंदाज करणें कठीण आहे.

जावजीशेठजींचें वागणें सर्वांशीं प्रेमळपणाचें असे. आपल्याकडे गिऱ्हाईक ह्या नात्यानें किंवा दुसऱ्या कोणत्याही नात्यानें कोणीही येवो; त्याच्याशीं सरळपणानें वागणें त्यांना फार आवडे. आपल्याकडे येऊन कोणीही नाखूष होऊन जाऊं नये, ह्यासाठीं ते फार जपत असत.

जावजीशेठ ह्यांच्या काळांत ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाला फार मोठें उधाण आलेलें होतें. महात्मा जोतिबा फुले हे त्यांचे समकालीन व एकमेकांबद्दल प्रेमादरभाव बाळगणारे. जावजीशेठ ह्यांचा जन्म मराठा जातींत झाला असला, तरी त्यांनीं जो व्यवसाय पतकरला त्यांत त्यांना मनापासून सहकार देणारे जे होते ते बहुतेक सारे विद्वान ब्राह्मण होते. त्या वर्गाच्या विद्वत्तेबद्दल त्यांच्या अंतःकरणांत कमालीचा आदरभाव वास करीत होता. आणि त्याचबरोबर सत्यशोधक समाजाचे संस्थापक म. जोतिबा फुले तसेंच त्यांच्या 'दीनबंधु' ह्या पत्राचे संपादक लोखंडे ह्यांच्याशींही त्यांचे संबंध जिव्हाळ्याचे होते. दीनबंधूसाठीं टाईप किंवा इतर जें कांहीं साहित्य लागेल तें जावजीशेठ त्यांना पुरवीत असत.

म. जोतिबा फुले व त्यांचे सहकारी ह्यांनीं जी चळवळ त्याकाळीं मोठ्या जोगानें चालविली होती, तिच्याकडे पहाण्याचा जावजीशेठजींचा विशिष्ट दृष्टिकोन होता. एका वर्गांतील लोकांनीं दुसऱ्या वर्गांतील लोकांचा द्वेष करावयाचा नि आपसांत दुफळी माजवीत रहावयाचें, हें त्यांना बिलकूल पसंत नसे. ते नेहमीं म्हणत असत व लोखंडे किंवा सत्यशोधक समाजवाले जे कोणी त्यांच्याकडे येत असत, त्यांना ते स्पष्टपणें सांगत असत की, "बाबांनो ! आधींच आमच्यांत किती तरी तट पडले आहेत, त्यांत आणखी भर घालूं नका. सध्यांचा काळ दुफळी माजविण्याचा नसून आम्हीं सर्वांनीं एकमेकांशीं बंधुभावनेनें वागण्याचा आहे. दुफळीमुळें दुसऱ्यांचें फावतें, हें आपण विसरतां कामा नये."

कधीं कधीं हा वाद निकरावर यायचा. जावजीशेठ सहसा तसें घडूं देत नसत. मग शेवटीं वाद मिटविण्याच्या हेतूनें त्यांनीं म्हणावें "बाबांनो ! तुमच्याशीं कोणीं वाद घालावा? तुम्ही आमचं थोडंच ऐकणार ! तुम्ही 'सत्यशोधे' आहांत !" एवढें बोलून ते स्वतःचें नि त्यांचें समाधान करीत असत.

म. जोतिबा फुले ह्यांच्याबद्दल जावजीशेठना फार आदर वाटत असे म्हणून सांगितलें; कारण त्यांनीं लोक-जागृतीचें जें कार्य चालविलें होतें, त्याचें महत्त्व ते ओळखून होते. खालचा समाज अज्ञानांधकारांत घोरत पडलेला होता, त्याला आपल्या कर्तव्याचें भान नव्हतें. जोतिबांनीं तो निद्रिस्त समाज खडबडून जागा केला, ह्याबद्दल त्यांना आदर वाटत असे.

प्रत्येकाची विचारसरणी व ध्येयप्राप्तीसाठीं वापरायचीं साधनें वेगवेगळीं असतात. ध्येय स्तुत्य असतें. कोणालाही न दुखवितां आपलें कार्य करायचें, हा होता जावजीशेठजींचा मार्ग. त्या मार्गाची कास धरून आपल्या गरीब नि मागासलेल्या समाजाच्या उन्नतीसाठीं जें जें हातून होण्यासारखें असेल तें तें जावजीशेठ तत्परतेनें करीत असत. आपल्या समाजाच्या उन्नतीच्या बाबतींत त्यांनीं कधींही डोळेझांक केली नाहीं. समाजाच्या उन्नतीसाठीं झटणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे, असें ते मानीत असत. विद्यार्थि असोत, शास्त्री-पंडित असोत किंवा संस्था-चालक असोत; प्रत्येकास ते उदारहस्तें मदत करीत असत.

शिक्षणप्रसार, व्यापार नि उद्योग ह्यांच्या सहाय्यानें समाजोन्नति साधावयाची, ह्या ध्येयानें प्रेरित होऊन जे कोणी समाजबंधु त्यांच्याकडे येत,

त्यांची योग्य ती संभावना ते करीत असत. ते म्हणत असत कीं, 'खालीं पडून किंवा दबलेल्या स्थितींत कोणीही राहातां कामा नये. सर्वांनीं वर येण्यासाठीं धडपडलें पाहिजे. माझें अखेरचें आयुष्य माझ्या मागासलेल्या बंधुभगिनींच्या उन्नतीसाठीं मला खर्च करायचें आहे. त्यांच्यासाठीं मी झोळी लावून फिरणार आहें; परंतु प्रथम त्या झोळींत मी माझी भरभक्कम मूठ घालीन तेव्हांच बाहेर पडेन.'

आंत एक आणि बाहेर एक, असला दुटप्पी व्यवहार जावजीशेठनीं कधीं केला नाहीं. सर्वांशीं वागणूक सरळपणाची. 'अंतरीं निर्मळ, वाचेचा रसाळ' अशी होती त्यांची वृत्ति. अंतःकरण सर्वांसाठीं प्रेमानें ओथंबलेलें; त्यामुळें स्वजातीय मराठा समाजामध्यें जसें त्यांचें स्थान मानाचें नि आदराचें होतें, तसेंच ब्राह्मण समाजांतही त्यांनीं तितकेंच बहुमानाचें स्थान आपल्या सरळ वागण्यानें नि कर्तृत्वानें मिळविलें होतें. त्यांना परकेपणा कोणाबद्दलही वाटत नसे.

एका समाजांतील लोकांबद्दल अधिक आपुलकी नि दुसऱ्या समाजांतील लोकांबद्दल कमी आपुलकी, असेंही त्यांच्या वागण्यांत कधीं आढळून आलें नाहीं. ह्या वट-वृक्षाची सांवली सर्वांना सारखी मिळत असे. जातीय भावना किंवा जातिद्वेष जावजीशेठजींच्या अंतःकरणाला कधींही शिवला नाहीं. आजचा काळ अगदीं वेगळा आहे. तो काळ जातीय मत्सरानें ग्रासलेला होता. उच्चवर्णीयांबद्दल भाषणांच्याद्वारें नि वृत्तपत्रांच्याद्वारें गरळ ओकलें जात होतें. ब्राह्मणेतर पुढाऱ्यांच्या भेटीगांठींचे प्रसंग मधून मधून जुळून येत होते. जावजीशेठसारख्या मातबर नि वजनदार व्यक्तींचा पाठिंबा मिळविण्यासाठीं कोण धडपड करणार नाहीं ? परंतु जावजीशेठ कोणाच्याही आहारीं गेले नाहींत. तसेंच आग्रह होत असतांही ते सत्यशोधक समाजाचे सभासदही कधीं झाले नाहींत. कोणीही भेटीस येवो. त्याच्यापुढें स्वतःचे विचार ते निर्भीडपणें मांडीत असत. कोणाचेंही मन न दुखवितां मामोपचारानें जें सांगतां येईल तें सांगावयाचें. प्रत्येकाला आपल्या हातून होण्यासारखी असेल ती मदत करावयाची. ह्या धोरणामुळें त्यांना सर्वांशीं मित्रत्वाचें नातें राखतां आलें. जावजीशेठ गुणांचे भोक्ते होते. ते गुण मग कुणांतही आढळोत. त्यांना ते जवळ करीत.

ब्राह्मण समाजाच्या संस्था नि चळवळी ह्यांच्याकडेही त्यांचें लक्ष असे. त्यांनीं सुरू केलेला कोणताही कल्याणकारक उपक्रम असो, त्याला आस्थापूर्वक

हातभार लावल्याशिवाय जावजीशेठ कधींही राहिले नाहींत. आपल्याकडे मदतीसाठीं कोणीही येवो, त्यांनीं भेदभाव कधींही मानला नाहीं. शिवाय भेदभाव उराशीं बाळगून त्यांना आपला व्यवसाय यशस्वी रीतीनें चालविणें जड झालें असतें.

आपली कुवत, आपली बुद्धिमत्ता किंवा आपणास प्राप्त झालेलें थोरपण ह्यासंबंधींच्या मर्यादा जावजीशेठ पूर्णपणें ओळखून होते. आपण आहोंत तसेंच जगाला दिसावें व जगानेंही वास्तव दृष्टीनें आपल्याकडे पहावें, असें त्यांना वाटत असे. आपण कोणी तरी मोठे आहोंत, आपल्यांत कांहीं आगळें वैशिष्ट्य आहे, असें भासविण्याचा प्रयत्न त्यांनीं कधींही केला नाहीं. आपल्यावर कोणीं मोठेपणाचा आरोप केला किंवा आपली कोणीं स्तुति केली तर ती त्यांना मनापासून आवडत नसे. प्रत्येक माणसानें आपली खरी योग्यता समजून जगांत वावरावें, त्यांतच त्याचें हित आहे, असें ते नेहमीं म्हणत असत आणि तसेंच स्वतः वागत असत.

जावजीशेठजींची कामगिरी व समाजांत स्वयंस्फूर्तीनें त्यांनीं मिळविलेलें मानाचें स्थान लक्षांत आल्यामुळें सरकारकडून त्यांना जे. पी. चे अधिकार बहाल करण्यांत आले. त्यामुळें खरोखर सर्वांना समाधान वाटलें नि आनंदही झाला. परंतु जावजीशेठना ह्यासंबंधीं काय वाटलें तें समजून घेणें महत्त्वाचें आहे. ते त्यावेळीं म्हणाले होते कीं, "सरकारनें हें मानाचें शेपूट मला विनाकारण जोडलं; मला तें नको होतें. त्या मानास मी लायक नाहीं; त्या पदवीचा अर्थ देखील मला कळत नाहीं. ती मला कशाला बरं दिली सरकारनं? त्यापेक्षां प्रो. राजारामशास्त्री भागवत ह्यांच्यासारख्या विद्वानास ती पदवी दिली असती, तर किती चांगलं झालं असतं!"

त्याकाळीं राज-भवनांत राज्यपाल यांजकडून दरबार भरविण्याचे किंवा मेजवान्यांचे कार्यक्रम होत असत. त्यावेळीं बड्या आणि शिष्ट समजल्या जाणाऱ्या लोकांना आमंत्रणें जात असत. अशा बड्या लोकांच्या यादींत जावजीशेठ ह्यांचें नांव नमूद झालें होतें. राज्यपालांचें आमंत्रण येणें म्हणजे केवढी मोठ्या मानाची गोष्ट! कोणींही हुरळून जावें अशी त्या काळची ती घटना! परंतु जावजीशेठनीं त्या घटनेचें स्वागत कोणत्या रीतीनें करावें? जेमतेम एकदां ते

राज्यपालांच्या खान्यास हजर राहिले. त्यांनीं तेथील थाटमाट नि वडेजाव पाहिला आणि त्याच वेळीं त्यांनीं मनाशीं खूणगांठ बांधिली कीं, येथें आपल्यासारख्यांचें काम नाहीं ! हें बड्या लोकांचें काम !

त्यानंतर पुन्हां अशा आमंत्रणाचा स्वीकार त्यांनीं कधीं केला नाहीं. कारण ? तेवढी आपली योग्यता नाहीं, असें त्यांना मनापासून वाटे.

जावजीशेठजींच्या निर्णयसागर-मुद्रणालयाची ख्याति सर्वत्र पसरलेली होती. संस्थानिकांच्या राजदरबारांतही त्याची प्रशंसा होऊं लागली होती. त्यांनीं झीज सोसून चालविलेल्या ज्ञान-प्रसारकार्याचें महत्त्व तर सर्वांनाच पटलें होतें. मुंबईंत एकदां एक संस्थानिक आले. जावजीशेठजींची कीर्ति त्यांच्या कानावर गेली होती. राजेसाहेबांनीं आपल्या चिटणिसांमार्फत त्यांना भेटीस येण्याचें आमंत्रण दिलें. त्याप्रमाणें जावजीशेठ राजेसाहेबांच्या भेटीस गेले. त्यांची भेट होणार इतक्यांत दुसरे कोणी गृहस्थ आपल्या भेटीस आल्याचें समजल्यावरून ते जावजीशेठना पटकन म्हणाले, "आपल्या भेटीचा आतां योग दिसत नाहीं. आपण दुसऱ्या वेळीं येण्याचें करावें !"

तें ऐकून कांहीं न बोलतां जावजीशेठ निमूटपणें परत घरीं आले. पुन्हां त्या राजेसाहेबांच्या भेटीस जाण्याच्या फंदांत ते कधींही पडले नाहींत.

कां गेले नाहींत ? दुरभिमानामुळें किंवा अहंकारामुळें गेले नाहींत, असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. त्या दुर्गुणांपासून ते दूर होते. त्यांच्या साध्या मनाला वाटलें कीं, महाराज केवढे मोठे ! आपण कोणत्या झाडाचा पाला ! त्यांची भेट घेण्याच्या जंजाळांत आपण पडाच कशाला ?

एकदां कांहीं मित्रांच्या आग्रहावरून कांहीं निवडक ग्रंथ बरोबर घेऊन मुंबईंत आलेल्या एका विद्याप्रेमी महाराजांस भेट देण्यासाठीं म्हणून ते त्यांच्या बंगल्यापर्यंत गेले. नंतर त्यांच्या मनांत एकाएकीं विचार डोकावला कीं, महाराजांनीं भेट घेण्याची संधी दिली तर ठीक आणि नाहीं दिली तर उगाच मनाला रुखरुख ! त्यापेक्षां तो नादच सोडून देणें बरें नाहीं का ? थोरामोठ्यांच्यामागें आपण लागा कशाला ? असा पोक्त विचार करून ते तसेच परत फिरले !

राजाश्रयासाठीं ग्रंथ-प्रकाशकांनीं धडपड करणें वाईट कोण म्हणेल ! त्याकाळीं कित्येक संस्थानिक मलत्यासलत्या छंदापायीं मोठा थोडका का पैसा

उधळीत होते? तो ओघ थोडासा ग्रंथप्रकाशन-कार्याकडे वळवितां आला तर तो सत्कारणीं लागला असता. अशा बाबतींत शेठ दामोदर सांवळाराम यंदे (१८६१–१९४४) किंवा रावजी श्रीधर गोंधळेकर (१८३१–१९१०) ह्या थोर ग्रंथ-प्रकाशकांचें संस्थानिकांशीं संबंध जोडण्याचें वळण नि धोरण वाखाणण्यासारखें नव्हतें असें कोण म्हणेल?

परंतु कांहीं म्हणा; जावजीशेठजींचा मार्ग इतरांहून फार भिन्न होता. त्यांना प्रकाशांत यायला नको होतें. निढळाच्या घामानें मिळविलेल्या पैशांशिवाय दुसऱ्या कोणत्याही मार्गानें येणाऱ्या पैशांची त्यांना अपेक्षा नव्हती.

जावजीशेठनीं संपत्तीच्या बाबतींत वाजवीपेक्षां फाजील हांव कधीं बाळगली नाहीं. नाहीं खंत, नाहीं ओशाळेपणा! 'नसावें ओशाळ, मग मानिती सकळ', असा होता त्यांचा बाणेदार पंथ!

लबाडीचा किंवा फसवाफसवीचा व्यवहार साऱ्या आयुष्यांत जावजीशेठनी कधीं केला नाहीं! दुसऱ्याकडे असलेलें आपलें येणें कधीं येईल तेव्हां येवो; परंतु मी कोणाच्या देण्यांत राहाणार नाहीं, असें त्यांनीं म्हणावें व त्यामुळें त्यांची सर्वत्र वहावा होत असे.

आत्मस्तुति त्यांना मनापासून आवडत नसे. तिच्या वाऱ्यासही ते सहसा उभे राहात नसत. माणसाची स्तुति कशासाठीं? स्तुति देवाची करावी. स्तुतीला माणूस पात्र नाहीं. असें प्रसंगविशेषीं ते स्पष्टपणें सांगत असत.

मुंबईंत त्याकाळीं हेमंत व्याख्यान-माला चालत असे. तिचे प्रवर्तक होते न्यायमूर्ति काशिनाथ त्र्यंबक तेलंग. त्या मालेंत महत्त्वाच्या विषयांवर विद्वान वक्त्यांचीं भाषणें होत असत. त्या भाषणांचा लाभ सर्वांना व्हावा, ह्या हेतूनें तीं भाषणें समग्र मिळवून नि छापवून प्रसिद्ध करण्याचा उपक्रम स्वयंस्फूर्तीनें केवळ ज्ञानप्रसाराच्या पवित्र हेतूनें जावजीशेठनीं कांहीं काळ चालू ठेविला होता. ह्या व्याख्यान-मालेच्या समारोपादाखल एका वर्षी माधव-बागेंत भरलेल्या जाहीर सभेंत शेवटीं आभारप्रदर्शनाच्या वेळीं न्या. तेलंग ह्यांनीं मालेच्या बाबतींत प्रकाशनाच्या दृष्टीनें जावजीशेठ ह्यांनीं दिलेल्या निःस्वार्थ नि स्वयंस्फूर्त सहकाराची मुक्तकंठानें प्रशंसा केली. ते प्रशंसेचे शब्द कानीं पडतांच

जावजीशेठ हळूच मागें सरकले व लाजेनें एका कोपऱ्यांत खालीं मान घालून उभे राहिले! स्वतःची स्तुति ऐकणें त्यांना फार जड झालें!

दानधर्मांत जावजींचा हात नेहमीं पुढें असे; परंतु उजव्या हातानें दिलेलें दान डाव्या हातालाही समजूं नये, याबद्दल आपल्याकडून होईल तेवढी खबरदारी ते घेत असत. नांवाशीं काय करायचें आहे? आपल्या हातून घडेल तेवढें करावें आणि बाजूला सरावें, अशी होती दानधर्माच्या बाबतींत त्यांची विचारसरणी. एखाद्या सत्कार्यासाठीं देणगी दिली तर वृत्तपत्रांत आपलें नांव छापून आलें पाहिजे, अशी बहुतेकांची अपेक्षा असते. जावजीशेठनीं ती अपेक्षा कधीं बाळगली नाहीं. एखाद्या व्यक्तीनें किंवा संस्थाचालकानें नांव प्रकट करण्याची जरूरी भासविलीच, तर 'मराठ्यांचा हितचिंतक' ह्या नांवानें देणगी प्रसिद्ध करण्याची ते विनंती करीत असत.

जावजीशेठ ह्यांच्याठायीं साधेपणा कमालीचा होता. साधा, स्वच्छ पोषाख त्यांना आवडे. खरें पहातां स्वतःच्या कर्तबगारीच्या बळावर ते लक्षाधीश बनले होते. ऐषआरामांत जीवन घालवायला त्यांना कोणती हरकत होती? परंतु त्याची त्यांना मनापासून आवड नव्हती. स्वतःचें बालपणांतील गरीबीचें जीवन ते कधींही विसरले नाहींत. त्या काळांतील कोणी मित्र, सवंगडी भेटला असतां त्यांना आनंद होई. त्यांपैकीं कोणाच्या मार्गांत कांहीं अडचणी असल्यास अगदीं आपुलकीनें चौकशी करून त्यांच्या अडचणींचें निराकरण ते करीत असत. शिवाय आपल्या असंख्य गोरगरीब बांधवांकडे त्यांचें सतत लक्ष असे. त्यांनीं दुःखांत दिवस कंठावे आणि मीं मात्र ऐषआरामांत लोळावें, हें त्यांच्या स्वभावाला परवडण्यासारखें नव्हतें. त्यांनीं गाडीघोड्याचा डामडौल केला असता तर तो त्यांना सहज शोभण्यासारखा होता; परंतु तसल्या फंदांत ते कधीं पडले नाहींत. ते मित्रमंडळींत बसले असतां गाडीघोड्याचा प्रश्न निघत असे. त्यावेळीं त्यांनीं म्हणावें, "आपल्यासारख्याला काय करायचा आहे गाडी आणि घोडा! चाललं आहे हें ठीक आहे; ईश्वरकृपेनें असंच चालूं द्या म्हणजे झालं!"

लहान, थोर कितीही योग्यतेचा माणूस असो. त्याच्या हातून कधीं ना कधीं चुका किंवा प्रमाद घडल्याशिवाय रहात नाहींत. एकाला जें योग्य वाटेल तें कदाचित दुसऱ्याला वाटणार नाहीं. त्याप्रमाणें शेठजींच्या हातून प्रमाद

घडले नसतील, असें म्हणतां येणार नाहीं. परंतु एक गोष्ट मात्र निश्चित आहे. त्यांनीं गुणशील-संपन्न माणसें जवळ केलीं नि स्वतः गुणसंपन्न होण्यासाठीं त्यांची आयुष्यभर धडपड चालू होती. हें काय थोडें झालें ?

जावजीशेठजींच्या गुणसंपदेसंबंधीं आज आम्हीं कितीही लिहिलें, तरी जे त्यांच्या सान्निध्यांत दीर्घकाळ आले व कार्यकारणपरत्वें वर्षानुवर्ष ज्यांच्याशीं त्यांचा निकट संबंध आला, त्यांनीं प्रकट केलेल्या मतांचें महत्त्व फार आहे. त्यांपैकीं जावजीशेठ ह्यांच्या दोन विद्वान नि निकटवर्ती मित्रांनीं त्यांना जी काव्यमिश्रित श्रद्धांजलि अर्पण केली तिचा किंचित् परामर्श घेऊन हें प्रकरण संपवायचें आहे.

'विविधज्ञान-विस्तार' हा ज्येष्ठ नि श्रेष्ठ मासिकाला निर्णयसागर मुद्रणालयाचा दीर्घकाळ उदार आश्रय होता. कारण ज्ञान-प्रसाराच्या नि संस्कृति-संवर्धनाच्या दृष्टीनें त्या मासिकाची योग्यता ते पूर्णपणें जाणून होते. विविधज्ञान-विस्ताराचे तत्कालीन विद्वान संपादक हरी महादेव पंडित [ १८४९–१८९९ ] हे जावजीशेठ ह्यांच्याबद्दल वाटणारी कृतज्ञता प्रगट करतांना म्हणतात: "पैशांच्या पायीं किती माणसें अमानुष होऊन गेलीं आहेत. पण जावजीशेठ हे या पिशाचिकेच्या तडाक्यांत सांपडले नाहींत. त्यांना जितका न्याय्य व सिध्या मार्गानें पैसा मिळेल तितका पाहिजे होता, पण अनाचारानें मिळालेली एक कवर्डीदेखील त्यांस नको होती. आपल्याशीं व्यवहार करणाऱ्या लोकांची सोय पाहणें हा तर जावजींचा अप्रतिम गुण होता. त्यांच्या अंगीं मारवाडीपणा नव्हता. या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव या विविधज्ञान-विस्ताराला अनेक वेळां आला आहे व या गोष्टीचा उल्लेख जावजींच्या हयातींतही त्यानें आत्मवृत्त कथनादि प्रसंगीं पूर्वी अनेक वेळां केला आहे. जर जावजींचे अंगीं मारवाडीपणा असता, तर आज जीं कांहीं पुस्तकें लोकांस सुलभ झालीं आहेत तीं त्यांच्या दृष्टीस पडतीं कीं नाहीं, याची आम्हांस बळकट शंका आहे.

"जावजींचा स्वभाव मोठा मनमिळाऊ व दयार्द्र होता. त्यांना आपली पूर्व-स्थिति अष्टौप्रहर आठवत असे, असें त्यांच्या वर्तनावरून दिसतें. गरीबांची कळकळ जावजींच्या आचरणांत पावलोपावलीं दृष्टीस पडते. तुकारामबोवांनीं जीं साधूचीं लक्षणें अनेक प्रसंगीं सांगितलीं आहेत, तीं सर्व जावजींचे आचरणांत स्पष्ट दिसत होतीं. आमचे दृष्टीनें तर जावजी उत्कृष्ट साधुकोटींत गणले जाण्यास योग्य होते.

# १६

# एकाऐवजीं दोन जावजींचा लाभ

जावजीशेठ ह्यांच्या निधनानंतर त्यांच्या मागें काय काय प्रकार घडतील, ह्यासंबंधीं अनेकांनीं आपआपल्या कल्पनेप्रमाणें नाना तर्कवितर्क केले. कारण जावजीशेठ ह्यांनीं आपल्यामागें फार मोठा पसारा करून ठेविला होता. आपल्याठायीं असलेल्या कित्येक असामान्य गुणांच्या बळावर मुद्रण नि प्रकाशन-क्षेत्रांतील पसारा त्यांनीं अवाढव्य प्रमाणांत वाढविला व आपल्या कर्तबगारीच्या बळावर त्या पसाऱ्याला ते पुरून उरले. कोणत्याही बाबतींत त्यांनीं उणें भासूं दिलें नाहीं व लौकिकही अपरंपार नि कोणीही हेवा करावा इतका मिळविला.

त्यांच्या निधनोत्तर लोक म्हणूं लागले कीं, त्यांची कर्तबगारी नि धोरण त्यांच्याबरोबर. त्यांच्या मागें त्यांचीं मुलें असलीं तरी तें धोरण नि वळण त्यांना थोडेंच साधणार आहे ? आणि जगांत आपल्या समोंवार आपण नेहमीं काय बरें पहातों ? महत् प्रयासांनीं व सारीं धोरणें संभाळून एकाद्या कारखान्याची उभारणी कोणी तरी कर्तबगार पुरुष करतो; परंतु त्याच्या मागें अनेक कारणांमुळें त्यांतील चैतन्य आस्ते आस्ते नामशेष होण्याच्या मार्गाला लागतें.

सारी सजावट सुंदर रीतीनें तयार झालेली असते. ती सांभाळण्याचें तेवढें कार्य मागें राहिलेल्यांनीं दक्षतापूर्वक पार पाडावयाचें असतें. परंतु तेवढाही कर्तबगारीचा भाग पार पाडतां येत नाहीं, अशीं उदाहरणें किती तरी दाखवून देतां येतील.

आणि त्यांतही संपत्तीचे किंवा इस्टेटीचे मालकी हक्क गाजविणारे एकापेक्षां अधिक असले म्हणजे त्यांच्यामध्यें उघळपट्टीच्या बाबतींत चढाओढ लागून रहाते. तंटेभांडणांस ऊत येऊन कोर्टाची पायरी चढण्याचे प्रसंग उद्भवतात आणि शेवटीं जाग्यावर शिल्लक कांहीं रहात नाहीं !

हेंच पहा ना ! जावजीशेठच्या निधनानंतर अनेकांनीं आपापल्या कल्पनांच्या वावड्या उंच उंच उडविल्या ! स्मशानांतून परततांना कोण काय म्हणालें, त्याची जावजींचे एक मित्र नि मार्गदर्शक विनायक कोंडदेव ओक यांनीं नोंद करून ठेवली आहे. 'काय हो ! जावजींनीं केवढा मोठा पसारा करून ठेविला आहे ! तो त्यांच्या मुलांना आवरतां का येणार आहे ? त्यापेक्षां त्यांनीं शहाणपणा करावा. कोणता ? तो पसारा त्यांनीं मोडून टाकावा नि छापखान्याच्या चाळी भाड्यानें देऊन टाकाव्या नि येईल तें उत्पन्न पदरांत पाडून घ्यावें आणि स्वस्थ रहावें ! कटकटी हव्यात कशाला ? त्या का झेपणार आहेत त्यांना !'

आहे कीं नाहीं पोक्त, परंतु पाय मोडून घालणारा सल्ला !

दीनबंधुकार लोखंडे हे जावजीशेठजींच्या स्नेहीमंडळींत मोडणारे. ते मृत्युलेखांत काय लिहितात पहा !

"आतां जावजी हे परलोकवासी झाले आहेत, तेव्हां राणोजी यांचें निर्णयसागर छापखान्यावरील प्रेम कोणत्याही रीतीनें कमी न होईल अशाविषयीं खबरदारी ठेवण्याविषयीं आम्हीं जावजींच्या खऱ्या मित्रांस, त्याचप्रमाणें त्यांचे वडील चिरंजीव तुकाराम जावजीशेठ यांस कळवून ठेवतों. कारण आतां "आठ कारभारी आणि बारा चौधरी" होण्याची वेळ आली आहे ! ज्याप्रमाणें जावजी यांच्या दराऱ्यानें, चांगुलपणानें व वेळ पडल्यास पैसे खर्चून काम होत असे, त्याप्रमाणें यापुढेंही सुरळीत चालेल, अशी इच्छा धरणें वाजवी होणार नाहीं !"[१]

अशा प्रकारें मोफत व न मागतां स्वयंस्फूर्त सल्ला देणाऱ्यांत एक गुण मात्र सर्वसाधारण दिसून येतो. तो म्हणजे जावजीशेठच्यामागें त्यांच्या कुटुंबियांचें भलें व्हावें हाच होय. परंतु एवढी घाई न करतां त्या लोकांनीं

१ दीनबंधु : ता. १०-४-९२

'जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ॥
तोचि साधू ओळखावा । देव तेथेंची जाणावा ॥
अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ । त्याचे गळां माळ असो नसो ॥
परद्रव्या अंध निंदेसी जो मुका । तोचि संत देखा तुका म्हणे ॥'

"हीं व यासारखीं प्रापंचिक व लौकिक साधूंचीं जीं इतर लक्षणें तुकोबा-सारख्यांनीं वर्णन केलीं आहेत, तीं जावजींस पूर्णपणें लागू होतीं असें ज्या कोणास त्या पुण्यपुरुषाचा कांहीं काळ समागम झाला आहे, त्याला खचीत वाटल्यावांचून रहाणार नाहीं. त्यांचा सर्व आयुष्यक्रम ह्या साधुत्वलक्षणांनीं ओतप्रोत भरलेला होता.········असे व्यावहारिक, प्रापंचिक व लौकिक साधू आमच्यामध्यें जितके अधिक उत्पन्न होतील तितके हवे आहेत. जेव्हां करवीरचे संबंधानें केसरीकारांवर मुकद्दमा येथील प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट साहेबांपुढें चालला होता, तेव्हां त्यांच्याकरितां जावजी जामीन राहिले होते ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे········बालबोधांतील चरित्रांत नुसतें गुणप्रकाशन असतें व दोषोद्घाटन नसतें व तसें होण्याचें कारण जावजी होत, असें रा. सा. ओक म्हणतात. बरें ही तरी गोष्ट कशाची दर्शक असावी ? 'निंदेसी जो मुका' या लक्षणाची. जावजींचे कृतीवर किती छाप होती, हें या गोष्टीवरून स्पष्ट होत नाहीं काय? जावजींचे एकंदर आचार, विचार व उच्चार यांची जर कोणी छाननी करील तर आम्हांस वाटतें कीं, त्या करणाऱ्या पुरुषास जावजी म्हणजे एक अवतारी पुण्यपुरुष व योगभ्रष्ट म्हणून पुन्हां अवतीर्ण झालेला महासाधु असे असावे, असें निःसंदेह वाटेल."[१]

*वामन दाजी ओक [ १८४५–१८९७ ] ह्यांची गणना तत्कालीन* विद्वानांत व पंडितांत केली जात असे. ते 'काव्य-संग्रह' मासिकाचे संपादक होते. त्यांनीं जावजीशेठजींच्या निधनोत्तर त्यांना वाहिलेल्या आदरांजलींत म्हटलें आहे:—"जावजी दादाजी शेठ हे कुलशीलसंपन्न, स्वकार्यदक्ष, सरळ मनाचे, परोपकारी, पोक्त विचारी आणि सदय असे होते. यांचा स्वजातीय जनांमध्यें जसा मानसन्मान असे, तसा परजातीय जनांमध्येंही असे. हे गुणी जनांचे भुकेले असल्यामुळें ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर जातींतील वंद्य पुरुषांचा गौरव मनापासून करीत असत. यांच्या मित्रमंडळींत अनेक ब्राह्मण आढळतात; यावरून ते जाति-द्वेषासारख्या स्वपरघातक दुर्गुणापासून किती अलिप्त होते हें स्पष्ट दिसतें.

१ विविधज्ञान विस्तारः पुस्तक २४ वें, अंक ६ जून १८९२

"जावजींची जीवनयात्रा बोधप्रद आणि उत्साहप्रद झाली आहे........ त्यांच्या चरित्रांतील अनेक गोष्टींचें मनन केलें म्हणजे समर्थ रामदासस्वामींनीं उत्तम पुरुषांविषयीं जें म्हटलें आहे, त्याची आम्हांस आठवण होते—

'शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें
उणें पडों न द्यावें । कोणीएकाचें
अडलें गांजलें जाणावें । यथाशक्ति कामास यावें
मृदुवचन बोलत जावें । कोणीएकासी
दुसऱ्याचे दुःखें दुःखी व्हावें । परसंतोषें सुखी व्हावें
प्राणिमात्रास मेळवून घ्यावें । बऱ्या शब्दें
बहुतांचे अन्याय क्षमावे । बहुतांचे कार्यभाग करावे
आपल्यापरी व्हावे । पारिखे जन
दुसऱ्यांचें अंतर जाणावें । तदनुसारचि वर्तावें
लोकांस परीक्षीत जावें । नाना प्रकारें
नेमकेंचि बोलावें । तात्काळचि प्रतिवचन द्यावें
कदापि रागासि न यावें । क्षमारूपें
स्वयें आपण कष्टावें । बहुतांचें सोशीत जावें
झिजोन कीर्तीसी उरवावें । नाना प्रकारें
परांतरास न लावावा ढका । कदापि पडों न द्यावा चुका
क्षमाशीलें तयाचा तुका । कोण नाहीं

"ह्या समर्थांच्या ओव्यांवर जर कोणी कीर्तन करूं पाहील, तर त्यास जावजींचें चरित्र हें उत्तम आख्यान होणार आहे; आणि जो कोणी विचारी पुरुष, जावजींच्या चरित्राचें आणि या ओव्यांचें मनन करील त्यास जावजींचें चरित्र आणि समर्थांचीं वचनें यांत बिंब कोणतें आणि प्रतिबिंब कोणतें याचा निर्णय करणें ( कालगणनेकडे लक्ष न दिलें तर ) कठीण जाईल. या म्हणण्याचा आशय असा कीं, या वचनानुरोधानें जावजींनीं आचरण ठेविलें, अथवा जावजींच्या जीवनवृत्तांतावरून पूर्वोक्त वचनें लिहिण्यांत आलीं; याचा निवाडा करतांना क्षणभर भ्रम पडेलच पडेल. समर्थांच्या वचनाप्रमाणें पाहिलें तर जावजींची गणना, समर्थ ज्यांस उत्तम पुरुष म्हणतात त्या कोटींत होते, असें म्हणायला हरकत नाहीं."[१]

१ काव्यसंग्रह—मे १८९२, अंक २९ वा

## १६

## एकाऐवजीं दोन जावजींचा लाभ

जावजीशेठ ह्यांच्या निधनानंतर त्यांच्या मागें काय काय प्रकार घडतील, ह्यासंबंधीं अनेकांनीं आपआपल्या कल्पनेप्रमाणें नाना तर्कवितर्क केले. कारण जावजीशेठ ह्यांनीं आपल्यामागें फार मोठा पसारा करून ठेविला होता. आपल्याठायीं असलेल्या कित्येक असामान्य गुणांच्या बळावर मुद्रण नि प्रकाशन-क्षेत्रांतील पसारा त्यांनीं अवाढव्य प्रमाणांत वाढविला व आपल्या कर्तबगारीच्या बळावर त्या पसाऱ्याला ते पुरून उरले. कोणत्याही बाबतींत त्यांनीं उणें भासूं दिलें नाहीं व लौकिकही अपरंपार नि कोणीही हेवा करावा इतका मिळविला.

त्यांच्या निधनोत्तर लोक म्हणूं लागले कीं, त्यांची कर्तबगारी नि थोरपण त्यांच्याबरोबर. त्यांच्या मागें त्यांचीं मुलें असलीं तरी तें धोरण नि वळण त्यांना थोडेंच साधणार आहे? आणि जगांत आपल्या सभोंवार आपण नेहमीं काय बरें पहातों? महत् प्रयासांनीं व सारीं धोरणें संभाळून एकाद्या कारखान्याची उभारणी कोणी तरी कर्तबगार पुरुष करतो; परंतु त्याच्या मागें अनेक कारणांमुळें त्यांतील चैतन्य आस्ते आस्ते नामशेष होण्याच्या मार्गाला लागतें.

सारी सजावट सुंदर रीतीनें तयार झालेली असते. ती सांभाळण्याचें तेवढें कार्य मागें राहिलेल्यांनीं दक्षतापूर्वक पार पाडावयाचें असतें. परंतु तेवढाही कर्तबगारीचा भाग पार पाडतां येत नाहीं, अशीं उदाहरणें किती तरी दाखवून देतां येतील.

आणि त्यांतही संपत्तीचे किंवा इस्टेटीचे मालकी हक्क गाजविणारे एकापेक्षां अधिक असले म्हणजे त्यांच्यामध्यें उघळपट्टीच्या बाबतींत चढाओढ लागून रहाते. तंटेभांडणांस ऊत येऊन कोर्टाची पायरी चढण्याचे प्रसंग उद्भवतात आणि शेवटीं जाग्यावर शिल्लक कांहीं रहात नाहीं !

हेंच पहा ना ! जावजीशेठच्या निधनानंतर अनेकांनीं आपापल्या कल्पनांच्या वावड्या उंच उंच उडविल्या ! स्मशानांतून परततांना कोण काय म्हणालें, त्याची जावजींचे एक मित्र नि मार्गदर्शक विनायक कोंडदेव ओक यांनीं नोंद करून ठेवली आहे. 'काय हो ! जावजींनीं केवढा मोठा पसारा करून ठेविला आहे ! तो त्यांच्या मुलांना आवरतां का येणार आहे ? त्यापेक्षां त्यांनीं शहाणपणा करावा. कोणता ? तो पसारा त्यांनीं मोडून टाकावा नि छापखान्याच्या चाळी भाड्यानें देऊन टाकाव्या नि येईल तें उत्पन्न पदरांत पाडून घ्यावें आणि स्वस्थ रहावें ! कटकटी हव्यात कशाला ? त्या का झेपणार आहेत त्यांना !'

आहे कीं नाहीं पोक्त, परंतु पाय मोडून घालणारा सल्ला !

दीनबंधुकार लोखंडे हे जावजीशेठजींच्या स्नेहीगंडळींत गोडणारे. ते मृत्युलेखांत काय लिहितात पहा !

"आतां जावजी हे परलोकवासी झाले आहेत, तेव्हां राणोजी यांचें निर्णयसागर छापखान्यावरील प्रेम कोणत्याही रीतीनें कमी न होईल अशाविषयीं खबरदारी ठेवण्याविषयीं आम्हीं जावजींच्या खऱ्या मित्रांस, त्याचप्रमाणें त्यांचे वडील चिरंजीव तुकाराम जावजीशेठ यांस कळवून ठेवतों. कारण आतां "आठ कारभारी आणि बारा चौधरी" होण्याची वेळ आली आहे ! ज्याप्रमाणें जावजी यांच्या दरान्यानें, चांगुलपणानें व वेळ पडल्यास पैसे खर्चून काम होत असे, त्याप्रमाणें यापुढेंही सुरळीत चालेल, अशी इच्छा धरणें वाजवी होणार नाहीं !"[1]

अशा प्रकारें मोफत व न मागतां स्वयंस्फूर्त सल्ला देणाऱ्यांत एक गुण मात्र सर्वसाधारण दिसून येतो. तो म्हणजे जावजीशेठच्यामागें त्यांच्या कुटुंबियांचें भलें व्हावें हाच होय. परंतु एवढी घाई न करतां त्या लोकांनीं

१ दीनबंधु : ता. १०-४-९२

कांहीं दिवस थांबून मग सबुरीनें अभिप्राय प्रगट करणेंच योग्य झालें असतें, नाहीं का ?

जावजीशेठचे चिरंजीव तुकारामशेठ (वय २८) नि पांडुरंगशेठ (वय १८) हे दोघेही वयांत आलेले नि चांगलें समजूं उमजूं लागलेले होते. त्यांना आपल्या शिरावरील जबाबदारीची पूर्ण जाणीव होती. त्यांना जाणीव असली तरी इतरेजनांस त्याची कल्पना असणें संभवनीय नव्हतें.

दूर रहाणाऱ्या लोकांचें कशाला ? शेठजींच्या अगदीं निकट सहवासांत असलेल्या विनायक कोंडदेव ओक, रामभाऊ गुंजीकर, गोविंदशास्त्री बापट, काशीनाथपंत परच ह्यांच्यासारख्या निकटवर्ती हितचिंतकांसही आतां शेठजींच्या निर्णयसागरचें पुढें काय होणार ? या बाबतींत चिंता वाटूं लागली. कारण मुलांचें ऐन तारुण्य, हातांत भरपूर पैसा घोळत रहाण्यासारखी परिस्थिति, मुंबईसारख्या शहरांत वास्तव्य, शिक्षण बेताबाताचें, अशा स्थितींत कोणी भलत्या सलत्या मार्गाकडे वळला नाहीं तरच नवल !

आणि तीच नवलाई तुकारामशेठ व पांडुरंगशेठ ह्यांनीं आपल्या सद्वर्तनानें सर्वांच्या नजरेस आणून दिली !

जावजीशेठ सदा सर्वकाळ आपल्या कारखानदारींत गुंतलेले असले तरी त्यांचें लक्ष घराकडे व आपल्या मुलांबाळांकडे सतत लागून राहिलेलें असे. त्यांना एका गोष्टीची पूर्ण जाणीव होती. आपण जो एवढा व्याप वाढवीत आहोंत व आपण जो लौकिक मिळविला, त्यांत आपल्यामागें भर कदाचित् नाहीं पडली तरी आपण जें संपादिलें तें आपलीं मुलें नीट सांभाळतील व ते आपण संपादिलेल्या लौकिकास सहसा गालबोट लावणार नाहींत.

त्या हेतूनें त्यांनीं दोन्हीं मुलांचें जरूरीपुरतें शिक्षण होतांच त्यांचा एकंदर कल लक्षांत घेऊन त्यांना कारखान्यांत प्रत्यक्ष काम करायला नि इतरांप्रमाणें राबायला लाविलें. छापखाना, मुद्रिका बनविण्याचा कारखाना, मुद्रिका जुळविण्याचें खातें, छपाई खातें, प्रकाशन विभाग वगैरे कारखान्याचे जे वेगवेगळे विभाग होते त्या प्रत्येक विभागांत आपल्या नजरेसमोर त्यांना इतरांप्रमाणें अंग मोडून काम करायला लाविलें.

मुद्रिका तयार करण्याचा कारखाना हें जावजींच्या सर्व पसाऱ्याचें मुख्य अंग व हुकमी उत्पन्नाचें साधन. त्याचें महत्त्व लक्षांत घेऊन जावजीशेठनीं

तुकारामजींना राणूजी आरू ह्यांच्या हाताखालीं तत्संबंधीं शिक्षण घेण्यासाठीं दीर्घकाळ ठेविलें. रोज तीन तास ह्याप्रमाणें सतत कांहीं वर्षें तुकारामजी त्यांच्या हाताखालीं मुद्रिका तयार करण्याचें पायाशुद्ध शिक्षण घेत होते.

कामगार कामें करताहेत. ते करीत रहातील. आपल्या मुलानें मुद्रिका घांसण्यांत हात खराब करण्याची काय जरूरी आहे ? आपण घांसकामाचे कष्ट उपसले तेवढे बस्स झाले, असें जावजीशेठना कधींही वाटलें नाहीं. त्यांची ही वृत्ति नि हें धोरण स्वतःस मालक समजणाऱ्या प्रत्येकानें लक्षांत घेण्यासारखें आहे. शेठजींच्यामागें त्यांचीं मुलें चांगलीं नि कर्तबगार निघालीं, ह्याचें मर्म लहानपणापासून त्यांनीं आपल्या मुलांच्या मनावर जे सुसंस्कार घडविले व त्यांना जें धंद्याला पोषक असें शिक्षण दिलें त्यांत आहे.

दुसरी एक लक्षांत घेण्याजोगी गोष्ट आहे. दोन भाऊ असले तर दोघांच्या दोन तऱ्हा, असा बहुधा प्रकार असतो. येथें तसा प्रकार मुळींच नव्हता. तुकारामजी नि पांडुरंगजी ह्यांच्या वयांत दहा वर्षांचें अंतर होतें. तुकारामजी ( १८६४ ते १९१८ ) आपल्या धाकट्या बंधूच्या सुखासमाधानासाठीं आयुष्यभर मनापासून झटले. पांडुरंगाला कोणत्याही प्रकारें त्रास होईल, त्याला शीण वाटेल, अशी जबाबदारी त्याच्यावर सोपवावयाची नाहीं, ह्यासाठीं तुकारामजी फार जपत असत. चांगला कपडा, चांगलें खाणें व जें जें कांहीं चांगलें असेल तें सारें पांडुरंगासाठीं ! अशी होती त्यांची वागण्याची प्रेमळ पद्धत. आणि पांडुरंगजी ? तेही वडीलबंधूचें मन कोणत्याही प्रकारें दुखविलें जाऊं नये, म्हणून फार जपायचे. त्यांनीं सोपविलेलें कोणतेंही काम असो; अगदीं मन लावून नि भूक तहान विसरून करायचे. त्यांच्या मागून त्यांच्या पावलांवर पाऊल टाकून चालायचे. ते करतील व म्हणतील तें प्रमाण. जणूं काय रामलक्ष्मणांची जोडी ! दोघांनाही एकमेकांबद्दल जिव्हाळा नि असीम आदर. येथें ओढून ताणून आणलेलें चंद्रबळ नव्हतें. जें वडिलांनीं वळण लावून दिलें, त्याप्रमाणें वागावयाचें. त्यांतच आपलें नि आपल्या घराण्याचें कल्याण आहे, अशी उभयतांचीही दृढ श्रद्धा होती.

जावजीशेठजींच्या मागें घरांत त्याचप्रमाणें कारखान्यांत जरासुद्धां फूट पडली नाहीं, ह्याचें मुख्य कारण दोघांही बंधूंचें ऐक्य नि कमालीचें सख्य होय.

शेठजींनी आपल्या घरांत प्रेमाच्या पायावर उभारलेली शिस्त नि सुव्यवस्था जशी निर्माण केली, त्याचप्रमाणें कारखान्यांतही सर्व कामगार नोकरवर्गांत आपुलकी निर्माण केली. ती आपुलकी क्षणिक नव्हती, तर चिरंतन काळ टिकून राहाणारी नि सात्त्विक अभिमानानें भारलेली होती. तुकारामशेठनीं तिला जरासुद्धां धक्का लावला नाहीं. तेंच सौजन्य, तीच प्रत्येकाबद्दल तळमळ नि तोच आपलेपणा.

त्यामुळें काय झालें ? घातलेली घडी जशीच्या तशी राहिली. विस्कळीतपणा बिलकुल आला नाहीं. उलटपक्षीं आतां आपल्यावरील जबाबदारी अधिक वाढली आहे, ह्यापुढें मागील जाणीव ठेवून दुप्पट उत्साहानें कारखान्याच्या उत्कर्षासाठीं झटलें पाहिजे, असें प्रत्येकास वाटूं लागलें.

जावजीशेठ ह्यांच्या निधनानंतर अनेक हितचिंतकांकडून त्यांच्या चिरंजिवांस सांत्वनपर पत्रें आलीं. सर्वांनीं भावी काळाबद्दल शुभेच्छा प्रकट केल्या. त्या पत्रांत तत्कालीन रसिक कवि केशव विश्राम फणसे (सिहोरा) ह्यांचें एक काव्यमय पत्र होतें. तें सद्भावनांनीं परिपूर्ण होतें. कविवर्यांनीं त्यांत आपलें सारें अंतःकरण ओतलें होतें. मागील एका प्रकरणांत तत्संबंधीं उल्लेख आलेला आहेच. त्यांनीं त्यांत पुढीलप्रमाणें अपेक्षा प्रकट केली होतीः—

"एका जावजिबद्दल प्राप्त जाहले अम्हां जनां दोन ।
ऐसें म्हणतिल जेणें, जनीं असा तेंवि आज नांदोन ॥
जो हेतु–संघ राहे अपूर्ण तो करुनि पूर्ण जावजिचा ।
मिळवा अखंड कीर्ती उद्योगि–नरावरीच भाव जिचा ॥

इतरेजनांकडून प्रकट केल्या जाणाऱ्या अपेक्षा ह्या चांगल्याच असावयाच्या; परंतु त्या पालन करण्यासाठीं झटणें, अगदीं मनापासून झटणें हें आपलें पवित्र कर्तव्य मानणारीं माणसें ह्या जगांत क्वचितच आढळून येतात. तुकारामशेठ नि पांडुरंगशेठ ह्या उभय बंधूंनीं वडिलांच्या कीर्तीत भर घालण्यासाठीं झटणें हें आपलें पवित्र कर्तव्य मानिलें नि त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या उद्योगाची सारी मांडणी केली.

त्यामुळें फणसे कवींनीं अपेक्षिल्याप्रमाणें ज्यांचा ज्यांचा कार्यकारणपरत्वें निर्णयसागर-मुद्रणालयाशीं संबंध आला, त्या प्रत्येकास वाटूं लागलें कीं,

जावजीशेठ इहलोक सोडून गेले असले तरी त्यांच्या दोन सुपुत्रांच्या रूपानें आपणास दोन जावजीशेठजींचा लाभ झालेला आहे ! एवढा विश्वास संबंधित मंडळींत निर्माण करणें ही साधी का गोष्ट आहे ?

जावजीशेठच्या ध्येय - धोरणाशीं नि विचाराशीं तुकारामशेठ सर्वतोपरी एकरूप झाले होते. त्यांच्या आशा-आकांक्षांची, वागणुकीची नि ध्येय-धोरणाची त्यांना पूर्ण जाणीव होती. त्यांच्या ज्या आकांक्षा फलद्रूप होऊं शकल्या नाहींत; त्या त्यांच्यामागें शक्य त्या मार्गांनीं फळास याव्या, ह्यासाठीं ते मनापासून झटले व नुकसान होण्याचा संभव स्पष्टपणें दिसत असतांही त्यांच्या ध्येयानुरूप जें जें करतां आलें तें तें त्यांनीं कर्तव्यबुद्धीनें केलें. तुकारामशेठजींचें हें फार मोठें नि वाखाणण्याजोगें वैशिष्ट्य आहे.

हेंच पहा ना. एक 'बालबोध' मासिक सोडलें तर 'काव्य-संग्रह' व 'काव्य-माला' हीं दोन मासिकें म्हणजे जाणून बुजून आंतबट्ट्याचा कारभार होता. जावजीशेठच्या गादीवर दुसरा कोणी आला असता तर त्यानें म्हटलें असतें कीं, 'जनतेंत ज्ञानप्रसार करणें, संस्कृति-संवर्धनास हातभार लावणें नि लोककल्याण साधणें ह्या गोष्टी महत्त्वाच्या असतील; त्यासाठीं वडिलांनीं जन्मभर नुकसान सोसलें. त्या भावना आणि तें नुकसान त्यांच्याबरोबर गेलें ! मला व्यवहार करावयाचा आहे. मला आंतबट्ट्याचा व्यवहार करावयाचा नाहीं. नुकसान सोसण्याला कांहीं मर्यादा असतेच कीं नाहीं ? झालें तेवढें बस्स झालें !'

परंतु नाहीं; तुकारामशेठनीं तसें कांहीं म्हटलें नाहीं किंवा कोणत्याही प्रकारें त्रागाही केला नाहीं. कारण तुकारामशेठ म्हणजे जावजीशेठजींची हुबेहुब प्रतिमा होते. दोघांच्याही विचारांत आणि भावनांत कमालीचें साम्य. त्यामुळें फणसे कवियर्यांनीं म्हटल्याप्रमाणें—'जो हेतुसंघ राहे अपूर्ण तो करूनि पूर्ण जावजिचा' ह्या गोष्टीकडे त्यांचें लक्ष मुद्रणालयाचीं सूत्रें हातीं घेतल्यापासून लागून राहिलें होतें.

वर सांगितल्याप्रमाणें जावजीशेठनीं विशिष्ट पवित्र हेतूंनीं 'बालबोध,' 'काव्यमाला,' 'काव्यसंग्रह' हीं तीन मासिकें सुरू केलीं, तीं तुकारामशेठजींनीं जोंपर्यंत परिस्थिति सर्वतोपरी आटोक्याबाहेर गेली नाहीं, तोंपर्यंत मोठ्या हिंमतीनें चालू ठेविलीं.

एवढेंच काय, परंतु जावजीशेठजींच्या मनांत ज्ञान-प्रसाराच्या दृष्टीनें जे कांहीं हेतु नि आकांक्षा वावरत होत्या, त्या अंमलांत आणण्याकडेही तुकारामजींनीं आपलें लक्ष वळविलें. जुने ऐतिहासिक कागदपत्र, बखरी नि गतेतिहासावर प्रकाश टाकणारीं साधनें हरप्रयत्नांनीं मिळवून तीं प्रकाशांत आणणें, हें त्या काळांतील एक महत्त्वाचें कार्य होतें. काव्येतिहास-संग्रहानें तें कांहीं वर्षे केलें. तें कार्य आपल्या हातून पार पडावें अशी जावजीशेठ यांची फार इच्छा होती. अनेक कारणांमुळें ती पार पाडणें त्यांना शक्य झालें नाहीं. ती जबाबदारी सांभाळणारा योग्य नि लायक माणूस मिळाला पाहिजे, साधनांचा वेळोवेळीं पुरवठा झाला पाहिजे; त्याचप्रमाणें त्या विषयाचें गम्य असलेल्यांचा सहकार मिळाला पाहिजे. जावजीशेठ त्या प्रयत्नांत होते. परंतु त्यांना तत्कालीन प्रतिकूल परिस्थितीमुळें म्हणा, वा अन्य कारणांमुळें म्हणा, त्या प्रयत्नांत यश मिळालें नाहीं.

जावजीशेठना तसेंच तुकारामजींनाही हा एक आंतबट्ट्याचा व्यापार आहे, त्यासाठीं नुकसान सोसण्याची आपण नेहमीं तयारी ठेविली पाहिजे, याची पूर्ण जाणीव होती. त्याचबरोबर हें एक संस्कृतिसंवर्धक नि देशकल्याणाच्या दृष्टीनें उपयुक्त कार्य आहे, ह्या गोष्टीचीही त्यांना जाणीव होती. कांहींही होवो. जें जनतेच्या दृष्टीनें उपकारक तें करण्यासाठीं झटायचें, ही होती जावजीशेठप्रमाणें तुकारामजींची दृष्टि.

वडिलांच्यामागें सतत दहा वर्षे तुकारामशेठ 'इतिहास-संग्रह' मासिक सुरू करण्याच्या उद्योगांत होते. शेवटीं १९०८ सालीं त्यांनीं तें मासिक सुरू करण्यांत यश मिळविलें. ह्या प्रकाशनासंबंधीं सविस्तर माहिती एका स्वतंत्र प्रकरणाच्याद्वारें करून देण्यांत आलेली आहेच. त्याचप्रमाणें त्यांना कोणतें मासिक कोणत्या परिस्थितींत बंद करावें लागलें, तोही वृत्तांत त्या त्या प्रकरणांत देण्यांत आलेला आहे.

जावजीशेठजींच्या मनांत 'बालबोध' जसा विद्यार्थ्यांसाठीं, तसेंच थोरामोठ्यांसाठीं 'प्रौढबोध' नांवाचें मासिक सुरू करावें, असें फार होतें. प्रयत्न करूनही त्यांना तें सुरू करतां आलें नाहीं. तुकारामजींना वडिलांची ही इच्छा माहीत होती. ती पूर्ण व्हावी असें त्यानाही मनापासून वाटत असे. ह्या बाबतींत तत्कालीन कांहीं विद्वानांशीं झालेला त्यांचा पत्रव्यवहार आमच्या पहाण्यांत

आलेला आहे. विनायक कोंडदेव ओक ह्यांच्याप्रमाणें सर्वस्वी त्याच कार्याला वाहिलेला नि जबाबदारीनें त्यासाठीं झटणारा कोणी संपादक त्यांच्या आटोक्यांत न आल्यामुळें तो बेत त्यांना निरुपायानें सोडून द्यावा लागला.

संस्कृत-ग्रंथांचें नि संत-वाङ्मयविषयक ग्रंथांचें प्रकाशन तर त्यांनीं केवळ वडिलांप्रमाणेंच नव्हे तर त्यांच्यापेक्षां अधिकाधिक उत्साहानें व हिंमतीनें चालू ठेविलें.

विनायक कोंडदेव ओक ह्यांनीं जावजीशेठ नि तुकारामशेठ ह्या पिता-पुत्रांची कारकीर्द अगदीं जवळून पाहिलेली. ते तुकारामशेठसंबंधीं काय म्हणतात पहा :—

'मित्र तुकारामशेठ आपल्या वडिलांचे सगळे गुण घेऊन चालले आहेत. स्वतः निरंतर उद्योग करणें, सगळ्या व्यवहारांत सत्यशीलतेनें वागणें, हाताखालच्या माणसांस ममतेनें वागविणें, श्रेष्ठांचा व शिष्टांचा स्नेह संपादणें, गरीब-गुरिबांस साह्य करणें, थोरांचा संतोष राखण्यास झटणें, स्वधर्मानें वागणें आणि आपणापासून कधीं कोणास दुःख होऊं नये, होईल तर थोडेंबहुत सुखच व्हावें, अशा रीतीनें आपलें सगळें वर्तन ठेवणें, ह्याविषयीं ते नेहमीं जपत असतात. त्यांतही निरंतर उद्योग करून आणि त्यांत एकसारखें लक्ष ठेऊन, त्यांनीं छापखान्यासंबंधाच्या सगळ्या खात्यांत एकसारखें प्रावीण्य संपादिलें आहे."[१]

जावजीशेठजींच्या मार्गे सर्वस्वी त्यांच्या धोरणानें वागून नि त्यांच्या पावलांवर पावलें टाकून तुकारामजींनीं कारखान्यांत नि वाङ्मय-प्रकाशनांत किती भर घातली व 'बापसे बेटा सवाई' ही म्हण कशी सर्वार्थानें सार्थ करून दाखविली, ह्याची यथातथ्य कल्पना पुढील कांहीं आंकड्यांवरून सहज करतां येण्यासारखी आहे.

जावजीशेठ १८९२ सालीं इहलोक सोडून गेले आणि तुकारामशेठ १९१८ सालीं निधन पावले. तुकारामजींची कारकीर्द एकंदर सव्वीस वर्षांची. त्या कालावधींत केवढें स्थित्यंतर घडून आलें पहा!

जावजीशेठजींच्या वेळीं मराठी मुद्रिका वीस प्रकारच्या होत्या; तुकारामजींनीं त्यांत भर घालून तो आंकडा चाळीसपर्यंत पोहोंचविला. गुजराती

१ जावजी कीर्तिप्रकाश–विनायक कोंडदेव ओक, प्रस्तावना पृ. १४

मुद्रिकांचे पंधरा प्रकार होते, त्यांत आणखी दहा प्रकारांची भर पडून तो आंकडा पंचविसांवर गेला. इंग्रजी मुद्रिका पूर्वी फारशा नव्हत्या. तुकारामजींनी साठ प्रकारच्या इंग्रजी मुद्रिका तयार करविल्या. हिब्रू मुद्रिका पूर्वी दोन प्रकारच्या होत्या, त्या पांच प्रकारच्या बनविण्यांत आल्या. कानडी मुद्रिका तात्पुरत्या कामासाठीं एकाच प्रकारांत मोडणाऱ्या होत्या, त्या बारा प्रकारच्या झाल्या. शिवाय नवीन प्रकारच्या मराठी अखंड-मुद्रिका इतर छापखानेवाल्यांसाठीं मुबलक प्रमाणांत उपलब्ध झाल्या.

हें झालें मुद्रिका-निर्मितीसंबंधानें. आतां आपण प्रकाशन-क्षेत्रांत तुकारामजींनीं कुठवर मजल मारली तें पाहूं या.

पूर्वी मालकीचीं संस्कृत पुस्तकें १९३ होतीं. तुकारामजींच्या काळांत तीं संख्या ४०० वर जाऊन पोहोंचली. मराठी पुस्तकें २२८ होतीं, तींही ४०० वर गेलीं. गुजराती व हिंदी मिळून १५ होतीं तीं ५० वर गेलीं. शिवाय दोन कानडी पुस्तकांचीही भर पडली.

पूर्वी (१८९२) कारखान्यांत २५० माणसें कामावर होतीं, तर तुकारामजींच्या काळांत तो आंकडा ३७५ वर जाऊन पोहोंचला. पूर्वी पगार वाटप ३५०० रुपयांत होत असे, तर तुकारामजींच्या काळांत मासिक वेतनानें ६५०० रुपयांपर्यंत मजल गांठली.

एवढ्यावरून तुकारामशेठनीं कारखान्याची, मुद्रिकांची नि ग्रंथप्रकाशनाची वाढ सर्व बाजूंनीं किती भव्य प्रमाणांत घडवून आणिली, ह्याची कल्पना करतां येईल.

काळ झपाट्यानें बदलत चालला होता. इतर क्षेत्रांप्रमाणें छापखान्यांच्या क्षेत्रांतही नवनवीन सुधारणा झपाटेबंद स्वरूपांत घडून येत होत्या. मुंबईंत छापखान्यांची वाढही वेगानें होऊं लागली होती. ह्या नव्या जमान्याशीं तुकारामशेठनीं धैर्यानें तोंड देऊन काळावर मात करून दाखविली. छापखान्यांच्या जगांत त्यांनीं आपलें वजन कायम ठेविलें एवढेंच नव्हे, तर कांहीं बाबतींत तें त्यांनीं वाढविलेंही.

संस्कृत ग्रंथांच्या अक्षरजुळवणीसाठीं व छपाईसाठीं विशिष्ट प्रकारच्या मुद्रिका लागतात. त्या आपल्या कारखान्यांत तयार करण्याचें कौशल्य प्रथम जावजीशेठ नि त्यांचे सहकारी राणूजी आरू ह्यांनीं प्रकट केलें व त्यांत तुकारामजींनीं

बहुमोलाची भर घालून भारतांतच नव्हे तर इंग्लंड, जर्मनी, रशिया, अमेरिका ह्यांसारख्या दूरदूरच्या देशांतही निर्णयसागर मुद्रणालयाचा यशस्वी कीर्तिध्वज फडकविला. परदेशांतील थोर नि जाणकार विद्वानांनीं त्याबद्दल ह्या मुद्रणालयाची मुक्त कंठांनीं प्रशंसा केलेली आहे. निर्णयसागर-मुद्रणालयानें परदेशांनाही संस्कृत-मुद्रिका त्याकाळी पुरविल्या आहेत.

लोकमान्य टिळक ह्यांचें इतर अनेक सुधारणांप्रमाणें मुद्रिका व सुलभ छपाई ह्याकडेही फार बारकाईनें लक्ष होतें. ह्यासंबंधीचा उल्लेख अकराव्या प्रकरणांत आलेला आहेच. निर्णयसागर-मुद्रणालय नि त्याचे चालक ह्यांच्याबद्दल त्यांना आदरभाव वाटत असे. त्याबाबतींत त्यांनी तुकारामशेठजींच्या सहकाराची अपेक्षा करतांच त्यांनीं तो दिला. त्यासंबंधीं प्रत्यक्ष माहिती असलेले विनायक कोंडदेव ओक हे लिहितात कीं, "रा. रा. बाळ गंगाधर टिळक ह्यांच्या मनांत फार दिवसांपासून घोळत होतें की, इंग्रजी लिपीचे टैप आपोआप ओतले जाऊन त्यांच्या ओळी बनून त्या छापण्याची युक्ति सध्यां ( १९०९ ) जशी प्रचारांत आली आहे, तशी रचना मराठीची करावी. त्याकरितां त्यांनीं आपल्या पुण्यांतल्या कारखान्यांत आपल्या कामदारांकडून पंच करून पाहिले, पण ते त्यांच्या मनासारखे झाले नाहींत; म्हणून पंच व मेट्रिसी त्यांनीं तुकारामशेठजींच्याद्वारें राणूजींकडून करवून घेऊन मागितल्या. त्या त्यांनी त्यांस मोठ्या आनंदानें करून दिल्या. त्या रा. रा. टिळक ह्यांस फार पसंत पडल्या; आणि त्यांनीं त्याबद्दल राणूजींची फार वाहवा केली. पण तें काम पुढें कांहीं अनिवार्य अडचणींमुळें तसेंच मागें पडलें, त्यास उपाय नाहीं. त्याप्रमाणेंच केसरींतल्या अक्षरांत अलीकडे जो सुबकपणा विशेष दृष्टीस पडतो, तो तुकारामशेठजींनीं आपल्या कारखान्यांतल्या मेट्रिसी रा. रा. टिळक ह्यांनीं मागितल्यावरून त्यांस दिल्या, त्याचा परिणाम आहे. ही व्यापारासंबंधाची निर्मत्सरवृत्ति कारखानदारांत फारच क्वचित दृष्टीस पडते. कां कीं, ती धंद्याच्या अभिवृद्धीच्या आड येते. पण, तुकारामशेठजवळ तें नाहीं."[१]

ह्यावरून तुकारामजींनीं व आरूंनीं मुद्रिका तयार करण्याच्या क्षेत्रांत किती प्रावीण्य नि तज्ज्ञता संपादन केली होती, ह्याची कल्पना करतां येईल.

---

१ जावजी कीर्ति-प्रकाशः वि. कों. ओक प्रस्तावना, पृ. २४–२५

मुद्रिका नि छापखाना ह्यांसंबंधीं कोणताही व्यवहार असो, किंवा त्या व्यवहारांत मतभेद किंवा तंटे निर्माण झालेले असोत, ते अखेरच्या निर्णयासाठीं तुकारामजींकडे येत असत नि त्यांचा निर्णय मान्य केला जात असे, इतकी त्या क्षेत्रांतील त्यांची तज्ज्ञता नि योग्यता होती.

हें महत्त्व त्यांना आलें ह्याचें कारण, वडिलांच्या व राणूजी आरू ह्यांच्या-सारख्या त्या क्षेत्रांतील भीष्माचार्यांच्या नेतृत्वाखालीं त्यांनीं केलेली एकनिष्ठ तपश्चर्या, सतत त्याच विषयांचा व्यासंग नि निरभिमानता हींच होत.

भारताच्या कोणत्याही भागांत किंवा इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, रशिया, ह्यांसारख्या परराष्ट्रांतील कोणा संस्कृतज्ञ पंडितास किंवा संस्थेला कितीही तोलामोलाचा संस्कृत-ग्रंथ बिनचूक सुंदर रीतीनें नि सुयोग्य मुद्रिकांत छापावयाचा असल्यास तें बहुमोलाचें छपाईचें काम निर्णयसागर-मुद्रणालयाकडेच यावयाचें, अशी जी परंपरा जावजीशेठपासून सुरू झाली, ती तुकारामजींच्या काळांत विशेष वृद्धिंगत झाली व आजही ती परंपरा तशीच अव्याहत चालू आहे.

निर्णयसागर-मुद्रणालयाची ही कामगिरी अजोड, अनन्यसाधारण, तशीच कोणीही हेवा करावा अशा स्वरूपाची आहे.

कोणताही व्यवसाय असो; त्याला महत्त्व प्राप्त होतें तें केव्हां? कसाबसा धंदा करायचा व त्यांत दोन पैसे मिळवायचे, ह्याला का व्यवसाय म्हणतात? व्यवसाय हा व्यवस्थितपणें करायचा असतो. त्याच्याशीं संलग्न अशा कांहीं निष्ठा असतात, त्यांची जीवेंभावें जपणूक करायची असते. त्यासाठीं जिवाचें रान करावें लागतें; स्वार्थ बाजूला सारावा लागतो नि स्वतः गुण-सुंदर बनून आपल्या व्यवसायांत सौंदर्याची पेरणी करावी लागत असते.

जावजीशेठनीं हीं सारीं पथ्यें पाळिलीं आणि पुत्रांनीं त्यांच्या जीवनाचें हें तत्त्वज्ञान आत्मसात् करून तें आचरणांत आणल्यामुळें, निर्णयसागरचा नांवलौकिक सर्वत्र झाला.

हे पितापुत्र केवळ आपल्या व्यवसायाच्या पसाऱ्यांत गडप होऊन राहिले नाहींत. आपल्या व्यवसायाबाहेर विशाल जग आहे, ह्याचीही त्यांना जाणीव होती. जावजीशेठजींचें सारें आयुष्य कारखान्याची उभारणी करून त्याची नीट व्यवस्था लावण्यांत गेलें. ती व्यवस्था लावीत असतां लोकशिक्षणाच्या नि

ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें जें जें त्याकाळीं करतां आलें तें त्यांनीं सहज रीतीनें केलें. समाजोन्नतीच्या दृष्टीनें आपल्या हातून अधिकाधिक कार्य घडावें असें त्यांना वाटत असे. तुकारामशेठ नि पांडुरंगशेठ ह्या त्यांच्या दोन्ही पुत्रांनीं तोच हेतु दृष्टीपुढें ठेवून त्यांच्या कार्याला उजाळा आणिला.

कोणतेंही सार्वजनिक हिताचें किंवा समाजहिताचें कार्य असो; त्याला यथाशक्ति हातभार लावणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे, असें हे बंधु मानीत असत. चिखलवाडींत व छापखाना ज्या भागांत आहे, त्या कोलभाट लेनमध्यें (आतां डॉ. वेलकर स्ट्रीट) त्यांनीं वडिलांच्या नांवें अनेक इमारती बांधल्या नि अनेक कुटुंबांची रहाण्याची सोय करून उत्पन्नही वाढविलें. त्याकाळीं स्थापन झालेल्या मराठा प्लेग हॉस्पिटलला बरीच मोठी रक्कम दिली व रोग्यांसाठीं एक स्वतंत्र विभाग बांधवून घेऊन त्याला 'जावजीवार्ड' असें नांव देवविलें. मराठा ऐक्येच्छु सभेच्या विद्याप्रसारक फंडाला साडेतीन हजार रुपयांची देणगी देऊन एका विद्यार्थ्यास दरमहा दहा रुपये शिष्यवृत्ति देवविण्याची व्यवस्था करविली. तसेंच समाजांतील गरीब विद्यार्थ्यांच्या विद्यार्जनासाठीं स्वतः तीन हजार रु. देऊन तुकारामशेठनीं त्यांत प्रो. ह. वडदे व आ. स. डोंगरे ह्या आपल्या स्नेह्यांस भर घालायला लाविली, व त्या निधींतून उच्च शिक्षण घेऊं इच्छिणाऱ्यांची सोय करविली. फर्ग्युसन कालेज (पुणें), मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय वगैरे अनेक लोकोपयोगी शैक्षणिक संस्थांना त्यांनीं उदारहस्तें सहाय्य केलें.

तुकारामशेठजींची सव्वीस वर्षांची यशस्वी कारकीर्द त्यांच्या निधनावरोबर १९१८ सालीं संपली व बंधु पांडुरंगशेठ (१८७४ ते १९४०) ह्यांचा जमाना सुरू झाला. हा जमाना संमिश्र होता. तुकारामशेठजींची कर्तव्यदक्ष नि चतुर पत्नी श्रीमती जिजाबाई ह्यांनीं आपल्या दिरास छापखाना चालविण्याच्या बाबतींत बहुमोलाचा सहकार दिला. एवढा मोठा छापखान्याचा नि टाईप फाऊंड्रीचा पसारा पांडुरंगजींना कसा आवरतां येणार, ह्याबद्दल त्यांना काळजी वाटत होती. त्यांच्याठायीं जशी जबाबदारीची जाणीच होती, तशीच छापखान्यांतील निरनिराळ्या खात्यांची नि तेथील कामकाजाची माहितीही होती. ही वेळ दुःख करीत हातपाय गाळून घरांत बसून रहाण्याची नसून छापखान्यांत बसून यथाशक्ति हातपाय हालविण्याची आहे, हें जिजाबाईंनीं अचूक ओळखलें व त्या रोज नित्यनेमानें छापखान्यांत येऊन बसूं लागल्या नि देखरेख करूं लागल्या.

पांडुरंगजींनी जशी आपल्या बंधूंवर श्रद्धा होती, तशीच त्यांच्या पत्नीवरही होती. कोणताही प्रश्न असो; वहिनींच्या सल्लामसलतीशिवाय निर्णय घ्यायचा नाहीं, हें मत त्यांनीं शेवटपर्यंत चालविलें.

श्रीमती जिजाबाईंबद्दल पांडुरंगजींना किती आदरभाव वाटत असे हें त्यांच्याच शब्दांत निवेदन करणें अधिक चांगलें. ते एके ठिकाणीं म्हणतात'— "वडिलांच्या मृत्युसमयीं आम्ही लहान होतों व तुकारामजींनीं आमच्यावर अगदीं अकृत्रिम प्रेम करून आमचें पूर्णपणें पुत्रवत् लालनपालन केलें. आम्हांस कोणतीही तोशीस लागूं दिली नव्हती. त्यांचें आमच्यावरील छत्र नाहींसें झाल्यामुळें आमची स्थिति त्यावेळीं कशी झाली असेल तें कल्पनेनेंच जाणणें बरें. त्यावेळीं युरोपांत महायुद्ध चालू होतें. (१९१८) त्याचा परिणाम हिंदुस्थानांतील उद्योगधंद्यांवर झाला होता. सर्वत्र महागाई होऊन उद्योगधंदे बसल्यासारखे झाले होते. त्यांतच कांहीं प्रापंचिक अडचणीही उद्भवल्या; परंतु तशा त्या दुःखाच्या आणि अडचणीच्या वेळीं आम्हांस मातृवत् असलेल्या, तुकारामजी यांच्या समंजस, सात्त्विक व सुशील पत्नी, श्रीमती जिजाबाई, यांनीं आम्हांस धीर देऊन संकटांतून बाहेर पडण्याचा मार्ग दाखविला. अद्यापही (जानेवारी १९४०) आमचें मार्गदर्शकत्व त्यांच्याकडेच असून त्यांच्या सल्ल्याशिवाय कोणतीही गोष्ट करणें आमच्या जिवावर येतें."

पांडुरंगजी हे लहानपणापासून लाडांत वाढलेले. ज्या कारखान्यांत शेंकडों माणसें वावरतात व ज्या कारखान्याचा सर्वत्र नांवलौकिक झालेला आहे, तसेंच ज्याचा कार्यकारणपरत्वें नानाप्रकारच्या लोकांशीं सतत संबंध येतो, त्याची बूज राखली गेली पाहिजे, घरांतील व कारखान्यांतील कर्ता पुरुष गेला, त्याची जागा भरून काढली पाहिजे, फट पडली असें कोणालाही वाटतां कामा नये, ह्याची त्या कर्तव्यपरायण माउलीला अहोरात्र चिंता!

श्रीमती जिजाबाईंनीं खरोखर आपलें नांव सार्थ केलें! त्यांना संतान नव्हतें. त्यांनीं पूर्वीपासून पांडुरंगजींवर पुत्रवत् प्रेम केलें व पांडुरंगजीही मातेच्या नात्यानें त्यांच्याकडे पाहूं लागले. त्या माउलीच्या रूपानें त्यांना खंबीर

१ वामन पंडितकृत कवितासंग्रह भाग २ रा.
प्रकाशक ह्या नात्यानें पांडुरंग जावजी चौधरी ह्यांचे हस्त. पृ. ३

मार्गदर्शक लाभला आणि त्यामुळें घरांतील नि कारखान्यांतील सारे प्रश्न सुरळीतपणें सुटत गेले.

ह्या ठिकाणीं जातां जातां एक गोष्ट नमूद करणें जरूर आहे. जावजी शेठजींच्या घराण्यांत पुरुषांप्रमाणें कर्तबगार स्त्रियांचीही परंपरा आढळून येते. ती परंपरा आजही चालू आहे. गेलीं शंभर वर्षें निर्णयसागर-मुद्रणालय एकाच घराण्याकडे अखंडपणें चालू आहे. हें कशाच्या बळावर? ह्याचें मुख्य कारण म्हणजे ज्या ज्या वेळीं जरूर भासली त्या त्या वेळीं त्या घराण्यांतील कर्तबगार स्त्रिया कारखान्याच्या सूत्रचालक ह्या नात्यानें पुढें सरसावत राहिल्या. त्यामुळें दैनंदिन कारभारांत कधींही खंड पडूं शकला नाहीं.

कर्तबगार वहिनींचा संपूर्ण सहकार संपादन करून पांडुरंगजींनीं महागाईच्या व भीषण चढाओढीच्या काळांतही कारखान्याचा गाडा बावीस वर्षेंपर्यंत यशस्वी रीतीनें रेटला.

आपल्या वडिलांनीं नि वडील बंधूंनीं मुद्रण-प्रकाशन व्यवसायांत जो लौकिक मिळविला तो टिकवून धरण्याची जबाबदारी आपल्या शिरावर आहे, ह्या जाणिवेनें पांडुरंगशेठ आयुष्यभर वावरले.

त्यांची मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांतील कर्तबगारी नि त्यांचें औदार्य लक्षांत घेऊन तत्कालीन सरकारकडून त्यांनाही जे. पी. चे अधिकार देण्यांत आले. त्याप्रसंगीं त्यांच्या चहात्यांनीं व नोकरवर्गानें एक भव्य सत्कार-समारंभ घडवून आणिला. त्यावरून त्यांनीं केवढी लोकप्रियता संपादन केली आहे ह्याची सर्वांना बरोबर कल्पना करतां आली.

मुंबईतील 'प्रेस ओनर्स असोसिएशन' ह्या संस्थेचे ते उपाध्यक्ष होते. संस्थेच्या कारभारांत ते आत्यंतिक आपुलकीनें भाग घेत असत. त्याकाळीं ह्या संस्थेतर्फे छापखान्यासंबंधीं शिक्षण देण्यासाठीं एक विद्यालय स्थापन करण्यांत आलें होतें. त्याला आर्थिक नि इतर दृष्टींनीं त्यांनीं फार मोठ्या प्रमाणांत मदत केली.

अनेक संस्थांशीं अध्यक्ष, उपाध्यक्ष किंवा इतर नात्यानें त्यांचा निकट संबंध होता. मराठा ऐक्येच्छु सभा, मराठा तिलोरी समाज, मराठा प्रॉव्हिडंट फंड, केळुसकर स्मारक मंडळ, अहल्याबाई मोफत वाचनालय, माधवराव रोकडे मोफत शाळा, मुंबई मराठी ग्रंथ-संग्रहालय अशा किती संस्थांचीं नावें सांगावीं? ह्या सर्व संस्थांना त्यांच्या औदार्याचा नि मार्गदर्शनाचा लाभ झालेला आहे.

नाशिक येथें उदाजी मराठा विद्यार्थि-वसतिगृहांतील विद्यार्थ्यांना विद्याभ्यासाबरोबर धंदे-शिक्षणही संपादन करतां यावें, या सद्हेतूनें त्यांनीं त्या संस्थेला एक मुद्रणालय घेऊन दिलें. धार्मिक नि संस्कृत ग्रंथांचें प्रकाशन निर्णयसागरनें विशेष मोठ्या प्रमाणांत केलें असल्यामुळें त्यांच्याकडे ग्रंथांच्या अपेक्षेनें वेळोवेळीं अनेक विद्यार्थी नि शास्त्री-पंडित येत असत. त्यांची अडचण व जरूरी लक्षांत घेऊन पांडुरंगशेठ त्यांना ग्रंथ-भेटीनें उपकृत करीत असत. जावजीशेठजींपासून ही परंपरा अखंड चालू होती.

निर्णयसागरचा संस्कृत ग्रंथप्रकाशनाचा लौकिक देशभर पसरलेला होता. त्यामुळें विद्वानांच्या नि शास्त्री-पंडितांच्या मनांत निर्णयसागरबद्दल एकप्रकारची पवित्र नि प्रेमादराची भावना वास करीत असे. असे विद्वान व शास्त्रीपंडित मुंबईंत आले असतां निर्णयसागर-मुद्रणालयास भेट देणें हें त्यांना आपलें एक पवित्र कर्तव्य आहे असें वाटत असे. अशाप्रसंगीं त्यांचा यथोचित सत्कार करणें, हें चालकांसही आपलें एक कर्तव्य आहे असें वाटत असे.

श्रीमंतीचा यत्किंचितही डौल न मिरविणें व गोरगरीबांकडे जितकें म्हणून लक्ष पुरवितां येईल तेवढें पुरविणें, ही ह्या घराण्याची उदात्त परंपरा पांडुरंगशेठजींनीं आत्मसात् केली होती. त्या परंपरेंत त्यांनीं कधींही उणेपणा भासूं दिला नाहीं.

पांडुरंगशेठजींना ईश्वरानें उत्तम प्रकारचें आरोग्य दिलें होतें; त्यामुळें वयाच्या ६५।६६ व्या वर्षापर्यंत त्यांनीं सर्व जबाबदाऱ्या संभाळल्या; परंतु त्यानंतर त्यांना हृदयाचा विकार जडला असल्याचें आढळून आलें. त्यामुळें निरनिराळ्या हवेच्या ठिकाणीं वास्तव्य करून त्यांना मधून मधून विश्रांति घेणें भाग पडत असे. शेवटीं ता. २० मार्च १९४० रोजीं मुंबईंतील आपल्या राहात्या घरीं त्यांचें दुःखद निधन झालें !

थोर नि कर्तबगार परंपरेंतील एक उदार गृहस्थ आपल्यांतून गेला ह्याबद्दल सर्वांनाच पराकाष्ठेचें दुःख झालें असल्यास नवल नाहीं.

त्यांच्यासंबंधीं लिहिलेल्या मृत्युलेखांत 'केसरीनें' लिहिलें होतें कीं :—

"श्री. शेठ पांडुरंग जावजी यांनीं आपल्या वडिलांच्या लौकिकाबरोबर त्यांचें धंद्यांतील कौशल्य जसें संपादन केलें होतें, तसेंच त्यांचे इतर गुणही

त्यांनीं स्वतःच्या अंगीं उतरविले होते. निर्णयसागर छापखाना या संस्थेशीं अनेकांचा अनेक कारणांनीं संबंध सहज येतो. ज्यांचा ज्यांचा शेठजींशीं आजपर्यंत परिचय झाला, त्यांना त्यांना त्यांच्या थोर अंतःकरणाची, त्यांच्या उदार वृत्तीची आणि त्यांच्या अनेक गुणांची खात्री पटल्याशिवाय राहात नव्हती. अशा तऱ्हेचा एक लौकिकवान्, कर्तबगार आणि उदारधी गृहस्थ आपल्यांतून गेला, याबद्दल सर्वांस हळहळ वाटल्यावांचून राहणार नाहीं."

केसरीप्रमाणेंच बॉम्बे क्रॉनिकल, मुंबई-समाचार, संध्याकाळ, नवाकाळ, प्रभात, मौज, नागरिक, विविधवृत्त, लोकमान्य, जामेजमशेद, गुजराती, ज्ञानप्रकाश, दीनबंधु, जागृति, पुढारी, पुरुषार्थ, वार्ता, हिंदी स्वराज्य, महाराष्ट्र, वगैरे मराठी, इंग्रजी, गुजराती व हिंदी वृत्तपत्रांनीं आपापल्या अंकांत विस्तृत मृत्युलेख लिहून कै. पांडुरंगशेठजींचा गौरव केला आहे. महाराष्ट्र नाट्यसंमेलन, पुणें प्रेस ओनर्स असोसिएशन, मुंबई प्रेस ओनर्स असोसिएशन, वगैरे अनेक संस्थांनीं दुःखप्रदर्शक ठरावही पास केले.

पांडुरंगशेठजींचें निधन ही घटना निर्णयसागर-मुद्रणालयाच्या उज्वल इतिहासांत नमूद करून ठेवण्यासारखी आहे. कारण त्यांच्या निधन-कालापर्यंत आद्य संस्थापक शेठ जावजी दादाजी ह्यांनीं एकंदर कारभाराची जी सुव्यवस्थित घडी बसविली होती, ती विस्कळित न होतां, मुद्रण-प्रकाशनकार्य पूर्ववत् जोमांत चालू राहिलें.

एकंदरींत मुद्रण-प्रकाशनाच्या दृष्टीनें ह्या संस्थेच्या जीवनांतील पाऊणशें वर्षांचा, म्हणजे पांडुरंगशेठजींपर्यंतचा काळ हा अत्यंत उज्ज्वल तसाच संस्थेला व जनतेला उपकारक होऊन राहाणारा होता. त्यानंतरच्या पंचवीस वर्षांच्या कालखंडांत कांहीं ना कांहीं कारणांमुळें पूर्वीचें तें चैतन्य नि ती कार्यक्षमता आस्ते आस्ते ओसरण्याच्या मार्गास लागली.

मनुष्याच्या, त्याचप्रमाणें संस्थेच्या जीवनांतील वैभवश्रीचा, भाग्योदयाचा नि कर्तबगारीचा काळ अव्याहत पूर्वस्थितींत टिकून राहूं शकत नाहीं. कालांतरानें त्याला उतरती कळा येऊं लागते. त्याला कारणें अनेक असतात. सभोंवारच्या परिस्थितींत झपाटेबंद घारेपालट घडून येऊं लागतात. त्या परिस्थितीला धैर्यानें तोंड देण्याइतकी ताकद मागें शिल्लक राहिलेली नसते. जो सूत्रचालक असतो,

त्याच्याठायीं कर्तेपणा असावा लागतो; मालक ह्या नात्यानें त्याला आपल्या शिरावरील जबाबदारीची जाणीव असावी लागते; त्याचप्रमाणें ज्या नानाविध सद्गुणांच्या बळावर संस्था वैभवशिखराची एकेक पायरी गांठीत शिखरापर्यंत पोहोंचलेली असते, त्या सद्गुणांची पूजाअर्चा पूर्ववत् होईनाशी झाल्यामुळें, महत् प्रयासांनीं संपादन केलेल्या वैभवाला उतरती कळा लागण्याचा काळ सुरू होतो.

शिवाय ह्या जगांत वर येणें नि खालीं जाणें, त्याचप्रमाणें कांठोकांठ भरणें आणि मोकळें होणें, हें रहाटगाडगें जिकडे पहावें तिकडे चालू आहे. त्या ईश्वरी संकेताला अनुसरून निर्णयसागरच्या वांट्यास भरतीप्रमाणें ओहोटीचाही काळ आला तर त्याबद्दल खेद न मानतां प्राप्त परिस्थितींत जिवंत कसें राहतां येईल व पूर्व-वैभवाला स्मरून मानानें कसें जगतां येईल, हें पहाणें नि त्यासाठीं झटणें हें मागें राहिलेल्यांचें कर्तव्य असतें.

१९४० सालीं पांडुरंगशेठ हे निधन पावल्यानंतर तुकारामशेठजींच्या पत्नी श्रीमती जिजाबाई व पांडुरंगशेठजींच्या पत्नी श्रीमती सत्यभामाबाई ह्या दोघी जावा वडील ह्या नात्यानें चौधरी घराण्यांत वावरत होत्या. त्यांनाच छापखान्याच्या सर्व पसाऱ्याकडे लक्ष पुरवावें लागलें. त्यांपैकीं श्रीमती सत्यभामाबाई ह्यांचें नांव प्रकाशक ह्या नात्यानें घालावयाचें व मुद्रणालयाची आणि मुद्रिका-कारखान्याची व्यवस्था श्रीमती जिजाबाई ह्यांनीं पहावयाची असें ठरून, त्याप्रमाणें दोघी जावा एकमेकींच्या सल्ल्यानें व कारखान्यांतील घटकांच्या सहकारानें कारभार पाहूं लागल्या.

१९४४ सालीं श्रीमती जिजाबाई निधन पावल्या व सर्व जबाबदारी श्रीमती सत्यभामाबाई ह्यांच्या शिरावर येऊन पडली. बिलकूल न डगमगतां त्यांनीं ही जबाबदारी आपल्या निधनकालपर्यंत म्हणजे १९५१ पर्यंत धीरगंभीरपणें सांभाळिली.

धीरगंभीरपणें असें म्हणण्याचें कारण, काळ झपाट्यानें बदलत चालला होता. त्याबरोबर माणसांच्या मनोवृत्तींतही बदल होऊं लागला होता. अशा परिस्थितींत सर्वांना सांभाळून व गोडीगुलाबीनें वागून, निर्णयसागरची हेलकावे खाणारी नौका त्यांना सुरक्षितपणें पैलतीरास न्यावयाची होती. अधिक कांहीं करणें शक्य झालें नाहीं, तरी जें जवळ होतें तें काळजीपूर्वक सांभाळणें ही

कामगिरीही कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. त्या दृष्टीनें पहातां आपली सात वर्षांची कारकीर्द त्यांनीं यशस्वी रीतीनें पार पाडिली व चौधरी घराण्याच्या परंपरेतील एक कर्तबगार महिला अशी कीर्ति संपादन केली.

दानधर्माकडे, समाजसेवेकडे व देवभक्तीकडे त्यांचें फार लक्ष होतें. भगिनीवर्गाबद्दल त्यांना तळमळ वाटत असे. शिक्षणप्रसार हें तर त्यांचें विशेष आवडतें कार्य होतें. ठाणें जिल्ह्यांतील वाडें येथील हायस्कूलला दहा हजार रुपयांची उदार देणगी देऊन त्या परिसरांत रहाणाऱ्या दोनअडीचशें विद्यार्थिवर्गाच्या शिक्षणाची त्यांनीं उत्तम प्रकारची सोय केली आहे. संस्थेच्या चालकांनीं त्या शिक्षण संस्थेला 'पांडुरंग जावजी हायस्कूल' हें नांव देऊन श्रीमती सत्यभामाबाई ह्यांच्या औदार्याचें चीज केलें.

मुरबाड येथील सूतिकागृहाला साडेसहा हजार रुपयांची देणगी देऊन त्यांनीं त्या संस्थेच्या कार्यक्षमतेंत नि उपयुक्ततेंत चांगली भर घातली आहे. तसेंच पालघर् जवळील नवली येथील शाळेला व मुंबईंतील आर्यन एज्युकेशन सोसायटी व इतर अनेक संस्थांना त्यांच्या औदार्याचा लाभ झालेला आहे. गाडगेमहाराज ह्यांच्यामार्फत गोरगरीबांस होणारें अन्नदान नि कपडेदान ह्यासारख्या परोपकारी कार्यांनाही त्यांचा वेळोवेळीं हातभार लागत असे.

देवभक्तीकडे त्यांचा विशेष ओढा होता म्हणून सांगितलें. बालपणापासून त्यांच्या मनावर देवभक्तीचे संस्कार झाले व पुढें चौधरी घराण्यांत आल्यापासून ते वृद्धिंगत होत गेले. हुबळीच्या श्रीसिद्धारूढ महाराजांच्या त्या एकनिष्ठ भक्त होत्या. तीर्थयात्रेची परंपरा त्यांनी चालू ठेविली होती. त्या १९२७ सालीं तीर्थयात्रा करीत करीत हुबळी येथें आल्या. तेथें सिद्धारूढ स्वामींना त्यांनीं कांहीं एक नवस केला. तो सिद्धीला गेल्यामुळें तेव्हांपासून त्याची त्या सत्पुरुषावर जी भक्ति जडली, ती आयुष्याच्या अखेरीपर्यंत वाढत गेली व आजही तो भक्तिभावाचा सोहळा त्यांच्या कुटुंबांत प्रतिवर्षी त्याच भक्तिभावानें नि उत्साहभरांत चालू आहे.

श्रीसिद्धारूढ महाराजांचा वार्षिकोत्सव-सप्ताह मोठ्या थाटांत व अनेक भक्तांच्या सहवासांत आपल्या घरीं साजरा करण्याची प्रथा श्रीमती सत्यभामाबाईंनीं सुरू केली. १९५१ सालच्या उत्सवाची समाप्ति सोमवार ता. १९

नोव्हेंबर रोजीं व्हावयाची होती. रविवारीं उत्सव-मंडपांत बसून, कोण किती बेल वहाणार, याबद्दल भक्तमंडळींत चर्चा चालू होती. कोण म्हणे मी महाराजांना एक हजार बेल वहाणार, तर आपल्या भक्तिभावाचा वरचढपणा दाखविण्यासाठीं कोणी आपण दोन हजार बिल्वपत्रें वहाणार असें सांगत होते. मंडपांत चाललेल्या या चढाओढीकडे बाईंचें लक्ष होतेंच. बाईंची भक्ति फार मोठी आणि वाटेल तें करण्याचें सामर्थ्यही त्यांच्याठायीं होतें. तेव्हां त्या किती बेल वहाणार हें समजावें म्हणून प्रत्येकजण मोठ्या उत्कंठेनें त्यांच्याकडे पाहूं लागला! त्यांच्याकडून निदान दहा हजारांचा आंकडा ऐकूं येईल, अशी बहुतेकांची अपेक्षा होती.

मग त्या चढाओढीच्या सामन्यांत श्रीमती सत्यभामाबाईनीं बिल्वपत्रांचा आंकडा कुठवर चढविला?

सर्वांची उत्कंठा लक्षांत घेऊन त्या चटकन् म्हणाल्या, "मी का? मी एकच बेलाचें पान वाहीन! भक्ति का पानांच्या संख्येवर अवलंबून असते? अंतःकरणांत भक्तीचा ओलावा अपरंपार असावा लागतो. रुक्मिणीनं एका तुलसीपत्रावर आपला भक्तिभाव ठेवून त्याच प्रेमानं तें तराजूच्या एका पारड्यांत ठेवतांच दुसऱ्या पारड्यांत बसलेल्या घनश्याम शामसुंदराचें वजन त्या तुलसीपत्रापेक्षां कमीच भरलं नाहीं का? असं आहे निस्सीम भक्तिभावाचं!"

आणि त्या रविवारीं सत्यभामाबाई महाराजांना वहाण्यासाठीं बेल-फुलें खरेदी करण्यासाठीं स्वतः बाहेर पडल्या. भक्तांसाठीं खूप बेल खरेदी केला त्यांनीं! वाहूं या किती वाहतात तेवढा! सायंकाळीं कीर्तनाचा कार्यक्रम होता, तो कसा चुकवावयाचा? त्यासाठीं त्या लगबगीनें घरीं परतल्या; परंतु घरीं आल्यावर त्यांना अतोनात थकवा जाणवूं लागला. त्यामुळें त्या कीर्तन-श्रवणास हजर राहूं शकल्या नाहींत.

कीर्तन संपलें. आरती झाली व श्रोते नि भक्तमंडळी घरोघर निघून गेली. इकडे एकाएकीं व कोणत्याही प्रकारें वैद्यकीय औषधोपचार होण्यापूर्वीच बाईंची प्राणज्योत रात्रीं साडेअकरा वाजण्याच्या सुमारास दिव्यत्वांत विलीन झाली!

सर्व लोकांच्या दृष्टीनें ही एक अत्यंत दुःखद, तशीच आश्चर्यकारक घटना होती; परंतु श्रीमती सत्यभामाबाईंच्या दृष्टीनें पहातां तो क्षण महद्भाग्याचा

होता. पुण्यवंताशिवाय अशा रीतीनें शेवटचा दिवस गोड होण्याचें भाग्य दुसऱ्या कोणाच्या वांट्याला येणार आहे ?

अशा प्रसंगीं—

**'याचसाठीं केला होता अट्टाहास ।**
**शेवटचा दिस गोड व्हावा ॥'**

ह्या तुकोबारायांच्या अनुभव-वाणीची कोणाला आठवण होणार नाहीं ?

त्यानंतर शेठ तुकारामजी ह्यांच्या स्नुषा श्रीमती लक्ष्मीबाई नारायण चौधरी ह्यांची कारकीर्द सुरू झाली. ती ईशकृपेनें आजतागायत चालू आहे.

ह्या संस्थेच्या जीवनांतील एक घटना लक्षांत बाळगण्याजोगी आहे. आरंभापासून म्हणजे शेठ जावजी दादाजी ह्यांच्या कारकीर्दीपासून व्यवस्थापकीय आसनावर बसणारीं जीं माणसें वेळोवेळीं मिळत गेलीं, तीं संस्थेचें हित लक्षांत घेऊन वागणारी, प्रामाणिक नि जबाबदारीची जाणीव असणारीं होतीं. तीं यदृच्छेनें म्हणा किंवा जावजीशेठजींच्या पुण्याईनें म्हणा, वेळोवेळीं मिळत गेलीं. शेठजींच्या काळांतील व्यवस्थापक रामचंद्रराव मोरेपासून तों आजच्या काळांतील व्यवस्थापक पांडुरंगराव मोरेपर्यंत, प्रत्येक व्यवस्थापक, मुद्रणालयाच्या उत्कर्षासाठीं आपापल्या परीनें झटत आलेला आहे.

ती जबाबदारीची जागा सध्यांच्या पडत्या काळांत पांडुरंगराव मोरे हे सांभाळीत आहेत. नाना प्रकारच्या अडचणींमुळें नि दैनंदिन कटकटींमुळें कंटाळून न जातां ही संस्था मानानें जगावी व तिला तें लौकिकसंपन्न पूर्ववैभव प्राप्त व्हावें, ह्यासाठीं त्यांची परोपरीनें धडपड चालू आहे. जावजी शेठजींची पुण्याई एवढी बलवान् आहे कीं, त्यांनीं महत् प्रयासानें स्थापन केलेल्या ह्या संस्थेच्या वांट्यास आज नाहीं उद्यां, ऊर्जितावस्था आल्याशिवाय रहाणार नाहीं, अशी त्यांची श्रद्धा आहे. त्या श्रद्धेच्या सावलींत ते वावरत आहेत. हा चरित्रग्रंथ तयार होऊन तो प्रकाशांत यावा, ही त्यांचीच कल्पना. ती मूर्त स्वरूपांत आलेली पाहून त्यांच्याइतका आनंद दुसऱ्या कोणाला होईल असें वाटत नाहीं.

अशा रीतीनें गेलीं शंभर वर्षें निर्णयसागर-मुद्रणालय नि टाईप फाऊंड्रीची मालकी आद्य संस्थापकांच्या घराण्याकडे अव्याहत चालू आहे. ही थोर संस्था सतत शंभर वर्षें मालकीच्या दृष्टीनें सातत्य सांभाळूं शकली, हें सत्य अभिनंदनीय

व वास्ताणण्याजोगें असलें तरी गेल्या कांहीं वर्षांपासून तिच्या वांट्याला आर्थिकदृष्ट्या जी हलाखीची स्थिति आली आहे, तिचें काय ?

निर्णयसागर-मुद्रणालयानें व टाईप फाऊंड्रीनें विविध क्षेत्रांतील व भाषांतील वाङ्मय-प्रकाशनाच्याद्वारें व सुंदर देवनागरी मुद्रिकांच्याद्वारें त्या त्या क्षेत्रांत उज्ज्वल व संस्मरणीय इतिहास घडविला आहे. प्रतिकूल परिस्थितीचे कठोर फटके बसत असतांही ह्या संस्थेच्या चालकांनीं शंभर वर्षांपूर्वीच्या काळांत ज्ञान-प्रसाराच्या व संस्कृति-संवर्धनाच्या पवित्र नि अत्यावश्यक कार्यांत हिरिरीनें व त्यागपूर्वक भाग घेतला, त्यांच्या कार्याचें केवळ स्मरण करून व गोडवे गाऊन आम्ही आमच्या कर्तव्यांतून मोकळे होऊं शकत नाहीं.

गेल्या कांहीं वर्षांपासून विशेषतः आर्थिक अडचणींमुळें ह्या संस्थेचें मुद्रणप्रकाशन-कार्य थंडावलें आहे. पूर्वीं संस्थेनें प्रसिद्ध केलेल्या किती तरी संस्कृत, धार्मिक नि शैक्षणिक दृष्ट्या महत्त्वाच्या ग्रंथांना आज सतत मागणी असूनही द्रव्याभावीं त्यांचें पुनर्मुद्रण अशक्य होऊन राहिलें आहे. आकुंचित क्षेत्रांत कसावसा जीव सांभाळून मुद्रण-प्रकाशन चालू आहे; परंतु त्यांत पूर्वीचा जोम व उत्साह आतां राहिलेला नाहीं. तो येणें अत्यंत जरूर आहे.

गेल्या कांहीं वर्षांपासून महाराष्ट्र बँकेची दयाळू व सहकारी दृष्टि ह्या संस्थेकडे वळल्यामुळें त्या पाठिंब्यावर तिला आपलें जीवन कंठणें शक्य झालें आहे; परंतु हें किती दिवस चालायचें ?

ह्या संस्थेची दीर्घकालीन, उज्ज्वल व सर्वांना उपकारक होऊन राहिलेली कामगिरी लक्षांत घेऊन, आमच्या महाराष्ट्र सरकारनें तिच्या कारभारांत लक्ष घालून निदान ह्यापुढील काळांत ती खंबीर पायावर उभी राहील, अशी कांहीं ना कांहीं व्यवस्था करणें अत्यंत जरूर आहे, असें तीव्रतेनें वाटतें व प्रत्येकजण आमच्या ह्या मताशीं सहमत होईल, अशी अपेक्षा बाळगल्यास ती अनाठायीं होणार नाहीं.

# शेठ जावजी दादाजी चौधरी घराण्याचा वंशवृक्ष

- पदाजी
  - दादाजी
    - जावजी
      श्रीमती भागिरथीबाई (पत्नी)
      - तुकाराम
        - पत्नी जिजाबाई
        - नारायण (दत्तक शांताराम)
          पत्नी लक्ष्मीबाई
      - विठोबा
      - पांडुरंग
        कन्या
        - आनंदीबाई
          - मथुराबाई (कन्या)
          - हिराबाई (कन्या)
        - पार्वतीबाई
          - शंकर
            - राजाराम
              कन्या
              - गीता
              - सरिता
          - शांताराम (दत्तक नारायण)
          - रमाबाई (कन्या)
        - सत्यभामाबाई
          - सौ. छबुबाई (कन्या)

## शेठ जावजी दादाजी यांच्या घराण्याची सचित्र वंशावळ

### पहिली पिढी



चौधरीवंश-कुलदीपक शेठ जावजी दादाजी

## दुसरी पिढी



शेठ तुकाराम जावजी



शेठ विठोबा जावजी



शेठ पांडुरंग जावजी

## दुसरी पिढी



श्रीमती जिजाबाई तुकाराम



श्रीमती सत्यभामाबाई पांडुरंग

## तिसरी पिढी



शंकर पांडुरंग चौधरी



नारायण तुकाराम चौधरी

## तिसरी पिढी



श्रीमती लक्ष्मीबाई नारायण चौधरी



सौ. छबुबाई शांताराम ठाकरे

## चौथी पिढी



राजाराम शंकरशेठ चौधरी



सौ. वनमालाबाई राजाराम चौधरी

## पांचवी पिढी



कु. गीता राजाराम चौधरी



कु. सरीता राजाराम चौधरी

शेठ जावजी दादं . प्रकाशन-कार्यांतील त्यांचे कांहीं सहकारी



उभे डावीकडून—

शेठ जावजी दादाजी, पं. दुर्गाप्रसाद व पं. का. पां. परब

खुर्चीवर बसलेले, डावीकडून—

पं. शा. मं. थापट, विनायक कों. ओक, ना. वा. गोडबोले व रामचंद्र भि. गुंजीकर

## १

## धर्म-प्रसारासाठीं मुद्रण-कला

मानवी जीवनांत मुद्रणकलेचें स्थान अत्यंत महत्त्वाचें आहे. मानवाच्या प्रगतीला तिनें फार महत्त्वाचा हातभार लावलेला आहे.

मुद्रा-आंगठी-ह्या शब्दावरून मुद्रण हा शब्द प्रचारांत आला. फार प्राचीन काळापासून भारतांत पत्रें, राजाज्ञा वगैरे मुद्रांकित करण्याची वहिवाट रूढ होती. आंगठीवर किंवा धातूच्या तुकड्यावर अक्षरें किंवा खुणा कोरलेल्या असावयाच्या; त्यांना शाई, काजळ किंवा गंध लावून त्याचा ठसा कागदावर किंवा दुसऱ्या कशावरही उमटवावयाचा. लाखेच्या सहाय्यानें सील करण्याची पूर्वी पद्धत होती नि आजतागायत ती चालू आहे. पत्रें, लखोटे किंवा बटवे बंद करून आपली खूण म्हणून त्या मुद्रांकित करावयाच्या. मोहेंजोदारो येथील उत्खननांत पांच हजार वर्षांपूर्वी 'सील' करण्यासाठीं वापरांत असलेल्या मुद्रा आढळून आल्या आहेत! ह्या मुद्रा नाना प्रकारच्या नि नाना आकारांच्या असत. त्याचप्रमाणें त्यांचा उपयोगही वेगवेगळ्या प्रकारें करण्यांत येत असे. ज्याप्रमाणें पत्रें, लखोटे, ह्यांच्यावर मुद्रांचा ठसा उमटविण्यांत येत असे, त्याचप्रमाणें छावणींतून बाहेर जाणाऱ्या माणसाच्या अंगावर छाप मारण्यासाठीं मुद्रांचा उपयोग करण्यांत येत असे. सीलबंद लखोटे पाठविण्याची पद्धत ह्या देशांत फार पूर्वीपासून असली तरी छाप मारण्याच्या किंवा छपाईच्या बाबतींत आमची मजल त्यापलीकडे जाऊं शकली नाहीं!

मजल दर मजल करीत त्या क्षेत्रांत पहिलें पाऊल टाकण्याचा मान चीनकडे जातो. आरंभकाळापासून मुद्रण-कला आणि धर्म-प्रसार ह्यांचा फार

निकट संबंध आहे. मुद्रण-कला कशी नि कां जन्माला आली नि निरनिराळ्या देशांत नि भारतांतही सुमारें चारशें वर्षांपूर्वीच्या काळांत तिचें आगमन कां नि कसें झालें, हा इतिहास आपण उगमस्थानापासून बारकाईनें पाहूं लागलों असतां, धर्मप्रसारासंबंधींची ईर्षा व तत्संबंधीं आत्यंतिक अगत्य, हींच कारणें बुडाशीं असल्याचें आढळून येतें. बुद्ध-धर्माचा सार्वत्रिक प्रसार झाला पाहिजे; तो कशा रीतीनें करायचा, त्याचीं साधनें कोणतीं, ह्याचा विचार करतां करतां दगडावर किंवा लाकडाच्या ठोकळ्यावर अक्षरें किंवा आकृत्या खोदावयाच्या अथवा कोरावयाच्या नि त्यांना शाई लावून त्याचे ठसे वाटतील तेवढ्या कागदांवर उमटवावयाचे. धर्म असो किंवा दुसरी कोणतीही सुधारणा असो, तिचा सार्वत्रिक प्रसार करावयाचा झाल्यास मुद्रणकलेची काम धरणें अत्यावश्यक आहे, हें अनुमवांतीं पटल्यानंतर त्या कलेंत कालांतरानें सुधारणा होत गेल्या. बुद्धधर्मासंबंधीं हीरक-सूत्र ( Diamond Sutra ) हें दगडावर अक्षरें कोरून छापलेलें पुस्तक चीनमधील एका गुहेंत सांपडलें असून तें इ. स. ८६८ मधील आहे. तसेंच चीनमध्यें दगडावर कोरून छापून काढलेल्या बुद्धाच्या मूर्ति आढळून आल्या असून त्या इ. स. ६५० मधील असाव्यात. उपरोक्त हीरक-सूत्र हें सर्वांत जुन्यांत जुनें छापील वाङ असावें, असें मानण्यांत येतें. लांकडाच्या ठोकळ्यावर अक्षरें किंवा चित्रें कोरावयाचीं नि तीं शाईच्या सहाय्यानें छापून काढावयाचीं. अशा रीतीनें ह्या कलेचा जन्म चीनमध्यें झाला. 'The invention of Printing from wooden blocks was therefore the invention of Printing in China.'*

बुद्ध-धर्माचा प्रसार घरोघर नि सर्वत्र झाला पाहिजे, म्हणून त्याच्यासाठीं जरूर तीं सुलभ साधनें शोधून काढण्यांत चीनमधील धर्मवेडे गुंतले होते. पी शांग ह्यानें तर चिनी मातीचीं अक्षरें बनवून तीं एका लोखंडी चौकटींत घट्ट बसविलीं नि शाईच्या सहाय्यानें छपाईचें काम १०४१ मध्यें सुरू केलें! त्यानंतर १३१४ मध्यें वँग चँग ह्यानें लांकडी मुद्रिका तयार करून त्या उपयोगांत आणल्या आणि त्याच्याही पुढची मजल गांठली ती कोरियाचा राजा

* The Invention of Printing in China and its spread Westward by Thomas Francis Carter.

जनरल यी ह्यानें. त्यानें १३९२ मध्यें धातूपासून अक्षरें तयार करण्यासाठीं एक फाऊंड्री स्थापन केली होती[१].

अक्षरमुद्रिकांची जुळवाजुळव करून कोणताही मजकूर छापून काढण्याची कला युरोपमध्यें पंधराव्या शतकांत पसरली असें म्हणतां येईल. युरोपमधील कोणत्या देशांतील कोणत्या संशोधकानें या कलेची प्राणप्रतिष्ठा केली ह्याबद्दल मतभेद आहेत. सर्वसाधारणपणें गटेनबर्ग ( जर्मनी ) ह्याच्याकडे तो मान जातो. युरोपमधील कोणत्या देशांत ह्या कलेचें कधीं आगमन झालें, हें ठोकळमानानें सांगतां येण्यासारखें आहे. इटाली ( १४६५ ), फ्रान्स ( १४७० ), स्पेन ( १४७४ ), इंग्लंड ( १४७७ ), डेन्मार्क ( १४८२ ), स्वीडन ( १४८३ ), पोर्तुगाल ( १४९५ ) नि रशिया ( १५५३ ). भारतांत गोमंतकामध्यें मुद्रणकलेचें आगमन झालें १५५६ सालीं आणि तेंही ख्रिस्ती-धर्माच्या प्रचारासाठीं.[२]

भारतांत मुद्रण-कला कोणत्या मार्गानें नि कोणामुळें आली, हें समजून घेण्यासारखें आहे. गोव्यांत त्या काळीं ( १५४० ) ख्रिस्ती धर्मप्रचाराला अत्यंत उग्र स्वरूप आलें होतें. जबरदस्तीनें नि नानाप्रकारच्या कडक उपायांची योजना करून पोर्तुगिजांनीं धर्मप्रचार चालविला होता. त्यांच्या हातीं छपाईचें साधन १५५६ सालापर्यंत आलें नव्हतें. मात्र धर्मप्रचारांत गुंतलेल्या ख्रिस्ती मिशनऱ्यांना मुद्रण यंत्राची जरुरी तीव्रतेनें भासूं लागली होती. स्थानिक भाषेंत बायबल ह्या ख्रिस्ती धर्म-ग्रंथाचीं भाषांतरें करून तीं सर्वांना वांटावयाचीं नि त्यांना तीं वाचायला लावायचीं, हा धर्म-प्रचाराचा एक सर्वोत्तम मार्ग आहे, ह्याची जाणीव त्यांना होऊं लागली होती.

इतक्यात एक मुद्रण-यंत्र नि छपाईचीं कांहीं साधनें १५५६ सालीं एकाएकीं गोव्यात येऊन थडकलीं ! छापखाना गोव्यांत आला खरा, परंतु तो गोवामार्गें अबिसीनियांत जावयाचा होता. अबिसीनियाच्या बादशहानें कांहीं जरूर असलेलीं पुस्तकें छापण्यासाठीं पोर्तुगालच्या राजाकडे मुद्रण-यंत्राची व कांहीं तंत्रज्ञ पाठविण्याची विनंती केली. कांहीं ना कांहीं कारणामुळें ती विनंती

१ The Invention of Printing in China and its spread Westward by Thomas Francis Carter.

२ The Printing Press in India by A. K. Priolkar.

कित्येक वर्षेपर्यंत धूळ खात पडली होती. शेवटीं वरील सालीं एक छापखाना, त्यासाठीं लागणारें साहित्य, कांहीं तंत्रज्ञ नि कांहीं-धर्मप्रचारक ह्यांच्यासह गोव्यांत येऊन थडकला. त्याकाळीं सुएझ कालव्यांतून बोटींचें दळणवळण सुरू झालें नव्हतें. केप ऑफ गुड होपला वळसा घालून पोर्तुगालमधून छापखान्यासह निघालेलें तें जहाज गोव्यांत आलें।

त्यानंतरच्या काळांत अनेक भानगडी निर्माण होऊन गोव्यांत येऊन थडकलेलें मुद्रण-यंत्र अबिसीनियास न जातां त्यानें गोव्यांतच कायमचा मुक्काम ठोकला नि तेथील ख्रिस्ती-धर्म-प्रचार कार्यास हातभार लाविला. ख्रिस्त-देवाची इच्छा आणि दुसरें काय ?

महाराष्ट्रांत नि विशेषतः मुंबईंत मुद्रण-कलेचा प्रवेश कधीं नि कोणामुळें झाला, तसेंच आरंभकाळांत ह्या कलेचें महत्त्व ओळखून तिला कोणीं नि कशा रीतीनें राबविलें, हें जाणून घेणें विशेष महत्त्वाचें आहे. त्या महत्त्वाच्या इतिहास-काळाकडे आपण आतां वळूं या.

श्री छत्रपति शिवाजी महाराज ह्यांच्या काळापासूनच नव्हे, तर त्या पूर्वीच्या काळापासून हा इतिहास सुरू होतो. छत्रपति शिवाजी महाराजांनीं मुद्रण-यंत्राचें महत्त्व ओळखून त्याची स्थापना करण्याची दक्षता दाखविली; परंतु त्याकाळीं तें यंत्र चालविणारा जरूर तो यंत्रज्ञ त्यांना उपलब्ध न होऊं शकल्यामुळें व त्यांच्यामागें इतर नाना व्याप असल्यामुळें त्यांनीं तें यंत्र १६७४ मध्यें भिमजी पारेख ह्या नांवाच्या एका उद्योगी नि धाडशी गृहस्थास विकून टाकलें असें म्हणतात. आणि नंतर ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकाऱ्यांशीं संधान बांधून त्यानें महत् प्रयासांनीं इंग्लंडहून एक तंत्रज्ञ आणवून तें यंत्र कामास लाविलें.

१९४२ सालीं मुंबईंत भरलेल्या ग्रंथालय परिषदेच्या अध्यक्षस्थानावरून के. एम्. मुनशी ह्यांनीं ही माहिती सांगितली. ह्या माहितीला विश्वसनीय आधार सांपडत नाहीं; परंतु भिमजी पारेख ह्यानें ता. ९ जानेवारी १६७० रोजीं ईस्ट इंडिया कंपनीला एक तरबेज मुद्रक पाठविण्याबद्दल विनंतीपर पाठविलेलें पत्र उपलब्ध झालें आहे.*

* The Printing Press in India by A. K. Priolkar.

सुरत येथील कंपनीच्या अधिकाऱ्यांमार्फत हा पत्रव्यवहार सुरू झाला, व त्याप्रमाणें इंग्लंडहून सुरतेच्या अधिकाऱ्यांस पत्र आलें. त्यावरून हेन्री हिल्स ह्या नांवाचा एक तंत्रज्ञ, छापखाना नि छपाईचें साहित्य मुंबईंत येऊन थडकलें, सोबत त्याचें बिलही पाठविण्यांत आलें. त्याची वसुली भिमजीकडून व्हावयाची होती. इंग्लंडमधून ईस्ट इंडिया कंपनीतर्फे भिमजीशेठच्या विनंतीस मान देऊन ही जी व्यवस्था काळजीपूर्वक करण्यांत आली, तिच्यामागें एक अंतस्थ हेतु होता. त्याचा उल्लेखही त्या पत्रांत स्पष्टपणें पुढील शब्दांत करण्यांत आलेला आहे. 'ही साधनसामुग्री पाठवीत आहोंत ती कशासाठीं? आमच्या धर्माचा प्रसार करण्याच्या दृष्टीनें त्या साधनांचा उपयोग होईल, अशी आशा त्यामागें आहे.' "We should gladly hear that Bingees (Bhimaji) design about the printing do take effect, that it may be a means to *propogate our religion* whereby soules may be gayned as well as Estates.* "

अशा रीतीनें मुंबई प्रांतांत मुद्रण-यंत्राचें प्रथमागमन झालें तें १६७४–७५ सालीं, भिमजी पारेख ह्यांच्या प्रयत्नांमुळें. यंत्र आलें त्याबरोबर कांहीं इंग्रजी टाईपही आलेला होता. त्यामुळें इंग्रजी पत्रकें छापून काढण्याची सोय झाली; परंतु भिमजीची आकांक्षा होती देशी-भाषांत छपाईचीं कामें करण्याची. ती कांहीं तृप्त होऊं शकली नाहीं. त्यासाठीं कांहीं काळ लोटावा लागला.

जें शिवाजी महाराजांच्या काळांत शक्य झालें नाहीं, तें पेशवाईच्या काळांत धोरणी मुत्सद्दी नाना फडणवीस ह्यांनीं सिद्धीस नेण्याचा प्रयत्न केला. सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक कै. रा. ब. दत्तात्रय बळवंत पारसनीस ह्यांनीं ह्या-संबंधीं एक संशोधनपर नि महत्त्वाचा लेख 'नवयुग' मासिकांत प्रसिद्ध केला आहे. त्या लेखांतील विशेष महत्त्वाचा भाग येथें उद्धृत करण्यांत येत आहे. "टांकिबार येथें मिशनरी लोकांनीं १७११ सालीं एक छापखाना काढला व तेथें तामीळ भाषेंत ग्रंथ छापण्याची तजवीज केली. पहिलें तामीळ पुस्तक १७१० मध्यें जर्मनींत छापलें गेलें. डॉ. केरी ह्यांचें ता. १४ डिसेंबर १८०३ चें एक पत्र उपलब्ध असून त्यांत म्हटलें आहे कीं, 'मी न्यू टेस्टामेंटचें मराठी भाषांतर

*Printsng Press in India: by A. K. Priolkar Page—31

करीत आहे. ह्या कामांत मदत करणारा एक महाराष्ट्रीय गृहस्थ आहे. त्याचें नांव पंडित वैद्यनाथ.' 'सिंहासन बत्तिसी' १८१४ त श्रीरामपूर येथें छापिली. तिचा कर्ता हाच पं. वैद्यनाथ. तो महाराष्ट्रीय असून नागपूरकर भोंसल्यांच्या आश्रितांपैकीं होता. नागपूरकर भोंसल्यांचा कलकत्त्याशीं संबंध होता. राजकारणाच्या निमित्तानें कांहीं महाराष्ट्रीय बंगालमध्यें गेले. पं. देऊस्कर हेही त्यांपैकींच एक होत. तिकडे गेल्यानंतर नोकरीधंद्याच्या निमित्तानें कांहीं महाराष्ट्रीय तेथें कायमचे रहिवासी झाले.*

पं. वैद्यनाथ हे संस्कृतज्ञ होते. हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल मार्क्विस ऑफ वेल्स्ली ह्यांनीं स्थापन केलेल्या कॉलेज ऑफ फोर्ट विल्यममध्यें पं. वैद्यनाथ ह्यांस मराठी अध्यापकाची जागा देण्यांत आली होती. ह्या नागपूरकर पंडिताच्या हाताखालीं शिक्षण घेऊन पुष्कळ युरोपीयन पुढें प्रसिद्धीस आले.

पं. वैद्यनाथ हे विल्यम कॅरी ह्यांचे सहाध्यापक होत. त्यांनीं मराठी भाषेचीं देवनागरी अक्षरें तयार करण्यास कॅरी यांस मदत केली. अर्थात् पं. वैद्यनाथ हे बंगाल्यांतील मराठी मुद्रणकलेच्या संशोधकांपैकीं एक प्रमुख होत.

१८०५ सालीं उपरोक्त कॉलेजचा चौथा बक्षीस-समारंभ झाला. मराठी भाषेत उत्तीर्ण झालेला पहिला युरोपीयन विद्यार्थी नि. टावर ह्यास एक सुवर्ण-पदक नि एक हजार रु. बक्षीस देण्यांत आले. हा पं. वैद्यनाथचा शिष्य होय.

पं. वैद्यनाथ ह्यांच्या सहाय्यानें श्रीरामपूर (बंगाल) येथील बॅपटिस्ट प्रेसमध्यें विल्यम कॅरी यांनीं १८०५ सालीं मराठी कोश छापून प्रसिद्ध केला. सिंहासन बत्तिसी, राजा प्रतापादित्य चरित्र, नागपूरचे रघोजी भोंसले वंशावळ, वगैरे त्यांच्याच मदतीनें छापिलीं.

*मराठी-मुद्रणाचा पहिला प्रयत्न विल्यम कॅरी ह्यांनीं पं. वैद्यनाथ ह्यांच्या* सहाय्यानें श्रीरामपूर येथें १८०५ मध्यें केला. अशा रीतीनें प्रथम बंगालमध्यें मराठी मुद्रणाचा जन्म १८०५ सालीं झाला.

---

* नवयुग : रा. दुर्गे, अंक ८ वा. माहे जून १९१५

## २

## मुद्रण - कलेचें महाराष्ट्रांत आगमन

मुद्रण–कलेच्या इतिहासांत १८०५ हें वर्ष फार महत्त्वाचें आहे. विशेषतः महाराष्ट्राच्या दृष्टीनें. त्या वर्षी बंगालमध्यें मराठी–मुद्रणाचा जन्म झाला आणि त्याच वर्षी महाराष्ट्रांत कोणती घटना घडून आली, हें पहाण्यासारखें आहे.

पेशव्यांच्या राजवटींत नाना फडणवीस ह्यांनीं त्या वेळचे पुण्याचे रेसिडेंट सर चार्लस मॅलेट ह्यांच्या सहाय्यानें पुणें येथें एक चित्रशाळा नि शिल्पशाळा स्थापन केली. तेथें शिकून तयार झालेल्या एका तांबट विद्यार्थ्याकडून त्यांनीं मराठी अक्षरांचे खिळे तयार करवून एक गीता-ग्रंथ छापण्याची कल्पना प्रथम मनांत आणिली. त्याकाळीं भगवद्गीता-ग्रंथ सुंदर अक्षरांत लिहवून घेऊन तो ब्राह्मणांस वाटण्याचा परिपाठ होता. जयपुर, काशी, मथुरा येथून सुंदर अक्षरांत लिहविलेले नि वेलबुट्टींनी सजविलेले ग्रंथ विकत घेऊन ते वाटण्यांत येत असत. इंग्रजी पुस्तकांप्रमाणें ते ठशांत छापल्यास चांगलें असें वाटून नानांनीं ती कल्पना काढिली. त्यांनीं कुशल कारागिरांकडून ठसे तयार करवून घेण्याचा पुणें येथें प्रथम प्रयत्न केला. त्यांचा हा उद्योग चालू असतां १७९६ सालीं दुसरे रावबाजी गादीवर आले नि पुण्यांत अस्वस्थता सुरू झाली. नाना फडणविसांच्या संस्थास विपरीत काळ आला. त्यामुळें त्यांनी योजलेले मनोरथ जागच्या जागीं राहिले. पुण्याचे कारागीर पुणें सोडून देशांतरास गेले. गीता-मुद्रा तयार करणारा कारागीर पुणें सोडून मिरजेस गेला. त्यावेळीं श्रीमंत गंगाधरराव गोविंद हे त्या संस्थानचे अधिपती होते. त्यांनीं त्या कारागिरास

आश्रय दिला. त्यांनीं तयार केलेल्या मुद्रिका पाहून त्याजकडून अधिपतींनीं संपूर्ण गीता - ग्रंथाच्या मुद्रा तयार करवून घेतल्या. आणि त्या तांब्याच्या ब्लॉकवर लाकडी दाबानें लाखीशाईनें छापून पहिला छापील ग्रंथ महाराष्ट्रामध्यें १८०५ सालीं निर्माण केला. तांब्याचीं उलटीं अक्षरें जोडून तयार केलेले ह्या गीताग्रंथाचे अस्सल ठसे नि त्यांवर छापून काढलेली गीतेची पोथी मिरज संस्थानचे अधिपति ह्यांचे संग्रहीं आहे.

बंगालमध्यें मराठी मार्फत ग्रंथ - छपाईसंबंधीं १८०५ सालीं काय घडलें व त्याच वर्षी महाराष्ट्रांत त्या दृष्टीनें काय घडलें, हें ताडून पहाण्यासारखें आहे. मराठी - मुद्रणाच्या बाबतींत दोन प्रांतांत एकाच वर्षी त्या घटना घडून आल्यामुळें त्यांना विशेष महत्त्व आहे.

मिरज येथें छापण्यांत आलेल्या भगवद्गीतेची एक प्रत राजापूर येथील संस्कृत पाठशाळेंत आहे. ज्या ठोकळ्यांच्या सहाय्यानें मिरज येथें गीता-ग्रंथ छापण्यांत आला, त्यांची संख्या ३५० असून त्यांपैकीं जवळजवळ निम्मे ठोकळे पुणें येथील भारत-इतिहास-संशोधक मंडळांत नि दोन नमुन्यादाखल सातारा येथील पारसनीम वस्तुसंग्रहालयांत जतन करून ठेवण्यांत आले आहेत.

ह्या गीता - ग्रंथाच्या शेवटच्या पृष्ठावर मिरज अधिपतींच्या ह्या कामगिरीचा उल्लेख पुढीलप्रमाणें करण्यांत आला आहे:—

"शके १७२७ क्रोधनवत्सरे
मार्कंडेय मुनिक्षेत्रे पटवर्धन संज्ञिकः ॥
निगमागम धर्मज्ञः श्रीगोविंद तनूद्भवः ॥
विदुषामंतरायासं दिव्यां कृतीं गंगाधरो मुदा ॥
तज्जन्यं पुस्तकं यत्तत् द्विजेभ्यो दत्तवानसौ ॥
गोपाल कृष्ण चरण प्रसाद ध्यान लब्धये ॥ श्रीरस्तु ॥"

ह्यावरून स्पष्ट होणारी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे पं. वैद्यनाथ नागपूरकर नि श्रीमंत गंगाधरराव गोविंद पटवर्धन मिरजकर ह्या दोन नांवांस महाराष्ट्र मुद्रण-कलेच्या इतिहासांत महत्त्वाचें स्थान आहे.

त्यानंतरच्या काळांत मुंबईंत मुद्रण - कलेचा प्रवेश होऊन तिला उन्नत स्वरूप कसकसें येत गेलें तें पहाण्यापूर्वी वर नमूद केल्याप्रमाणें बंगालमध्यें

विल्यम कॅरी व त्यांचे इतर सहकारी ह्यांनीं मराठी मुद्रणाच्या दृष्टीनें जो उद्योग केला, त्याच्याकडे पुनरपि थोडें लक्ष पुरविणें जरूर आहे.

गोवा नि मद्रास प्रांतांत आरंभकाळांत मुद्रण-कलेचा प्रवेश झाला तो धर्मप्रसार परिणामकारक रीतीनें करतां यावा ह्या हेतूनें; परंतु बंगालमध्यें त्या कलेनें प्रवेश केला त्यांत आरंभीं तरी मुख्यतः राजकीय हेतु होता. जनतेंत शिक्षण-प्रसार व्हावा नि राज्यकर्त्यांबद्दल प्रजेच्या मनांत प्रेमादराची भावना निर्माण व्हावी, ह्यासारखे उदात्त हेतु बुडाशीं होते. बंगालमध्यें छापखान्यांतून बाहेर पडलेलें पहिलें पुस्तक म्हणजे बंगाली भाषेचें व्याकरण होय. तें हुगळी येथून १७७८ सालीं प्रसिद्ध करण्यांत आलें.

ईस्ट इंडिया कंपनीनें बंगाल प्रांताच्या राज्यकारभाराचीं सूत्रें १७७२ सालीं आपल्या हातीं घेतलीं. कंपनीच्या नोकरींत त्या काळीं एकाहून एक हुशार नि मोठीं कल्पक माणसें होतीं. जनतेंत ज्ञान-प्रसार झाला पाहिजे, ज्यांच्यावर आपण राज्यकारभार चालवितों, त्यांच्या भाषेचें ज्ञान आपणास झालें पाहिजे, ह्या व इतर अनेक हेतूंनीं कंपनी सरकारला छापखान्याची जरूरी भासूं लागली. मुद्रण-यंत्र हाताशीं होतें; परंतु देशी भाषेंतील मुद्रिका नव्हत्या. त्या तयार करण्याची कामगिरी नोकरवर्गांपैकीं चार्लस विल्कीन्स नामक कल्पक गृहस्थावर सोंपविण्यांत आली आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे परदेशांतून आलेल्या ह्या गृहस्थानें बंगालीच नव्हे तर देवनागरी-मुद्रिकाक्षरें तयार करून देण्यांत कमालीचें कौशल्य प्रकट केलें. हें कौशल्य त्यानें स्वतःजवळ ठेविलें नाहीं, तर आपल्या जवळपास वावरणाऱ्या पंचानन कर्मकार ह्या नांवाच्या कर्तृत्वसंपन्न कारागिरास त्या कलेची दीक्षा दिली.

देवनागरी मुद्रिकांच्या दृष्टीनें पंचानन कर्मकार नि पं. चैतनाथ हीं आरंभकाळांतील दोन भारतीय नांवें जशी संस्मरणीय आहेत, तशींच चार्लस विल्कीन्स नि विल्यम कॅरी हीं दोन युरोपीयन नांवेंही लक्षांत बाळगण्यासारखीं आहेत.

चार्लस विल्कीन्स (१७५० - १८३६) हे १७७० सालीं कंपनी-सरकारच्या बंगाल कचेरींत कारकुनी करण्याच्या हेतूनें आले. संस्कृत भाषेचें मनापासून अध्ययन करणारे ते पहिले युरोपीयन गृहस्थ होत. भगवद्गीता, हितोपदेश,

शाकुंतल ह्या संस्कृत ग्रंथांचीं त्यांनीं आपल्या इंग्रजी भाषेंत भाषांतरें करून संस्कृत भाषेंतील अमूल्य ग्रंथ-भांडाराची युरोपीयन लोकांस सार्थ कल्पना करून दिली व संस्कृत भाषेचें व्याकरणही तयार करून तें त्यांनीं छापून प्रसिद्ध केलें. (१७७९)

विल्कीन्सप्रमाणें देवनागरी नि इतर देशी भाषांतील ग्रंथ-छपाईच्या बाबतींत ज्यांचें नांव संस्मरणीय आहे ते म्हणजे विल्यम कॅरी (१७६१–१८३४) हे होत. हे एक मिशनरी नि धर्मप्रसारकार्यासाठीं झटणारे कट्टे धर्माभिमानी होते.

जनतेच्या धार्मिक भावना दुखवायच्या नाहींत. त्यामुळें जनता बिथरून जाईल नि मग राज्यकारभार सुरळीतपणें चालवितां येणार नाहीं, असें तत्कालीन जबाबदार नि धोरणी वरिष्ठ अधिकाऱ्यांस वाटत असे. त्यामुळें मिशनऱ्यांवर बंधनें होतीं. तीं बंधनें संभाळून वावरावें लागत असे.

विल्यम कॅरी ह्यांची धर्मप्रसार-भावना अत्यंत जाज्वल्य होती. ती त्यांना थोडीच स्वस्थ बसूं देणार? कलकत्त्यापासून नजीक असलेल्या एका निळीच्या कारखान्यांत त्यांनीं नोकरी पतकरली. आपल्या ख्रिस्तीधर्माचा प्रसार देशी लोकांत प्रभावीपणें करावयाचा, तर त्यांची भाषा अवगत झाली पाहिजे. आपल्या धर्मग्रंथाचें अर्थात बायबलचें बंगाली नि इतर देशी भाषांत भाषांतर प्रसिद्ध केलें पाहिजे, ह्याची खूणगांठ बांधून विल्यम कॅरी हे उद्योगास लागले. कोणाचा ना कोणाचा सहकार संपादन करून ते बंगाली, संस्कृत वगैरे भाषा मोठ्या उत्साहानें शिकले, एवढेंच नव्हे तर त्या भाषांत ते चांगले प्रवीण झाले. त्यांनीं आमच्या 'महाभारत' सारख्या ग्रंथांचीं पारायणें केलीं. संस्कृत–इंग्लीश नि बंगाली–इंग्लीश कोशवाङ्मय निर्माण करतां येईल एवढा त्या भाषांचा पायाशुद्ध अभ्यास त्यांनीं आपला नित्याचा व्यवसाय सांभाळून केला. प्रथम त्यांनीं न्यू टेस्टामेंटचें बंगालींत भाषांतर तयार केलें. तें छापायचें कसें, हा त्या काळीं मोठा गहन प्रश्न त्यांच्यापुढें उभा राहिला; परंतु कोणत्याही बाबतींत ते डगमगणारे नव्हते. अनेक संकटांना तोंड देत देत त्यांनीं येथवर मजल मारली होती आणि पुढील काळांत तर अमतील नमतील तेवढीं सारीं संकटें एकजूट करून त्यांच्या वाट्यास यायचीं होतीं नि त्यांच्यावर मात करून दाखविण्याच्या पुरुषार्थाचें श्रेय कॅरींच्या वांट्यास जायचें होतें.

छापखान्याच्या शोधांत असतां एक लाकडी छापखान्याचें यंत्र कलकत्त्यांत विकायचें असल्याची जाहिरात विल्यम कॅरी यांच्या वाचण्यांत आली. तावडतोब जाऊन तें यंत्र त्यांनीं चाळीस पौंडांस विकत घेतलें. छापण्याचें यंत्र हातीं आलें; परंतु मुद्रिकांशिवाय मुद्रण कसें करणार? हा प्रश्न सोडवायचा शिल्लक राहिलाच होता. लंडनमध्यें त्याकाळीं बंगाली नि देशी भाषांच्या मुद्रिका तयार करणारे सुविख्यात मुद्रणकलाप्रवीण कॅस्लन हे होते. त्यांच्याकडून बंगाली मुद्रिकांचा संच मागवावा अशा विचारांत असतां त्यापायीं होणारा अवाढव्य खर्च नि विलंब ध्यानीं आणून देशी कारागिरांच्या सहाय्यानें मुद्रिकांचा संच तयार करविण्याचा त्यांनीं निर्धार केला नि त्यांतही यश मिळविलें.

विल्यम कॅरी ह्यांचा बंगाली नि संस्कृत भाषेचा दीर्घ व्यासंग नि त्या भाषांत त्यांनीं संपादन केलेलें प्रावीण्य लक्षांत घेऊन कलकत्ता येथील फोर्ट विल्यम कॉलेजमध्यें बंगाली नि संस्कृत भाषेचे प्राध्यापक ह्या नात्यानें १८०१ सालीं त्यांची नेमणूक झाली. ह्या नेमणुकीमुळें आरंभ काळांत विद्यार्थ्यांच्या उपयोगी पडणारीं कांहीं पुस्तकें त्यांनीं तयार केलीं. कॅरींना देशी भाषा शिकण्याची भारी हौस. त्यांनीं मराठी भाषाही नंतर आत्मसात् केली. त्या बाबतींत त्यांनीं पं. वैद्यनाथ ह्यांचा सहकार संपादन केला असावा. मुद्रिका तयार करण्याच्या बाबतींत विल्कीन्सचा पट्टशिष्य पंचानन कर्मकार ह्यांचा कॅरी यांस फार उपयोग झाला. पंचाननाच्या हाताखालीं काम करतां करतां मनोहर ह्या नांवाचा एक कारागीर कोणत्याही देशी भाषेच्या मुद्रिका तयार करण्यांत तरबेज झालेला होता. त्याचाही उपयोग विल्यम कॅरी ह्यांनीं करून घेतला.

विल्यम कॅरी हे जबरदस्त उत्साहाचे गृहस्थ होते. त्यांनीं श्रीरामपूर (बंगाल) येथें आपल्या मुद्रणालयाचा व्याप आस्ते आस्ते वाढवून अनेक देशी भाषांत 'शुभवर्तमान' छापण्यासाठीं नि इतर ग्रंथांच्या छपाईसाठीं मुद्रिका तयार करण्याचा प्रचंड कारखाना सुरू केलेला होता. मुद्रणाच्या बाबतींत विल्यम कॅरी ह्यांच्या नेतृत्वाखालीं श्रीरामपूर येथील मुद्रणालयानें नि टाईप फाऊंड्रीनें इतिहास घडविला आहे असें म्हणण्यापेक्षां त्या क्षेत्रांतील इतिहासास जोराची गति देऊन ठेविली, असें म्हणणें अधिक शोभेल.

बंगालप्रमाणें मुंबईंतही आरंभकाळांत ज्या मुद्रणविषयक हालचाली झाल्या, त्या राजकीय हेतूंनीं प्रेरित होऊन. कंपनी सरकारला जनता सुशिक्षित करायची होती. त्या हेतूनें बाँबे हेराल्ड, बाँबे गॅझेट, बाँबे कूरीयर ह्यासारख्या इंग्रजी वृत्तपत्रांचें प्रकाशन १७८९–९० पासून सुरू झालें.

एतद्देशीयांच्या दृष्टीनें मुद्रण क्षेत्रांतील महत्त्वाची बाब म्हणजे १८१२ सालीं फर्दुनजी मर्झबान ह्या पारशी गृहस्थानें मुंबईंत गुजराती मुद्रणालय स्थापन करण्यांत पुढाकार घेतला ही होय. त्या काळीं 'बाँबे कूरियर' मुद्रणालयांत जिजीमाई छापघर ह्या नांवाचें एक मुद्रक होते. ते उपरोक्त फर्दुनजींचे स्नेही होते. त्यांनीं त्यांस गुजराती मुद्रिका तयार करून दिल्या.

त्यानंतरच्या काळांत मुंबईंत अमेरिकन मिशनऱ्यांचें आगमन झालें. त्यांनीं धर्मप्रसाराच्या हेतूनें मुंबईंत १८१३ च्या सुमारास मुद्रणालयाची स्थापना केली. ह्या छापखान्याच्या व्यवस्थापकांपैकीं वेबस्टर नि त्यांचे पट्टशिष्य थॉमस ग्रॅहॅम हीं दोन नांवें लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत.

बंगालमध्यें जशी विल्यम कॅरी यांनीं मुद्रणकलेच्या बाबतींत संस्मरणीय कामगिरी पार पाडिली, त्याचप्रमाणें महाराष्ट्राच्या दृष्टीनें थॉमस ग्रॅहॅम ह्यांच्या कामगिरीला फार महत्त्व आहे. कारण महाराष्ट्रांत ज्यांनीं मुद्रण–कलेच्या क्षेत्रांत नंतरच्या काळांत उज्ज्वल परंपरा निर्माण केल्या, ते गणपत कृष्णाजी, जावजी दादाजी, नि राणूजी रावजी आरू ह्यांचे वंदनीय गुरुजी होऊन रहाण्याचा मान त्यांनीं आपल्या सौजन्याच्या, कलाकुशलतेच्या नि शिष्य-प्रेमाच्या बळावर मिळवून ठेविला आहे.

त्या काळांतील मिशनऱ्यांस एतद्देशीय धर्माचे वाटेल तसे वाभाडे काढून आपल्या धर्माचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करायचें होतें. कलकत्त्यांत येऊन बॅपटिस्ट मिशनतर्फे विल्यम कॅरी ह्यांनीं प्रथम जो मुद्रणालयाचा संसार थाटला, तो केवळ स्वधर्म-प्रचाराच्या हेतूनें. बंगाली भाषा शिकून त्यानें बायबलचें त्या भाषेंत भाषांतर करून तें प्रचारासाठीं प्रथम छापून काढलें; परंतु देशी भाषा शिकून नि बायबलचीं भाषांतरें करून त्यांचें समाधान झालें नाहीं. १८०० आणि १८०५ च्या दरम्यान त्यानें हिंदु नि मुस्लीम धर्मावर शिंतोडे उडविणारीं कांहीं पत्रकें नि पुस्तिकाही प्रचारासाठीं प्रसिद्ध केल्या. परंतु जनता

बिथरून जाऊं नये, ह्यासाठीं जपून वागणाऱ्या तत्कालीन सरकारच्या नजरेंत त्या भरल्या.

इंग्रज राज्यकर्त्यांना ह्या देशांत आपले पाय बळकट करायचे होते.जनतेला विश्वासांत घ्यायचें होतें नि राज्य--शकट अडथळ्याशिवाय हांकायचा होता. धार्मिक प्रश्न म्हटला म्हणजे तो सर्वांच्याच जिव्हाळ्याचा प्रश्न. त्यावर परधर्मीयांनीं वाटेल तसे आघात करून कसें चालेल? आणि आरंभ-काळांत भारतांत आलेल्या मिशनऱ्यांनीं उत्साहभरांत नेमकें त्याच्या उलट धोरण स्वीकारलें होतें.

त्यामुळें जनतेंत अस्वस्थता निर्माण होऊं लागली. मिशनऱ्यांच्या धर्मप्रचारामुळें राज्यकर्त्यांच्या हेतूंबद्दल जनतेला संशय वाटूं लागला. ह्यासंबंधींच्या कारणांचा शोध करतां, त्याच्या बुडाशीं मुद्रण-यंत्र असल्याचें आढळून आलें. केवढा हा त्या यंत्राचा प्रताप!

मुद्रण-यंत्र हें दुहेरी धारेचें हत्यार आहे. त्याच्या सहकारानें जशी शांतता प्रस्थापित करतां येते नि जनतेंत ज्ञान-प्रसाराची दिव्य-ज्योत प्रज्वलित करतां येते, त्याचप्रमाणें, त्याच्या सहाय्यानें अशांततेचा नि अप्रीतीचा दावाग्नीही भडकवितां येतो.

त्या काळांतील एकच एक उदाहरण द्यावयाचें झाल्यास वेलोर येथील शिपायांच्या बंडाळीचें (१८०६) देतां येईल. त्या बंडाळींत कर्नल फँकोर्ट यांना नि शंभर अधिकाऱ्यांस प्राणांस मुकावें लागलें! त्याकाळीं गोऱ्या अधिकाऱ्यांची ही जी भयंकर कत्तल झाली, तिचें प्रमुख कारण म्हणजे मिशनऱ्यांनीं मुद्रण-यंत्राच्या सहाय्यानें चालविलेली धार्मिक चळवळ होय. कांहीं धोरणी ब्रिटीश राज्यकर्त्यांनींच हें कारण नमूद करून ठेविलें आहे.

उपरोक्त बंडाळी नि तत्प्रसंगीं झालेली भयंकर कत्तल, ह्यामुळें इंग्लंडांतील लोकांचे डोळे खाडकन उघडले असल्यास नवल नाहीं. त्याकाळीं भारतांत लष्करी, मुलकी नि व्यापारी मिळून तीस हजार गोरे लोक होते. त्यांच्या जीवित-रक्षणाची काळजी घ्यायची असल्यास मिशनऱ्यांच्या हालचाली बंद करण्यांत आल्या पाहिजेत, एवढेंच नव्हे तर भारतांतील मिशनऱ्यांस परत स्वदेशीं पाठवून देण्यांत आलें पाहिजे, असें स्पष्ट मत मार्शमन ह्या लेखकानें नमूद करून ठेविलें आहे.*

*Printing Press in India, by A. K. Priolkar, Page—111

डॉ. कॅरी ह्यांनीं श्रीरामपूर येथें मुद्रण-यंत्राची उभारणी करून जो छपाईचा उद्योग सुरू केला होता, त्या आपमतलवी उद्योगाचें हें कटु फळ होतें. त्या मुद्रणालयांत हिंदु नि मुस्लीम धर्मांविरुद्ध बंगाली व हिंदी भाषेंत छापून प्रसिद्ध करण्यांत आलेलीं चोपडीं कोणत्या ना कोणत्या मार्गानें सरकारकडे आलीं. कोणाही हिंदु किंवा मुस्लीम धर्मीयास तीं वाचून भयंकर चीड आल्याशिवाय राहिली नसती. सरकारनें हें अचूक ओळखलें.

सरकारच्या सेक्रेटरीकडून ह्या बाबतींत डॉ. कॅरी ह्यांस जाब विचारण्यांत आला. ते जाब काय देणार ? त्यांच्या अपायकारक नि राज्यकर्त्यांस धोक्यांत आणणाऱ्या हालचालींचा भरभक्कम पुरावा सरकारच्या दप्तरीं दाखल झालेला होता.

एकंदर परिस्थितीचें गांभीर्य लक्षांत घेऊन डॉ. कॅरी ह्यांस उद्देशून सरकारकडून एक हुकूम काढण्यांत आला नि त्या हुकुमान्वयें डॉ. कॅरी ह्यांच्यावर नि त्यांच्या मुद्रण-हालचालींवर कडक बंधनें घालण्यांत आलीं.

'सरकारी अधिकाऱ्यास दाखविल्याशिवाय कोणताही मजकूर छापून प्रसिद्ध करायचा नाहीं व श्रीरामपूर येथून मुद्रणालय कलकत्ता येथें आणून तेथें सरकारच्या नजरेखालीं छपाईचीं कामें करण्यांत यावीं. त्यामुळें सरकारी अधिकाऱ्यास देखरेख ठेवणें सोईचें होईल,' असें त्यांना स्पष्टपणें कळविण्यांत आलें.

सरकारनें आपली सुख-सोय पाहिली; परंतु डॉ. कॅरी ह्यांच्या दृष्टीनें तीं सरकारी बंधनें अत्यंत गैरसोयीचीं नि त्यांच्या उद्दिष्टांवर संपूर्णपणें घाला घालणारीं होतीं, त्याचें काय ? ज्या कार्याच्या सिद्धयर्थ आपण स्वदेश सोडून आलों, हालअपेष्टा भोगल्या नि आपल्या जिवाचें रान केलें, त्या कार्याचा हा अंत आहे असें त्याला वाटलें. कारण धर्म-प्रचारासंबंधींचा त्यांचा उत्साह तसाच तीव्रतर होता. सरकारी हुकूम हातीं पडतांच, 'हें फळ काय मम तपाला ?' असें वाटून तो ढळढळां रडला असें सांगतात. ('Dr. Carey considered that this would mean an end to the work to which he had dedicated himself and it is said that he wept bitterly when he received this directive.')*

* *Printing Press in India* by A. K. Priolkar.

श्रीरामपूर डॅनिश वसाहतींत होतें. डॉ. कॅरी हे तेथून सारीं सूत्रें हालवीत होते. त्या वसाहतीच्या गव्हर्नरालाही लॉर्ड मिंटो (भारताचे गव्हर्नर जनरल) ह्यांनीं कळविलें कीं, श्रीरामपूर येथील छापखाना भारत-सरकारच्या थेट हुकमतीखालीं कलकत्ता येथें आणण्यांत यावा. डॅनिश गव्हर्नरला तें पत्र अपमानकारक वाटून त्यानें तें धुडकावून लाविलें. त्याच्या दृष्टीनें तें पत्र अपमानकारक असलें, तरी डॉ. कॅरी आणि त्यांचे सहकारी मिशनरी-बंधु ह्यांना बेपर्वाईनें वागून कसें चालेल ? त्यांची दृष्टि कार्यावर खिळून राहिलेली होती. येन केन प्रकारेण त्यांना भारतीय जनतेंत स्वधर्म-प्रचार करायचा होता. आणि उठतां बसतां राज्यकर्त्या इंग्रज अधिकाऱ्यांशीं संबंध येत होता. तेव्हां निमूटपणें मिटतें घेणें नि नम्रता स्वीकारणें हेंच श्रेयस्कर आहे, असा पोक्त नि कार्याच्या दृष्टीनें फायदेशीर विचार करून त्यांनीं 'इतके कठोर होऊं नका; आम्ही तुमचा हेतु समजूं शकतों. त्या हेतूला स्मरून आम्ही वागत जाऊं; आम्हांला थोडें तरी कार्य करूं द्या,' अशा अर्थाचा एक दयेचा विनंती-अर्ज त्यांनीं सरकारला सादर केला. त्यामुळें झालें काय ? सरकारनें आपल्या वक्र-दृष्टीला मुरड घातली नि पहिला हुकूम बराच शिथिल केला. मात्र मिशनऱ्यांस मुद्रण-यंत्राच्या सहाय्यानें छापून जें कांहीं प्रसिद्ध करायचें असेल तें प्रसिद्धीपूर्वी ब्रिटीश अधिकाऱ्याच्या नजरेखालून गेलेंच पाहिजे, ही महत्त्वाची नि बंधनकारक अट बदलण्यांत आली नाहीं !

# ३

# महाप्रतापी मुद्रण–यंत्र !

भारतांत मुद्रण-कलेचा प्रवेश कोणत्या मार्गानें नि कशा रीतीनें झाला हें आपण येथवर पाहिलें; परंतु हा प्रवेश आरंभकाळीं राज्यकर्त्यांस धोक्याचा वाटावा, अशी परिस्थिति निर्माण झालेली होती. कशी नि कां तें आपण पाहूं या. त्याचें थोडेंसें दिग्दर्शन मागील प्रकरणांत केलें आहे; आतां राजकीय दृष्ट्या त्याकाळीं मुद्रण-यंत्रानें जे प्रताप गाजविले, त्यांकडे वळूंया।

मुद्रण-यंत्र हें प्रचाराचें एक अमोघ साधन आहे, ही गोष्ट सुस्पष्ट झालेली होती; त्याचप्रमाणें परदेशी मिशनऱ्यांना ह्या देशांत आपल्या धर्माचा प्रचार जास्तींत जास्त प्रभावी रीतीनें करण्यासाठीं हें प्रभावी प्रचार-यंत्र कसें राबवितां येईल हें पाहावयाचें होतें. त्याच हेतूनें गोव्यांत काय, कलकत्त्यांत काय, किंवा मुंबईंत काय, मिशनऱ्यांनीं मुद्रण-यंत्रांची आयात करण्यांत पहिला पुढाकार घेतला. स्वधर्म-प्रचाराच्या बाबतींत त्यांच्या उत्साहास ताळ-तंत्र राहिला नव्हता. त्यांना स्वधर्माचे गोडवे गाऊन ह्या देशांतील हिंदु, मुस्लीम वगैरे धर्मांवर शिंतोडे उडवायचे होते नि आपला धर्म श्रेष्ठ हें जनतेच्या मनावर बिंबवायचें होतें. धर्माभिमानानें माणूस आंधळा होतो म्हणतात. त्या दुरभिमानामुळें तो कुठें वहात जाईल, हें सांगतां येणें कठीण आहे.

आरंभकाळांत मुद्रण-यंत्राला सरकारकडून विरोध कां झाला नि त्याच्या चालकांवर बंधनें घालण्याची जरूरी कां निर्माण झाली, त्याचें हें एक कारण

सांगितलें. ह्याशिवाय मुद्रण-यंत्र तत्कालीन सरकारच्या डोळ्यांत कां सलूं लागलें, ह्याला अन्य कारणही होतें. कोणतें तें अन्य कारण ?

त्या काळीं वृत्तपत्र-व्यवसाय होता इंग्रज संपादकांच्या हातीं. ते राज्यकर्त्यांचे जातभाई असले तरी कांहीं ना कांहीं कारणामुळें त्यांचे आपसांत हेवेदावे, चढाओढी त्या काळीं सतत चालू असत. प्रत्येकाचे हितसंबंध वेगवेगळे असत. ते साध्य झाले नाहींत म्हणजे राज्यकर्त्यांवर किंवा अधिकाऱ्यांवर, ज्यांच्या हातीं वृत्तपत्रें असत त्यांच्याकडून टीकेचा मारा होत असे. शिकले-सवरलेले हिंदी लोक तीं वृत्तपत्रें वाचीत असत. त्या टीका वाचून त्यांच्यामध्यें अराजनिष्ठा किंवा राज्यकर्त्यांबद्दल अप्रीति निर्माण होऊं नये, नि त्यांच्यांत राजकीयदृष्टया जागृति घडून येऊं नये, असें तत्कालीन राज्यकर्त्यांना मनापासून वाटत असे. त्यासाठीं अधिकारी-वर्ग डोळ्यांत तेल घालून जपत असे.

राज्यकर्त्यांवर आज इंग्रज-संपादक टीका करूं लागले, तर उद्यां देशी वृत्तपत्रांचे संपादक त्यांचें अनुकरण करून टीका नाहीं का करणार ? आणि ती टीका वाचणाऱ्या वाचकांच्या मनांत राज्यकर्त्यांबद्दल अप्रीति नाहीं का निर्माण होणार ? कोणालाही समजणारा हा सरळ हिशेबी मामला होता.

गव्हर्नर जनरल वारन हेस्टिंग्सपासून नव्हे, तर त्याच्या पूर्वीपासून राज्यकर्त्यांच्या कारभारावर त्यांच्याच जातभाईंनीं टीकास्त्र सुरू केल्याचें आढळून येतें. राज्यकारभारावर नि वरिष्ठ अधिकाऱ्यांवर निर्भीडपणें टीकास्त्र सोडणारा बंगालमधील पहिला टीकाकार जेम्स ऑगस्टस हिकी हा होय. त्यानें 'बंगाल गॅझेट' ह्या नावाचें एक निर्भिड वृत्तपत्र चालविलें होतें.* (१७८०) त्यानें त्या पत्रांतून वॉरन हेस्टिंग्स नि सर एलिझा इंपे (सदर दिवाणी अदालतचे प्रमुख) ह्यांच्यावर प्रखर अशी व्यक्तिगत स्वरूपाची सणसणीत टीका केली. त्याचा परिणाम काय झाला ? जेम्स हिकीला अटक करण्यांत येऊन दंडाची शिक्षा ठोठावण्यांत आली; परंतु तरीही त्यानें आपलें धोरण यत्किंचितही बदललें नाहीं. पुन्हां तोच उपक्रम दुप्पट उत्साहानें चालू ! वारन हेस्टिंग्सला कोणीना कोणी बडे शत्रु होतेच. त्यांची हिकी ह्यास आंतून

* Printing Press in India' by A. K. Priolkar, Page: 105

फूस होती आणि त्या जोरावर तो पुन्हां पुन्हां टीकेचे फूत्कार सोडीत असे. त्यामुळें त्याला पुन्हां अटक करून त्याच्यावर खटला भरण्यांत आला नि त्याला एकुणीस महिन्यांच्या तुरुंगवासाची शिक्षा ठोठावून त्याचें मुद्रणालय जप्त करण्यांत आलें! आणि अशा रीतीनें सरकारवर टीकेचा भडिमार करणाऱ्या 'बंगाल गॅझेट'चा अवतार आटोपला!

त्यानंतरच्या काळांत जेम्स हिकीची गादी चालविणारे अनेक इंग्रज संपादक पुढें आले व त्यांचीं वृत्तपत्रें सरकारकडून बंद पाडण्यांत येऊन त्यांना त्यांच्या बाडबिस्तऱ्यांसह त्या काळीं इंग्लंडला रवाना करण्यांत आलें!

कोणत्याही परिस्थितींत वृत्तपत्रांची गळचेपी करावी किंवा संपादकीय स्वातंत्र्य मर्यादेबाहेर हिरावून घेण्यांत यावें, असें वारन हेस्टिंग्सला वाटत नसे. त्या बाबतींत तो उदार-मतवादी होता; परंतु प्राप्त परिस्थितीपुढें त्याला वांकावें लागत असे.

लॉर्ड वेलेस्ली हा भारताचा गव्हर्नर जनरल असतां (१७९७) त्याच्या कारकीर्दीवर कलकत्त्याच्या 'एशियाटिक मिरर' ह्या पत्राचे संपादक ब्रूस ह्यांनीं जोरदार टीका करण्यास सुरुवात केली. त्यामुळें सार्वजनिक शांततेला धोका पोहोंचण्याचा संभव आहे, ह्या सबबीवर इंग्लंडला जाणारी जी पहिली बोट मिळेल, त्या बोटीनें संपादक ब्रूस ह्यांची उचलबांगडी करण्यांत यावी, असा हुकूम त्यांनीं सोडला व त्याची त्यांच्या हुकुमाप्रमाणें अंमलबजावणी करण्यांत आली!

ह्या एकंदर रागरंग नि मुद्रण-यंत्रापायीं अस्तित्वांत येणाऱ्या ह्या हालचाली लक्षांत घेऊन मुद्रणालयांवर नि त्यांच्या चालकांवर त्या काळीं इष्ट वाटणारीं बंधनें लादणारा नि मुद्रणालयाचें नियंत्रण करणारा सेन्सॉरशिप कायदा अस्तित्वांत आला.

ह्या कायद्यामुळें मुद्रकांवर नि संपादकांवर जबरदस्त बंधनें लादण्यांत आलीं. वरील एकंदर विवेचनावरून एक गोष्ट समजून आली असेल कीं, त्याकाळीं मुद्रणयंत्राचा नि लेखणीचा दुरुपयोग करणारे राज्यकर्त्यांचे जातभाईच होते.

इंग्रजी राजवटीच्या आरंभकाळीं तत्कालीन बहुसंख्य गोऱ्या अधिकाऱ्यांस असें वाटत असे कीं, राज्यकारभार चालविण्याच्या दृष्टीनें हिंदी जनता अज्ञानावस्थेत नि रानटी स्थितींत रहाणेंच इष्ट आहे. त्यामुळें ज्ञान-प्रसाराचें अमोघ साधन जें मुद्रण-यंत्र, तें त्यांना ह्या देशांत समृद्ध व्हायला नको होतें; परंतु

त्याची आयात तर झालेली होती. मग काय करायचें ? त्याच्यावर शक्य तेवढीं बंधनें लादावयाचीं. पुढील काळांत हीं बंधनें वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या धोरणानुसार कधीं कडक तर कधीं शिथिल करण्यांत आलीं. काळ झपाट्यानें बदलत चालला होता; त्याबरोबर मुद्रण-यंत्राकडे पहाण्याच्या नि त्याला राबविण्याच्या दृष्टींतही आस्ते आस्ते बदल होत गेला.

त्या काळीं कलकत्ता हें राजधानीचें शहर असल्यामुळें साऱ्या महत्त्वाच्या हालचाली नि घडामोडी त्या शहरांत होत असत. त्यामुळें राजधानीच्या प्रमुख शहरांत आरंभकाळांत मुद्रण-यंत्रानें कोणते प्रताप गाजविले, ह्याची थोडक्यांत माहिती करून दिली. आतां आपण आपल्या महाराष्ट्रांत, विशेषतः मुंबईंत मुद्रण-यंत्रानें कोणते प्रताप गाजविले, हें पाहूं या.

# ४

## मुंबईंतील मुद्रणविषयक हालचाली

मुंबईंत प्रथमतः मुद्रणविषयक हालचाली सुरू झाल्या त्या अमेरिकन मिशनतर्फे. स्वधर्मप्रचाराच्या बाबतींत त्यांनी आरंभापासून सावधगिरीचें धोरण स्वीकारलें होतें. शिवाय तत्कालीन अधिकाऱ्यांनीं मुद्रण-यंत्रावरच्या हालचालींवर आपली सक्त नजर ठेविली होती; धोरणी व मुत्सद्दी राज्यपाल माउंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन हा मुद्रण-यंत्राचें महत्त्व बरोबर ओळखून होता. त्यानंतर ३।४ वर्षांनीं (१८२१) सुरतेंत मिशनची स्थापना होऊन तेथें मिशनऱ्यांनीं छापखाना सुरू केला तेव्हां अधिकारीवर्ग त्याकडे वक्रदृष्टीनें पाहूं लागला. त्या काळीं सुरतेंत मुस्लीम समाज मोठ्या प्रमाणांत होता आणि मिशनऱ्यांच्या उपद्व्यापांमुळें तो समाज खवळला तर त्याचा अनिष्ट परिणाम भोगावा लागेल, अशी अधिकाऱ्यांस धास्ती वाटूं लागली. तेव्हां मुद्रण-यंत्राला तेथें थारा द्यावा कीं नाहीं, ह्याबद्दल साधक बाधक चर्चा सुरू झाली. कोर्ट ऑफ डायरेक्टर्सपर्यंत हें प्रकरण गेलें. त्यावेळीं राज्यपाल एल्फिन्स्टन ह्यानें डायरेक्टर-बोर्डापुढें आपलें मत एका निवेदनाच्या द्वारें अत्यंत स्पष्टपणें मांडिलें. त्या निवेदनांत तो म्हणतो कीं, "मुद्रणालयावर बंधनें हीं असलींच पाहिजेत. मिशनऱ्यांस लेखन-स्वातंत्र्य देऊन चालणार नाहीं. सध्यां आपल्यापुढें जो प्रश्न आहे तो म्हणजे सरकारी नियंत्रणाखालीं छापखान्याचा व्यवहार चालू देण्यांत यावा कीं नाहीं ? त्याला माझें उत्तर होकारार्थी आहे. नियंत्रण ठेवून ह्या देशांतील जनतेमध्यें मुद्रण-कला सुरू करणें

इष्ट आहे, असें मला वाटतें. ही कला अत्यंत उपयोगी नि कल्याणप्रद आहे. तिचे फायदे ह्या देशाला घेऊं देणें अत्यंत इष्ट आहे. ह्या यंत्राच्या प्रभावामुळें कालांतरानें जनतेंत जागृति होऊन आमच्या सत्तेचें वर्चस्व झुगारून द्यावें, असें तिला वाटण्याचा संभव आहे, नव्हे शक्यताही आहे; परंतु त्याहीपेक्षां निश्चितपणें होणारे दुसरे फायदे अनेक आहेत आणि त्यांचें महत्त्व फार आहे. त्या यंत्राच्या प्रभावामुळें जनतेंतील अज्ञान नि अज्ञानमूलक खुळ्या समजुती नाहींशा होतील व जनता सुबुद्ध होईल. हें ज्ञान-प्रसाराचें कार्य फार महत्त्वाचें आहे. तेव्हां मुद्रण-यंत्राची स्थापना होऊं देणें ही अत्यावश्यक गोष्ट आहे. ह्या देशांतील धर्मावर आघात करण्यासाठीं मिशनरी जर का त्या यंत्राचा उपयोग करूं लागले, तर तें त्यांचें कृत्य धोक्याचें ठरेल. त्यासाठीं निर्बंधांची आवश्यकता आहे; परंतु त्या भीतीनें मुद्रण-यंत्राची सर्वतोपरी मुस्कटदाबी करून चालणार नाहीं. मुद्रण-यंत्राच्या सहाय्यानें जनतेंत ज्ञान-प्रसार करतां येतो. ह्या देशांतील जनतेंत ज्ञानप्रसाराची फार जरूरी आहे आणि त्यासाठीं मुद्रण-यंत्राच्या स्थापनेला उत्तेजन देणेंच जरूर आहे. तेव्हां सुरतेंतील मिशनऱ्यांच्या मुद्रणालयांवर बंधनें घालून त्यांना मुद्रण-यंत्र चालवूं देण्यांत यावें. सुरतेंतच काय, परंतु ह्या प्रांताच्या इतर भागांतही मुद्रणालयें स्थापन व्हावीं, असें मला वाटतें."

एल्फिन्स्टननें मुद्रणालयाच्या बाबतींत स्वीकारलेल्या ह्या उदारमतवादी नि उपकारक धोरणामुळें मुंबई प्रांतांत नंतरच्या काळांत आस्ते आस्ते मुद्रणालयांची संख्या वाढत गेली.

जनतेंत ज्ञानप्रसार होणें अत्यंत जरूर आहे; आणि त्यासाठीं ज्या ज्या साधनांचा सहकार मिळवितां येईल तीं तीं साधनें नि माणसें जवळ करावयाचीं, हें होतें राज्यपाल एल्फिन्स्टनचें धोरण. शिक्षणप्रसारासाठीं 'नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी' ह्या संस्थेची स्थापना करून तिचीं सूत्रें त्यानीं कॅप्टन जर्व्हिस ह्या शिक्षणप्रेमी गृहस्थाकडे सोपविलीं. शिक्षणप्रसारासाठीं शालोपयोगी पुस्तकें पाहिजेत, त्यांची निर्मिती कशी करावयाची, हा प्रश्न पुढें आला तेव्हां मुद्रण-यंत्राची आवश्यकता सहाजिकच जाणवूं लागली. तो काळ शिळाप्रेसचा होता. त्यासाठीं जरूर तीं साधनें मागवून ग्रंथ-छपाई सुरू करण्याची परवानगी एल्फिन्स्टननें त्याकाळीं जाणीवपूर्वक दिली.

'मुंबई वर्णन'कार गो. ना. माडगांवकर ह्या घटनेचा उल्लेख करून लिहितात कीं, "पुस्तकें वगैरे छापण्याकरितां एक छापखानाही घातला. ह्या खात्याची देखरेख करण्यासाठीं कप्तान जर्विस ह्यांस नेमिलें. त्यांनीं हें काम मोठ्याच तारतम्यानें चालविलें. मराठी शाळेचें काम तपासण्यास सदाशीव काशिनाथ छत्रे व जगन्नाथ शास्त्री क्रमवंत ह्यांस नेमिलें. आणि त्यांच्या हाताखालीं दुसरे पुष्कळ शास्त्री नेमून शालोपयोगी पुष्कळ ग्रंथ तयार केले. सदाशीव काशिनाथ छत्रे यांनीं इंग्रजी भाषेंतून बाळमित्र, इसापनीति, वगैरे सुंदर शालोपयोगी पुस्तकें शुद्ध मराठी भाषेंत तयार करून छापिलीं. खुद्द जर्विस साहेबानीं गणित, भूगोल, भूमिति इत्यादि ग्रंथ प्रथम तयार केले. तसेंच रसायन-शास्त्र, पदार्थ-विज्ञान यावर उत्तम प्रकारचे ग्रंथ दुसऱ्या गृहस्थांकडून करविले. हरी केशवजी नावाचे एक विद्वान गृहस्थ होते. हे इंग्रजी ग्रंथांचें मराठी भाषांतर उत्तमप्रकारें करीत. त्यांनींही कांहीं ग्रंथ तयार केले. हाच मराठी शालोपयोगी पुस्तकें छापण्याचा सबळ पाया पडला.[१]

आणि ही सबळ पायाभरणी त्याकाळीं झाली ती राज्यपाल एल्फिन्स्टन ह्यांच्या उदार, दूरदर्शी नि कल्याणकारी धोरणामुळें. ह्या उल्लेख पुन्हां पुन्हां करण्याचें कारण त्या आरंभकाळांत त्यांच्या ह्या उदार धोरणास कसून विरोध करणारे वॉर्डन साहेबासारखे सभासद त्यांच्या मंत्रिमंडळांतच होते.

मुद्रणयंत्राला थारा देणें म्हणजे आपल्याच हातांनीं स्वतःवर कुऱ्हाडीचा घाव घालून घेण्यासारखें धोक्याचें आहे, असें त्यांना वाटत असे.

हा देश त्याकाळीं ज्या परिस्थितींतून जात होता त्या परिस्थितींत मुद्रणयंत्राला उत्तेजन देणें नि ठिकठिकाणीं त्यांची स्थापना होऊं देणें धोक्याचें आहे, असें वॉर्डन ह्यांस प्रामाणिकपणें वाटत असे. "Whatever may be my own views on the subject, a most important question, which has been much discussed under the Presidency of Bengal presents itself, what would the effects of the power and influence of the Press in the present state of the country, if the Natives are to be taught the art of printing, the dissemination of whatever they choose to publish would of course immediately follow."*

१ मुंबई वर्णन, लेखक - गो. ना. माडगांवकर (१८६३) पृ. २२७-२८

*The Bombay Secretariat Records G. D. Vol. 8/63, 1824, P. 192

राज्यपाल एल्फिन्स्टन ह्यांस त्यामुळें पुन्हां मुद्रण-यंत्राच्या प्रसारासंबंधीं आपलें खंबीर धोरण पुढें मांडण्याची सुसंधी मिळाली. वॉर्डेन ह्यांच्या वरील धोरणास उद्देशून प्रकट केलेल्या निवेदनांत ते म्हणतात, "मुद्रिका नि मुद्रणयंत्रें मागवून त्यांचा येथील गरजू लोकांस लाभ करून दिल्यानें मुद्रण-यंत्राचा मुंबईबाहेर झपाट्यानें प्रसार होईल असें मानण्याचें कारण नाहीं. ह्या यंत्राची उपयुक्तता जनतेला पटेपर्यंत बराच कालावधि लोटावा लागेल. आणि मुद्रण-कला ही सार्वत्रिक वापरांतील कला झाली, तरी तिचा वापर करण्याच्या बाबतींत औदार्य दाखविणें घोक्याचें आहे, असें मला मुळींच वाटत नाहीं, हें मत मला स्पष्टपणें पुढें मांडणें जरूर वाटतें. "Even when printing becomes general, I confess, I do not look on it with any such alarm as to induce me to discourage its commencement.'

ह्याच आपल्या खंबीर निवेदनांत एल्फिन्स्टनसाहेब पुढें म्हणतात:— "ह्या देशांतील जनतेंत मुद्रण-कलेचा प्रसार वाढत्या प्रमाणांत जसजसा होत जाईल तसतशी जनतेला आपल्या वर्चस्वाखालीं ठेवण्याची आमची सत्ता दुबळी होत जाईल, हें सत्य मी नाकारूं शकत नाहीं; परंतु त्याचबरोबर त्या यंत्रामुळें जनतेंत शिक्षण-प्रसार वाढीला लागेल, निःपक्षपाती न्यायनिवाडे जनतेला मिळूं लागतील नि जनतेची स्थिति अधिकाधिक सुधारण्याच्या बाबतींत तें यंत्र उपयोगी पडेल. माझ्या दृष्टीनें हे फायदे फार महत्त्वाचे आहेत."

शेवटीं आपल्या निवेदनाच्या समारोपांत हे साहेब काय म्हणतात पहा:

"मुद्रण-यंत्रामुळें जे धोके निर्माण होतील असें वाटतें, ते दूरवरचे नि काल्पनिकही आहेत; परंतु त्या यंत्रामुळें होणाऱ्या फायद्यांचें काय? आम्हांलाही जे फायदे होतील त्यासाठीं वाट पहात बसायला नको. त्यांचें स्वरूप अगदीं व्यवहार्य नि फळ तात्काळ पदरांत पडणारें आहे. ह्या देशांतील लोकांवर राज्यकारभार चालविण्याची जबाबदारी आम्हीं ज्याअर्थी स्वीकारली आहे, त्याअर्थी त्यांची सुधारणा करण्यासाठीं झटणें हें आमचें कर्तव्य आहे. तेव्हां कोणत्याही परिस्थितींत मुद्रणकलेपासून त्यांना वंचित करणें केव्हांही न्याय्य ठरणार नाहीं. तसेंच ह्या देशांतील लोकांवर दीर्घकाळ वर्चस्व गाजवितां यावें, ह्या हेतूनें त्यांना अज्ञानांत ठेवणेंही न्याय्य म्हणतां येणार नाहीं."*

* *The Bombay Secretariat Records G. D. Volume 11, 1821-23*

एल्फिन्स्टनसाहेब हे मुद्रणयंत्राच्या बाबतींत अनेक कारणांमुळें उदारमतवादी असले तरी ह्या देशांतील लोक त्या यंत्राचा वापर सारासार दृष्टीनें करतील कीं नाहीं, ह्याबद्दल राज्यकर्ते साशंक होते. त्यानंतर १।२ वर्षांच्या काळांत अशा कांहीं घटना घडून आल्या कीं, त्यामुळें सत्ताधाऱ्यांस मुद्रणालयांवर कांहीं निर्बंध घालणें जरूर पडलें.

ह्या निर्बंधांचें स्वरूप काय होतें व त्यांची मगरमिठी कधीं सैल तर कधीं घट्ट कसकशी होत गेली, ह्याचें विवेचन येथें करण्याची फारशी जरुरी आहे असें वाटत नाहीं; परंतु एवढें मात्र निश्चित कीं, मुद्रण-यंत्रामुळें जनमनांत क्रांति घडून आली. आणि एल्फिन्स्टनसाहेबांनीं सुमारें दीडशें वर्षांपूर्वीच्या काळांत भाकित करून ठेवल्याप्रमाणें अज्ञानांधकारांत चांचपडणारी जनता ज्ञानसंपन्न झाली व इंग्रज सरकारकडे स्वातंत्र्याची मागणी करूं लागली, एवढेंच नव्हे तर शेवटीं जनतेनें स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलें व परकीय सत्तेचें जूं झुगारून दिलें!

मुद्रण-यंत्राला वेगवेगळ्या कारणांमुळें तत्कालीन सत्ताधाऱ्यांचा विरोध होता आणि त्या प्रतिकूल नि अनुकूल वातावरणांत हेलकावे खात खात त्या यंत्राला आपली बैठक स्थिर करायची होती. लोक कल्याणाच्या दृष्टीनें ती बैठक स्थिर होणें अत्यंत जरूर होतें व ती कालांतरानें झालीही; परंतु आरंभकाळांत ह्या प्रभावशाली यंत्राला नाना प्रकारच्या दिव्यांतून पार पडावें लागलें आहे.

महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें झाल्यास तत्कालीन बहुसंख्य अज्ञ जनता तरी मुद्रण-यंत्राला अनुकूल कुठें होती ? छापण्याच्या शाईंत चरबी असते व छापील पुस्तकांस घरांत थारा देणें नि तीं वाचणें म्हणजे भ्रष्टाकार आहे, असें तत्कालीन विद्वानांसही कसें व कां वाटत असे हें आपण पाहिलें व पुढील प्रकरणांत त्याचें विशेष दिग्दर्शन करण्यांत आलें आहे.

ज्या काळीं मुद्रण-यंत्रानें महाराष्ट्रांत प्रवेश केला तो आरंभकाळ अशा प्रकारचा होता. पहिले महाराष्ट्रीय मुद्रक-प्रकाशक गणपत कृष्णाजी व त्यांच्यामागून आलेले शेठ जावजी दादाजी ह्यांनीं मुद्रण-यंत्राची कांस खंबीरपणें धरून त्या विपरीत काळांत जें ज्ञानप्रसाराचें नि धर्मप्रसाराचें कार्य मोठ्या जिद्दीनें पार पाडिलें, त्याचें महत्त्व किती आहे, ह्याची वरील विवेचनावरून सार्थ कल्पना करतां येण्यासारखी आहे.

ही असहाय्य परिस्थिति डोळे मिटून स्वस्थपणें पहात रहाणें ज्याला असह्य झालें, असा एक धर्माभिमानी व कर्तबगार महाराष्ट्रीय तरुण त्या वेळीं अमेरिकन मिशन-प्रेसमध्यें मुद्रिका (टाईप) दगडावर घासून त्या साफसूफ करण्याच्या कामावर होता. त्याला घांसकामावद्दल पगार मिळत होता अवघा दोन रुपये ! लिहितां वाचतां येण्यापुरतें त्याचें शिक्षण झालें होतें. कुलावा जिल्ह्यांतील एका आडवळणी खेड्यांतून पोट भरण्यापुरता कांहींतरी कामधंदा करावा, ह्या हेतूनें तो मुंबईत आला. भंडारी जातींतील एका गरीब कुटुंबांत त्याचा जन्म झाला. त्याची धारणाशक्ति जबरदस्त होती. धर्माभिमान प्रखर होता. आणि तो नसतो कोणांत ? परंतु ह्या तरुणानें मुद्रिका घांसतां घांसतां आपल्यासभोंवार ज्या कांहीं हालचाली पाहिल्या, त्यामुळें तो बेचैन झाला. तो स्वतःशीं विचार करूं लागला कीं, हे गोरे लोक हजारों कोसांवरून आमच्या देशांत येतात, आमच्याच लोकांना हाताशीं धरतात, छापखान्याच्या यंत्राचीं उभारणी करतात, आमच्या भाषा शिकतात नि आपल्या धर्माचीं लहानमोठीं पुस्तकें छापून धर्मप्रसार करण्यासाठीं परोपरीनें झटतात. आणि आम्हीं कांहीं एक हालचाल न करतां हें सारें निमूटपणें पहात बसतों ! तें कांहीं नाहीं; ह्या परिस्थितींतून मार्ग काढलाच पाहिजे, अशी ईर्षा त्या तरुणांत निर्माण झाली नि घांसकाम करतां करतां जन्मास तसें, ह्या न्यायानें आपणास पावलें टाकतां येतील का ? ह्या विचारास तो लागला. सर्वत्र निःकर्तव्यमूढता, पराभूतवृत्ति, परावलंबन नि आळस सैरपणें वावरत असतां त्या तरुणाला आपण कांहींना कांहीं हालचाल केलीच पाहिजे, अशी प्रेरणा झाली. त्याच्याजवळ सत्तेचें, संपत्तीचें किंवा समानधर्मा सहकाऱ्याचेंही पाठबळ नव्हतें. अगदीं एकाकी ! परंतु तो तरुण कल्पक नि हिंमतबहाद्दर होता. सर्वत्र काळोख दिसत असतांही निराशा त्याला भेडसावूं शकली नाहीं !

त्या कर्तबगार तरुणाचें नांव होतें गणपत कृष्णाजी. मोठा उद्योगी, हरहुन्नरी, तसाच धर्माभिमानी. महाराष्ट्रांतील मुद्रण-प्रकाशन व्यवसायाचा पाया घालण्याचें नि त्यावर यथाशक्ति इमारत उभारण्याचें भाग्य त्याच्या वाट्यास जावयाचें होतें.

त्यानंतर सुमारें चाळीस वर्षांनीं शेठ जावजी दादाजींचा मुद्रण-प्रकाशन

क्षेत्रांतील आज्वल्य जमाना सुरू झाला. परंतु तत्पूर्वीचा, तीस वर्षांचा काळ, गणपत कृष्णाजींनीं मुद्रण-व्यवसायांतील आपल्या अजोड कर्तबगारीनें अक्षरशः गाजविला.

कुलाबा जिल्ह्यांत थळ ह्या नावाचें एक खेडें आहे. त्या खेड्यांतील एका लहानशा घरांत गणपत कृष्णाजींचा जन्म १८०० सालीं झाला. त्यांचें आडनाव होतें पाटील. लिहिण्यावाचण्यापुरतें जुजबी शिक्षण झाल्यानंतर पोटापाण्याचा कांहीं तरी उद्योग किंवा नोकरी करण्याच्या हेतूनें गणपत मुंबईंत आला. नोकरीचा शोध करतां करतां मेंडीबाजारांतील अमेरिकन मिशन प्रेसमध्यें घांसकामासाठीं मुलांना ठेवतात, असें समजल्यावरून गणपत त्या छापखान्यांत गेला नि तेथील व्यवस्थापक थॉमस ग्रॅहॅम ह्यांस भेटला. तेथें दरमहा दोन रुपये पगारावर, मुद्रिका घांसण्याच्या कामीं त्याची नेमणूक झाली. त्याच्याबरोबर हेंच काम करणारीं अनेक मुलें होतीं. त्या सर्वांत गणपतची चमक कांहीं वेगळीच होती. आपल्या सभोंवार काय चाललें आहे, ह्याकडे त्याचें सतत लक्ष लागून राहिलेलें असे. अशा चौकस दृष्टीचा, जबर महत्त्वाकांक्षी मुलगा हजारांत नव्हे, लाखांत एकादाच सांपडायचा.

मुद्रण-यंत्राचें सामर्थ्य प्रचाराच्या नि ज्ञान-प्रसाराच्या दृष्टीनें अचाट आहे, हें युरोपीयन लोकांनीं व युरोपमधील निरनिराळ्या देशांतील पुढाऱ्यांनीं, धर्मसुधारकांनीं नि जनतेंत कोणत्याही प्रकारच्या ज्ञानाचा प्रसार करूं इच्छिणाऱ्या समाजधुरीणांनीं ओळखलें; परंतु त्यानंतर सुमारें तीन शतकांचा काळ लोटला तरी समाज-जीवनांत क्रांति घडवून आणणाऱ्या त्या यंत्राकडे आम्हीं भारतीय पाठ फिरवून बसलों होतों !

गणपत कृष्णाजी मुद्रिका घांसण्याच्या कामगिरीवर मिशनरी प्रेसमध्यें दाखल झाले तो काळ म्हणजे १८२०।२२ सालचा. पेशवाईचा अंत होऊन २।४ वर्षेंच मागें पडलीं होतीं. तेथें घांसकामांत असतां एका मुद्रण-यंत्राचें नि त्याच्या अचाट सामर्थ्याचें प्रत्यक्ष दर्शन गणपतला घडलें. परंतु भारतांत प्रचाराच्या दृष्टीनें प्रभावशाली अशा मुद्रण-यंत्राचें आगमन होऊन अनेक वर्षांचा काळ मागें पडला होता. त्या काळांत फ्रेंच, डच व इंग्रजांच्या झुंडींच्या झुंडी व्यापारउदीमाच्या . किंवा अन्य कारणांमुळें भारतांत येरझारा घालीत होत्या.

१

# मुद्रण–महर्षि गणपत कृष्णाजी

स्वधर्माचा प्रचार प्रभावीपणें करतां यावा ह्या हेतूनें भारतांत मुद्रण-कलेचा प्रवेश मिशनऱ्यांमार्फत कशारीतीनें झाला हें आपण पाहिलें. धर्म-भावना किंवा स्वधर्माभिमान प्रत्येकाच्या अंतःकरणांत दृढमूल झालेला असतो. मुंबईत येऊन मिशनऱ्यांनीं मुद्रण-कलेचा संसार थाटला नि ख्रिस्ती--धर्माच्या प्रसारासाठीं वायबलच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या मराठी नि इतर देशी भाषांत छापून त्या प्रत्येकाच्या हातांत सुलभ रीतीनें पडतील अशी व्यवस्था केली. त्यांच्या ह्या शुभवर्तमानाच्या पुस्तिका कोणी हातांत घेवोत वा न घेवोत. त्या पुस्तिका सुबक रीतीनें छापून वाटण्याचा त्या लोकांचा उपक्रम सतत चालू होता. ह्या क्षेत्रांतील त्यांची चिकाटी दांडगी नि आश्चर्यकारक होती.

मुंबईंत अमेरिकन मिशन प्रेस ह्या कामगिरीच्या दृष्टीनें पहातां त्याकाळीं आघाडीवर होता. छापखान्याचीं सूत्रें ज्यावेळीं थॉमस ग्रॅहॅम ह्या महाउद्योगी, कल्पक नि मराठी, गुजराती भाषा जाणणाऱ्याच्या हातीं आलीं, त्यावेळीं त्या दोन्हीं भाषांतील मुद्रिका तयार करून त्यांच्या सहाय्यानें ख्रिस्ती धर्मासंबंधींचें वाङ्मय प्रसिद्ध करण्याचें कार्य विशेष जोमानें सुरू झालें.

मिशनऱ्यांच्या ह्या उद्योगाला राजाश्रयाचा पाठिंबा होता. कारण ख्रिस्ती धर्म हा राज्यकर्त्यांचा धर्म होता. ते अशा उद्योगाला विरोध करणें शक्य नव्हतें. एतद्देशीय लोक ह्या उद्योगाकडे जरी संशयाच्या दृष्टीनें पहात असले तरी त्यांच्या हातीं सत्ता किंवा साधन-सामुग्री नसल्यामुळें, मनांतल्या मनांत जळफळण्यापलीकडे त्यांना कांहीं करतां येत नव्हतें.

त्यांच्याबरोबर बायबलसारखे त्यांचे छापील ग्रंथ ह्या देशांत आयात होत होते नि ते ह्या देशांतील तत्कालीन राज्यकर्त्यांच्या नि विद्वानांच्या पहाण्यांत येत होते. परंतु ह्या प्रभावशाली यंत्रासंबंधानें आपण जरूर ती माहिती करून घेऊं या, किंवा गोवा अथवा कलकत्त्यासारख्या ठिकाणीं आपलीं २।३ हुशार, कारागीर माणसें पाठवून त्या यंत्राची नि छपाईसाठीं लागणाऱ्या मुद्रिका तयार करण्याची माहिती करून घेऊं या व त्या यंत्रणेचा उपयोग आपल्या लोकांची सुधारणा करण्यासाठीं यथाशक्ति करून घेऊं या, असें एकाद्या समर्थ भारतीयाला किंवा महाराष्ट्रीयाला कां वाटलें नाहीं, ह्याचा प्रत्येकानें विचार करण्यासारखा आहे.

हेंच पहाना; चार्ल्स विल्किन्स व विल्यम कॅरी ह्या दोन गोऱ्यांचें बंगालमध्यें आगमन अनुक्रमें १७७० व १७९५ सालीं झालें. नोकरीचीं बंधनें संभाळून त्यांनीं सभोंवारच्या परिस्थितीचें बारकाईनें अवलोकन केलें. आमच्याच महाराष्ट्रीय नि बंगाली शास्त्री-पंडितांना हाताशीं धरून त्यांनीं देवनागरी, बंगाली नि इतर भाषांच्या मुद्रिका तयार केल्या. त्या त्या भाषांचे शब्दकोश नि व्याकरणें तयार केलीं व आमच्याच पंडितांच्या सहाय्यानें आपल्या धर्म-ग्रंथाचीं अर्थात् बायबलचीं भाषांतरें निरनिराळ्या भाषांत तयार करवून घेऊन तीं छापून काढलीं नि त्यांचा हिंदी जनतेंत प्रसार केला. केवढा हा त्यांचा उद्योग!

त्या किंवा तत्पूर्वीच्या काळांत आमचीं सर्वसाधारण माणसें सोडा, परंतु समर्थ नि बुद्धिमान् समजलीं जाणारीं माणसेंही सुखोपभोगांत नि घोर अज्ञानांधकारांत खुशाल कालक्रमणा करीत होतीं. नाहीं म्हणायला आपल्या कारकीर्दीच्या अखेरी अखेरीस पेशवाईतील एक 'शहाणे' नाना फडणवीस ह्यांना ह्या सुधारणेची थोडीशी जाग लागली होती नि त्यांनीं गीता-ग्रंथ छापून काढण्यासाठीं कां होईना, मुद्रिका तयार करवून घेण्याचा उद्योग आरंभला होता; परंतु पुढें त्याचें काय झालें, ह्याची हकीकत ह्यापूर्वीच्या प्रकरणांत सविस्तरपणें देण्यांत आलेली आहेच.

महाराष्ट्रावर राज्य करणाऱ्या मराठ्यांनीं किंवा पेशव्यानीं सर्व दृष्टींनीं अत्यंत महत्त्वाच्या अशा मुद्रण-कलेकडे दुर्लक्ष करून आपलें बौद्धिक दैन्य कसें प्रगट केलें आहे, ह्याचा सडेतोड उल्लेख विद्वान इतिहास-संशोधक नि संग्राहक इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे ह्यांनीं पुढीलप्रमाणें केलेला आहे. :—

"मराठ्यांच्या संस्कृतींत प्रथम व्यंग म्हटलें म्हणजे त्यांना छापण्याची कला माहीत नव्हती. व ती माहीत करून घेण्याचा त्यांनीं कधीं प्रयत्नही केला नाहीं. १४९८ च्या ११ मेला गामानें हिंदुस्थान शोधून काढलें. तेव्हांपासून १७६० पर्यंत फिरंग्यांच्या व मराठ्यांच्या मुलाखती अनेक ठिकाणीं झाल्या. गोमांतक, सावंतवाडी, वसई, कोची, दाभूळ, दिव, दमण वगैरे स्थळीं मराठ्यांच्या फिरंग्यांशीं गांठी पडलेल्या आहेत. वलंदेज (डच्) व डिंगमार (डेन) ह्या लोकांनाही मराठे ओळखीत असत. मुसाबुसी वगैरे फ्रेंच लोकांशीं तर मराठ्यांची चांगलीच घसट असे. मुंबई, सुरत, बाणकोट, विजयदुर्ग, राजापुर, दाभोळ वगैरे ठिकाणीं इंग्रजांचीही जानपछान मराठ्यांना झाली होती. मुंबईंतील परभू, शेणवाई, पारशी, भाटे व वाळुकेश्वरचे छत्रे, भातखंडे वगैरे, ब्राह्मण पुजारी व वैरागी इंग्लीश लोकांशीं हरहमेश दळणवळण ठेवीत. कित्येकांना इंग्रजी चांगलें लिहितां व बोलता येत असे. त्यांनीं छापील पुस्तकें पाहिलीं होतीं यांत संशय नाहीं. नाना फडणिसांच्या दप्तरांत छापील इंग्रजी नकाशे अद्यापही आहेत. मोरोबा दादाच्या घरच्या पुस्तकालयांत एक इंग्रजी चोपडी होती, असें त्यांच्या पुस्तकांच्या यादीवरून कळतें. असें असून म्हणजे युरोपांतील सर्व देशचे लोक त्यांच्या दारीं उभे असून, मराठ्यांनीं छापण्याची कला कशी घेतली नाहीं, याचें मोठें आश्चर्य वाटतें. मराठ्यांच्या वाढल्या साम्राज्यांत योग्य कल्पनांचें वीं पेरण्यास ह्या कलेचाच प्रवेश महाराष्ट्रांत झाला पाहिजे होता. घोरपडे, शिंदे, होळकर, भोंसले, कोल्हापूरकर, सावंत, आंग्रे वगैरे सरदारांच्या पदरीं फिरंगी, फराशिस, इंग्रज वगैरे बरेच देशचे लोक पेशवाई जाईतोंपर्यंत व पुढें देखील होते; असें असून ज्या अर्थी मराठ्यांनीं ही कला उचलली नाहीं, त्याअर्थी त्यांच्या ग्राहकशक्तीच्या कीर्तीला बराच कमीपणा येतो हें निर्विवाद आहे."[१]

इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनीं मुद्रणकलेच्या महत्त्वासंबंधानें प्रकट केलेले विचार खरोखर मननीय आहेत. पेशवाईच्या काळांत मुद्रणकलेच्या महत्त्वाचें आकलन झालेलीं माणसें मात्र अगदींच नव्हतीं असें नाहीं. नाना फडणविसांचें लक्ष गीता-ग्रंथ छापून काढण्यापुरतें तरी ह्या कलेकडे होतें, हें आतां पुराव्यानिशीं

१ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें भाग १ ला, पान १००, लेखक वि. का. राजवाडे

सिद्ध झालें आहे. परंतु इतिहासाचार्य राजवाडे ह्यांस त्याची त्या काळीं खबर लागली नव्हती, असें दिसतें.

ज्यांच्या बुद्धिमत्तेची झेंप चौफेर पोहोंचेल अशा सर्वंगामी बुद्धिमत्तेचें त्या काळीं दुर्भिक्ष होतें हेंच खरें.

ह्याच मुद्रणकलेच्या महत्त्वास अनुसरून पेशवे काळासंबंधीं लिहितांना सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक प्रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर ह्यांनीं काढलेले उद्गारही मनन करण्याजोगे आहेत. ते म्हणतातः—

"तत्कालीन युरोपीय ज्या अनेक उपयुक्त कलांत निपुण होते, त्यांतील पहिली छापण्याची कला. वास्को द गामा इकडे येण्यापूर्वीच या कलेचा शोध लागलेला असून हिंदुस्थानांतसुद्धां पोर्तुगिजांनीं ती कला चालू केली होती. गोवें, कैंगानूर वगैरे ठिकाणीं त्यांनीं बायबलें छापण्याचे कारखाने काढले होते. एका जेझुईट पाद्रीबोवानें अकबर बादशहास स्पेनच्या दुसऱ्या फिलिप बादशहासाठीं मुद्दाम छापलेली बायबलची एक बहुमूल्य सुंदर प्रत नजरही केली होती. त्यानें त्या प्रतींतील येशू व मेरीचीं चित्रें पाहून त्यांच्या प्रती आपल्या चित्रकारांकडून करून घेतल्या. पण एवढ्या शहाण्या अकबरासही इकडे छापखाना काढणें फायदेशीर आहे, हें सुचलें नाहीं. जी गोष्ट अकबरासारख्या जगद्विख्यात शहाण्याची, तीच नानासाहेबांची. चौकसपणानें दुसऱ्याचा ठाव घेऊन त्याच्या चांगल्या गोष्टींचें अनुकरण करावें हें आम्हांस ठाऊकच नाहीं."[१]

ह्यावरून गणपत कृष्णाजींसारख्या एका खेडवळ, गरीब नि साध्यासिध्या माणसाच्या अंतःकरणांत मुद्रण - कलेनें व मुद्रण - यंत्रानें जें कायमचें ठाण मांडलें नि सर्व प्रकारें असहाय्य परिस्थितींत असतांही त्या क्षेत्रांत त्यांनीं जी अविस्मरणीय कर्तबगारी गाजवून दाखविली, त्याबद्दल त्यांचें करावें तेवढें कौतुक थोडेंच होईल, असें वाटल्याशिवाय रहात नाहीं.

गणपत कृष्णाजी ज्या मिशन प्रेसमध्यें २।३ रुपये पगारावर वावरत होते, त्या छापखान्यांत शिळा-प्रेस होता, त्याचप्रमाणें खिळा-प्रेमही होता. दोन्हीं प्रेसवर भराभर कागद छापून बाहेर पडत होते नि त्यांचीं पुस्तकें बांधून तीं

१ शेजवलकरांचे लेख पुस्तक दुसरें. रियासतकार गो. स. सरदेसाई ह्यांच्या 'नानासाहेब पेशवे' ग्रंथाची प्रस्तावना, (ह. वि. मोटे प्रकाशन)

ख्रिस्ती-धर्माच्या प्रसारासाठीं बाहेर पाठविलीं जात होतीं. स्वधर्मप्रसारासाठीं परक्या व दूरच्या देशांतील लोकांनीं येथें येऊन नि मुद्रण यंत्रांचें सहाय्य घेऊन ह्या जो उद्योग विनबोभाटपणें चालविला आहे, तो आपण हात जोडून स्वस्थपणें बसून पहायचा काय ? तशा प्रकारचें प्रचार-यंत्र तयार करून आपल्या धर्माला व समाजहिताला पोषक अशा प्रकारची वाङ्मय-निर्मिति आपण कां करूं नये ? अशा प्रकारचे विचार गणपतला अस्वस्थ करूं लागले ! ते उन्नत नि धर्माभिमानाचें पोषण करणारे विचार होते; परंतु ते आचरणांत कसे आणायचे ? त्यासाठीं जरूर असलेल्या साधनांपैकीं त्याच्याजवळ एकही नव्हतें. सारी निर्मिति शून्यांतून करायची होती.

गणपत मनानें खंबीर होता नि शरीरानें धडधाकट होता. मनांत सतत घोळणारा विचार आचरणांत आणण्यासाठीं त्याची धडपड अविरत चालू होती. आपलें काम चोख रीतीनें करून त्यानें आपल्या मालकाची अर्थात् थॉमस ग्रॅहॅमची मर्जी संपादन करून घेतली. मुद्रणकलेच्या क्षेत्रांतील तोच त्याचा गुरु. ह्या गुरूची त्याच्यावर कृपा होती. घांमकाम करतां करतां मुद्रण-व्यवसायांतील एकेक पायरी तो चढत जात होता. हुशार माणसाला वाव देण्याइतका थॉमस ग्रॅहॅम उदार होता. गणपतनें त्याचा फायदा घेतला.

तो काळ शिळा-प्रेसचा होता. मागें सांगितल्याप्रमाणें ही छपाईची, ज्ञान-प्रसाराची नि धर्मप्रसाराची कला मिशनऱ्यांनीं ह्या शहरांत आणिली. गणपत कृष्णाजींनीं अमेरिकन मिशन-प्रेसमध्यें प्रवेश केला, त्यावेळीं छपाईचें सारें काम शिळाप्रेसच्या सहाय्यानें केलें जात असे. शिळा प्रेससाठीं मराठी नि गुजराती मुद्रिका तयार होऊं लागल्या होत्या.

छापण्याची कला ही त्या काळीं एक आश्चर्याचा विषय होऊन राहिली होती. सर्वांना त्याबद्दल फार मोठें कुतूहल वाटत असे. 'मुंबई वर्णन'कार गोविंद नारायण माडगांवकर हे त्या काळच्या लोकांना छापील कागदाबद्दल किती आश्चर्य वाटत असे, ह्याची माहिती करून देतांना आपल्या 'मुंबई वर्णन' ग्रंथांत लिहितात कीं, "भरतखंडांतील लोकांस शिळाछाप म्हणजे काय व ठसेछाप म्हणजे काय हें पुष्कळ वर्षेपर्यंत ठाऊक नव्हतें. छापल्यानें कागदावर अक्षरें निघतात व त्यापासून पुस्तकें तयार होतात म्हटलें म्हणजे या लोकांस मोठें अद्भुतच

वाटे. एकादा छापलेला कागद पाहिला म्हणजे स्वर्गाहून विमान आल्याप्रमाणे लोक पहायला जमत."*

इतर लोकांप्रमाणें गणपत कृष्णाजी ह्यांनाही छापलेला कागद हा एक कुतूहलाचा विषय होऊन राहिला असल्यास नवल नाहीं. अशी ही कला आपण साध्य करून घेतली पाहिजे नि तिचा सदुपयोग आपण हिंदुधर्मप्रसाराच्या व समाजोन्नतीच्या कामीं केला पाहिजे, ह्या विचारानें छपाईच्या साधनांकडे अर्थात् त्यासाठीं लागणाऱ्या गिळा, कागद, शाई वगैरेकडे ते अत्यंत बारकाईनें नि चौकस दृष्टीनें लक्ष पुरवूं लागले. ही कला आपण साध्य करून घ्यावयाचीच, अशी ईर्षा त्यांच्या मनांत आरंभापासूनच उत्पन्न झाली.

गणपत कृष्णाजींचें ह्या बाबतींत आरंभापासून ध्येय कोणतें होतें नि तें साध्य करून घेण्यासाठीं त्यांनीं कसेकसे प्रयत्न केले, ह्याचा परिचय करून देतांना मुंबई-वर्णनकार लिहितात कीं, (१८६३) "मिशनऱ्यांचीं पुस्तकें छापून बाहेर पडलेलीं पाहून गणपत कृष्णाजी यांच्या मनांत शके १७६२ म्हणजे सन १८४० मध्यें आलें कीं, आपणही असाच कारखाना उभारून हिंदुधर्मप्रकरणीं व दुसरीं पुस्तकें छापावीं; परंतु छापायाचीं साधनें यांजपाशीं कांहीं नव्हतीं. व तीं त्या वेळीं मुंबईंत उपलब्धही नसत. मग त्यांनीं अमेरिकन मिशनरींची कृती पाहून स्वतः आपल्या युक्तीनें प्रेस (छापखाना) तयार करण्याचे उद्योग मांडिले. हे गृहस्थ भंडारी जातीचे असून कुशळ, बुद्धिमान, धोरणी व हिंदुधर्मावर निष्ठा ठेवणारे होते. प्रथम त्यांनीं एक लाकडी यंत्र आपल्या हातानें तयार केलें; आणि लहान शिळांचे तुकडे जिकडून, तिकडून जमवून त्यांवर अक्षरें कशीं उठतात ही कृति करून पाहिली; मग शाई वगैरे कशी करतात, त्याच्या शोधास ते लागले. प्रथम त्यांनीं आपल्याच तर्कानें दोन चार प्रकारची शाई करून पाहिली. मग हळूहळू श्रम आणि उद्योग इहीं करून त्यांनीं ही सर्व कृति साध्य करून घेतली. जसजसें हें काम त्यांला साधत गेलें, तसतशी उमेद येऊन त्यांनीं सर्व गोष्टी आपणांस अनुकूल करून घेतल्या. त्यानें सगळें धोरण छापखान्याच्या कामांत गम्य करून घेण्याकडे लागलें होतें. आणि

* मुंबई-वर्णन : ले. गो. ना. माडगांवकर दुसरी आवृत्ति पृ. २२४

तें त्यांनीं साध्य करून घेतलें. मग त्यांनीं एथेंच एक लोखंडी प्रेस करवून मोठ्या शीला विकत घेऊन लहान लहान ग्रंथ छापण्याचें काम सुरू केलें."*

अशा कार्यांत द्रव्यसहाय्याची जरूरी किती असते, हें का सांगितलें पाहिजे? तें गणपत कृष्णाजींपाशीं होतें कुठें? परंतु त्याच्या अभावीं ते हातपाय आंखडून निराशेनें स्वस्थ बसून राहिले नाहींत. ही नवीन सुधारणा आपल्या लोकांना उपकारक होऊन राहाणार आहे नि ती आपण हस्तगत केली पाहिजे, ह्या एकमेव भावनेनें विपरीत परिस्थितीशीं ते निकरानें झगडले.

मुंबईंत त्या काळीं महाराष्ट्रीय समाजांत पुष्कळ धनिक लोक होते; परंतु एका उपयुक्त नवीन सुधारणेचें स्वागत करून ती हस्तगत करून घेऊन लोककल्याणासाठीं राबविण्याच्या इच्छेनें मोठ्या ईर्षेनें धडपडणाऱ्या ह्या उत्साही व धर्मभावनेनें भारल्या गेलेल्या तरुणाकडे त्या काळीं कोणाचेंही लक्ष वेधलें नाहीं. कशाला लक्ष जाईल? ज्याला एखाद्या गोष्टीचा ध्यास लागलेला असतो, त्याच्यासाठीं जिवाची तळमळ चाललेली असते, ती पूर्ण करून घेण्यासाठीं त्या एकट्यानेंच परिस्थितीशीं प्राण जाईतों झगडायचें असतें! त्या अवस्थेंत असतां तुमच्या वाऱ्याला सहसा कोणीही उभा राहाणार नाहीं किंवा तुमच्या हालअपेष्टांकडे कोणी ढुंकूनही पहाणार नाहीं! त्या दिव्यांतून तुम्हीं सहीसलामत पार पडलां, म्हणजे मग मात्र तुमचे गोडवे मुक्तकंठानें गायिले जातील नि तुम्हांला आरत्या ओंवाळल्या जातील!

गणपत कृष्णाजींजवळ त्या धडपडत्या काळांत कोणी आला नाहीं नि तेही कोणाजवळ गेले नाहींत. स्वावलंबनानें जें कांहीं साध्य करून घेतां येईल तें पदरांत पाडून घ्यावयाचें नि अंगभूत कल्पकतेच्या नि चिकाटीच्या बळावर अंगीकृत कार्यांत आपण यशस्वी होऊं, ह्या निष्ठेनें ते रात्रंदिवस परिस्थितीशीं झगडत होते.

वर सांगितल्याप्रमाणें छापखान्यांत जें जें लक्ष लावून पहायचें, त्याचे घरीं आल्यानंतर प्रयोग करून पहावयाचे. कधींकधीं ते प्रयोग फसायचेही! प्रयोग करायला तरी साधनें नि पैसा लागतोच कीं नाहीं? तो त्यांच्याजवळ

* मुंबई-वर्णन : ले. गो. ना. माडगांवकर दुसरी आवृत्ति, पृ. २२४-२२५

नव्हता, म्हणून का ते अडून राहिले? कुठून ना कुठून मोडक्या तोडक्या शिळा मिळवून आणायच्या, त्या घांसून पुसून साफ करायच्या, शाई मिळवून तिनें शिळेवर लेखन करायचें नि तें कागदावर बरोबर उमटतें कीं नाहीं, हें पहायचें. हा त्यांचा उद्योग फावल्या वेळांत सतत चालू होता. त्यांना विसांवा ठाऊक नव्हता.

ह्या बाबतींत एका कलेचें त्यांना वरदान होतें. शिळा-प्रेसवर कांहीं छापायचें झाल्यास प्रथम हातानें लेखन करावें लागतें. गणपतजींचें हस्ताक्षर फार सुंदर होतें. एवढेंच नव्हे तर ते वेलबुट्टी, चित्रें काढण्यांतही वाकबगार होते. नुसतें लेखन काय कामाचें? लेखन–कला आणि चित्र-कला ह्यांची सुंदर सांगड घातली गेली पाहिजे. ह्या दोन्ही कला सख्या बहिणी आहेत. लेखनाला सुंदर सजावट पाहिजे. कोणतेंही पुस्तक असो; तें सचित्र असावें, असें आजच्या प्रगमनशील काळांत आपण म्हणतों; परंतु सव्वाशें वर्षांपूर्वीच्या काळांत गणपत कृष्णाजींनीं छपाईच्या क्षेत्रांत ह्या उपयुक्त नि परिणामकारक सुधारणेचा रिक्तहस्तांनीं अवलंब केला, ह्या जाणीवेनें कोणाला आश्चर्य वाटणार नाहीं?

त्या काळीं गणपत कृष्णाजींपुढें एक-दोन नाहींत, तर किती तरी बिकट प्रश्न आ वासून उभे होते. एकाद्या धार्मिक पोथीचें पान मनोहर अक्षरांत लिहून त्याला सुंदर वेलबुट्टीच्या चौकटींत बसविणें हा गणपतजींच्या हातचा मळ असला तरी शिळाप्रेसची उभारणी करणें, ही गोष्ट त्यांच्या हातांतील नव्हती. शिळाप्रेससारखें छापण्याचें साधन निर्माण करण्यासाठीं त्यांना भारी कष्ट करावे लागले. स्वतःच्या अक्कलहुशारीनें नि हिंमतीनें त्यांनीं एक लाकडी शिळा-प्रेस बनविला. जरूर असलेल्या शिळा महत् प्रयासांनीं मिळविल्या नि त्यांनीं स्वतः बनविलेल्या शिळा-प्रेसवर छोटीं छोटीं स्तोत्रें प्रयोगादाखल छापण्यास सुरुवात केली. जवळ पैशांचें पाठबळ नसलेल्या एका हिकमती, उद्योगी नि हिंमतबहाद्दर महाराष्ट्रीय तरुणाची त्या काळांतील ही कर्तबगारी वाखाणण्याजोगी नाहीं, असें कोण म्हणेल?

एवढ्यानें काय झालें? त्या काळीं गणपत कृष्णाजींना अनेक पेंचप्रसंगांतून पार पडायचें होतें. छापील पुस्तकें म्हणजे नवी नवलाई असली तरी बहुसंख्य अज्ञ नि भोळ्या वृत्तीचे लोक छापील पुस्तकांस स्पर्श करायला बिलकुल तयार

नव्हते. त्याला तसेंच कारण होतें. आरंभकाळांत मिशनऱ्यांच्या छापखान्यांतून जीं चोपडीं बाहेर पडलीं, तीं येशूख्रिस्ताचें 'शुभवर्तमान' जाहीर करणारीं होतीं. त्यामुळें छापील पुस्तकें म्हणजे ख्रिस्ती-धर्माच्या बायबलसंबंधीं पुस्तकें, असा समज फैलावला होता. तो दूर होण्यास कांहीं काळ लोटावा लागला. आणि तो समज दूर करण्यांत गणपत कृष्णाजींच्या नवीनच स्थापन झालेल्या शिळा-प्रेसनें त्या काळीं फार महत्त्वाचा भाग घेतलेला आहे. त्यांच्या छापखान्यांतून आरंभकाळांत जीं लहानसहान पुस्तकें छापून बाहेर पडलीं, तींही धार्मिक स्वरूपाचीं होतीं; आणि तीं अर्थातच हिंदुधर्मासंबंधीं होतीं.

परंतु हिंदुधर्मविषयक पुस्तकें छापून बाहेर पडलीं तरी त्यांचा सार्वत्रिक प्रसार होण्याच्या आड येणाऱ्या इतर कांहीं दुर्धर अडचणी होत्या. त्या काळांतील लोकांच्या सोवळ्या-ओवळ्यासंबंधींच्या कल्पना मोठ्या विचित्र होत्या. आज त्या कल्पना ऐकून खरोखर कोणालाही हसूं येईल !

धार्मिक-ग्रंथ किंवा पोथ्या, पुराणें सोवळें नेसून वाचावयाच्या असतात ना ? परंतु छापील पुस्तकांप्रमाणें भ्रष्टाचाराला प्रोत्साहन देणारी दुसरी कोणती वरें वस्तु असूं शकेल ? हा भ्रष्टाचार एकेरी नव्हे, तर तिहेरी स्वरूपाचा होता ! कसा तो पहा ! सुती शिवण, कापडी वेष्टन नि चरबीमुळें शाईचें भ्रष्टीकरण ! पुस्तक छापील असलें तरी त्याला ह्या तीन महा-पापांचा स्पर्श झाल्यामुळें पुराणमतवादी नि सनातनी वृत्तीचे लोक छापील पुस्तकांस निषिद्ध समजत असत !

छापील कागदांस शिवणें व त्यांचा घरांत प्रवेश होऊं देणें, हें अपवित्र नि धर्मबाह्य आहे, ह्या समजुतीचा पगडा तत्कालीन जनमनावर कशा रीतीनें नि किती प्रमाणांत बसला होता, ह्यासंबंधीं उल्लेख करून 'मुंबईवर्णन'कार गोविंद नारायण माडगांवकर हे आपल्या 'मुंबई-वर्णन' ह्या ग्रंथांत लिहितात कीं, "आमचे कित्येक भोळे व नैष्ठिक ब्राह्मण छापलेल्या कागदांस स्पर्श करण्यास भीत असत; आणि अद्याप मुंबईंत व बाहेर, छापील कागदास शिवत नाहींत व छापलेलें पुस्तक वाचीत नाहींत, असे पुष्कळ सांपडतील."[1]

१ मुंबई-वर्णन : ले. गो. ना. माडगांवकर, पृ. २४८

१८२५ ते १८३० हीं ५।६ वर्षे गणपत कृष्णाजी अक्षरशः रात्रंदिवस शिळा–प्रेसची उभारणी करण्याच्या उद्योगांत सतत गुंतलेले होते. त्यांना प्रयोग करून पहाण्याचा मुळींच कंटाळा नव्हता. शाईत चरबी असते म्हणून लोक छापील पुस्तकांस स्पर्श करायला तयार नाहींत. मग चरबीशिवाय शाई बनविण्याचा उद्योग त्यांनीं आरंभिला नि त्या उद्योगांतही त्यांनीं दीर्घ प्रयत्नांतीं यश मिळविलें. चरबीऐवजीं तुपाचा उपयोग करून त्यांनीं छापण्याची शाई तयार केली. तत्कालीन परिस्थितीवर त्यांनी मिळविलेला हा एक मोठाच विजय होता. कारण त्या काळीं रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक ह्यांच्यासारखे आंग्लविद्याविभूषित विद्वान नि पुढारलेले लोकही ज्या पोथ्या सोवळ्यानें वाचीत, त्या हस्तलिखित असत ![1]

शेवटीं सर्व सुसज्जता झाल्यानंतर गणपत कृष्णाजींनीं १८३१ सालीं नोकरीला रामराम ठोकून स्वतःचा छापखाना सुरू केला. वर सांगितल्याप्रमाणें ही जी छापखान्याची मुहूर्तमेढ त्यानीं रोविली; तिच्यामागें त्यांचा मुख्य हेतु मिशनऱ्यांच्या धार्मिक हालचालींस तोंड देणें व मुद्रण-यंत्राच्या सहाय्यानें आपल्या धर्मबंधूंची सेवा करणें हा प्रामुख्यानें होता. हा शिळा छापखान्याचा शुभारंभ त्यांनीं बोरीबंदरजवळ जुनी जांभळी मशिद होती, त्या मशिदीजवळच्या एका चाळींतील खोलींत केला.

गणपत कृष्णाजींचा धर्माभिमान जाज्वल्य होता नि त्या अभिमानामुळें त्यांचें लक्ष छापखान्याची स्थापना करण्याकडे वळलें. मुंबईंत येऊन छापखान्याच्या व्यवसायाशीं संबंध जडल्यापासून महाराष्ट्रीयांच्या दृष्टीनें गणपत कृष्णाजींना एक उणीव तीव्रतेनें जाणवत असे. कोणती ती उणीव? तिथी, वार, मुहूर्त, सण वगैरे समजण्यासाठीं पंचांगाची फार जरूरी असते. इंग्रजी कॅलेंडर इंग्रज लोकांची गरज भागवीत असे. त्याचप्रमाणें गुजराती जाणणाऱ्यांसाठीं एक गुजराती पंचांगही प्रसिद्ध झालें होतें. मग महाराष्ट्रीयांनीं मुहूर्त, मणवार वगैरे जाणून घेण्यासाठीं उठतांबसतां शास्त्रीबुवांकडे धांव घ्यायची का? पंचांग हें पदोपदीं उपयोगी पडणारें एक धार्मिक साधन आहे. तें आपल्या धर्मबंधूंना सहज उपलब्ध झालें पाहिजे, असें गणपत कृष्णाजींना

१ रा. मा. मंडलिक यांचें चरित्र : ले. न. रा. हवालदार, भाग १ ला; पृ. २७७

अत्यंत तीव्रतेनें वाटूं लागलें. हिंदुधर्माच्या दृष्टीनें आवश्यक वाटणारी प्रत्येक गोष्ट आपण यथाशक्ति पार पाडावी, ही त्यांची एक महत्त्वाकांक्षा होती.

तो हेतु साध्य करून घेण्यासाठीं छापखान्याच्या रूपानें जरूर तें साधन निर्माण केल्यानंतर गणपत कृष्णाजी हे पंचांग तयार करून घेण्याच्या उद्योगास लागले. तुमची इच्छा तीव्र असावी लागते. त्यासंबंधीं अंतःकरणांत तळमळ निर्माण व्हावी लागते. मात्र ती तळमळ शुद्ध नि लोककल्याणकारी असावी. मग देव कोणाला तरी निमित्तमात्र करून तुमचें कार्य घडवून आणतो.

पंचांगाची कल्पना मनांत घोळूं लागल्यानंतर गणपत कृष्णाजींना आपल्या एका ज्योतिषी मित्राची आठवण झाली. ते मित्र जातीनें नि व्यवसायानें होते शिंपी. ते धर्माभिमानी होते, तसेंच संस्कृत चांगलें जाणणारे होते. ज्योतिषविषयक संस्कृत ग्रंथांचा अभ्यास करणें, हा त्यांचा एक आवडता छंद होता. त्यांचें नांव होतें रखमाजी देवजी मुळे. गणपत कृष्णाजी जातीनें भंडारी तर रखमाजी जातीनें शिंपी. दोघांचेही व्यवसाय वेगवेगळे; परंतु दोघेही एकाच उच्च ध्येयानें भारलेले. गणपत कृष्णाजींनीं पंचांग तयार करण्याची कल्पना रखमाजी ह्यांच्यापुढें ठेवतांच त्यांनींही ती उचलून धरली व ते म्हणाले, "तुमची कल्पना फार चांगली आहे. मात्र माझ्यावर तुम्हीं सोंपविलेली जबाबदारी कशी काय पार पडते, ह्याबद्दल मी साशंक आहें. कांहीं झालें तरी हें एक सत्कार्य आहे आणि तुम्हीं शुद्ध भावनेनें माझ्यावर ही कामगिरी सोंपविली आहे. ती पार पाडण्यासाठीं मी शिकस्तीचे प्रयत्न करीन."

आणि खरोखर आश्वासन दिल्याप्रमाणें रखमाजी वागले. गणपत कृष्णाजी नि रखमाजी ह्या दोघांनीं शिरावर घेतलेली ही जबाबदारी साधीसुधी नव्हती. तेथपर्यंत छापील स्वरूपांत मराठी पंचांग प्रसिद्ध झालें नव्हतें. तेव्हां तो पहिलेपणाचा व मराठी पंचांगांची गंगोत्री होऊन राहाण्याचा मान त्यांच्याकडे जावयाचा होता. रात्रीचा दिवस करून रखमाजी-शास्त्रीबुवांनीं पंचांग तयार केलें नि गणपत कृष्णाजींनींही अत्यंतिक मेहनत घेऊन महाराष्ट्रांतील मराठी भाषिकांसाठीं पहिलें वहिलें पंचांग सन १८३१ सालीं म्हणजे ज्या वर्षी छापखाना सुरू केला, त्याच वर्षी शिळा प्रेसवर छापून प्रसिद्ध केलें.

ह्या पहिल्या वहिल्या छापील पंचांगाचें स्वागत त्या काळीं जनतेनें

कशा रीतीनें केलें, हें समजून घेण्यासारखें आहे. ह्या पंचांगाच्या वेष्टनावर चारी बाजूंस सुंदर वेलबुट्टी काढण्यांत आली होती; तसेंच गणपतीच्या चित्रानें हें पंचांग सुशोभित करण्यांत आलें होतें. आंतील एकंदर मांडणीही आकर्षक तशीच जनतेच्या धार्मिक गरजा भागविणारी होती.

आरंभकाळांत तत्कालीन कर्मठ ब्राह्मणांनीं ह्या पंचांगास कसून विरोध केला; परंतु अशा प्रकारचें लोकोपयोगी नि उपयुक्त कार्य पार पाडल्याबद्दल गणपत कृष्णाजींना दुवा देणारेही पुष्कळ लोक त्या काळीं होते. कोणत्याही सुधारणेचें असेंच असतें. तिची उपयुक्तता पटत गेली नि घडून आलेली सुधारणा आपल्या सोयीची आहे, अशी खात्री पटत गेली, म्हणजे विरोधाला आस्ते आस्ते उतरती कळा लागत जाते. नंतरच्या काळांत एक जमाना असा येऊन गेला कीं, गणपत कृष्णाजींच्या पंचांगानें लोकप्रियतेच्या बाबतींत उच्चांक गांठला!

आरंभकाळांतील ह्या पंचांगाच्या स्वागतासंबंधानें 'विविधज्ञान-विस्तार'चे विद्वान संपादक हरी माधव पंडित काय लिहितात पहा!

"तें पंचांग प्रसिद्ध करणारे छापखान्याचे मालक ब्राह्मणच असले पाहिजेत असें मुंबईच्या बाह्यप्रदेशीय लोकांस वाटे. व ते त्यास वेदशास्त्रसंपन्न रा. रा. अशा मायन्यांचीं पत्रें लिहीत. त्या परस्थांस जर कोणीं हे भंडारी आहेत असें सांगितलें, तर तें त्यांस खरे वाटत नसे; कारण अशा जातींतल्या पुरुषाचे अंगीं असले ब्राह्मणी गुण असंभाव्य आहेत, अशी त्यांची दृढ समजूत होती. प्रथमतः जेव्हां हें पंचांग प्रसिद्ध होऊं लागलें, तेव्हां मुंबईंतील ब्राह्मण मंडळी तें शिंप्यानें तयार केलेलें पंचांग म्हणून त्याचा उपयोग करण्याचा कंटाळा करीत. परंतु स्थळ पडलें मुंबई व राज्य पडलें इंग्रजांचें! म्हणून आमच्या जुन्या समजुतीची मंडळी गप्प बसली; नाहीं तर हें पंचांग वर्तविणारे ज्योतिषी व त्यांचे पुस्तकें छापखान्याचे मालक याचे आमच्या कर्मठ राजांच्या कारकीर्दीत क्वचित हात कलम केले गेले असते!"*

अशा ह्या पंचांगाचा आस्ते आस्ते शहरांतील नि खेड्यापाड्यांतील घराघरांतून प्रवेश होऊन दैनंदिन जीवनांत लोक आदरभावानें त्याचा उपयोग करूं लागले. प्रथम कांहीं वर्षे हें पंचांग शिळा-प्रेसवर छापलें जात असे व शिळा-प्रेस नांवारूपास आल्यानंतर तें खिळा-प्रेसवर छापलें जाऊं लागलें.

---

* विविधज्ञान विस्तार : जून १८९२; पुस्तक २४ वें.

गणपत कृष्णाजींच्यामागें आज जवळ जवळ एकशें पस्तीस वर्षें होत आलीं तरी अजूनही त्यांच्या नांवें पंचांग प्रसिद्ध होत आहे, ही घटना लक्षांत घेण्याजोगी आहे. शेठ जावजी दादाजींनीं निर्णयसागर छापखान्याचा शुभारंभ सन १८६९ सालीं पंचांगछपाईनें कसा केला हें आपण वाचलें. आजकाल निर्णयसागर पंचांगानें इतर सर्व पंचांगांवर मात केली आहे, हें आपण पहातच आहोंत; परंतु ज्या विपरीत काळांत गणपत कृष्णाजींनीं पंचांगाच्या प्रांतांत मोठ्या धडाडीनें पहिलें पाऊल टाकलें व त्या धार्मिक उपक्रमाचा शुभारंभ केला, त्यांना कितीही धन्यवाद दिले तरी ते थोडेच होतील.

गणपत कृष्णाजींनी सतत एक धोरण आपल्या हृदयाशीं बाळगलें होतें. आपल्या व्यवसायाच्या बाबतींत कोणाच्याही ओंजळीनें पाणी न पितां स्वावलंबनाच्या मार्गानें जो कांहीं प्रगतीचा टप्पा गांठतां येईल तो गांठावयाचा. त्यांच्या छापखान्याच्या अपूर्वाईमुळें नि त्यांच्या गोड नि मनमिळाऊ स्वभावामुळें त्यांना छपाईच्या कामाचा तुटवडा कधींही पडला नाहीं. शिवाय त्यांचीं स्वतः स्वयंस्फूर्तीनें शिरावर घेतलेलीं छपाईचीं कामें थोडीं थोडकीं का होतीं? शास्त्री पंडितांना जवळ करून नि त्यांना योग्य तो मोबदला देऊन त्यांना किती तरी धार्मिक ग्रंथ छापून प्रसिद्ध करावयाचे होते व ते त्यांनीं व त्यांच्या चिरंजीवांनीं नंतरच्या काळांत प्रसिद्ध केले.

गणपत कृष्णाजींनीं त्या काळीं शिळा-प्रेस सुरू करून जनतेवर कितीतरी उपकार केले. कारण तेथपर्यंत मराठी नि संस्कृत पोथ्या, पुराणें, नित्यपाठाचीं स्तोत्रें वगैरे हातानें लिहून घ्यावीं लागत असत. गणपत कृष्णाजींच्या असामान्य कर्तबगारीमुळें आतां तीं सारीं सुंदर पोथीच्या आकारांत छापील स्वरूपांत वाचकांस मिळं लागलीं. मोठमोठ्या पोथ्या हातानें लिहिण्याचे श्रम थोडे थोडके का असतात? शिवाय ज्याचें अक्षर चांगलें असेल त्याला पैसे देऊन नि महिनेच्या महिने मोडून हें काम करवून घ्यावें लागत असे. आरंभीं सोवळ्याच्या कल्पनेनें भारलेल्या कित्येक लोकांनीं ह्या नवीन सुधारणेचें अंतःकरणपूर्वक स्वागत केलें नाहीं हें खरें असलें, तरी बहुजनसमाज नंतर गणपत कृष्णाजींना नि त्यांच्या शिळा-प्रेसला दुवा देऊं लागला व छापखान्यांतील काम उत्तरोत्तर वाढूं लागलें.

छापखान्यांतील कामाच्या वाढीबरोबर उत्पन्नाचीही वाढ होऊं लागली. हातीं येणाऱ्या पैशांचा उपयोग आपल्या कारखान्याची वाढ करून तो स्वयंपूर्ण

करण्याकडे ते करीत असत. तसेंच संस्कृत नि मराठी धार्मिक ग्रंथ शुद्ध करून छापावयाचे तर त्यासाठीं जाणकार नि विद्वान शास्त्री-पंडितांचा सहकार अत्यावश्यक होता. त्यासाठीं ते रिक्तहस्तें खर्च करीत असत.

मिशनऱ्यांनीं स्थापन केलेला छापखाना अत्यंत सुसज्ज नि भरभराटींत असला तरी आपल्या एका महाराष्ट्रीय बंधूनें धाडस करून चालविलेला छापखाना ह्या दृष्टीनें मुंबईंतील तत्कालीन महाराष्ट्रीय गणपत कृष्णाजींच्या छापखान्याकडे कौतुकाच्या, आपुलकीच्या नि प्रेमादराच्या भावनेनें पहात असत.

त्या काळीं महाराष्ट्रीय विद्वानांची पहिली पिढी नुकतीच कुठें उदयाला येऊं लागली होती. आचार्य बाळशास्त्री जांभेकर, सदाशिवराव छत्रे, गोविंद नारायण माडगांवकर, दादोबा पांडुरंग अशी त्या काळीं जी कांहीं तुरळक नि मोलकी विद्वान महाराष्ट्रीय मंडळी होती, त्यांच्या वाङ्मय-प्रकाशनाला गणपत कृष्णाजींचा फार मोठा आधार होता. त्या काळीं त्यांनीं व इतर महाराष्ट्रीय लेखकांनीं लिहिलेलें शालोपयोगी नि इतर विविध विषयांवरील वाङ्मय गणपत कृष्णाजींच्या छापखान्यांतून बाहेर पडलें.

ह्यापूर्वीच सांगितल्याप्रमाणें छापण्याच्या शाईंत चरबीचा समावेश झालेला असतो नि त्यामुळें छापील पुस्तकांस स्पर्श करायला लोक दचकतात; ती अडचण लक्षांत घेऊन गणपत कृष्णाजींनीं चरबीऐवजीं तुपाचा वापर करून छापण्याची शाई बनविण्यांत यश मिळविलें. त्याचा परिणाम जनमनावर किती आश्चर्यकारक झाला असेल, ह्याची आजच्या काळांतील लोकांना कल्पनाही करतां येणार नाहीं.

आचार्य बाळशास्त्री जांभेकर ह्यांनीं सुरू केलेल्या 'दिग्दर्शन' ह्या पहिल्या मराठी मासिकाचा आधार गणपत कृष्णाजींचा छापखाना होता. बाळशास्त्री जांभेकर म्हणजे त्या काळांतील पुढारलेले व अत्यंत थोर विद्वान गृहस्थ; परंतु शाईच्या बाबतींत इतर सर्वसाधारण लोकांप्रमाणें त्यांचीही समजूत होती! गणपत कृष्णाजींनीं जरूर ती सुधारणा करून चरबीविरहित शाई बनविली, ह्यामुळें त्यांनाही समाधान वाटलें.

आणि समाधान कां वाटूं नये? कारण त्यांच्यासारख्या सारासार दृष्टि असलेल्या विद्वानाच्या मनावर सभोंवारच्या वातावरणाचा परिणाम झालेला होता. गणपत कृष्णाजींचे चरबीविरहित शाईचे प्रयोग चालू होते. त्यादरम्यान

सुप्रसिद्ध व्याकरणकार नि तत्कालीन नामवंत लेखक दादोबा पांडुरंग ह्यांस पाणिनीच्या अष्टाध्यायीची सार्थ मराठी आवृत्ति छापून प्रसिद्ध करावयाची होती, त्या बाबतींत त्यांनीं आचार्य बाळ गंगाधरशास्त्री ह्याचा सल्ला घेतला. तेव्हां त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें की, "अष्टाध्यायी म्हणजे पवित्र धार्मिक ग्रंथ. तो छापून काढल्यानें त्याचें पावित्र्य नष्ट होईल व कदाचित् लोकक्षोभाला आपणास तोंड द्यावें लागेल!" तो भयंकर स्वरूपाचा सल्ला ऐकून दादोबांनी आपला ग्रंथ-छपाईचा बेत कांहीं काळ स्थगित केला!

आचार्य बाळशास्त्री जांभेकर आपल्या 'दिग्दर्शन'च्या अंकांत लिहितात कीं "या छापाच्या शाईंत चर्बी पडत असती, यामुळें छापलेलें पुस्तक अपवित्र अशी लोकांची समजूत आहे. म्हणोन याविषयीं कांहीं लिहिलें पाहिजे. वर जिनसाच्या याद्या लिहिल्या आहेत. त्यांत तूप अथवा चर्बी असें आहे. परंतु हें 'दिग्दर्शन' ज्या छापखान्यांत छापतात, तेथें चर्बीच्या ठिकाणीं तुपाचा उपयोग करितात. व तेणेंकरून काम चर्बीप्रमाणेंच होतें. परंतु तुपामध्यें चर्बीप्रमाणें तेज नाहीं म्हणोन मेहेनत जास्त पडती."[१]

ही जी 'मेहनत जास्त पडती' ती पडूनही लोकांच्या मनांतील गैरसमज दूर झाले असते, तर त्या पडलेल्या मेहनतीचें चीज झालें असतें. परंतु जनमनांतील शाईसंबंधींचे गैरसमज दूर व्हायला दीर्घकाळ लोटावा लागला.

एकाकाळीं ठाणें येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'अरुणोदय' पत्राच्या ता. १४ आक्टोबर १८६६ च्या अंकांत श्रीगुरुचरित्राची जाहिरात प्रसिद्ध झालेली आहे. त्यांत सोवळ्यानें वाचण्याकरितां जरूर ती खबरदारी घेऊन तो ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत येत असल्याची जाहिरात आलेली आहे. गणपत कृष्णाजींनीं आपला छापखाना स्थापन केल्यानंतर ३०।३५ वर्षांनीं प्रसिद्ध झालेली ती जाहिरात आहे. एवढेंच कशाला? त्यानंतर शेठ जावजी दादाजी ह्यांचा निर्णयसागर छापखाना स्थापन झाला नि त्या छापखान्यांतून जे धार्मिक स्वरूपाचे ग्रंथ आरंभ-काळांत बाहेर पडले, त्यांची जाहिरात करतांना 'हा ग्रंथ तुपाच्या शाईंत छापला आहे' असा स्पष्ट उल्लेख त्यांना कांहीं काळ करावा लागत असे! छापलेल्या ग्रंथाचा खप झाला पाहिजे ना? लोकांनीं शाईमुळें त्या ग्रंथांवर बहिष्कार पुकारला तर काय करावयाचें?

असा होता तो विचित्र काळ!

---

१ दिग्दर्शन: पुस्तक १ लें, पृ. २१२; १८४०

२

## गणपत कृष्णाजी व रावसाहेब मंडलिक

**ना.** नाना शंकरशेठ ह्यांच्यामागून ज्या थोर महाराष्ट्रीयानें मुंबईचें पुढारीपण शोभविलें, असे रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलिक ह्यांचा नि गणपत कृष्णाजींचा अत्यंत निकट नि जिव्हाळ्याचा संबंध होता. दोघांच्या परिस्थितींत नि शैक्षणिक बाबतींत महदंतर असलें तरी दोघेही धार्मिक भावनेनें भारलेले नि स्वपराक्रमानें पुढें आलेले होते.

रा. सा. मंडलिक हे आरंभकाळीं शिक्षण खात्यांत होते. चांगले ग्रंथ छापवून घेऊन ते शाळाखात्यास पुरविणें, विद्वान लोकांकडून ग्रंथ लिहवून घेऊन नि त्यांस योग्य तो मोबदला देववून ते छापवून घेणें व सरकारला पुरविणें, हें त्यावेळच्या क्युरेटरचें काम त्यांच्याकडे असे. (१८५७ ते १८५९)

गणपत कृष्णाजींचा छापखाना त्या काळीं चांगला नांवारूपास आलेला होता. त्याचा बोलबाला सर्वत्र होऊं लागला होता. रावसाहेब मंडलिकांचें लक्ष ह्या छापखान्याकडे नेहमीं लागून राहिलेलें असे. गणपत कृष्णाजींच्या कर्तबगारीचे, कल्पकतेचे, त्यांच्या उद्योगशीलतेचे नि त्यांच्या धर्मनिष्ठेचे ते एक निस्सीम चहाते होते. आपल्या अधिकारांत जीं जीं म्हणून मराठी पुस्तकें छापावयाचीं असत, तीं सारीं ते गणपत कृष्णाजींच्या छापखान्याकडे पाठवीत असत. तसेंच इंग्रजी पुस्तकें छापावयाचीं झाल्यास तीं नानाभाई राणीना ह्यांच्या युनियन प्रेसकडे ते पाठवीत असत.

कामानिमित्त रावसाहेबांस गणपत कृष्णाजींच्या छापखान्यांत वारंवार

जावें लागत असे. वागण्यांत दोघेही अत्यंत सरळ, प्रामाणिक आणि चचाखोर; त्यामुळें काय झालें ? दोघेही एकमेकांचे चहाते बनले. दोघांचीही एकमेकांवर श्रद्धा बसली. रावसाहेब हे आपले नि आपल्या छापखान्याचे खरेखुरे हितचिंतक आहेत, असें गणपत कृष्णाजींना वाटूं लागलें. ह्याचाच परिणाम नंतर गणपत कृष्णाजींच्या चिरंजीवानें रावसाहेबांस आपल्या इस्टेटीचे विश्वस्त (ट्रस्टी) नेमण्यांत झाला.*

गणपत कृष्णाजींच्या छापखान्याबद्दल रा. सा. मंडलिक ह्यांस किती आपुलकी वाटत असे नि गणपतजींच्या मागें त्यांनीं त्या छापखान्याच्या उत्कर्षासाठीं काय काय केलें, त्याची माहिती पुढें यथावकाश करून देण्यांत येईलच.

रा. सा. मंडलिक ह्यांनीं तुकाराम महाराजांच्या अभंगांचा गाथा संपादन करून ती गणपत कृष्णाजींच्या छापखान्यांत छापवून घेतली. कां ? कारण ते छपाईसाठीं वापरीत असलेल्या शाईंत चरबी नसे. गाथा म्हणजे पवित्र ग्रंथ. वारकऱ्यांचें सर्वस्व. त्या ग्रंथावर त्यांची असीम श्रद्धा.

ह्या अभंगांचा गाथा छापला जात असतां, रावसाहेबांचे पंढरपूर येथील एक स्नेही रावजी सखाराम लिमये ह्यांच्याशीं त्यांचा झालेला पत्रव्यवहार उपलब्ध असून त्या पत्रांत लिमये रावसाहेबांस लिहितात, "तुकारामाच्या गाथांच्या प्रती घेण्यास लोकांचा अंदेशा आहे. कारण शाईंत कांहीं वर्ज्य पदार्थ आहेत असें त्यांच्या मनानें घेतलें आहे. अक्षर मोठें, सुवाच्य व शिळा-छाप असावें व शाईची खात्री असावी."[१]

त्यानंतर जरूर ती खात्री पटवून देऊन रा. सा. मंडलिक ह्यांच्याकडून उपरोक्त लिमये ह्यांचें शंकानिरसन करण्यांत आलें.

गणपत कृष्णाजींच्या काळीं नि त्यानंतरही दीर्घकाळपर्यंत छापण्यासाठीं वापरण्यांत येणाऱ्या शाईसंबंधीं जनतेंत गैरसमज कसे पसरले होते व ते दूर करण्यासाठीं गणपत कृष्णाजींनीं जो पुढाकार घेतला, त्याचें महत्त्व किती होतें, हें समजून यावें, ह्यासाठीं हा एवढा प्रपंच पुन्हां करावा लागला.

---

* रा. सा. मंडलिक यांचें चरित्र : ले. ग. ए. हवालदार पृ. १०–११

१ ,, ,, ,, , खंड दुसरा. पृ. १५९

गणपत कृष्णाजी हे प्रगमनशील होते. सतत पुढें जाण्याचा त्यांचा उद्योग अविरत चालू होता. संकटांपायीं ते कधीं अडखळले नाहींत. शिळा-प्रेसच्या जमान्यांत सुमारें बारा वर्षें यशस्वी रीतीनें घालविल्यानंतर त्यांनीं १८४३ सालीं आपल्या वाढत्या पसाऱ्याला खिळा-प्रेसची जोड करून दिली.

सुंदर मराठी मुद्रिका तयार करण्याचें कसब अमेरिकन मिशन प्रेसमध्यें थॉमस ग्रॅहॅम ह्यांच्या हाताखालीं वावरत असतां त्यांनीं संपादन केलें. स्वतंत्रपणें उद्योग करूं लागल्यानंतर तें कसब त्यांना कसोटीला लावून पहातां आलें.

'मुंबईवर्णन'कार गोविंद नारायण माडगांवकर हे गणपत कृष्णाजींच्या ह्या कसबासंबंधानें लिहितात कीं, "गणपत कृष्णाजी यांनीं स्वतः टैप करण्याचें कसब साध्य करण्याचा उद्योग मांडिला आणि मोठ्या प्रयत्नानें अक्षरांचे सांचे तयार करून ते ओतविण्याचा कारखाना घातला आणि सर्व प्रकारचीं अक्षरें तयार करून टैपांचा कारखाना चालू केला. ह्याप्रमाणें त्यांनीं ह्या दोन्ही छापखान्यांवर हजारों गुजराथी आणि मराठी ग्रंथ छापिले. यांचें छापखान्यांत जसें काम तयार होतें तसें बहुधा दुसऱ्या कोठेंच होत नाहीं. हे थोडें थोडें इंग्रजीही कामें छापितात. चित्रें, नकशी, कोरीव कांतीव वेलबुट्टी काढण्याचें काम ते स्वतः करीत. यांच्या छापखान्यांत तयार होतें तसें पंचांग दुसऱ्या कोठेंच होत नाहीं. ह्यांच्या पंचांगाची सर्वत्र आख्या आहे. दुसऱ्या ठिकाणीं छापलेलीं पंचांगें आणा अर्धा आण्यास मिळतात; परंतु ह्यांचीं पंचांगें चार आण्याखालीं विकीत नाहींत. तथापि तीं लोक संतोषानें घेतात."*

ह्यावरून गणपत कृष्णाजींच्या तत्कालीन लोकप्रियतेची कल्पना करतां येईल.

महत् प्रयासांनीं आपण मुद्रणालयाची स्थापना केली. ती संस्था ग्रंथप्रकाशन कार्याच्या रूपानें लोकोपकारासाठीं जितकी राबवितां येईल तितकी राबवावयाची, ही होती गणपत कृष्णाजींची वृत्ति. त्यामुळें आरंभकाळांतील लेखकांना नि नियतकालिकांच्या संपादकांना त्यांचा फार मोठा आधार वाटत असे.

रा. ब. दादोबा पांडुरंग ह्यांची आद्य व्याकरणकार ह्या नात्यानें प्रसिद्धि आहे. आपलें पहिलें मोठें व्याकरण तयार केल्यानंतर तें छापून प्रसिद्ध

* मुंबई-वर्णन : ले. गो. ना. माडगांवकर. पृ. २२५-२६

करण्याच्या हेतूनें त्यांनीं गणपत कृष्णाजींकडे धांव घेतली. (१८३६) ह्यासंबंधानें ते लिहितात कीं, "माझ्या मनांत मराठी भाषेचें एक चांगलें व्याकरण करून ती भाषा हल्लीं नियमित नाहीं, तिला व्याकरणाच्या नियमांत आणावी असें आलें. तो ग्रंथ लिहिण्यास १८३४ सालच्या अखेरीस आरंभ केला. तो पुढें १८३६ च्या आरंभीं शेवटास नेऊन पुढें गणपत कृष्णाजी यांनीं त्या वेळेस शिला-छापखाना घातला होता त्याच शिलेवर छापविला........मला वाटतें निदान हजार प्रती काढविल्या असतील. तें व्याकरण बाहेर पडतांच सरकारनें व सोसायटीनें सर्व प्रती घेतल्या. मित्रांस देण्यासाठीं थोड्या प्रती ठेविल्या. त्या व्याकरणाचीं पहिलीं छापलेलीं पुस्तकें पहिल्यानें माझ्या हातीं मी पुढें इंदुरास गेल्यावर आलीं. तीं पहातांच मला मोठा आनंद झाला."[१]

आजकाल मुंबईंत नि इतरत्र शेंकड्यांनीं मोजतां येतील इतके छापखाने निघाले आहेत व दरवर्षी खंडोगणती ग्रंथ छापून बाहेर पडत आहेत. ही छपाईची कला आतां सर्व लोकांच्या अंगवळणीं पडली आहे व त्यामुळें तिच्यासंबंधानें फारसें कांहीं कोणाला वाटत नाहीं; परंतु ज्या काळीं एका महाराष्ट्रीय कर्तबगार पुरुषानें मुंबईंत स्वतःच्या मालकीचा पहिला छापखाना सुरू केला, त्या वेळीं लोकांना त्याचें किती महत्त्व वाटलें असेल, ह्याची सहज कल्पना करतां येण्यासारखी आहे.

मागें सांगितल्याप्रमाणें गणपत कृष्णाजींचें सारें लक्ष प्रथमपासून लागून राहिलें होतें धार्मिक ग्रंथांचें प्रकाशन करण्याकडे. खपेल तें किंवा ज्यामुळें चार पैसे पदरांत पडतील तेंच छापीन, ही नव्हती ह्या आद्य प्रकाशकाची दृष्टि. जें लोकोपयोगी, जें वाचकांची धर्मनिष्ठा वाढविणारें नि लोककल्याणकारी तें छापावयाचें, हें ध्येय त्यांनीं आपल्या दृष्टीसमोर सतत ठेविलें होतें. आणि त्याच ध्येयानें प्रेरित होऊन त्यांनीं रामायण, महाभारत, भागवत, उपनिषदें, सूत्रें, पुराणें, *पोथ्या, कारिका, स्तोत्रें वगैरे लहानमोठे अनेक ग्रंथ छापून* त्या काळीं प्रकाशांत आणिले. धर्म-प्रचाराप्रमाणें शिक्षण-प्रसाराचें नि ज्ञान-प्रसाराचें महत्त्वही ते ओळखून होते. सरकारच्या शिक्षणखात्यानें त्यांच्या छापखान्याचा सहकार संपादन केला नि अनेक शालोपयोगी पुस्तकें त्यांच्याकडून छापवून घेतलीं.

१ रा. ब. दादोबा पांडुरंग यांचें आत्मचरित्र पृ. ८७

त्याशिवाय त्यांच्या छापखान्यांतून त्या काळीं बाहेर पडलेल्या कांहीं विविध स्वरूपाच्या ग्रंथांचा येथें केवळ ओझरता नामोल्लेख करण्यांत येत आहे. तुकारामाचा गाथा नि दादोबा पांडुरंग ह्यांचें मोठें व्याकरण ह्यांचा उल्लेख ह्यापूर्वीच करण्यांत आला आहे.

आणखी कांहीं ग्रंथांचीं नावें:–रुक्मिणीस्वयंवर (एकनाथ) १८३६, इंग्लंडचा वृत्तांत (ले. हरी केशवजी) १८३८, मरेकृत इंग्रजी व्याकरणाचा संक्षेप–१८३८, निघंटु प्रकाशन, ले. बापू गंगाधर जोशी–१८३९ मानचंद्रिका, श्रीकृष्णार्जुन संवाद, ले. बाळाजी सुंदरजी व रा. सा. मंडलिक–१८३९, ब्रह्मस्तुतीची टीका–१८४२, शिवलीलामृत–१८४४, भक्तलीलामृत (महीपति) १८४६, ज्योतिषसार, ले. जनार्दन भा. भट–१८४८, हिंदुधर्मतत्त्व, ले. गंगाधरशास्त्री फडके–१८५२, देशव्यवहार शास्त्राचीं तत्त्वें, ले. हरी केशवजी–१८५४, कविचरित्र, ले. जनार्दन रामचंद्रजी–१८६० वगैरे.

सुमारें सव्वाशें वर्षांपूर्वीच्या काळांतील हें ग्रंथ-प्रकाशन आहे. आज त्यांपैकीं बहुतेक पुस्तकें दुर्मिळ झालेलीं आहेत. संशोधकांच्या दृष्टीनें त्या ग्रंथांचें महत्त्व अपरंपार आहे. लोकमान्य टिळक ह्यांच्यासारख्या थोर नि विद्वान संशोधकांनीं आपल्या 'गीतारहस्य' ह्या ग्रंथराजांत गणपत कृष्णाजींचें हें ऋण मान्य केलें आहे.

जें ग्रंथासंबंधानें तेंच तत्कालीन नियतकालिकें नि वृत्तपत्रें ह्यासंबंधानें. मराठी वृत्तपत्र-प्रकाशनाचा तो उषःकाल होता. गणपत कृष्णाजींच्या मुद्रणालयाचा सूर्योदय त्या काळीं झाला नसता, तर वृत्तपत्र-प्रकाशनाच्या रूपानें त्या काळावर जो प्रकाश पडला किंवा आज जो प्रकाश पाडणें शक्य झालें आहे, ती शक्यता दुरावली असती. जनतेंत ज्ञानप्रसार करण्याच्या सद्धेतूनें त्या काळीं जीं नियतकालिकें निघालीं नि त्याच्याबरोबर जो लेखकवर्ग उजेडांत आला, त्यामुळें आजच्या पिढींतील आम्हां लोकांना तत्कालीन वाङ्मयीन नि सामाजिक इतिहासाचे धागेदोरे जुळविणें शक्य झालें आहे.

'दिग्दर्शन', 'प्रभाकर', 'मराठी ज्ञान-प्रसारक', 'ज्ञान-चंद्रोदय,' 'बोध-सागर', 'ज्ञान-दर्शन', 'सुमित्र' वगैरे जीं ७८ नियतकालिकें त्या काळीं जनतेंत ज्ञानप्रसार करण्याच्या सद्धेतूनें निघालीं, त्यांना पहिलावहिला आधार

मिळाला तो गणपत कृष्णाजींच्या छापखान्याकडून, आणि त्या आधाराला वर सांगितल्याप्रमाणें, त्याच नव्हे तर आजच्या काळाच्या दृष्टीनेंही अपरंपार महत्त्व आहे.

'विविध-ज्ञान-विस्तार' ह्या मासिकाचा जन्म १८६७ सालीं झाला. त्याला प्रथम गणपत कृष्णाजींच्या मुद्रणालयानें नि नंतर शेठ जावजी दादाजी ह्यांच्या निर्णयसागरनें उदार आश्रय दिला. परंतु तत्पूर्वींच्या काळांत म्हणजे सरासरी १८३३ ते १८६०।६५ ह्या तीस पस्तीस वर्षांच्या काळांत ज्या ज्या वाङ्मयीन, सामाजिक नि इतर स्वरूपाच्या हालचाली झाल्या, त्यांची सर्वसाधारण कल्पना करून देणारें खात्रीलायक साधन म्हणजे गणपत कृष्णाजींच्या मुद्रणालयाच्या आश्रयानें प्रसिद्ध झालेलीं उपरोक्त दिग्दर्शन, मराठी ज्ञान-प्रसारक, बोध-सागर वगैरे नियतकालिकेंच होत. आज त्यांपैकीं कित्येक नियतकालिकांचे अंक दुर्मिळ झाले आहेत नि जे आजवर काळाशीं टक्कर देऊन राहिले आहेत, त्यांचें महत्त्व इतिहास-संशोधनाच्या दृष्टीनें आज अपरंपार आहे.

काय मौज आहे पहा! आजच्या सुधारलेल्या जमान्यांत नियत-कालिकांचा व्यवहार आंतबट्ट्याचाच आहे; मग त्या काळीं तो फायद्याचा थोडाच असणार? शिवाय नियतकालिकांपायीं आर्थिकदृष्ट्या जास्तींत जास्त बोजा जर कोणावर पडत असेल, तर तो मुद्रणालयाच्या मालकावर! तो भार पडून नंतर भिडेपायीं व अन्य कारणांमुळें तो कसा वाढत जातो, हें सांगण्याची येथें जरुरी नाहीं.

वर ज्या कांहीं नियतकालिकांचा उल्लेख करण्यांत आला आहे, तीं सारीं देशोन्नतीच्या नि ज्ञानप्रसाराच्या उच्चतम भावनेनें प्रेरित होऊन सुरू झालेलीं नियतकालिकें होतीं. त्यांच्या प्रवर्तकांना त्यापायीं त्यागाचा भोग द्यावा लागला आहे. आणि त्या त्यागांत गणपत कृष्णाजींचाही मोठा वांटा आहे, हें विसरून चालणार नाहीं.

त्यांच्याठायीं समाज नि देशकल्याणाची दृष्टि होती व त्यामुळेंच ते आर्थिक त्यागास तयार झाले हें उघडच आहे. गणपत कृष्णाजींनीं छपाईच्या बाबतींत कधीं कोणाचें अडूं दिलें नाहीं. आपल्या हातीं स्वपराक्रमानें स्थापन केलेलें मुद्रण-यंत्र आहे. आपल्याशीं सामना देणारा दुसरा कोणी महाराष्ट्रीय

मुद्रक - प्रकाशक नाहीं. तेव्हां आपण सांगूं तो दरदाम नि पदरांत टाकूं तें काम, ह्या स्वार्थी नि व्यापारी बाण्यानें ते कधीं कोणाशीं वागले नाहींत. छापखाना सर्वांच्या उपयोगासाठीं आहे. तो मीं स्थापन केला असला तरी तो माझा एकट्याचा नाहीं, तर तो माझ्या देशबांधवांचा आहे, ही भावना गणपत कृष्णाजींच्या अंतःकरणांत सदैव वावरत होती नि त्याप्रमाणें ते वागत असत. त्यामुळें छापखान्याला सार्वजनिक संस्थेचें स्वरूप प्राप्त झालें होतें. केवळ स्वधर्मीयांच्याच नाहीं, तर परधर्मीयांच्या सेवेलाही ते नेहमीं तयार असत.

ज्यू लोक आपलें वाङ्मय मराठी भाषेच्याद्वारें प्रसिद्ध करीत असत. त्यांचीं कांहीं मराठी पुस्तकें मिशनऱ्यांच्या छापखान्यांत सवलतीनें छापून मिळेनात म्हणून ते गणपत कृष्णाजींकडे आले. त्यांनीं आपली अडचण त्यांना सांगितली, तेव्हां गणपत कृष्णाजींनीं योग्य त्या सवलती देऊन त्यांचीं पुढील दोन धर्मविषयक पुस्तकें सुंदर रीतीनें छापून दिलीं. ( १ ) गरीब लोकांना धर्म करण्याविषयीं बोध व ( २ ) प्रायश्चित्ताच्या दिवशीं पापाविषयीं कबुली देणें. ज्यू लोकांची त्या वेळची ही गरज भागल्यामुळें त्यांना अपरिमित आनंद झाला.

अशा रीतीनें सुमारें तीस वर्षांच्या कारकीर्दींत गणपत कृष्णाजींनीं आपल्या छापखान्याची स्थापना, वाढ नि विकास, आश्चर्यकारक रीतीनें घडवून आणिला. केवढी त्यांची धडाडी व वाखाणण्याजोगी कल्पकता! त्यांनीं जें जें मनांत आणिलें, तें तें केवळ स्वावलंबनाच्या नि उद्योगाच्या बळावर सिद्धीस नेलें. महत् प्रयासानें गांठलेलें आपलें उदात्त ध्येय सिद्धीस गेलेलें पहाण्याचें भाग्य त्यांच्याप्रमाणें क्वचितच एकाद्याच्या वांट्यास येत असतें.

गणपत कृष्णाजींनीं मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांत इतिहास घडविला. आरंभ-काळांतील मुद्रण-प्रकाशन-क्षेत्रांतील पहिलेपणाचा मान त्यांचा आहे. अशा ह्या थोर नि कर्तबगार पुरुषाचें देहावसान १८६० सालीं झालें!

गणपत कृष्णाजी फार धोरणी होते. महत् प्रयासांनीं आपण छापखान्याचा डोलारा उभारला, त्याचा जनता-कल्याणासाठीं शक्य त्या परींनीं उपयोग केला नि आपण सर्वांकडून 'भला रे भला' म्हणवून घेतलें. तेंच धोरण नि तीच परिस्थिति दीर्घकाळ चालू रहावी, असें त्यांना वाटणें स्वाभाविक होतें. त्या हेतूनें त्यांनीं मृत्यूपूर्वी पावलें टाकायला सुरुवात केली होती.

त्यांनीं छापखान्यांत कामाकाजासाठीं जवळ केलेलीं माणसें विश्वसनीय तशींच धन्याची चूज राखण्यासाठीं झटणारीं होतीं. ह्या दृष्टीनें पहातां गणपत कृष्णाजींनीं जी एक गोष्ट आपल्या आयुष्यांत केली, तिचें महत्त्व फार आहे. रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलिक ह्यांच्यासारख्या तत्कालीन थोर नि वंदनीय पुढाऱ्याच्या विश्वासास नि आदरास ते पात्र झाले होते. त्यामुळें गणपत कृष्णाजींचा छापखाना ही एक लोकोपयोगी संस्था आहे, तिची जपणूक योग्य प्रकारें झाली पाहिजे, असें रावसाहेबांस मनापासून वाटत असे. त्याचप्रमाणें गणपत कृष्णाजींनींही 'आपल्यामागें छापखान्याकडे लक्ष असूं द्या', अशी तळमळीची विनंती त्यांना मृत्यूपूर्वी केलेली होती. त्यामुळें रावसाहेब त्या छापखान्याच्या उत्कर्षासाठीं हयातभर झटले. आपला अमूल्य वेळ छापखाना सुव्यवस्थित चालू रहावा ह्यासाठीं त्यांनीं खर्च केला, ही विशेष नमूद करण्यासारखी घटना आहे.

सुदैवानें गणपत कृष्णाजींचा मुलगा कानोबा हा वयांत आलेला व वडिलांच्या तालमींत तयार झालेला होता. कोणत्या परिस्थितींत आपल्या वडिलांनीं छापखान्याची स्थापना केली नि कशा रीतीनें वागून त्यांनीं नांवलौकिक मिळविला, ह्याची त्याला बरोबर जाणीव होती. शिवाय रावसाहेब मंडलिक हे त्याच्या पाठीशीं होतेच.

गणपत कृष्णाजींच्यामागें छापखान्यांत मधून मधून जाऊन रावसाहेब तेथील कामाकाजाची पहाणी आपुलकीनें करीत असत नि जरूर तेव्हां कानोबाची कानउघडणीही करीत असत. एकदां रावसाहेब छापखान्यांत गेले असतां त्यांनीं कानोबांस दोन बोधाच्या गोष्टी सांगितल्या. त्या वेळीं ते म्हणाले होते कीं, "बाबारे ! आपण खूप मेहनत घेऊन आपलें प्रत्येक काम पार पाडण्यासाठी झटलें पाहिजे. तसेंच मी आतां शहाणा झालों असें न समजतां आपला अभ्यासही चालू ठेविला पाहिजे. आपल्या लोकांच्या स्वभावांत दोन मोठे दुर्गुण आहेत. कोणते ते ? एकांगीपणा व आळस ! आपण बहुश्रुत बनलें पाहिजे व आळसाला बिलकूल थारा देतां कामा नये. युरोपीयन लोकांची आकलनशक्ति फार दांडगी असते. प्रत्येक विषयांत त्यांना रस वाटतो. त्यामुळें त्यांचें जीवन यशस्वी होतें. तसेंच ते लोक नेहमीं आपल्या

उद्योगांत असतात. त्या लोकांची तुलना करतां येणार नाहीं. कानोबा! तुम्हीं आपल्या वडिलांप्रमाणें कीर्तिसंपन्न व्हावें असें मला फार वाटतें, तेव्हां मीं सांगितलेल्या गोष्टी नेहमीं ध्यानांत ठेवा. त्या लोकांत व आपल्यांत एवढें अंतर कां पडलें, याचा स्वतःशीं विचार करा. तुमच्यासंबंधीं माझ्या आकांक्षा फार आहेत. तुम्हांला लागेल तें सहाय्य करण्यास मी सज्ज आहें."*

वडिलांप्रमाणें कानोबा यांचीही रावसाहेबांवर श्रद्धा होती. त्यांच्या शब्दाबाहेर ते कधींही गेले नाहींत. वडिलांचा लौकिक सांभाळण्यासाठीं ते मनापासून फार जपत असत. त्यामुळें छापखान्याचा लौकिक गणपत कृष्णाजींच्या मागेंही उत्तरोत्तर वाढत गेला.

परंतु दुर्दैवाची गोष्ट म्हणजे कानोजीची यशस्वी कारकीर्द छापखान्याला दीर्घकाळ लाभली नाहीं. अवघी पांचच वर्षे लाभली; कारण कानोबा हे १८६५ सालीं निधन पावले.

"तत्पूर्वीची एक घटना. कानोबा फार आजारी होते. त्यांचा तो आजार असाध्य स्वरूपाचा होता. ह्या जगाचा आपणास कधीं निरोप घ्यावा लागेल समजत नाहीं, ह्या भावनेनें बिछान्यावर पडून असतां, कानोबांनीं आपले हितचिंतक व पाठिराखे रावसाहेब मंडलिक ह्यांस बोलावणें पाठविलें. त्याप्रमाणें वेळांत वेळ काढून रावसाहेब आपले स्नेही डॉ. भाऊ दाजी ह्यांस बरोबर घेऊन त्यांच्या घरीं गेले. डॉ. भाऊ दाजी ह्यांनीं त्यांस तपासलें; पहातात तों काय? एक फुफ्फुस घट्ट झालें होतें. भाऊ म्हणाले, "हे पंधरा दिवस काढतील; पण नेम नाहीं. दोन दिवसांतही जातील." नंतर रावसाहेबांनीं विचारलें, "कानोबा! मला कां बोलावलें?" त्यावर कानोबांनीं मृत्युपत्र करावयास सांगितलें व तुम्हीं एक्झीक्युटर झालें पाहिजे, अशीही विनंती केली. रावसाहेबांनीं आपल्याबरोबर गोविंद गंगाधर फडके [हे त्या वेळीं इमारती व सडक खात्यांत (पी. डब्ल्यू. डी.) मोठे अधिकारी नि वजनदार गृहस्थ होते.] यांस नेमून घेतलें. मग त्यांच्या मनांत काय व्यवस्था करावयाची तें विचारून त्यांच्या कारकुनाकडून मसुदा लिहून घेतला, व नंतर डॉ. भाऊंना आणविलें. त्यांनीं मसुद्यासंबंधीं पुष्कळ प्रश्न कानोबास विचारले. त्यावरून त्यांच्या समजुतीप्रमाणें मृत्युपत्र आहे

* रा. सा. वि. ना. मंडलिक यांचें चरित्र ले. ग. रा. हवालदार पृ. १०४१

असें पाहून त्यावर कानोबास सही करण्यास सांगितलें. त्यावर भाऊंनीं साक्ष घातली व त्र्यंबक वैद्य यानींही घांतली."

"यांत मुख्य जबाबदारी म्हटली म्हणजे कानोबांचा मुलगा आत्माराम हा वयांत येईपर्यंत छापखाना चालविणें ही होती. ती करीत असतां रावसाहेबांस पहिल्यानें श्रम पडले. तथापि एक पायाशुद्ध रीत बसविल्यावर मग विशेष श्रम पडले नाहींत. रावसाहेब छापखान्यावर देखरेख ठेवीत असत. तसेंच जमाखर्चाकडे वेळोवेळीं लक्ष पुरवीत असत. या कामांत त्यांस चांगलें यश आलें."*

वर सांगितल्याप्रमाणें विश्वस्त ह्या नात्यानें छापखान्याची व्यवस्था रा. मा. मंडलिक नि गंगाधर गोविंद फडके ह्या दोन थोर पुरुषांच्या हातीं आली. दोघांनाही गणपत कृष्णाजींच्या घराण्याबद्दल नि त्यांनीं महत् प्रयासांनीं स्थापन केलेल्या लोकोपयोगी संस्थेबद्दल आत्यंतिक आदरभाव वाटत असे. तसेंच शिरावर घेतलेल्या जबाबदारीची दोघांनाही पूर्णपणें जाणीव होती. त्या जाणीवेनें ते शेवटपर्यंत वागले. छापखान्यांतील कामकाज सुव्यवस्थित रीतीनें पार पडावें ह्या हेतूनें त्यांनीं त्या छापखान्यांतील एक जुने प्रामाणिक व गणपत कृष्णाजींच्या कसोटीला पूर्णपणें उतरलेले आणि त्यांच्या विश्वासास पात्र ठरलेले मुख्य व्यवस्थापक नारो कृष्ण धुमाळे ह्यांस त्या कारखान्यावर कायम ठेवून त्यांच्यावर सर्व जबाबदारी सोंपविली. जरूर पडेल तेव्हां दोन्ही विश्वस्तांचा सल्ला घ्यावयाचा. त्याचा कारभार ५।६ वर्षे समाधानकारक रीतीनें चालला. (१८६५–७०) ह्या काळांत त्या छापखान्यांत जे जे ग्रंथ छापले. त्यांवर उपरोक्त दोन्ही विश्वस्तांचीं व धुमाळे ह्यांचें व्यवस्थापक म्हणून अशीं नांवें नमूद केलेलीं आढळतात.

त्यानंतर १८७१।७२ मध्यें आत्माराम वयांत आल्यानंतर छापखान्याचे विश्वस्त रा. सा. मंडलिक ह्यांनीं कायद्याप्रमाणें ॲडव्होकेट जनरल ह्यांचें मत घेऊन छापखान्यासह सर्व मालमत्ता त्यांच्या स्वाधीन करून स्वतः त्या जबाबदारीतून मोकळे झाले.

रावसाहेबांनीं आपल्या कारकीर्दीत छापखान्यांत उत्तम प्रकारची शिस्त ठेविली होती. आत्मारामनें त्यांत ढवळाढवळ न करतां त्यांच्याच सल्ल्यानें

* रा. सा. मंडलिक यांचें चरित्र ले. न. रा. हवालदार पृ. ६९९–७००

चालावयाचें, असें अबाधित धोरण ठेवल्यामुळें, ह्या छापखान्याचा पूर्वीचा लौकिक कायम राहिला. आजोबाचे बरेचसे गुण ह्या नातवांतही उतरले होते. नक्षी कामांत तो तरबेज होता. आपल्या छापखान्याला कोणींही नांव ठेवतां नये, ह्यासाठीं तो फार जपत असे. त्यामुळें ७८ वर्षांची त्याची कारकीर्द समाधानकारक रीतीनें पार पडली. वडिलांच्या नि आजोबांच्या लौकिकांत त्यानें चांगली भर घातली.

१८८० सालीं आत्माराम निधन पावला आणि त्यानंतरच्या काळांत ह्या छापखान्याला सर्व बाजूंनीं आस्ते आस्ते उतरती कळा लागली. त्याला कारणें अनेक होतीं. मुंबईंत छापखान्यांची संख्या उत्तरोत्तर वाढत गेली. निर्णयसागरसारखा नव्या दमाचा नि अनेक बाबतींत पुढारलेला छापखाना उदयाचलीं येऊं लागला होता. आत्माराम वारला त्या वेळीं त्याचीं मुलें लहान नि अज्ञान होतीं. पूर्वी त्या छापखान्यास थोरामोठ्यांचा पाठिंबा होता. तो आतां मिळण्यासारखा नव्हता. एकंदर मनूच पालटला होता.

संस्था असो या व्यक्ति असो. कोणाचीही भरभराट दीर्घकाळ टिकून राहूं शकत नाहीं. कांहीं काळानंतर ओहोटी सुरू होते. नातवापर्यंत छापखान्याच्या कारभाराला नांव ठेवण्यासारखें कांहीं नव्हतें; परंतु त्यानंतर मात्र सर्वच उलथापालथ झाली. मृत्युसमयीं आत्माराम नि त्याचे हितचिंतक ह्यांनीं छापखान्याची व्यवस्था पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी नि मारुती तुकाराम गवाणे ह्यांच्या स्वाधीन केली.

अशा रीतीनें एकाकाळीं नांवलौकिक संपादन केलेल्या गणपत कृष्णाजी छापखान्याची व्यवस्था दुसऱ्यांदा तिऱ्हाइतांच्या हातीं गेली. तिऱ्हाईत पालक सर्वच चांगले लाभतात असें नाहीं. कांहीं निःस्वार्थ असतात, तर कांहीं स्वार्थी नि आपमतलबी असतात; परंतु गणपत कृष्णाजींची पुण्याई थोर नि ती अजून संपुष्टांत आली नव्हती. त्यामुळें हे जे नवीन पालक लाभले, ते आपली जबाबदारी ओळखून वागणारे नि मूळ मालकाच्या हितासाठीं जपणारे होते. नाडकर्णी हे आपल्या कामांत पूर्ण तरबेज होते. गवाणे हे सल्लागार नि तपासनीस ह्या नात्यानें कारभाराकडे लक्ष पुरवीत असत.

"नाडकर्णी यांची टापटीप, सुयोजकता, मनमिळाऊपणा, धोरण, जमाखर्चाचा मेळ राखण्याची दक्षता, नियमितपणा वगैरे गुणांमुळें त्यांच्या

वीस वर्षांच्या काळांत ( १८८० ते १९०० ) छापखान्याचा योगक्षेम ठीक चालू राहिला. काम मिळून तो मानानें जगूं शकला; परंतु १९०० सालीं नाइकर्णी वारले, तेव्हां या छापखान्याची पुन्हां जी घडी बिघडली ती कांहीं सुधारूं शकली नाहीं.

"१९०० नंतर या छापखान्याचीं सूत्रें अडाणी, आप्पलपोट्या व अयोग्य लोकांच्या हातीं गेलीं. त्यामुळें पूर्वीचा नांवलौकिक धुळीस मिळाला, व त्याची माती झाली. अव्यवस्थेचा कडेलोट झाला. चांगले लोक त्याकडे ढुंकूनही पाहिनात. चांगलीं कामें येणें बंद पडलें. किरकोळ रद्दी कामें यायचीं. एकनाथी भारूड, भजनी भारूड, स्मशानगमनाचे अभंग, स्वर्गारोहणाचे अभंग, असलीं ५।२५ पानांचीं चोपडी, किरकोळ पत्रकें, लग्नचिठ्या, आमंत्रण-पत्रिका असलीं कामें छापून कशीबशी गुजराण करावी लागली! एकंदरींत कसेंबसें पोट जाळण्यासाठीं, एका काळीं नांव मिळविलेल्या या छापखान्याच्या वांट्यास येतील तीं कसलींही कामें छापण्याची पाळी आली!

"अशा रीतीनें हा छापखाना आपलें जीवन कसेंबसें रेटीत असता त्याच्या-अंतकाळाचा समय जवळ आला आणि ज्या सार्वभौम सरकारनें त्याच्या चांगुलपणास वश होऊन प्रारंभीं त्याकडे महत्त्वाचीं कामें, शालोपयोगी पुस्तकें भरपूर मोबदला देऊन छापून घेतलीं, त्याच सरकारच्या हातून त्याचा लिलांव झाला व त्याला मूठमाती मिळाली. १९१४ सालीं, त्यांत कांहीं बेकायदेशीर मजकुराचीं चोपडीं छापलीं गेलीं ( पत्रकें वगैरे ), त्यामुळें छापखाना जप्त झाला व त्याचा वारस किंवा कैवारी कोणी नसल्यामुळें त्याची कींवही कोणास आली नाहीं. एवढी दुर्दशा त्याच्या वांट्यास आली!........

"व्यक्तिमात्राचेंही तसेंच आहे, नाहीं का? एखादा कर्तबगार पुरुष स्वपराक्रमानें कर्तबगारी गाजवून मोठ्या पदास चढतो, जगाला वंद्य होतो. त्याला अनुकूल परिस्थितीचाही लाभ झालेला असतो; परंतु ते गुण त्याच्याबरोबर नाहींसे होतात. क्वचित् एखाद्या दुसऱ्या पिढीपर्यंत टिकतात. आणि नंतर उतरती कळा लागून सर्व गुणांचा नाश होतो. मागें कांहीं शिल्लक रहात नाहीं."

अशी आहे गणपत कृष्णाजींच्या वैभवशाली मुद्रणालयाची अखेरच्या काळांतील दुर्दैवी कहाणी!

---

विविधज्ञान विस्तार ' सप्टेंबर १९२२ बा. ना देव यांचा लेख.

# ३

## रावजी श्रीधर गोंधळेकर

महाराष्ट्राच्या दृष्टीनें पहातां मुंबईनें मुद्रणालयाच्या बाबतींत आघाडी मारली; परंतु आरंभ केला तो मिशनऱ्यांनीं. त्यानंतर मुंबईत मुद्रणालयाची स्थापना करणारे पहिले थोर व कर्तबगार महाराष्ट्रीय म्हणजे गणपत कृष्णाजी नि शेठ जावजी दादाजी हे होत.

पुण्यांत मुद्रण-कलेचा आरंभ कधीं नि कोणीं केला, ह्याचा इतिहासही मनोरंजक तसाच उद्बोधक आहे. तेथें मुद्रण-कलेचें बीजारोपण झालें तें राज्यकर्त्या इंग्रजांच्या हातून. पेशवाई नामशेष होऊन इंग्रजांची राजवट सुरू झाल्यानंतर पुण्यांतील विश्रामबाग-वाड्यांत संस्कृत पाठशाळा स्थापन करण्यांत आली. (१८२१) जनतेंत शिक्षणप्रसार करून ती सुसंस्कृत बनवावयाची तर ग्रंथनिर्मितीची अत्यंत जरुरी होती. आणि त्यासाठीं मुद्रणालयाचा सहकार अत्यावश्यक होता.

मुंबईचा राज्यपाल माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन हा मोठा धोरणी तसाच कावेबाज होता. ज्ञानप्रसारावर त्याची श्रद्धा होती. त्याची उपयुक्तता त्याला पटलेली होती. ज्यांच्यावर आपण राज्यकारभार चालविणार ती प्रजा सुसंस्कृत नि सुबुद्ध असेल तितकें आपलें कार्य सुकर होणार आहे, ह्याची त्याला पूर्ण जाणीव होती. त्यानें संस्कृत पाठशाळा पुणें शहरांत स्थापन केली, त्यांत त्याचें दूरदर्शी राजकारण होतें. त्याचप्रमाणें जनतेंत ज्ञानप्रसार करण्यासाठीं मुद्रणालय स्थापन करणें जरूर आहे, हें आपल्या कारकीर्दीच्या आरंभकाळांतच त्यानें हेरलें आणि पाठशाळेला जोडून त्यानें मुद्रणालय स्थापन करण्याचा आपला बेत

सिद्धीस नेला. (१८३१), हें मुद्रणालय 'पाठशाळा छापखाना' ह्या नांवानें ओळखलें जात असे.

संस्कृति-संवर्धन नि ज्ञान-प्रसार ह्या दोन्ही दृष्टींनीं पहातां मुंबई नि पुणें हीं केंद्रस्थानें आहेत आणि ह्या दोन्ही केंद्रस्थानीं मुद्रणालयाची पद्धतशीर मुहूर्तमेढ रोविली गेली ती १८३१ सालीं. त्यासाठीं मुंबईत पुढाकार घेणारा एक महत्त्वाकांक्षी, परंतु अकिंचन महाराष्ट्रीय होता, तर तेंच ज्ञान-प्रसाराचें कार्य पार पाडण्याच्या सद्धेतूनें पुण्यांत समर्थ इंग्रजसरकार पुढें सरसावलें.

पुणें पाठशाळा मुद्रणालयांतून त्या आरंभकाळांत बोधकथा, नीतिज्ञान-परिभाषा (१८३१), भूगोल-खगोलविषयक संवाद (१८३२), महाराष्ट्र देशाचें वर्णन, वगैरे विद्यावृद्धीच्या कार्यास पोषक अशीं लहानमोठीं पुस्तकें बाहेर पडलीं.

त्यानंतर ज्ञानप्रकाश छापखाना (१८४९), ज्ञानचक्षु छापखाना (१८६१), वृत्तप्रकाश (१८६२), बुद्धिप्रकाश (१८६३) वगैरे अनेक छापखाने स्थापन झाले. त्या छापखान्यांतून त्या त्या नांवांचीं वृत्तपत्रें निघूं लागलीं नि ग्रंथप्रकाशनही होऊं लागलें. मुद्रणालय हें ज्ञानप्रसाराचें एक अमोघ नि हुकमी साधन आहे, ह्याची जाणीव जसजशी वाढत गेली, तसतशी मुद्रणालयांच्या संख्येंत भर पडत गेली.

पुणें येथील मुद्रणालयाच्या पूर्वकालीन इतिहासांत रावजी श्रीधर गोंधळेकर (१८३१–१९१०) ह्या कर्तबगार पुरुषानें १८६० सालीं स्थापन केलेल्या जगद्धितेच्छु मुद्रणालयाचें स्थान आगळें नि अनेक दृष्टींनीं फार महत्त्वाचें आहे. सुमारें शंभर वर्षांपूर्वीच्या विपरीत व अडचणींच्या काळांत स्थापन झालेल्या ह्या मुद्रणालयाचा नि त्याच्या कर्तबगार जन्मदात्याचा अल्प परिचय येथें करून देण्यांत येत आहे.

मुंबईत गणपत कृष्णाजींनीं ज्या वर्षी पहिल्यावहिल्या मुद्रणालयाची स्थापना केली (१८३१), त्याच वर्षी पुणें येथील जगद्धितेच्छु मुद्रणालयाचे संस्थापक रावजी श्रीधर गोंधळेकर ह्यांचा रत्नागिरी जिल्ह्यांतील गोंधळें गांवीं जन्म झाला आणि ज्या वर्षी एक महाराष्ट्रीय ह्या नात्यानें मुद्रण-प्रकाशनक्षेत्रांत पहिलेपणाचा मान मिळवून गणपत कृष्णाजींनीं इहलोकींची यात्रा संपविली, त्याच

१८६० मालीं रावजी श्रीधर गोंधळेकर ह्यांनीं आपल्या शिळा-प्रेसची मुहूर्तमेढ पुणें शहरांत रोंविली.

शंभर वर्षांपूर्वींच्या काळांत ज्यांनीं विपरीत परिस्थितीशीं झगडून केवळ स्वतःच्या कर्तृत्वाच्या बळावर चिरस्मरणीय कार्याचे धवलगिरी निर्माण केले, अशा थोर नि वंदनीय महाराष्ट्रीयांत रावजी श्रीधर गोंधळेकर ह्यांचा समावेश होतो. अज्ञानाशीं झुंज देऊन नवीन जीवनमूल्यें स्थापन करावयाचीं होतीं. मार्ग आजच्यासारखा धोपट नि निष्कंटक नव्हता. अतिशय मेहनतीनें नि अक्कल-हुशारीनें तो साफसूफ करावयाचा होता. रावजी श्रीधर ह्यांनीं त्या कार्यांतील आपला वांटा उचलतांना कर्तव्याचरणांत यत्किंचितही कमूर केली नाहीं, म्हणून त्यांचें महत्त्व.

रावजींचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील गोंधळें गांवीं (ता. चिपळूण) झाला. त्यांच्या घराण्याकडे गांवची खोती होती. त्या काळाच्या मानानें त्यांचें मराठी नि संस्कृत शिक्षण झालें. खोती असल्यामुळें घरची स्थिति चांगली होती. त्या दृष्टीनें पाहिलें असतां आपला गांव नि सुखाची रहाणी सोडून बाहेर-गांवीं नशिबाची परीक्षा पहाण्यासाठीं जाण्याची त्यांना जरुरी नव्हती.

परंतु कांहीं माणसें जन्मतःच असमाधानी वृत्तीचीं असतात. त्यांना प्राप्त स्थितींत मुळींच समाधान वाटत नसतें. तीं माणसें कर्तृत्वाची शिदोरी आपल्या बरोबर घेऊन आलेलीं असतात. त्या शिदोरीची वासलात लावल्याशिवाय त्यांना चैन पडत नाहीं. सुखाचें नि आरामाचें, परंतु कर्तृत्वशून्यतेचें जीवन त्यांना नकोसें वाटूं लागतें. बेचैन अवस्थेंत तीं घराला रामराम ठोकतात आणि वाट मिळेल तिकडे पळत सुटतात. अशा पळपुट्यांनींच निरनिराळ्या क्षेत्रांत नेत्रदीपक इतिहास घडविला आहे.

रावजींनीं वयाच्या अठराव्या किंवा एकुणिसाव्या वर्षापर्यंत जेमतेम दम धरला आणि एके दिवशीं बेचैन अवस्थेंत त्यांनीं आपलें सुखाचें घर सोडलें. त्यांनीं ठाण्यांत येऊन तेथील मोजणी-खात्यात दरमहा तीन रुपये पगारावर ठाण मांडिलें. मात्र तें कायमचें नव्हतें.

रावजी कसल्या तरी शोधांत होते. ठाण्यांत शोधून काय मिळणार? शोध घेण्यासाठीं व नशिबाची परीक्षा पहाण्यासाठीं मुंबईंत आलें पाहिजे आणि

तसें पाहिलें तर ठाणें मुंबईपासून दूर का आहे? सवड मिळाली म्हणजे रावजी मुंबई गांठायचे आणि कुठें काय चाललंय ह्याचें चौकस दृष्टीनें निरीक्षण करायचे.

रावजींनीं विद्येची गोडी चाखली होती. त्या काळीं आजच्यासारखी ग्रंथ-समृद्धि मुळींच नव्हती. फार थोडीं पुस्तकें आणि तींही धार्मिक स्वरूपाचीं, छापून सवरून बाहेर पडलीं होतीं. मुंबईत त्या काळीं हिंगिष्टे, जुगुष्टे व खातू हे प्रमुख पुस्तकविक्रेते होते. ग्रंथनिर्मितीच्या पहिल्या अमदानींत त्यांनीं आपला व्यवसाय चांगला नांवारूपास आणिला होता.

व्यवसायाची टेहेळणी करतां करतां रावजी त्या पुस्तक-विक्रेत्यांकडे ओढले गेले. त्यांनीं त्यांच्याशीं संधान बांधिलें. होतकरू नि कष्टाळू तरुण कोणाला नकोसा झालाय्? रावजींना आपल्याकडून शक्य असेल तेवढें उत्तेजन द्यायचें, असें त्यांनीं ठरविलें आणि तें रावजींच्या पथ्यावर पडलें.

पंचांगें, पोथ्या, पुराणें, स्तोत्रें, कारिका ह्यासारखें धार्मिक वाङ्मय त्या काळीं नुकतेंच छापील स्वरूपांत प्रकाशांत येऊं लागलें होतें. तशा वाङ्मयाबद्दल जनतेंत कुतूहलमिश्रित ओढ उत्पन्न झाली होती.

रावजी धार्मिक वातावरणांत लहानाचे मोठे होत आलेले होते, आणि सर्वसाधारणपणें त्या काळांतील बहुजनसमाज धर्मभावनेनें भारला गेलेला होता. ह्या परिस्थितीचा फायदा पदरांत पाडून घेतां आल्यास पहावा, असें मनाशीं ठरवून रावजी त्या मार्गानें आस्ते आस्ते वाटचाल करूं लागले.

वाटचाल करायची म्हणजे काय करायचें? वर ज्या पुस्तक-विक्रेत्यांचा उल्लेख करण्यांत आला आहे, त्या परिचित पुस्तक-विक्रेत्याकडून ठराविक कमिशनवर पुस्तकें मिळवायचीं आणि तीं परळसारख्या कामगार विभागांत किंवा इतरत्र घरोघर फेऱ्या मारून विकायचीं. त्या काळीं मिळणाऱ्या धार्मिक चोपड्यांच्या किंवा पुस्तकांच्या किंमती आजच्यासारख्या महाभयंकर नव्हत्या. एक-दोन आण्यांपासून तों फार फार तर आठ-बारा आण्यांपर्यंत. कित्येकांच्या दृष्टीनें त्याही जड वाटणाऱ्या असल्या, तरी छाती दडपून टाकणाऱ्या खास नव्हत्या! जशीं पुस्तकें तशा किंमती! शिवाय तत्कालीन प्रकाशकांना नि पुस्तकविक्रेत्यांना आजच्यासारख्या महागाईशीं सामना द्यावा लागत नव्हता, हेंही तितकेंच खरें आहे.

घरोघर फिरून पुस्तकें खपविण्याचा रावजींचा व्यवसाय उत्तरोत्तर वाढत चालला. त्यांत चार पैसे मिळूं शकतात अशी खात्री पटल्यानंतर त्यांनीं नोकरी बंधन तोडलें आणि ते सर्वस्वी त्याच व्यवसायाकडे सर्व लक्ष पुरवूं लागले.

पंढरपूरसारख्या यात्रेच्या ठिकाणीं प्रसंगोपात जमा होणारा यात्रेकरूंचा समुदाय धार्मिक भावनेनें भारलेला असतो. त्यांच्या नजरेच्या आटोक्यांत आपल्या जवळचीं धार्मिक पुस्तकें आलीं, तर त्यांचा उठाव होण्याचा संभव आहे, असें वाटल्यावरून रावजी पंढरपूरच्या वाऱ्या करूं लागले. त्यांचा कयास बरोबर होता. यात्रेंत अल्प किंमतीचीं छोटीं छोटीं धार्मिक पुस्तकें भराभर खपूं लागलीं.

पंढरपूरला जातांना नि येतांना वाटेंत ज्या ज्या गांवीं मुक्काम होईल, त्या त्या ठिकाणीं आपलें फिरतें दुकान उघडायचें नि जरूर तेथें प्रचार-तंत्राचा उपयोग करायचा. लोकांना पुस्तकांचें महत्त्व पटावें ह्या हेतूनें आपल्या गोड वाणींत पुस्तकांतील कांहीं भाग वाचून दाखवायचा. त्या वाचण्याबोलण्याचा ऐकणाऱ्यांच्या मनावर इष्ट तो परिणाम होत असे. रावजींची तोंडपाटिलकी कारणीं लागत असे.

तत्कालीन खेड्यापाड्यांतील व इतर वाचक-वर्गाची नाडी रावजींनीं ओळखली. आपण पतकरलेला व्यवसाय फायद्याचा आहे, अशी मनाची खात्री पटल्यानंतर एखाद्या मध्यवर्ती ठिकाणीं स्वतःचें पुस्तकविक्रीचें दुकान थाटावें, असें वाटून त्यांनीं १८५८ च्या सुमारास पुणें येथें बुधवार चौकांत 'रावजी श्रीधर गोंधळेकर ह्यांचा बुक डेपो' ह्या नांवानें पुस्तकविक्रीचें दुकान उघडलें.

शंभर वर्षांपूर्वीची घटना आहे ही. दुकान उघडून रावजी आपल्या दुकानांत लोडाशीं टेकून गिऱ्हाईकांची वाट पहात आरामांत स्वस्थ बसून राहिले नाहींत. पुस्तकविक्रीसाठीं मधून मधून ते गांवोगांव प्रचार-दौरा काढीत असत. हा दौरा पद्धतशीर, प्रेक्षणीय तसाच फायदेशीर असे. दोन बैलगाड्या ठरावयाच्या. एकींत नानाप्रकारच्या पुस्तकांचे पेटारे भरावयाचे नि दुसरींत स्वतः आपण, एक कारकून नि एक नोकर असा लवाजमा बरोबर असावयाचा. गांवची वस्ती नि विक्रीचें प्रमाण लक्षांत घेऊन मुक्काम कमी जास्त करावयाचा. मुक्काम ठोकावयाचा धर्मशाळेत किंवा देवळांत.

पुस्तकविक्रीसाठीं त्या काळांत रावजींनीं अवलंबिलेलें हें प्रचार-तंत्र त्यांच्या कलकतेची नि उद्योगशीलतेची जाणीव करून देणारें आहे.

एकदम मोठी उडी मारायची नाहीं. सावकाश पायरीपायरीनें जायचें, हें होतें रावजींचें धोरण. पुस्तकविक्रीचा जम नीट बसला; धंद्यांत कमाई ठीक प्रमाणांत होऊं लागली. आतां पुढचें पाऊल टाकायला हरकत नाहीं असें वाटून प्रयोग करून पहाण्यासाठी म्हणून त्यांनीं एक लहानसा व हातानें चालवितां येणारा शिळाप्रेस सुरू केला. त्याचें नांव ठेवलें 'जगद्हितेच्छु छापखाना.' (१८६०) त्यासाठीं शनिवारांतील सरदार राजमाचीकर ह्यांच्या वाड्यांत जागा मिळविली. ह्या सरदारसाहेबांनीं 'न्यायाश्रय' नांवाचें एक मासिक सुरू करण्याचें ठरविलें नि तेंही काम ह्या छापखान्यास मिळालें.

कोणतीं पुस्तकें जास्त खपतात नि कोणतीं पुस्तकें आपण छापूं शकतों, ह्याचा अंदाज घेऊन रावजी नंतर पुस्तकप्रकाशनाकडे वळले. आरंभकाळांत त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत मत्स्यपुराण, मार्कंडेयपुराण, वामनपुराण, लिंगपुराण, दासबोध, हरिविजय, सूपशास्त्र, सार्थ पंचदशी वगैरे पुस्तकांचा उल्लेख करतां येईल.

केवळ धार्मिक पुस्तकांची छपाई नि विक्री एवढ्यावर समाधान मानून रावजी राहिले नाहींत. त्यांनीं पाहिलें कीं लोकांना रामपंचायतन, शिवपंचायतन, मारुतिराय, ह्यांसारख्या चित्रांची आवड आहे, आपल्या घरीं तीं असावीं असें अनेकांस वाटतें. रावजींनीं एक चित्रकार गांठून त्याच्याकडून रंगीत चित्रें काढवून नि तीं छापवून घेतलीं. त्यांचीही विक्री धूमधडाक्यानें सुरू झाली. तसेंच आस्ते आस्ते शिळा-प्रेसला खिळा-प्रेसचें भव्य स्वरूप देऊन ग्रंथछपाईचें प्रमाण वाढविण्यांत आलें.

पुण्यांत बुकडेपो स्थापन केला. तेथें पुस्तकविक्री ठीक प्रमाणांत होऊं लागली.-त्याचप्रमाणें त्याची एक शाखा मुबईंत नि पंढरपुरांतही उघडण्यांत आली. पंढरपूर शाखा विशेषतः यात्रेच्या दिवसांत उघडी ठेवण्यांत येत असे.

हा जो मुद्रणप्रकाशन व्यवसाय आपण सुरू केला, त्यांत स्वतःचें कल्याण साधतां येईल तेवढें साधावयाचें, हा रावजींचा हेतु असला, तरी इतरांच्याही कल्याणास नि विकासास हातभार लावतां आला तर लावावा असेंही रावजींना वाटत असे.

त्यांना पानसुपारीचें आमंत्रण दिलें नि त्या निमित्तानें त्यांस आपलें सुव्यवस्थित मुद्रणालय नि ग्रंथप्रकाशन-संग्रह दाखविला. विद्याप्रेमी व ज्ञानप्रसारासाठीं अहर्निश झटणाऱ्या महाराजांना रावजींच्या मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांतील कर्तबगारीचें मोठें कौतुक वाटलें.

ह्या भेटीचा इष्ट तो परिणाम घडून आला. त्यामुळें संस्थानचीं छपाईचीं कामें मिळवितां आलीं व तो ओघ सतत कांहीं वर्षें चालू होता.

रावजींचा जगद्धितेच्छु छापखाना, केसरी संस्था आणि लो. टिळक ह्यांचा निकट नि जिव्हाळ्याचा संबंध होता. लो. टिळकांचे वडील वारले, त्या वेळीं ते अज्ञानी होते. त्यांच्या वडिलांनीं आपल्या पश्चात् जी व्यवस्था करून ठेविली, त्यांत रावजी गोंधळेकर ह्यांस चि. बाळ गंगाधर टिळक ह्यांचे पालक नेमलें होतें. ह्यावरून रावजी गोंधळेकर ह्यांनीं त्या काळांत केवढें माननीय नि विश्वसनीय स्थान मिळविलें होतें, ह्याची कल्पना करतां येईल. त्यांनीं ती जबाबदारी समाधानकारक रीतीनें पार पाडिली.[१]

'केसरी' पत्र कांहीं वर्षें फडके यांच्या वाड्यांतील श्रीविठ्ठल छापखान्यांत छापलें जात असे. १८९७ सालीं आग लागून तो छापखाना जळाला, तेव्हां ४।६ महिने केसरी पत्र जगद्धितेच्छु छापखान्यांत छापलें जात असे.

रावजी गोंधळेकर ह्यांनीं मुंबईचे शेठ जावजी दादाजी ह्यांनीं स्थापन करून नांवलौकिकास आणून सोडलेल्या निर्णयसागर-मुद्रणालयाचा उच्च आदर्श स्वतःपुढें ठेविलेला होता. मुंबईंत जसा निर्णयसागर, तसा आपला जगद्धितेच्छु हा पुण्यांतील निर्णयसागर व्हावा, ही त्यांची महत्त्वाकांक्षा होती. ती पूर्ण व्हावी ह्यासाठीं त्यांची जीवनभर अविरत धडपड चाललेली असे. दोन्ही मुद्रणालयांचे संबंध जिव्हाळ्याचे होते. रावजींनीं आपले चिरंजीव केशवराव ह्यांस निर्णयसागर टाईप फाऊंड्रींत राणूजी आरू ह्यांच्या नेतृत्वाखालीं काम शिकण्यासाठीं ठेविलें होतें. त्यांनीं फाऊंड्री कामांत पूर्ण तरबेज व्हावें हाच त्यांत त्यांचा सद्हेतु होता; व तेथें राहून मर्व यरांतून बाघरल्यामुळें तो सिद्दीम गेला.

१ लो. टिळक यांचें चरित्र; लेखक-कृष्णाजी आबाजी गुरुजी

जावजीशेठ ह्यांच्या कर्तृत्वाचा आदर्श रावजींनीं आपल्या दृष्टीपुढें सतत ठेविला होता. जावजीशेठजींच्या सुसंपन्न नि सुप्रसचा टाईप फाऊंड्रीबद्दल त्यांना अत्यादर वाटत असे.

रावजींच्या जगद्धितेच्छु साप्ताहिकांत जावजीशेठ ह्यांच्या निधनोत्तर प्रसिद्ध झालेल्या मृत्युलेखांत पुढील आदराची भावना प्रगट झाली आहेः— "छापखान्यांतल्या अगदी कमी दर्जाच्या नोकरीपासून आपल्या उद्योगबळानें मुंबई इलाख्यांत पहिल्या प्रतीच्या ठरलेल्या छापखान्याच्या मालकपदाला जावजीशेठ पोहोंचले होते.......तसेंच टाईप पाडण्याच्या कलेला आमच्या इलाख्यापुरतेंच नव्हे, परंतु हिंदुस्थानांत यांनींच पूर्णत्वाजवळ नेलें."[१]

जावजीशेठप्रमाणें रावजी हे एका दृष्टीनें खरोखर भाग्यवान् होते. कोणत्या दृष्टीनें ? जावजीशेठप्रमाणें रावजींचे चिरंजीव कर्तबगार नि वडिलांच्या पावलावर पाऊल टाकून त्यांच्या कीर्तींत अनुपम भर घालणारे निघाले.

मोठेपण सहजासहजीं कोणाच्याही अंगीं येऊन चिकटत नाहीं. त्यासाठीं त्याग करावा लागतो, जीवतोड मेहनत घ्यावी लागते नि सर्व बाजू सांभाळण्यासाठीं तारेवरील सर्कशीप्रमाणें तोल संभाळून व्यवहार करावा लागतो. रावजींनीं तें सर्व केलें. ५०।५५ वर्षें जगद्धितेच्छु मुद्रणालयाच्या सर्वांगीण उत्कर्षासाठीं ते झटले, परिस्थितीशीं झगडले. आपल्या उद्योगाला गोड फळें आलेलीं त्यांनी डोळे भरून पाहिलीं नि वयाच्या सत्तराव्या वर्षीं (१९०१) सर्व कारभाराचीं सूत्रें चिरंजीवांच्या हातीं सोंपवून आपण व्यवहारांतून निवृत्त झाले. अशा प्रकारचें समृद्ध नि कर्तबगारीनें प्रफुल्लित झालेलें जीवन फार थोड्या भाग्यवंतांच्या वांट्यास येत असतें.

रावजींनीं आपल्या चिरंजीवांचीच नव्हे, तर नातवाचीही कर्तबगारी पाहिली नि १९१० च्या मार्चमध्यें इहलोकींची यात्रा समाधानपूर्वक संपविली.

रावजी मोठे धोरणी तसेच भविष्यकाळ अचूक हेरणारे होते. त्यांनीं आपले चिरंजीव केशवराव ह्यांच्यावर एकेक जबाबदारी सोंपवून, एवढेंच नव्हे तर घर नमूद केल्याप्रमाणें त्यांना निर्णयसागरसारख्या आदर्श नि संपन्न मुद्रणालयांत कांहीं काळ ठेवून, त्यांच्या व्यवसायीन शिक्षणाची शक्य तेवढी काळजी घेतली.

---

१ जगद्धितेच्छु (पुणें) ता. ९-४-९२

आपल्या मुद्रणालयाचें नांव त्यांनीं जगद्धितेच्छु ठेविलें होतें. नांवाप्रमाणें आपल्या हातून कांहींतरी करणी घडावी, असेंही वाटणें स्वाभाविक होतें. आणि त्याच हेतूनें लोककल्याणार्थ त्यांनीं 'जगद्धितेच्छु' नांवाचें एक साप्ताहिक सुरू केलें. (१८७७) त्याची वार्षिक वर्गणी फक्त एक रुपया ठेविली. (ट. ख. वेगळा) वृत्तपत्र चालविण्यांत फायदा नसून तोटाच आहे, ह्याची त्यांना पूर्ण जाणीव होती; परंतु माणसानें सर्व कांहीं फायद्यावर दृष्टि ठेवून करायचें नसतें; कांहीं बाबतींत सोसावें लागणारें नुकसान हें अन्य तऱ्हेनें फायद्याचें कलम होऊन रहात असतें. लोकसेवेच्या दृष्टीनें केलेला तो त्याग असतो. त्यामुळें जीवन शोभायमान होत असतें. आणि खरोखर अशा त्यागपूर्ण उपक्रमांमुळेंच रावजींच्या जीवनाला शोभा आलेली आहे.

'जगद्धितेच्छु' साप्ताहिकांत धार्मिक, सामाजिक नि राजकीय विषयांवर चर्चात्मक लेख येत असत. चटकदार कथाही मुबलक असत. लोकशिक्षण हें त्या पत्राचें ध्येय होतें. प्रो. चिंतामण गंगाधर भानू, रामचंद्र वि. टिकेकर, (धनुर्धारी), कृ. ना. आठल्ये (केरळकोकिळ) ह्यांच्यासारखे विद्वान् संपादक ह्या पत्रासाठीं रावजींनीं वेळोवेळीं जवळ केले. जास्तींत जास्त संख्येनें त्याला वाचक नि वर्गणीदार लाभावे, ह्या हेतूनें त्याची वा. वर्गणी एक रुपयावरून नंतर आठ आण्यांवर आणून ठेविली. तरीही वर्गणीदारांची संख्या अपेक्षेप्रमाणें न वाढल्यामुळें, सुमारें तीस वर्षांचें धडपडीचें जीवन जगून ह्या साप्ताहिकानें वाचक-वर्गणीदारांचा निरोप घेतला! (१९०७)

कोणतेंही वृत्तपत्र असो; साप्ताहिक असो या मासिक असो; मागमाप्रमाणें मरण हें त्याच्या बारशाला पुजलेलें असतें म्हणाना! कांहीं नियतकालिकें अल्पजीवी तर कांहीं दीर्घजीवी ठरतात. अपमृत्यु किंवा आकस्मिक आडमृत्यु अनेकांच्या बाबतींत अटळ असतात. तें कांहीं असो, त्यांच्यामागें चालकांचा त्याग नि अविरत धडपड असते. ती धडपड नि तो त्याग सद्भावनेनें केलेला असतो. तो कधींही वाया जात नाहीं. त्या त्या कालखंडांत जनमनावर त्याचे इष्ट ते परिणाम घडून येण्याचें कार्य अव्याहत चालू असतें.

महाराष्ट्रांत आजवर कितीतरी वृत्तपत्रें, लोकशिक्षणाचा सद्धेतु उराशीं बाळगून निघालीं व अनास्था किंवा आर्थिक अडचणी यांच्या कैचींत सांपडून

किती तरी काळाच्या उदरांत गडप झाली. परंतु त्यांच्या सेवेनें नि त्यागानें मराठी माणसाच्या विकासास जरूर तो हातभार लागलेला आहे हें निश्चित.

रावजी श्रीधर गोंधळेकर ह्यांच्या जगद्धितेच्छु साप्ताहिकाबद्दल आदरपूर्वक तेंच म्हणतां येईल.

रावजींचें लक्ष चौफेर होतें. छापखाना सुरू करून तो अनेक वर्षें चालविला तरी जरूर लागणारा टाईप दुसरीकडून घेण्यांत येत असे. स्वतःची टाईप फाऊंड्री असणें, हें एक भूषण आहे. भूषण असलें तरी त्याचा व्याप संभाळण्याचें सामर्थ्य असावें लागतें. तें आपण संपादन केलें आहे असें वाटतांच १९०५ सालीं रावजींनीं टाईप फाऊंड्रीचा पसारा मांडला नि जरूर तीं कलावंत माणसें मिळवून त्या पसाऱ्यांतही त्यांनीं यश मिळविलें. त्यांच्याकडील टाईपास इतरत्र असलेल्या मुद्रणालयांकडूनही मागणी असे.

अत्यल्प प्रमाणांत आरंभ करून, कोणीही हेवा करावा, अशी रावजींनीं आपल्या ह्या व्यवसायाची वाढ केली. छापखान्यासाठीं व स्वतःला राहाण्यासाठीं दोन टोलेजंग इमारती बांधल्या. केवळ स्थानिक मिळणाऱ्या कामावर राजी होऊन न राहातां बाहेरून जितकीं कामें मिळवितां येतील तितकीं मिळवून छपाईच्या क्षेत्रांत त्यांनीं आपला नि आपल्या छापखान्याचा लौकिक वाढविला.

ह्या दृष्टीनें बडोदें संस्थानचा उल्लेख अभिमानपूर्वक करतां येण्यासारखा आहे. या संस्थानशीं संबंध जोडून छपाईक्षेत्रांतील कर्तबगारीच्या बळावर रावजींनी तो संबंध दृढ केला. श्रीमंत मल्हारराव गायकवाड ह्यांच्या कारकीर्दीत महत्त्वाची छपाईचीं कामें जगद्धितेच्छु मुद्रणालयाकडे येत असत. कारण त्या काळीं तितकें सुबक काम बडोद्यांत होत नसे. महाराजांच्या प्रेरणेनें 'भारतसार' हा ग्रंथ रावजींनीं सुंदर रीतीनें छापून प्रसिद्ध केला.

महाराज खूश झाले. मग त्यांनीं त्या खुशींत काय करावें ? दसऱ्याच्या दरबारानिमित्त रावजींना खास आमंत्रण करून महाराजांनीं त्यांस सोन्याचा कंठा, महावस्त्र नि रोख रु. १५०० देऊन त्यांचा यथोचित गौरव केला.

त्यानंतर श्रीमंत सयाजीराव गायकवाड ह्यांच्याशींही रावजींनीं सलोख्याचा संबंध ठेविला होता. १८९० सालीं. महाराज पुण्यांत आले असतां रावजींनीं

त्यामुळें केशवरावांना धंद्यांत गोडी वाटूं लागली. वडिलांनीं जन्मभर खपून मुद्रणालयाचा जो पसारा मांडला, तो तर सांभाळला पाहिजेच; परंतु त्यांत आपल्या कर्तबगारीच्या बळावर जास्तींत जास्त भरही घातली पाहिजे, अशी ईर्षा त्यांच्याठायीं निर्माण झाली. आणि त्यामुळें धंद्याची वाढ करण्याचीं नवनवीं क्षेत्रें ते धुंडाळूं लागले. शोधलें म्हणजे सांपडतें; परंतु शोधण्याकडे प्रवृत्ति पाहिजे. ह्या प्रवृत्तीपायीं केशवरावांनीं पुण्याबाहेरील छपाईचीं अनेक कामें मिळविलीं. त्यांनीं नागपूर नि वऱ्हाडपर्यंत मजल मारिली. आणि विशेष म्हणजे त्यांनीं १९१७ सालीं बी. बी. सी. आय्. रेल्वेचें छपाईचें वार्षिक सुमारें तीन लक्ष रुपये किंमतीचें काम मिळविलें. त्यासाठीं मुद्रणालयाच्या यंत्रसामुग्रींत वाढ करावी लागली; एवढेंच नव्हे तर मुद्रणालयाची एक शाखा मुंबईंत उघडावी लागली; तीही त्यांनीं उघडली. ह्या कार्यांत त्यांचे चिरंजीव दत्तात्रय केशव ह्यांचा सहकार त्यांना मिळूं लागला.

अशा रीतीनें रावजींचे चिरंजीव नि नातु ह्या दोघांनीं मिळून जगद्धितेच्छु मुद्रणालयास अधिकाधिक उन्नत नि भरभराटीचें स्वरूप आणून सोडलें.

'बापसे बेटा सवाई' ह्याची प्रचीति एकाद्या पिढीपुरती क्वचित ठिकाणीं आढळून येते. परंतु त्या कर्तबगारीसूचक उक्तीचें प्रत्यंतर सतत २।३ पिढ्यांपर्यंत वाढत्या श्रेणीनें येत रहावें, हें विशेष होय. रावजी श्रीधर गोंधळेकर ह्यांच्या घराण्यांत कर्तबगारीचा हा विलक्षण विलास आपणास पहायला सांपडतो.

छापखान्यांतील कामाचा व्याप आधींच वाढत चाललेला; त्यांत आणखी रेल्वेच्या कामांची भर पडलेली. परंतु सर्व कामकाज टापटिपीनें नि सुव्यवस्थित रीतीनें पार पडावें, ह्याकडे हे पितापुत्र जातीनें लक्ष पुरवीत असत. आपलें छपाई - खातें अद्ययावत् नि स्वयंपूर्ण असावें, ह्याकडे त्यांचें सतत लक्ष असे. पुण्यांत सर्वप्रथम इंग्रजी मोनो - टाईप कास्टिंग मशीन आणवून त्याच्या सहाय्यानें ग्रंथप्रकाशन--कार्य प्रथम त्यांनींच सुरू केलें.

दत्तोपंत उर्फ नानासाहेब गोंधळेकर ह्यांना आपल्या छपाईखात्यांत चालढकलपणा किंवा कसूर झालेली आवडत नसे. नवनवीन यंत्रसामुग्रीची

वेळोवेळीं भर घालून त्यांनीं आपलें मुद्रणालय सुंदर नि सुसंपन्न बनविलें. तो त्यांचा एक छंदच होता म्हणाना.

निर्णयसागरप्रमाणें आपल्या मुद्रणालयांतून लहानमोठें जें जें छपाई-काम बाहेर जाईल, त्यांत नांव ठेवायला जागा राहूं नये, ह्यासाठीं जगद्धितेच्छूचे चालक फार जपत व त्यासाठीं झटत असत. त्यासाठीं जरूर ती दक्षता नि काळजी घेण्यांत येत असे.

अशा रीतीनें पुण्यांतील जगद्धितेच्छु मुद्रणालयानें आपली ७०।७५ वर्षांची अखंड कारकीर्द मुद्रण-क्षेत्रांत अक्षरशः गाजविली नि शोभविली.

एकाद्या व्यक्तीच्या किंवा संस्थेच्या जीवनाकडे पाहिलें असतां उत्कर्षाची चढती कमान सतत चढत्या स्वरूपांत चालू रहात नाहीं. अनेक कारणांमुळें कालांतरानें तिला उतरती कळा लागते. ही जगरहाटीच आहे असें म्हणण्यापेक्षां आम्हां लोकांना त्या रहाटीचें खास वरदानच आहे. परंतु जगद्धितेच्छु छापखान्यास नि त्याच्या उत्कर्षास तीन पिढ्यांचा यशस्वी हात लागला हें का थोडें झालें ?

ह्या छापखान्यास तीन तीन वर्षांच्या मुदतीचीं छपाई कामाची लक्षावधि रुपयांचीं कंत्राटें मिळत असत. त्यामुळें पसारा वाढविण्यास मदत झाली. १९१७ ते १९२३ हा सुमारें सहा वर्षांचा काळ कामांच्या नि मिळकतीच्या दृष्टीनें फार चांगला गेला. १९२३ सालीं भारतसरकारनें लॉर्ड इंचकेप ह्यांच्या अध्यक्षतेखालीं काटकसर कमिटी नेमिली. ह्या कमिटीनें वार्षिक खर्चांत काटकसर करण्याच्या दृष्टीनें कांहीं क्रांतिकारक सूचना केल्या. त्या सूचनांच्या परिणामीं, छपाईच्या कामाचें कंत्राट नवीन सुरू व्हायचें तें बंद झालें. रेल्वेचें काम येणार ह्या आशेनें त्यासाठीं खास लागणारा कागद सुमारें ऐशीं हजारांचा घेऊन ठेवला होता, तो येईल त्या भावानें विकून टाकावा लागला.

अशा रीतीनें एका काळीं आघाडीवर असलेल्या ह्या छापखान्याच्या जीवनांतील पडत्या काळास सुरुवात झाली. एक बाजू लंगडी पडली म्हणजे आस्ते आस्ते तिचा परिणाम इतर बाजूंवर होऊन त्याही लंगड्या पडूं लागतात. आपल्या शरीरासारखाच प्रकार आहे हा ! बुडत्याचा पाय अधिक खोलांत जावयाचा. अशा त्या काळांतील कथा सांगण्यांत कसला आलाय फायदा ?

सतत ७०।७५ वर्षे वाढत्या यशानें चालू असलेली ही मुद्रण-प्रकाशन संस्था विपरीत परिस्थितीच्या चक्रांत सांपडून शेवटीं १९२५ सालीं बंद पडली !

४

# नारो आप्पाजी गोडबोले

८०।८५ वर्षें लोटलीं तरीही ज्यांचें नांव अजून आदरानें घेतलें जातें, असे गणपत कृष्णाजी नि विशेषतः शेठ जावजी दादाजी ह्यांच्या काळांत वावरलेले पुण्यांतील मुद्रक-प्रकाशक म्हणजे नारो आप्पाजी गोडबोले ( १८२५–१८८३ ) हे होत. ज्या काळांत त्यांनीं मुद्रण-प्रकाशन व्यवसाय सुरू केला, तो काळ विपरीत होता. अनेक अडचणींना तोंड द्यावें लागत असे; परंतु त्या अडचणींतून त्यांनीं मार्ग काढिला व आपला व्यवसाय यशस्वी करून दाखविला.

गोडबोले ह्यांचें घराणें मूळ पांवस गांवचें. हा टुमदार नि अनेक इतिहासप्रसिद्ध सुपुत्रांना जन्म देणारा गांव रत्नागिरीनजीक आहे. नारो आप्पाजी ह्यांचे वडील आप्पाजी भास्कर गोडबोले हे मोठे उद्योगी, कर्तबगार तसेंच धाडसी होते. कोंकणांत वारंवार दुष्काळ पडायचा. कुटुंब मोठें; त्याचें पोषण तर झालें पाहिजे. पुणें, मुंबई ह्यांची उद्योगाबद्दल त्या काळींही ख्याति होती. आप्पाजींनीं उद्योगधंद्यासाठीं सर्व कुटुंबीय मंडळीसह पुण्यास जाण्याचा बेत रचिला. त्या काळीं ( १८१० ) आजच्यासारखीं प्रवासाचीं सुलभ साधनें नव्हतीं. कुटुंबांत लहान मोठीं ४०।४२ माणसें ! आपले दोन पुत्र नारो ऊर्फ नारायण व बळवंत ह्यांच्यासह ह्या सर्व कुटुंबीय मंडळीला घेऊन कांहीं बैलगाड्यांतून आप्पाजी हे मजल दरमजल करीत पंधरा दिवसांनीं पुण्यांत दाखल झाले ! त्या काळांतील हा प्रवास एकट्या दुकट्याचा नव्हता. कशाचा

कांहीं पत्ता नसतांना ४०।४२ माणसांचें कुटुंब घेऊन पुण्यांत येणें, ही साधी का गोष्ट होती? परंतु आप्पाजींचा आत्मविश्वास दांडगा. स्वतःच्या कर्तबगारीवर त्यांचा पूर्ण भरंवसा होता.

पुण्यांत येऊन त्यांनीं काय केलें? शनिवारवाड्यासमोर दुकान थाटण्यासाठीं दोन गाळे घेऊन तेथें तंबू ठोकला व एक तात्पुरतें दुकान थाटलें.

त्याकाळीं छपाईचें युग सुरू झालें नव्हतें. धार्मिक पोथ्या, स्तोत्रें वगैरे सारें हस्तलिखित असे. हें हस्तलिखित धार्मिक साहित्य जिथून तिथून मिळवायचें नि आपल्या दुकानांत विक्रीसाठीं ठेवायचें. त्याशिवाय कुंकू, जानवीं-जोड, शाई, फण्या वगैरे नित्योपयोगी वस्तूही दुकानांत विक्रीसाठीं ठेवायच्या. हस्तलिखित वाङ्मय महाग असलें तरी त्या काळीं त्याला गिऱ्हाईक मिळत असे, हें साहाजिकच आहे.

त्यानंतर १८५८ सालापासून आप्पाजींचे चिरंजीव नारोपंत ह्यांचा जमाना सुरू झाला. त्याच सालीं नारो आप्पाजी गोडबोले ह्या नांवाची पाटी दुकानावर झळकूं लागली. जमाना पालटला होता. मुंबई-पुणें शहरांतून शिळा-प्रेस आपलें अस्तित्व भासवूं लागले होते. नारो आप्पाजींनीं स्वतःच्या मालकीच्या आपल्या घरांत त्याच वर्षीं एका शिळा-प्रेसची स्थापना करून त्याचें नांव ठेवलें वृत्त-प्रसारक. त्या प्रेसमधून 'वृत्त-मोद' ह्या नांवाचें वृत्तपत्र कांहीं काळ चालू होतें. त्याची किंमत होती एक शिवराई, नि संपादक होते गजानन चिंतामण देव.

गोडबोले कुटुंब मोठें होतें. त्या काळीं कागदाच्या घड्या घालणें, शाई घोटणें, दगड घांसणें, उचलणें वगैरे सर्व कामें घरांतील लहानथोर माणसेंच सांभाळीत असत. सोवळ्या-ओवळ्याचा प्रश्न त्या काळीं मोठा बिकट होता. मुंबईंत प्रथम गणपत कृष्णाजींनीं चरबीविरहित शाई करण्यांत यश मिळवून धार्मिक पुस्तकांपुरता सोवळ्या-ओवळ्याचा प्रश्न जसा सोडविला, तसाच पुण्यांत तो सोडविण्यांत नारो आप्पाजींनीं यश मिळविलें. शाई आपल्या देखरेखीखालीं ते घरांतच तयार करीत असत. त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या गुरुचरित्राच्या पोथीवर, हा ग्रंथ तुपाच्या शाईंत छापिला आहे, असा स्पष्ट उल्लेख असे.

त्या काळीं मुंबईंत काय किंवा पुण्यांत काय, पुस्तकें मोडी लिपींत छापून बाहेर पडत असत. भक्त प्रल्हाद, नल-दमयंती-आख्यान, ह्यांसारखीं पुस्तकें प्रथम मोडींत व नंतर बालबोध लिपींत छापून प्रसिद्ध करण्यांत आलीं.

त्या काळांत नारो आप्पाजींनीं ५०।६० प्रकारचीं गोष्टींचीं पुस्तकें, तसेंच जातकाभरण, चमत्कार-चिंतामणी, महदेव-भाडळी, पुरुषोत्तममाहात्म्य, पंचरत्न गीता, अह्मकर्म वगैरे अनेक पुस्तकें, स्तोत्रें व नानाप्रकारचें धार्मिक वाङ्मय प्रसिद्ध केलें. त्यांचा छापखाना कधींही रिकामा नसे. बाहेरच्या ग्राहकांचींही छपाईचीं कामें येत असत व तीं वक्तशीरपणें करून दिलीं जात असत.

जुन्या काळांतील प्रसिद्ध कोशकार रघुनाथ भास्कर गोडबोले ह्यांनीं मेहनतपूर्वक तयार केलेला 'हंस-कोश' १८६३ सालीं नारो आप्पाजींच्या छापखान्यांतून बाहेर पडला.

नारो आप्पाजी हे त्याकाळीं धार्मिक वाङ्मय-प्रकाशनाबद्दल फार प्रसिद्ध होते.

शेठ जावजी दादाजी ह्यांच्याशीं नारो आप्पाजींचा निकट संबंध होता. ग्रंथ-छपाईच्या बाबतींत एकमेकांचा सल्ला घेतला जात असे. नंतरच्या काळांत उभयतांच्या चिरंजीवांचे परस्पर संबंधही अत्यंत सलोख्याचे होते. त्या काळीं निर्णयसागर-छपाई म्हणजे 'घोडे' व इतरांची छपाई म्हणजे 'गाढव' अशीं रूपकें वापरलीं जात असत!

सध्यां नारो आप्पाजी गोडबोले ह्या नांवानें बालाजी मंदिरासमोर (पुणें) जें पुस्तकविक्रीचें दुकान आहे, तें त्यांचे पणतु यशवंत महादेव हे चालवीत आहेत.

नारो आप्पाजी ह्यांचे तीन चिरंजीव. भास्कर, विष्णु नि लक्ष्मण. त्यांपैकीं विष्णुपंत ह्यांनीं १८९५ सालीं पंढरपूर येथें पुस्तकविक्रीचें दुकान स्थापन केलें. सध्यां त्यांचे (विष्णुपंतांचे) दोघे नातु पुरुषोत्तम वामन व श्रीपाद वामन हे पंढरपुरांत तोच व्यवसाय पुढें चालवीत आहेत.

नारो आप्पाजींचे तिसरे चिरंजीव लक्ष्मणराव ह्यांनीं व त्यांच्या चिरंजीवांनीं आणि नातवांनींही तोच व्यवसाय हाताळला व सध्यांही त्यांचा तोच व्यवसाय गोडबोले ग्रंथ-भांडार ह्या नांवानें चालू आहे.

❦

कांहीं सुविख्यात
मुद्रक-प्रकाशकांचीं
उपलब्ध झालेलीं
छायाचित्रें

❦

रावजी श्रीधर गोंधळेकर



पुणें येथील जगद्धितेच्छु मुद्रणालयाचे संस्थापक. पान ( ३१४-३२५ )

शेठ दामोदर सावळाराम यंदे



मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांतील ह्यांची कामगिरी संस्मरणीय आहे. ( पान ३३१-३३९ )

मनोरंजनकार का. र. मित्र



एकेकाळीं मुद्रण-प्रकाशनक्षेत्र ह्यांनी गाजवून सोडलें, 'मासिक मनोरंजन' द्वारें ह्यांनी केलेली वाङ्मयीनसेवा बहुमोलाची आहे. ( पान ३६४-३७७ )

मंगेशराव कुळकर्णी



कर्नाटक-मुद्रणालयाचे कर्तबगार चालक व साक्षेपी प्रकाशक ( पान ३४०-३६३ )

### गणेश महादेव वीरकर



गणेश महादेव आणि कंपनीचे चालक व संस्मरणीय प्रकाशक ( पान ३७८-३८७ )

### गणपतराव भटकळ



मुंबईतील नावाजलेल्या पाप्युलर प्रकाशन ह्या थोर प्रकाशनसंस्थेचे आद्य संस्थापक ( पान ३८८-३९८ )

### केशव भिकाजी ढवळे



धार्मिक नि इतर सर्व प्रकारच्या वाङ्मयाचे प्रभावशाली प्रकाशक. ( पान ३९९-४०६ )

### सदाशिवराव पाध्ये



पुणें येथील ' व्हीनस प्रकाशन ' ह्या नावाजलेल्या प्रकाशन- संस्थेचे चालक (पान ४०७-४१२)

हरीभाऊ मोटे



प्रकाशन-क्षेत्र गाजविणारे एक लोकविलक्षण प्रकाशक (पान ४१३-४२५)

रामभाऊ देशमुख



पुणें येथील देशमुख मंडळी ह्या संस्थेचे चालक (पान ४२६-४३४)

रामचंद्र यशवंत शेडगे



तुकाराम शेठजींच्या काळापासून सन १९१८ ते १९५० पर्यंत ह्यांनी निर्णयसागर संस्थेचे व्यवस्थापक या नात्यानें जबाबदारी सांभाळली.

कृष्णाजी विठ्ठल सोमणशास्त्री



निर्णयसागर मुद्रणालयाशीं शास्त्री ह्या नात्यानें यांचा दीर्घकाळ संबंध असून गेल्या कांहीं वर्षांपासून निर्णयसागर मराठी पंचांगाचें संपादन त्यांच्याकडून होत आहे.

गोडबोले घराण्याचें हें वैशिष्ट्य खरोखर लक्षांत घेण्यासारखें आहे.

**शास्त्रीबुवांची कर्तबगारी**

सुमारें ९०।९५ वर्षांपूर्वीच्या काळांत मुद्रण यंत्राचें महत्त्व पुरेपूर ओळखणारे पहिले विद्वान् महाराष्ट्रीय गृहस्थ म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर हेच होत. महत्त्व ओळखणारीं माणसें पुष्कळ सांपडतील; परंतु तें ओळखून त्यांनीं त्याची स्थापना करण्यासाठीं त्या काळीं जरूर ती हालचाल नि संघटना निर्माण केली व प्रभावशाली मुद्रणयंत्राची यशस्वी रीतीनें स्थापना केली, अशीं कर्तबगार विद्वान माणसें किती सांपडतील? आणि त्याबरोबर नाना संकटांनीं व अडीअडचणींनीं व्यापलेला तो पूर्वकाळ आपण लक्षांत घेतला पाहिजे.

स्वतः विष्णुशास्त्रीच आर्यभूषण छापखाना स्थापन केला त्याला (स्थापना १८७९) उद्देशून काय म्हणतात पहा:—"गेल्या वर्षाच्या उपसंहारांत सांगितलेला छापखाना तो हा होय. यांत पूर्वोक्त विद्यालयीन (न्यू इंग्लीश स्कूल) मंडळीच भागीदार असून त्यांच्या परिश्रमावर हेंही अवाढव्य काम सुरू झालें आहे. आजपर्यंत इतर सर्व व्यापाराप्रमाणें छापखान्यांचा उद्योगही अविद्वान व अडाणी लोकच प्रायः करीत आले आहेत. त्यामुळें अज्ञानध्वंसनाविषयीं केवळ वज्रच असें जें मुद्रणयंत्र, त्याचा प्रभाव व्हावा तितका प्रकट झाला नाहीं.*

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं अगदीं थोडक्यांत रेखाटलेलें ७५।८० वर्षांपूर्वीच्या काळांतील मुद्रण-व्यवसायिकांसंबंधींचें हें चित्र आहे. आजही त्यांत फारसा बदल पडला आहे, असें म्हणतां येत नाहीं. अलीकडे कुठें अत्यंत अल्प प्रमाणांत ह्या माननीय नि महत्त्वाच्या व्यवसायाकडे आमच्या सुशिक्षितांचें लक्ष वळूं लागलें आहे.

सर्वांना प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यास सहाय्यभूत होणाऱ्या ह्या माननीय व्यवसायाला त्यामुळें ह्यापुढील काळांत प्रतिष्ठेचे व बहुमानाचे दिवस येतील अशी आशा वाटूं लागली आहे.

पुणें शहरांत श्रीधर रावजी गोंधळेकर नि नारो आप्पाजी गोडबोले ह्यांनी पूर्वीच्या काळांत मुद्रणालयांची स्थापना करून जसा लोक-शिक्षण-

* निबंधमाला: ६ वें वर्ष-शेवटचा अंक.

कार्याला यथाशक्ति हातभार लाविला, त्याचप्रमाणें नव्हे तर त्यापेक्षां कितीतरी पटीनें अधिक हातभार विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांनीं जाणीवपूर्वक स्थापन केलेल्या चित्रशाळा ( १८७७ ) आर्यभूषण ( १८७९ ) व केसरी ( १८८१ ) ह्या मुद्रण-संस्थांनीं लाविलेला आहे. आणि विशेष म्हणजे ८०।९० वर्षांचा काळ मागें पडला तरी उपरोक्त मुद्रण-संस्थांतील पूर्वीचा जोमदारपणा बिलकूल कमी न होतां तो टिकून राहिला आहे, हें तिन्ही संस्थांच्या चालकांस भूषणावह आहे. ह्या तिन्ही मुद्रण-संस्थांचें कर्तृत्व नि इतिहास अत्यंत उज्ज्वल असून तो विस्तृतपणें लिहिला जाणें जरूर आहे.

५

## शेठ दामोदर सांवळाराम यंदे

शंभर सव्वाशें वर्षांचा दीर्घ कालावधि लोटल्यानंतर महाराष्ट्रांतील मुद्रण-प्रकाशन व्यवसायाला आतां कुठें स्थैर्य व प्रतिष्ठेचें स्थान प्राप्त झालें आहे, असें म्हणणें फारसें धाष्टर्याचें होणार नाहीं. ह्या व्यवसायांत पडणाऱ्या व्यक्तीच्या त्यागाची, सचोटीची, चिकाटीची व दूरदर्शीपणाची कसोटी लागण्याचे प्रसंग वेळोवेळीं येतात. त्या कसोटीला उतरणें फार कठीण असतें. आपण प्रकाशनाच्या बाबतींत कांहीं आराखडे मांडतों व त्यांच्या बळावर पुढें पाऊल टाकण्याचा प्रयत्न करतों; समोंवारची परिस्थिति पोषक आहे, तेव्हां आपलें प्रकाशन होईल यशस्वी, असें मनाला वाटतें; परंतु हवामानांतील स्थित्यंतराप्रमाणें परिस्थितींतील पालट केव्हां अंगाशीं येईल, ह्याचें भाकित करणें कठीण असतें. कधीं मांडलेले आराखडे यशस्वी होतात तर कधीं कधीं अपयश पदरांत घ्यावें लागतें. अशावेळीं हातपाय न गाळतां धीरगंभीरपणें पुढें पाऊल टाकण्याची जो हिंमत बाळगील, त्याच्या वांट्यास कधींमधीं अनुकूल काळ व यश आल्याशिवाय राहात नाहीं. प्रकाशनक्षेत्रांत त्यागाची तयारी ठेवावी लागते.

धर्मभावनेनें प्रेरित होऊन महाराष्ट्रांतील मुद्रण-प्रकाशन व्यवसायाची मुहूर्तमेढ रोविली गेली. कोणत्याही देशाकडे पाहिलें तरी ह्या व्यवसायाला जन्म देणारी नि तिचा विकास घडवून आणण्यास कारणीभूत होणारी भावना तीच असल्याचें आढळून येतें.

गणपत कृष्णाजी, शेठ जावजी दादाजी ह्यांच्यासारख्या त्या व्यवसायांतील पूर्वकालीन ऋषि-महर्षींनीं धर्मभावनेचें तें पावित्र्य जसें कटाक्षानें पालन केलें, त्याचप्रमाणें त्यांच्यामागून त्या व्यवसायांत पदार्पण करणारे शेठ दामोदर सांवळाराम यंदे, मंगेशराव कुळकर्णी, केशव भिकाजी ढवळे ह्यांच्यासारख्या स्वतःच्या कर्तबगारीच्या नि चिकाटीच्या बळावर पुढें आलेल्या मातबर मुद्रक-प्रकाशकांनींही तें व्रत इमानेंइतबारें पालन केल्याचें आढळून येतें.

मुद्रक-प्रकाशक हा समाजांतील एक अत्यंत महत्त्वाचा घटक आहे. त्याच्या व्यवसायाचा संस्कृतिसंवर्धनाशीं व अमृततुल्य ज्ञानप्रसाराशीं निकट संबंध आहे. मूर्खाला शहाणा करणारा, व्यक्तिमात्राला स्वकर्तव्याची जाणीव करून देणारा नि कोणत्याही क्षेत्रांतील पुरुषार्थाला प्रवृत्त करणारा हा माननीय व्यवसाय आहे.

अशा ह्या व्यवसायांत पडणाऱ्यांवर समाजाच्या नि राष्ट्राच्या दृष्टीनें फार मोठी जबाबदारी असते. ती ज्यांनीं आजवर सांभाळली व ती सांभाळण्यासाठीं आजच्या काळांत जे स्वार्थत्यागपूर्वक झटत आहेत ते धन्य होत. ते समाजाचे उपकारकर्ते आहेत. समाजावर कधींही फेडतां न येणारें असें ऋण त्यांनीं करून ठेविलें आहे.

प्रकाशकापेक्षां मुद्रकावर फार मोठी जबाबदारी असते. जो मजकूर छापून बाहेर प्रकाशांत येतो, तो बहुजन वाचकवर्गाला ब्रह्मलिखिताप्रमाणें विश्वास ठेवण्यालायक वाटतो. त्यामुळें त्याच्या मनावर बरावाईट जो कांहीं परिणाम व्हायचा, तो झाल्याशिवाय राहात नाहीं. ह्या परिणामासाठीं जपायचें असतें.

तें जपायचें कसें ? वाचकांची मनोवृत्ति बिघडणार नाहीं, वाचकांच्या मनावर सुसंस्कार घडतील, तसेंच सरळ नि सत्याच्या मार्गाकडे जाण्यासाठीं त्याला जरूर तें प्रोत्साहन मिळेल, अशा प्रकारचें जें लेखन असेल, तेंच मुद्रित होऊं द्यावयाचें. पैशाच्या लोभानें जें हातांशीं येईल, तें छापून काढायचें, हा बेजबाबदारपणा होय. तो कोणत्याही परिस्थितींत आपल्याकडून घडूं नये, म्हणून मुद्रकानें जास्तींत जास्त जपायचें असतें. कोणत्या ना कोणत्या कारणामुळें असो, ही जपणूक कित्येकांकडून जशी काटेकोरपणें व्हायी तशी

होत नसे आणि म्हणूनच ह्या बावतींत सरकारला बंधनकारक कायदे करणें भाग पडलें.

आरंभकाळीं ज्यांनीं ह्या व्यवसायाची प्राणप्रतिष्ठा केली, तीं माणसें ज्याला आजकाल आपण सुशिक्षित समजतों, त्या प्रकारच्या सुशिक्षित वर्गांत मोडणारीं नव्हतीं. त्या शिक्षणापासून तीं फार दूर असलीं तरी त्यांना सत्याची, न्यायनीतीची चाड होती. समाजोन्नतीला पोषक कोणतें नि मारक कोणतें, ह्याची त्यांना पूर्ण जाणीव होती; त्यामुळें त्यांच्याकडून समाजाच्या दृष्टीनें हानिकारक असें कांहीं न घडतां जें कांहीं घडलें, तें उपकारक असेंच घडलें आहे.

मुद्रण-प्रकाशन व्यवसायानें जेथें आपले पाय स्थिरपणें रोवले आहेत, असें मुंबई, पुणें किंवा महाराष्ट्रांतील कोणतेंही शहर असो. ह्या व्यवसायांत पडलेल्यांच्या वांट्यास पैसा फारसा आलेला नाहीं. केवळ पैसा हाच आपला परमेश्वर असें मानणाऱ्या अनेकांना त्या व्यवसायांतून पळ काढावा लागला आहे. त्यागाच्या पायावर ह्या व्यवसायाचें मंदिर उभारलें गेलें आहे; आणि त्यामुळेंच त्याला मानाचें स्थान प्राप्त झालें आहे.

ह्याचा अर्थ मुद्रक-प्रकाशक म्हणजे त्यागाचे पुतळे, असा मात्र कोणीं करूं नये. त्यांना स्वतःचा नि कारखान्याचा कारभार वा संसार चालू ठेवायचा असतो. त्यासाठीं द्रव्यार्जनाची जरूरी असतेच असते. तें द्रव्यार्जन सरळ नि सन्मार्गानें जाऊन प्रत्येकानें करावयाचें असतें. अशा रीतीनें ज्यांनीं आपला मार्ग चोखाळला, असे महाभाग मुद्रक-प्रकाशक आपल्या महाराष्ट्रांत होऊन गेले नि आजही यावरत आहेत.

ह्या व्यवसायाची मातब्बरी किंवा मोठेपण हेंच आहे कीं, तो व्यवसाय समाजाच्या उद्धारार्शीं, संस्कृति-संवर्धनार्शीं नि ज्ञान-प्रसारार्शीं फार निकटचा आहे. तेव्हां तो समजून उमजून सेवाभावानें करावयाचा आहे; आणि आजवर तो त्याच भावनेनें अनेकांकडून हाताळला गेला आहे.

आरंभापासून मुद्रण-प्रकाशन व्यवसायांत पडलेल्यांचीं कित्येक नांवें दृष्टीसमोर आलीं व त्या क्षेत्रांत विपरीत काळाशीं टक्कर देऊन त्यांनीं गाजविलेल्या कर्तबगारीचा कृतिपट दृष्टीसमोरून सरकत जाऊं लागला, म्हणजे त्यांच्यापुढें आपलें मस्तक आदराच्या भावनेनें खालीं वांकल्याशिवाय राहात नाहीं.

शेठ जावजी दादाजी चौधरी हे मुद्रण-प्रकाशन व्यवसायांत सुमा-रें पाऊणशें वर्षांपूर्वीच्या काळांत होऊन गेलेले एक आदरणीय कर्मवीर होत. त्यांचा जीवनपट उलगडण्याचा यथाशक्ति प्रयत्न करीत असतां, त्या व्यवसायाचा महाराष्ट्रांत पाया कोणीं घातला, त्याचें गणपति-पूजन कोणाकडून घडलें, त्यानंतर जावजी शेठजींनीं व त्यांच्या पुत्रांनीं त्या व्यवसायाचें पोषण कसकसें केलें, एवढेंच नव्हे तर त्यानंतरच्या काळांतही मुद्रण-प्रकाशन व्यवसायाच्या क्षेत्रांत ज्यांनीं आपलीं पुण्यपावन पावलें रोविलीं नि त्यांत संस्मरणीय भर घातली, आणि ज्यांनीं त्याला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली, त्यांच्याकडेही थोडें लक्ष पुरवावें, असें साहजिकच वाटलें; आणि केवळ त्याच हेतूनें कांहीं प्रकाशकांची केवळ तोंडओळख करून देण्याचा हा अल्पसा प्रयत्न आहे.

महाराष्ट्रांतील मुद्रण-प्रकाशन व्यवसायाचा उज्ज्वल इतिहास संगतवार व व्यक्ति-निदर्शनपूर्वक लिहिला जाणें अत्यंत जरूर आहे. तें उद्दिष्ट गांठणें हा या लेखनामागील हेतु नाहीं; तो प्रश्न फार मोठा व व्यापक स्वरूपाचा आहे. तो स्वतंत्रपणें व समर्थपणें हाताळला गेला पाहिजे, असें आम्हांला तीव्रतेनें वाटतें. येथें जातां जातां सहजासहजीं आमच्या दृष्टीसमोर त्या व्यवसायांत वावरणारीं नि त्याला आपल्या कर्तबगारीच्या बळावर शोभा आणणारीं जीं कांहीं थोडीं माणसें व मुद्रण-प्रकाशन-गृहें आलीं, त्यांच्या कर्तृत्वाचा अल्पसा व त्रोटक परिचय यथाशक्ति करून देण्याचा हा एक प्रामाणिक प्रयत्न आहे. ह्याच्या बुडाशीं जर कोणता एकमेव मद्देतु असेल तर तो हाच कीं, मुद्रक नि प्रकाशक ह्यांचें समाजांतील व राष्ट्रांतील स्थान अत्यंत महत्त्वाचें आहे. ती माननीयता निदान ह्यापुढील जागृतीच्या काळांत तरी त्यांच्या वांट्यास आली पाहिजे.

चरित्र-ग्रंथाच्या ह्या परिचय-विभागांत ज्या कांहीं थोड्या गतकालीन नि सद्यःकालीन मुद्रक-प्रकाशकांचा अल्प परिचय करून देण्यांत येत आहे, त्यांच्याशीं बरोबरी करणारे किंवा त्यांच्याहीपेक्षां श्रेष्ठ असे मुद्रक-प्रकाशक पूर्वीच्या काळांत महाराष्ट्रांत होऊन गेले व आजही समाजांत वावरत आहेत, ह्याची लेखकास पूर्ण जाणीव आहे. त्या सर्वांच्या महनीय मुद्रण-प्रकाशन कार्यांची संगतवार माहिती एकाद्या स्वतंत्र ग्रंथाच्याद्वारें करून देण्यांत आली

पाहिजे. ऐतिहासिक दृष्टचा व इतर अनेक दृष्टींनीं त्याची फार जरूरी आहे व तें कार्य समर्थपणें पार पाडण्यासाठीं कोणी ना कोणी पुढें यावें, ह्या उच्च आकांक्षेनें प्रेरित होऊन हें परिचय करून देण्याचें धाडस आम्हीं पतकरलें आहे. तेव्हां यत्किंचितही रागरोष न करतां वाचकांनीं व मुद्रक-प्रकाशक बंधूंनीं आमच्या ह्या तुटपुंज्या नि दुबळ्या प्रयत्नाकडे सहानुभूतीनें पहावें, एवढीच कळकळीची विनंती आहे.

मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांत एकाकाळीं शेठ दामोदर सांवळाराम यंदे (१८६१–१९४४) ह्यांनीं फार महत्त्वाची कामगिरी बजाविली आहे. जन्म मागासलेल्या वर्गात, शिक्षणाचा लाभ फारसा झालेला नाहीं; परंतु वृत्तपत्राच्या व ग्रंथ-प्रकाशनाच्या क्षेत्रांत त्यांनीं जी धडाडी गाजविली, ती खरोखर आश्चर्यकारक आहे. यंदे हे मूळ अहमदनगरचे. लहानपणींच वडिलांचा वियोग घडला. आईला आर्थिक हातभार लावतां यावा, ह्या हेतूनें वयाच्या पंधराव्या वर्षी ते मुंबईत आले व नव्यानेंच सुरू झालेल्या ट्रॅम्वे कंपनींत अल्प पगारावर नोकरीस लागले. परंतु अल्पसंतुष्ट राहून एकच मार्ग चोखाळणारे ते नव्हते. आपण जगांत पुढें येण्यासाठीं कांहीं ना कांहीं धडपड केली पाहिजे, मार्गे राहून चालणार नाहीं नि कोणी विचारणारही नाहीं, असें ऐन तारुण्यांत नि ऐन उमेदीच्या काळांत त्यांना वाटूं लागलें. महात्मा जोतिबा फुले ह्यांचे मागासलेल्या वर्गास हालवून जागे करण्याचे प्रयत्न त्या काळीं जोरदारपणें चालू होते. त्या प्रयत्नांकडे यंदे यांचें सतत लक्ष लागून राहिलें होतें.

समाजसुधारणेच्या दृष्टीनें मुद्रण-यंत्राचें महत्त्व त्यांना वाटूं लागलें; परंतु तें आटोक्यांत यावें कसें, ह्या विचारांत असतां उमरखाडी येथें त्यांना एक लहानसा छापखाना आढळून आला व धाडस करून तो त्यांनीं चालवावयास घेतला. तेथें त्यांनी 'सुदिदर्पण' ह्या नांवाचें एक साप्ताहिक सुरू केलें. त्यानंतर महात्मा फुले यांच्या मतांच्या प्रचारासाठीं निघालेल्या 'दीनबंधु' पत्रांतून माधवराव रोकडे हे बाहेर पडून त्यांनीं 'शेतकऱ्यांचा कैवारी' ह्या नांवाचें पत्र यंदे ह्यांचा सहकार घेऊन सुरू केलें. अशारीतीनें ते वृत्तपत्र-सृष्टींत वावरत असतां त्यांना बडोद्याहून बोलावणें आलें व शेवटीं बडोद्यानेंच त्यांच्या कार्याचा खंबीर पाया घातला.

त्याचें असें झालें. १८८४ सालीं श्रीमंत सयाजीराव गायकवाड ह्यांनीं बडोदें संस्थानचीं राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतल्यानंतर प्रजेच्या कल्याणाच्या दृष्टीनें त्यांनीं आपल्या राज्यांत नवनवे उपक्रम जारीनें सुरू केले.

'शेतकऱ्यांचा कैवारी' ह्या वृत्तपत्राकडे श्रीमंत सयाजीरावांचें लक्ष होतें. प्रजेंत ज्ञान-प्रसार व जागृति घडवून आणण्यामाठीं एकादें वृत्तपत्र सुरू करणें जरूर आहे, असें वाटल्यावरून प्रथम 'शेतकऱ्यांचा कैवारी' पत्राचे मुद्रक रामजी संतूजी आवटे ह्यांच्या नेतृत्वाखालीं त्यांच्याकडून बडोद्यास 'बडोदा वत्सल' ह्या नांवाचें पत्र सुरू करविण्यांत आलें. तें धडाडीनें चालवें, ह्यामाठीं मागाहून यंदे ह्यांना पाचारण करण्यांत आलें. मुंबई सोडून यंदे १८८५ सालीं बडोद्यास गेले, त्या वेळीं त्यांचें वय तेवीस किंवा चौवीस वर्षांचें असावें. यंदे-आवटे ह्या जोडीनें बडोद्यांत एका मुद्रणालयाची स्थापना करून 'बडोदा-वत्सल' पत्राचा दर्जा नि रूपही वाढविला. छापखान्यास उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणांत छपाईचीं कामें मिळूं लागलीं. कारण राजाश्रय होता. त्यामुळें पैशांची प्राप्ति चांगली होऊं लागली.

कधीं कधीं धंद्यांतील भरभराट हीच त्या धंद्याच्या नाशाला कारण होत असते. कारण त्यामुळें माणसाची दृष्टि फिरते, मनांत नाना विकल्प येऊं लागतात. धंद्यांत लक्ष घालणारीं दोन किंवा अधिक माणसें असलीं म्हणजे भांडणें नाहीं झालीं तरच नवल ! योग्य तो आर्थिक हिस्सा आपणांस मिळत नाहीं, असें दिसून येतांच यंदे वेगळे झाले नि त्यांनीं स्वतंत्र छापखाना व 'सयाजीविजय' ह्या नांवाचें वेगळें साप्ताहिक पत्र सुरू केलें. यंद्यांच्या कर्तबगारीला योग्य वेळीं नि योग्य ठिकाणीं आव्हान मिळालें आणि तें धडाडीनें स्वीकारून त्यांनीं आरंभ सुरू केलेलें पत्र कमालीचें लोकप्रिय करून दाखविण्यांत यश मिळविलें.

यंदे तेवढ्यावर राजी होऊन राहिले नाहींत. नंतर ते ग्रंथ-प्रकाशनाकडे वळले. ह्या कामीं बडोद्यांतील विद्वान मंडळींचें, तेथील सहविचारिणी सभेचें व श्रीमंत सयाजीराव ह्यांचें त्यांनीं सहकार्य मिळविलें. त्या सर्वांना यंदे ह्यांच्यासारख्या धडाडीच्या व ज्ञानप्रसाराच्या कार्यांत मनापासून लक्ष घालणाऱ्या मुद्रक-प्रकाशकाची फार जरूरी भासत होती; ती यंद्यांनीं भरून काढली.

भेदक दृष्टि, हंसरा चेहरा व मिठ्ठास बोलून जरूर तीं माणसें जवळ करण्याची नि त्यांच्याकडून हौसेनें काम करवून घेण्याची हातोटी, त्यांना चांगली साधलेली होती. त्या गुणांच्या बळावर त्यांनीं त्या काळीं लौकिकाच्या नि अर्थार्जनाच्या दृष्टीनें कोणीही हेवा करावा अशी कमाई केली.

त्यांची ही कमाईची कमान उत्तरोत्तर वाढत गेली असती; परंतु मुंबईंत एकाकाळीं नांवारूपास आलेलें 'इंदुप्रकाश' पत्र बंद पडण्याची वेळ नजीक येऊन ठेपलेली होती. त्याचे मालक सखारामपंत पंडित इहलोक सोडून गेले होते. अशा स्थितींत त्या पत्राची व मुद्रणालयाची जबाबदारी एकाद्या तडफदार नि खंबीर व्यक्तीनें स्वीकारणें जरूर होतें. न्या. रानडे ह्यांच्यासारख्यांना तें पत्र चालू रहावें असें वाटत होतें. त्यासाठीं योग्य माणसाच्या तपासांत असतां इंदुप्रकाशाबद्दल आस्था वाटणाऱ्या मुंबईंतील मंडळीचें लक्ष यंदे शेठजींकडे गेलें व त्यांना मुंबईंत येण्याचें आग्रहाचें आमंत्रण पाठविण्यांत आलें.

बडोदें येथील 'सयाजी विजय' पत्राचा गाडा यंदे नसले तरी पुढें चालू राहील, अशी त्या वेळची परिस्थिति होती. मुंबईंत मात्र यंदे ह्यांच्यासारख्या कर्तबगार माणसाची जरूरी फार होती. ह्या गोष्टीचा साधकबाधक रीतीनें विचार करून यंदे हे बडोद्यांत चांगला थाटलेला मुद्रणालयाचा संसार सोडून केवळ कर्तव्यबुद्धीनें मुंबईंत आले.

मुंबईंत आल्यानंतर यंदांना मोडकळीस आलेला गाडा सांवरून दुरुस्त करून तो चालता नि कार्यक्षम करायचा होता. अशा कार्यांत त्यांचा हातखंडा होता. त्यांनीं इंदुप्रकाश पत्र सुरळीत व सुव्यवस्थितपणें चालावें, ह्यासाठीं एक नवी कंपनी स्थापन केली. दामोदर गणेश पाध्ये, मणेरीकर नि चिंतामण गंगाधर भानू ह्यांच्यासारख्या तत्कालीन विद्वानांचें नि कार्यकर्त्यांचें सहकार्य त्यांनीं संपादन केलें. तसेंच मुद्रणालयाचेंही पुनरुज्जीवन केलें. त्यांच्या हिशेबीं वृत्तपत्रप्रकाशनाला दुय्यम स्थान होतें. अग्रपूजेचा मान विविध प्रकारच्या व विशेषतः धार्मिक स्वरूपाच्या ग्रंथप्रकाशनाला ते देत असत.

यंदे ह्यांनीं हां हां म्हणतां त्यांच्या वांट्यास आलेला हा नवा संसार सुंदर रीतीनें थाटला. दुसऱ्यांच्या नि जे समव्यवसायी अडीअडचणींत असतील त्यांच्या उपयोगी पडणें, त्यांचाही मोडका संसार सुरळीत करण्यासाठीं हातभार

लावणें, हें आपलें पवित्र कर्तव्य आहे, असें यंदे नेहमीं मानीत असत संकटांची त्यांनीं कधीं पर्वा केली नाहीं. ते जसे हरहुन्नरी होते, तसेच हिकमतीही दांडगे होते. कोणताही पेचप्रसंग पुढें येवो, त्याच्यांतून स्वतः पार पडण्यांत व दुसऱ्यांनाही पार पाडण्यांत ते वाकबगार होते.

काकासाहेब खाडिलकर 'लोकमान्य' पत्रांतून बाहेर पडल्यानंतर त्यांना स्वतःच्या मालकीचें 'नवा काळ' पत्र सुरू करायचें होतें. त्यासाठीं जरूर असलेला आधार त्यांना प्रथम यंदे यांनीं आपल्या मुद्रणालयांत मोठ्या आपुलकीनें दिला. त्यांच्या घरीं 'नवा काळ' दैनिकाचा जन्म झाला !

आणि अच्युतराव कोल्हटकर ह्यांस त्यांच्या 'संदेश' दैनिकाच्या पडत्या काळांत आधार कोणीं दिला ? यंदे ह्यांच्या इंदुप्रकाश मुद्रणालयानेंच !

अल्प मोबदल्यांत घरोघर ज्ञानाचा प्रसार व्हावा, ह्या हेतूनें अनेक लेखकांचें सहकार्य मिळवून यंदे ह्यांनीं 'ज्ञान-मंदिर' ह्या नांवाचें मासिक अनेक वर्षे झीज सोसून चालू ठेविलें होतें.

सर्वसाधारणपणें हा झाला त्यांचा वृत्तपत्र-सृष्टींतील संचार. यंदे ह्यांनीं प्रकाशन-क्षेत्रांतही फार मोठी कामगिरी पार पाडली आहे. चिंतामण गंगाधर भानू, भारताचार्य चिंतामणराव वैद्य, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, विठ्ठल रामजी शिंदे, मोरो केशव दामले, कृष्णराव अर्जुन केळुसकर वगैरे तत्कालीन अनेक विद्वान लेखकांचे ग्रंथ प्रकाशांत आणून त्यांनीं मराठी ग्रंथभांडारांत बहुमोलाची भर घातली आहे. समग्र श्रीमद्भागवत, कथाकल्पतरू, कथासरित्सागर ह्यांसारखे घरोघरीं भक्तिभावपूर्वक वाचले जाणारे प्रचंड धार्मिक ग्रंथ अनेक भागांत त्यांनीं धर्मनिष्ठेनें झीज सोसून प्रसिद्ध केले.

शेठ दामोदर सांवळाराम यंदे हे कुठें तरी एका कोपऱ्यांत दडून रहाणारे नव्हते. ते जसे मिठ्ठास बोलणारे होते, तसेंच त्यांचें व्यक्तिमत्त्वही ठमठशीत व आकर्षक होतें. मोठ्या हिकमतीनें थोरामोठ्यांचा नि संस्थानिकांचा उपयोग आपल्या प्रकाशन—कार्यासाठीं कशा रीतीनें करून घ्यावा, ह्या कलेंत ते प्रवीण होते. बडोदें, कोल्हापूर, ग्वाल्हेर, इंदूर ह्यांसारख्या तत्कालीन थोर नि विद्याप्रेमी नरेशांचे पाय यंदे शेठजींच्या प्रकाशनगृहाला लागले आहेत. त्यांच्याकडून वेळप्रसंगीं प्रकाशन-कार्यासाठीं जरूर असलेला आर्थिक सहकार

त्यांनीं मिळविला आहे. हें खरें असलें तरी त्या सहकारानेंही त्यांचें भागत नसे. प्रकाशनापायीं त्यांच्या शिरावर कर्जाचा बोजा उत्तरोत्तर वाढत चालला. वयोमानही वाढत चाललें. त्याबरोबर उत्साहाला ओहोटी लागली. अखेरचे दिवस त्यांच्या वांट्यास आले ते आर्थिक अडचणीचे नि चिंतेचे !

यंदे शेठजी बडोदा नगरींतील चांगला चालता व भरभराटींतील प्रकाशन-संसार सोडून मुंबईंत आले. मुंबईंतही त्यांनीं २०।४० वर्षे मुद्रण-प्रकाशन व्यवसायांत मानानें घालविलीं. कोणत्याही कारणामुळें असो; त्यांच्या वांट्यास अखेर कांहीं चांगली आली नाहीं. मुंबईंतील मोडकळीस आलेला संसार सोडून ते शेवटीं पुण्यास गेले व तेथेंच त्यांनीं १९४० सालीं देह ठेविला.

ठाकुरद्वारवर (आतां जगन्नाथ शंकरशेट रोड) ज्या ठिकाणीं एका काळीं ना. नाना शंकरशेठ ह्यांची जुन्या बांधणीची इतिहासप्रसिद्ध भव्य वास्तु मोठ्या डौलानें उभी होती, तिच्या पिछाडीस इंदुप्रकाश छापखाना व नजीकच दामोदर सांवळाराम यंदे ह्यांचें निवासस्थान होतें. त्याच शंकरशेठ वाडीला व एके काळीं गजबजलेल्या त्या स्थानाला आज कोणतें स्वरूप प्राप्त झालें आहे? ज्या वास्तूच्या मालकानें मुंबईची जडण-घडण करण्यांत एका काळीं महत्त्वाचा भाग घेतला, तो 'शंकरशेठ वाडा' आतां जमीनदोस्त झाला असून तेथें आतां नव्या धर्तीची नऊ मजली इमारत वर आलेली आहे! आणि त्या इमारतीच्या पिछाडीस असलेलें इंदुप्रकाश प्रकाशन मुद्रणालय आणि त्याचे चालक यंदे शेठजी ह्यांची तेथें आतां नांवनिशाणीही राहिलेली नाहीं!

६

## कर्नाटक मुद्रणालयाचें प्रकाशन—कार्य

सुमारें ३०।४० वर्षांपूर्वीच्या काळांत मुंबईंत उत्कृष्ट छपाई नि दर्जेदार प्रकाशनें करून मुद्रण-प्रकाशन व्यवसायांत मानाचें च कोणींही हेवा करावा असें आदरणीय स्थान मिळविणारी मुद्रण-*प्रकाशन संस्था म्हणजे कर्नाटक-मुद्रणालय नि कर्नाटक-प्रकाशन संस्था हीच होय.*

वंकीकोट (कारवार) येथील एक रहिवासी मंगेशराव नाडकर्णी यांनीं मुंबईंत येऊन कानडी भाषेंत वृत्तपत्र सुरू करण्याच्या हेतूनें 'कन्नड-सुवार्ता' ह्या नांवाचें पत्र नि त्याच नांवानें एक लहानसा छापखाना १८९०।९१ च्या सुमारास सुरू केला.

ज्यांनीं नंतरच्या काळांत मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांत कौतुकास्पद कामगिरी बजाविली, त्या मंगेशराव कुलकर्णी ह्यांचे वडील बंधु गणपतराव हे त्या छापखान्यांत एक जुळारी ह्या नात्यानें मासिक सहा रु. पगारावर नोकरीस होते. तेही त्याच गांवचे. सुमारें ५।६ वर्षांनंतर 'कन्नड-सुवार्ता' हें पत्र, प्लेगच्या धामधुमींत जुळारी मिळणें कठीण झाल्यामुळें चालकांनीं बंद केलें नि मुद्रणालय विक्रीस काढलें. गणपतराव हे मुद्रण व्यवसायांत चांगले मुरलेले नि त्या व्यवसायाचें उज्ज्वल भवितव्य ओळखून वागणारे होते; परंतु छापखान्याची मालकी मिळविण्यासाठीं लागणारे तीन हजार रुपये त्या वेळीं त्यांच्याजवळ नव्हते. कोठून असणार? छपाईच्या कामामुळें परिचित झालेला एक दाता (पन्नालाल जैन) त्यांना सुदैवानें मिळाला. त्यांच्याकडून पांचशें रुपये कर्जाऊ घेऊन गणपतरावांनीं किंमतीपोटीं

पहिला हप्ता म्हणून ती रक्कम मालक नाडकर्णी यांस दिली व छापखाना ताब्यांत घेतला. (१९०२) त्याचें नांव 'कर्नाटक मुद्रणालय' हें ठेवून गणपतरावांनीं त्याच्या भरभराटीसाठीं अतिशय मेहनत घेतली. तो छापखाना एका कोंपऱ्यांत आडवळणी रस्त्यावर होता. त्याला त्यांनीं रहदारीच्या ठाकुरद्वार-गिरगांव रस्त्यावर आणिलें. छपाईचीं कामें मिळवायचीं नि मिळालेला पैसा मुद्रणालयाच्या वाढीसाठीं खर्च करावयाचा, असें होतें त्यांचें धोरण.

गणपतराव ह्यांस मुद्रणासंबंधीं सर्व खडान् खडा माहिती होती. स्वतः अंगमेहनतीनें काम करतां करतां ते त्या क्षेत्रांत तरबेज झाले होते. सतत पंधरा वर्षें ते राबत होते व छापखान्याला उन्नत स्वरूप यावें, ह्यासाठीं झटत होते. १९१६ सालीं त्यांना आजारानें गांठल्यामुळें त्यांचे बंधु मंगेशराव ह्यांच्याकडे कर्नाटक मुद्रणालयाचें चालकत्व आलें. त्यावेळीं छापखान्यावरील कर्जाचा बोजा चाळीस हजार रुपयांपर्यंत वाढला होता आणि छापखान्याची एकंदर मिळकत सुमारें साठ हजारांच्या आंतबाहेर होती.

मंगेशरावांचा जन्म १८८७ सालचा. शिक्षण बेताबाताचेंच म्हणजे अवघें चार इयत्तांपर्यंत. परंतु त्यांची उमेद, कर्तव्यनिष्ठा व धारणाशक्ति दांडगी होती. ज्या व्यवसायासंबंधीं कांहींच ज्ञान नव्हतें, अशा व्यवसायाची जबाबदारी त्यांना स्वीकारावी लागली. माणसांत हिंमत पाहिजे, धोरण सांभाळतां आलें पाहिजे आणि त्याच बरोबर न्यायनीतीचीही चाड असली पाहिजे. ह्या सद्गुणांचें भरपूर मांडवल मंगेशरावांपाशीं होतें. धाडस कधीं यश देतें तर कधीं तोंडघशींही पाडतें! दोन्ही प्रसंगीं समतोल संभाळतां आला तरच कोणत्याही व्यवसायांत टिकाव धरून मानानें जगतां येतें.

हेंच पहा ना. मंगेशरावांचे बंधु मे १९१८ सालीं वारले आणि आतां ते कर्नाटक मुद्रणालयाच्या बाबतींत सर्वाधिकारी झाले. तो पहिल्या युद्धाचा अस्वस्थतेचा नि गडबडीचा काळ होता. त्या काळानें मंगेशरावांस आरंभींच फार चांगला हात दिला. युद्धजन्य परिस्थितींत छपाईचें कामकाज फार वाढलें. तीं लक्षावधि रुपयांचीं कामें त्या काळीं टाईम्स नि क्लॅरिज कंपनीच्या मुद्रणालयांकडे जावयाचीं. गोऱ्या अधिकाऱ्यांनीं नि मध्यस्थांनीं गोऱ्या छापखानेवाल्यांकडे नाहीं तर दुसऱ्या कोणाकडे कृपादृष्टीनें पहायचें? शिवाय देशी छापखानेवाल्यांबद्दल

त्यांना विश्वास वाटत नसे आणि आपुलकी तर नव्हतीच ! मंगेशराव माणसें मिळविण्याच्या व वळविण्याच्या कलेंत आरंभापासून वाकबगार होते. त्यांनीं मोठ्या युक्तीनें मध्यस्थाला गांठून नि त्याला आपलासा करून टाईम्स व कॅरिज कंपनीकडे जाणाऱ्या कामांपैकीं पूर्व-आघाडी संबंधींचें सर्व काम मोठ्या हुशारीनें आपल्या कर्नाटक मुद्रणालयासाठीं मिळविलें. रात्रंदिवस मुद्रणालय चालू ठेवून आलेलीं छपाईचीं कामें अगदीं वेळच्यावेळीं पोहोंचविण्याची त्यांनीं व्यवस्था केली; त्यामुळें विश्वास वाढला व अधिकाधिक कामें येऊं लागलीं. त्याचा परिणाम काय झाला ? छापखान्यावर चाळीस हजार रुपये कर्जाचा जो बोजा होता, तो मंगेशरावांनीं अवघ्या सहा महिन्यांच्या काळांत सर्व फेडून टाकिला. शिवाय वीस हजार रुपये फायदा पदरांत पडला. आरंभकाळांत, अल्पावधींत मंगेशरावांना दैवानें अशा रीतीनें हात दिला. आणि नंतरच्या काळांत त्याच दैवाचे फांसे उलटे पडून कांहीं काळ मंगेशरावांना जबर कर्जाच्या खाईंत बुडावें लागलें !

कांहीं मित्रांच्या सांगण्यावरून, आपला व्यवसाय नीटनेटका चालला असतांही मंगेशरावांनीं फायद्याच्या लोभानें सीमेंटचा धंदा हाताळला. पहिल्या प्रथम त्या धंद्यांत २०–२५ हजार रुपये फायदा झाला. त्यामुळें अधिक लोभ सुटला ! कधीं कधीं आपण बांधलेलीं धोरणें नि अंदाज चुकतात ! तसेंच झालें त्यांचें ! सीमेंटचे भाव वाढणार म्हणून जवळ जमा झालेलें व इकडून तिकडून आणलेलें भांडवल त्या धंद्यांत ओतलें आणि त्याच सुमारास अंमलांत आलेल्या अवमूल्यनामुळें अंदाज चुकून बेसुमार मंदीची लाट उसळली आणि त्या धंद्यांत मंगेशरावांना सात लाखांची जबरदस्त ठोकर बसली !

त्यामुळें ते हताश झाले नाहींत. 'शीर सलामत तो पगडी पचास !' ह्या उक्तीवर त्यांची श्रद्धा होती. मुद्रणालयांतील कामकाज चालू होतें. त्यांतील अंतर्गत कारभाराचें त्यांना कांहींएक ज्ञान नसलें तरी चांगलीं जाणकार नि विश्वासु माणसें त्यांनीं जवळ केलीं होतीं. तीं समर्थपणें कारभार सांभाळीत होतीं. त्या बाबतींत ते भाग्यवान होते.

पण सीमेंटचें पुढें काय झालें ? तें वखारींत तुंबून राहिलें होतें ! भाडें भरावें लागत होतें. कुठेंही पडलेले खड्डे बेमालूमपणें बुजविण्यांत सीमेंटसारखें दुसरें समर्थ साधन नाहीं आणि त्याच सीमेंटनें मंगेशरावांच्या आर्थिक जीवनांत मलें

मोठें भगदाड निर्माण केलें होतें! तें बुजवायचें कसें? ह्या विचारांत मंगेशराव होते. इतक्यांत बँकेचे रेक्लेमेशनच्या दुंदुभी वाजूं लागल्या. समुद्राचा भाग बुजवायचा तर सीमेंट हवेंच कीं नाहीं? त्या हिशेबानें ग्रीव्हज कॉटन कंपनीनें मंगेशरावांकडचें सारें सीमेंट खरेदी करून त्यांच्या शिरावरील बराचसा भार कमी केला आणि तरीही राहिलेलें कर्ज १५-१६ वर्षें ते फेडीत होते.

ही झाली मंगेशरावांच्या जीवन-कथेंतील एक उपकथा. त्यांनीं आपलें प्रकाशन-कार्य जोमानें चालविलें होतें. त्या क्षेत्रांत नवीन काय करतां येईल, आपली प्रकाशन-संस्था कोणते मार्ग चोखाळले असतां नांवारूपाला येईल, ह्याचें सतत चिंतन त्यांनीं चालविलें होतें.

मंगेशराव ह्यांच्यासंबंधीं वर ध्वनित केल्याप्रमाणें एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. त्यांचे बंधु गणपतराव ह्यांस छापखान्याचीं सारीं तंत्रें माहीत होतीं. एक साधा जुळारी ह्या नात्यानें काम करतां करतां ते छापखान्याचे मालक झाले. त्यामुळें त्यांना छापखान्यांतील सर्व अंगांची माहिती होती. मंगेशरावांचें तसें मुळींच नव्हतें. म्हणून त्यांनीं छापखान्याचें तंत्र जाणणारीं योग्य नि विश्वासु माणसें नेमून नि त्यांच्याकडे विश्वासपूर्वक अंतर्गत कारभार सोंपवून त्या कटकटींतून ते मोकळे झाले होते. मुद्रण-प्रकाशन कार्यांत मंगेशरावांस ज्यांनीं आत्यंतिक निष्ठापूर्वक सहकार दिला असे त्यांचे दोन सहकारी म्हणजे श्रीराम सीताराम पुरोहित व गणेशपंत रामकृष्ण मल्हापूर हेच होत. छापखान्यांतील मराठी बाजू पुरोहित समर्थपणें सांभाळीत असत, तर मल्हापूर हे इंग्रजी बाजू सांभाळीत असत. बाहेरचे व्यवहार सांभाळावयाचे म्हणजे कामें मिळविणें, नवीन छपाईचीं कामें निर्माण करणें, पैशांची सोय करणें, हीं कामें कांहीं कमी महत्त्वाचीं नसतात. तीं कौशल्यपूर्वक सांभाळण्यांत मंगेशरावांनीं जी तडफ दाखविली नि त्यासाठीं जें बुद्धिकौशल्य उपयोगांत आणिलें, त्यावरून त्यांच्या कर्तबगारीची कल्पना करतां येते.

नंतरच्या काळांत आपल्या बुद्धिबळाच्या, नेकीच्या नि संघटनाकौशल्याच्या बळावर मंगेशरावांनीं कर्नाटक-मुद्रणालय व प्रकाशन-संस्था ह्यांचें महाराष्ट्रांत एवढें महत्त्व वाढविलें कीं, त्या दोन्ही संस्थांचा केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर भारताच्या इतर प्रांतांत नि परदेशांतही दीर्घकाळ डंका वाजत राहिला. आपल्या

कर्तृत्वाच्या बळावर प्रकाशन-क्षेत्रांत त्यांनीं थोर परंपरा निर्माण केल्या. त्या क्षेत्रांत परमोच्च स्थान प्राप्त करून घेण्यासाठीं सतत तीस वर्षे ते परिस्थितीशीं अविरत झगडले.

अशा ह्या थोर प्रकाशकाच्या जीवनांतील कांहीं महत्त्वाच्या नि अज्ञात घटनांचा येथें ओझरता उल्लेख करावयाचा आहे. आपला महाराष्ट्रीय समाज सुशिक्षित नि सुबुद्ध झाला पाहिजे; त्याचप्रमाणें त्याची वाढती ज्ञानतृष्णा उपयुक्त वाङ्मय-प्रकाशनाच्याद्वारें भागविली पाहिजे, ह्याकडे त्यांचें आरंभापासून लक्ष होतें. त्यांनीं आपलें कर्नाटक-मुद्रणालय स्वार्थाशिवाय आणखी कोणत्या कार्यासाठीं वापरलें व समाजकल्याणासाठीं आणि राष्ट्र-कार्यासाठींही त्याचा सदुपयोग कशा रीतीनें केला, हें चालू पिढींतील लोकांनीं जाणून घेणें उद्बोधक ठरणार आहे.

स्वामी विवेकानंद हे ह्या देशांत खऱ्याखुऱ्या अर्थानें एक थोर सत्पुरुष नि राष्ट्रीय-संत होऊन गेले. त्यांच्या अमोघ वाणीचा प्रभाव युरोप-अमेरिकेसारख्या परदेशांतील स्त्रीपुरुषांना जाणवला. मग ज्या देशांत त्यांनीं जन्म घेतला त्या भारतांतील जनतेसंबंधानें काय सांगायचें? त्यांचे लेख नि व्याख्यानें ६०-७० वर्षांनंतर आजही आपला प्रभाव गाजवीत आहेत. त्यांचें चिरंतन महत्त्व शब्दांनीं व्यक्त करतां येण्यासारखें नाहीं. मंगेशरावांनीं हें बरोबर ओळखलें. विवेकानंद ह्यांचे लेख नि व्याख्यानें म्हणजे तें अमर वाङ्मय आहे. झोंपी गेलेल्याला जागें करून त्यांच्यांत चैतन्य निर्माण करण्याचें सामर्थ्य त्या वाङ्मयांत आहे, ह्याची जाणीव होऊन, तें महाराष्ट्रीय वाचकांच्या आटोक्यांत मराठीच्याद्वारें कसें आणावें व ही जबाबदारी कोणावर सोंपवावी, ह्या विचारांत असतां प्रसिद्धिविन्मुख व साधु-वृत्तीनें वागणारे दादा गोगटे ह्यांचें नांव त्यांच्यापुढें आलें. त्यांनीं विवेकानंद-वाङ्मयाचाच नव्हे तर वेद, उपनिषदांचा व इतर परदेशीय नि एतद्देशीय आध्यात्मिक वाङ्मयाचा अभ्यास केलेला होता. अभ्यास पुष्कळ लोक करतात नि विद्वान म्हणून मिरवितात! तशा प्रकारचे अभ्यासु दादा गोगटे नव्हते. जे उच्च विचार वाचण्यांत आले व ज्यांचें चिंतन केलें, त्या उच्च विचारांचें मनापासून आचरण करणारे ते सच्छील सद्गृहस्थ होते. अगदीं साध्यांत साधा व कोणाचेंही लक्ष वेधून न घेणारा शुभ्र स्वदेशी पोषाख.

नेहमीं वाचनांत नि चिंतनांत मग्न. संसाराचा गाडा चालू राहिला पाहिजे, एवढ्याचसाठीं ते घड्याळ-दुरुस्तीचें काम आर्यन वॉच कंपनींत (ठाकुरद्वार) नित्यनेमानें करीत असत; परंतु तें तरी किती? साध्या संसाराला पुरेल एवढेंच! त्यांनीं तेंच काम अधिक करण्याचें मनावर घेतलें असतें तर त्यांना अधिक पैसा अवश्य मिळाला असता; परंतु दादांनीं तो हव्यास कधींही बाळगला नाहीं. ते संसारांत राहून साधुवृत्तीनें वागणारे होते.

जसा त्यांनीं पैशांचा हव्यास बाळगला नाहीं, तसाच नांवलौकिकाचाही बाळगला नाहीं. सहसा कुठेंही आढळून न येणारा दुसरा एक अनन्यसाधारण सद्गुण दादांच्याठायीं होता. प्रसिद्धि-पराङ्मुखता हाच तो सद्गुण होय.

दादा गोगटे हे एक चिंतनशील व अध्यात्ममार्गी गृहस्थ आहेत, ह्याची चाहूल लागल्यामुळें मंगेशराव एके दिवशीं भीत भीतच त्यांच्या भेटीस गेले; आणि विवेकानंद-वाङ्मय मराठींत आणण्याची आपली योजना त्यांनीं त्यांच्यापुढें ठेविली. होय–नाहीं करतां करतां, आत्यंतिक आग्रहामुळें व आपल्या हातून घडणाऱ्या ह्या कृत्याचे परिणाम सुफलदायी होण्याचा संभव ध्यानीं आणून, शेवटीं ती जबाबदारी शिरावर घेण्यास गोगटे ह्यांनीं मान्यता दर्शविली. मात्र ती जबाबदारी स्वीकारतांना मंगेशरावांपुढें त्यांनीं दोन भल्या मोठ्या नि जबरदस्त अटी ठेविल्या! त्या अटी ऐकून मंगेशरावांना आश्चर्याचा धक्का बसला व तसा तो तुम्हां–आम्हांलाही बसल्याशिवाय राहाणार नाहीं!

दादा गोगटे ह्यांनीं अशा कोणत्या आश्चर्यकारक अटी घातल्या? त्यांपैकीं पहिली अट, ह्या कामाबद्दल मोबदल्यादाखल पैसा बिलकुल घ्यायचा नाहीं, ही होती. आणि दुसरी अट म्हणजे कोणत्याही स्वरूपांत आपल्या नांवाला प्रसिद्धी द्यावयाची नाहीं! येथें मंगेशरावांचा कांहीं इलाज चालण्यासारखा नव्हता! त्यांना त्या अटी मान्य कराव्या लागल्या. त्या स्वीकारून मंगेशरावांनीं विवेकानंद-वाङ्मय एकंदर तेरा भागांत सुबक रीतीनें छापून प्रसिद्ध केलें.

दादा गोगटे ह्यांची गृह-परिस्थिति सर्वसाधारणच होती. साधुवृत्तीनें वावरणाऱ्याला त्याचें काय? मंगेशरावांस ह्या गोष्टीची जाणीव होती; त्याचप्रमाणें एवढी मोठी जबाबदारी स्वीकारून ती वेळच्यावेळीं पार पाडणाऱ्याच्या

पदरांत आपणांस कांहींच मोबदला टाकतां येत नाहीं, ही टोंचणी त्यांच्या मनास सतत लागून राहिलेली असे. आपलें हें मनींचें दुःख त्यांनीं गोगटे ह्यांच्या पत्नीपुढें कोणत्या ना कोणत्या मार्गानें ठेविलें. त्यांच्या समाधानाखातर ती माउली नाममात्र मोबदला स्वीकारण्यास तयार झाली नि अशा रीतीनें हा बिकट, परंतु तितकाच नाजुक प्रश्न सोडविण्यांत, मंगेशरावांनीं शेवटीं अंशतः कां होईना, यश मिळविलें!

दादांनीं सुबोध नि सोप्या भाषेंत विवेकानंद-वाङ्मयाला मराठीचा सुंदर साज चढविला, व मंगेशरावांस नि मराठी वाचकांस कायमचें ऋणी करून ठेविलें; परंतु त्यांची निरपेक्ष वाङ्मयीन-कामगिरी एवढ्यावरच संपत नाहीं.

महाराष्ट्रांत अनेक 'माला' जन्मास आल्या व आपआपल्या काळांत लोकरंजनाचें नि ज्ञानप्रसाराचें कार्य पार पाडून अंतर्धान पावल्या; परंतु प्रभाकर श्रीपत भसे ह्यांनीं मंगेशरावांच्या सहकारानें सुरू केलेली व नंतर मंगेशरावांच्या मालकीची झालेली 'भारत-गौरव-ग्रंथमाला' सर्वार्थानें उच्च दर्जाची होती. त्या मालेनें जें यश मिळविलें तें खरोखर अतुलनीय होतें. त्या उज्ज्वल यशांत दादा गोगटे ह्यांचाही हात होता. ही घटना किती वाचकांस माहीत आहे? आणि ती कशी असावी? टॉलस्टॉयचें चरित्र, कैसरची प्रभावळ, प्रिन्स बिस्मार्क, ज्ञानदीप, ह्यांसारखीं १०।१५ सुगंधी पुष्पें दादांनीं त्या मालेंत गुंफिलीं; परंतु त्यांपैकीं एकाही ग्रंथावर त्यांनीं स्वतःचें नांव घालूं दिलें नाहीं! सारें कांहीं गुपचूप! आपल्या हातून एकादें सत्कार्य घडलें तरी त्याचा गाजावाजा हवा कशाला? अशी होती दादांची मर्मोवारच्या जगावेगळी विलक्षण वृत्ति!

आणि दादा गोगटे ह्यांच्या त्यागाचा, निरपेक्षतेचा, निरहंकारी वृत्तीचा व महत्त्वाचें कर्तृत्व गाजवूनही प्रसिद्धीपासून दूर दूर रहाण्याच्या लोकविलक्षण वृत्तीचा मंगेशरावांच्या मनावर झालेला परिणाम, चिरंतन काळ टिकणारा नि त्यांचें सारें जीवन उजाळून सोडणारा होता.

स्वतःचा गाजावाजा न होऊं देतां लोकशिक्षणाच्या व देशसेवेच्या दृष्टीनें आपलें मुद्रणालय सत्कारणीं लावण्याच्या दृष्टीनें जी जी संधि साधतां येईल ती साधावयाची हें होतें मंगेशरावांचें धोरण. सत्कार्याची कांस धरून

व सन्मार्गानें जाऊन मिळवितां येईल तेवढा जास्तींत जास्त पैसा मिळवायचा व लोककल्याणासाठीं नि आपल्यावर अवलंबून असलेल्यांसाठीं त्याचा विनियोगही मुक्तहस्तांनीं करावयाचा ह्याकडे त्यांचें नेहमीं लक्ष असे.

भारत-गौरव ग्रंथमालेचें नांव अलीकडे फारसें ऐकूं येत नसलें तरी एका काळीं त्या मालेनें नांवाप्रमाणें गौरवास्पद कामगिरी करून आपलें नांव महाराष्ट्रांत गाजवून सोडलें आहे. चालक प्रभाकर भसे ह्यांच्या मार्गांत नंतर अडचणी येऊं लागल्या. परंतु माला पुढें चालू रहावी, ही त्यांची आकांक्षा होती. मंगेशरावांनीं त्या मालेची उपयुक्तता ध्यानीं आणून ती आपल्या ताब्यांत घेऊन तिला अधिकाधिक गौरवास्पद स्वरूप प्राप्त करून देण्याचा निर्धार केला व तो पारही पाडला. त्या मालेला मंगेशरावांनीं चांगलें पोषक खतपाणी घालून नवी पालवी आणिली व मधुर आणि सुगंधी फळांफुलांनीं महाराष्ट्र दरवळून सोडला. ह्या मालेतर्फे एकंदर एकशें सदतीस ग्रंथ प्रकाशांत आले.

जें जें चांगलें, दुर्मिळ व समाजशिक्षणाच्या दृष्टीनें उपयुक्त असेल, तें झटून प्रकाशांत आणावयाचें. त्यासाठीं व्याप किती करावा लागेल, ह्याचा सहसा विचार करायचा नाहीं. मेहनतीकडे नि पैशांकडे पहायचें नाहीं. त्यासाठीं जरूर त्याचा सहकार हमखास मिळवावयाचा. तो इतरांस अशक्य वाटला तरी वाटेल तें करून तो आपण शक्य कोटींत आणून दाखवायचा, ह्या ईर्षेनें ते प्रकाशन-क्षेत्रांत वावरत असत. त्यांच्या हिशेबीं अशक्य कांहीं नव्हतें!

एकदां माधवबागेंतील तुकाराम पुंडलीक शेटये ह्यांच्या पुस्तक विक्रीच्या दुकानीं ते बसले असतां एक गृहस्थ दुर्मिळ झालेला महाभारताचा 'सेट' विकत घ्यायला आले. दुर्मिळ ग्रंथ कुठें नाहीं तर शेटये ह्यांच्या दुकानीं हटकून मिळावयाचा, अशी त्या दुकानाची पूर्वीपासून ख्याति आहे. त्याप्रमाणें चिपळूणकर आणि मंडळीनें प्रसिद्ध केलेला त्या ग्रंथराजाचा 'सेट' त्या गिऱ्हाइकास तेथें मिळाला; परंतु दुर्मिळतेमुळें भारी किंमत देऊन! त्या घटनेवरून जो कांहीं बोध घ्यायचा तो मंगेशरावांनीं घेतला व महाभारताचा मराठी अनुवाद नवीन स्वरूपांत प्रसिद्ध करण्याची योजना आंखून मध्यंतरीं अडचणी आल्या असतांही न डगमगतां त्यांनीं तेरा खंडांत व स्वस्त किंमतींत मराठी-महाभारत प्रकाशांत आणिलें.

शाळांतून अभ्यासक्रमासाठीं लागणारीं पाठ्यपुस्तकें तयार करवून घेऊन तीं प्रसिद्ध करणें म्हणजे मोठा व्याप असला, तरी तो व्याप मुद्रणालयाला किफायतशीर व विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें आवश्यक नि उपकारक होऊन रहाणारा असतो. शेठ जावजी दादाजी ह्यांनीं तत्कालीन प्रसिद्ध नि अनुभवी लेखक विनायकराव ओक ह्यांच्या सहकार्यानें तशा प्रकारचा उपक्रम एका काळीं केलेला होता; परंतु शेठजींच्या अकालीं निधनामुळें व इतर अनेक कारणांमुळें तो दीर्घकाळ नांवारूपास येऊं शकला नाहीं. विद्यार्थ्यांच्या मनावर सुपरिणाम घडवून आणून त्यांच्याठायीं पुरुषार्थाचें बीजारोपण करणारीं शालेय पुस्तकें निर्माण करणें ही साधीसुधी गोष्ट नाहीं. आमच्याच लोकांना हाताशीं धरून सरकारनें तो व्यवसाय आपल्या हातीं ठेविला होता. तीं पुस्तकें खपविण्याची ठेकेदारी होती मॅकमिलन, लॉंगमन्स ह्यांसारख्या युरोपीयन कंपन्यांकडे. मुंबई प्रांताचेंच उदाहरण घेतलें व आपण प्राथमिक शाळांतून लागणाऱ्या क्रमिक पुस्तकांकडे वळलों तर काय दिसून येतें ? प्रत्येक पुस्तकाच्या लक्षावधि प्रती खपावयाच्या व त्यामुळें युरोपीयन कंपन्यांना लक्षावधि रुपयांचा फायदा व्हावयाचा ! तें क्षेत्र म्हणजे त्यांचीच वतनदारी होती. त्यांचें राखीव कुरण होतें. त्या सुपीक कुरणांत त्यांनीं बिनबोभाट चरावें नि आपापली तुंबडी खुशाल भरून घ्यावी !

मंगेशराव कुलकर्णी ह्यांनीं सरकारच्या ह्या परंपरागत धोरणाला नि युरोपीयन कंपन्यांच्या वतनदारीला सुरुंग लावण्याचा बेत रचिला. १९३२ साल उजाडलें आणि मुद्रणालयास मंदीमुळें व इतर अनेक कारणांमुळें कामाची टंचाई भासूं लागली. आपल्या छापखान्यासाठीं दीर्घकाळ पुरेल व फायदेशीर होईल, असें छपाईचें कोणतें नवीन काम निर्माण करावें, ह्याचा मंगेशराव विचार करूं लागले. शालेय पुस्तकांच्या छपाईशीं त्यांचा संबंध ह्यापूर्वीच थोडाफार आलेला होता. वऱ्हाड-मध्यप्रांतासाठीं कांहीं शालेय पुस्तकें प्रा. ना. के. बेहरे व त्या प्रांतांतील इतर नामवंत लेखकांचा सहकार संपादन करून त्यांनीं प्रसिद्ध केलीं होतीं; तसेंच मुंबई शिक्षणखात्यासाठीं कन्या-वाचन-मालाही त्यांनीं प्रसिद्ध केली होती; परंतु त्या शालेय पुस्तकांचा खप फार मर्यादित असे.

विचार करतां-करतां सभोंवारच्या निराशाजनक परिस्थितीमुळें जी सुपीक

कल्पना सहसा कोणाच्या डोक्यांत येऊं शकणार नाहीं, तिचा उदय मंगेशरावांच्या डोक्यांत झाला ! अशी कोणती ती कल्पना ? मुंबई इलाख्यांत प्राथमिक शिक्षण देणाऱ्या हजारों शाळा आहेत व लक्षावधि विद्यार्थी त्या शाळांतून शिक्षण घेत आहेत. वर्षानुवर्षे ठराविक सांच्याचीं व मुलांच्या बुद्धिविकासाच्या दृष्टीनें कुचकुवत क्रमिक पुस्तकें त्यांच्या हातीं दिलीं जातात. त्यांत क्रांतिकारक थारेपालट घडवून आणणारीं, नव्या धर्तीचीं, तसेंच विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासास महत्त्वाचा हातभार लावणारीं अशीं पुस्तकें तयार करवून घेऊन तीं प्रसिद्ध केलीं, तर काय बहार होईल !

मंगेशरावांच्या डोक्यांत घोळूं लागलेली ही कल्पना मोठी नामी व सुंदर होती; परंतु ती अंमलांत आणण्याच्या बाबतींत असंख्य अडचणी होत्या. त्याही साध्यासुध्या नव्हत्या. दुर्लंघ्य होत्या. परंतु मंगेशराव हे मोठ्या छातीचे नि धडाडीचे गृहस्थ होते. ह्या जगांत त्यांना अशक्य कांहींच वाटत नसे. एकादी कल्पना मनांत येण्याचीच खोटी ! मग ती अंमलांत आणण्यासाठीं आपल्या जिवाचें रान करावयाचें, प्रयत्नांची शिकस्त करावयाची, तिचा पिच्छा पुरवावयाचा नि शेवटीं ती घडवून आणावयाची !

त्या काळीं राज्य होतें गोऱ्यांचें आणि शालोपयोगी पाठ्यपुस्तकांचीं सारीं सूत्रे होतीं गोऱ्या अधिकाऱ्यांच्या व गोऱ्या पुस्तक-विक्रेत्या कंपन्यांच्या हातीं. असेनात कां. आपण प्रयत्न तर करून पाहूंया. ह्या विचारानें मंगेशराव त्या उद्योगास लागले. पायरीपायरीनें जायचें. क्रमिक पुस्तकें तयार करवून घ्यावयाचीं व नंतर सरकारच्या परवानगीसाठीं प्रयत्न करावयाचा. परंतु पहिली पायरी कशी गांठावयाची?

बिगर इयत्तेपासून चौथ्या इयत्तेपर्यंत, प्रथमतः एकंदर पांच क्रमिक पुस्तकें त्यांना तयार करवून घ्यायचीं होतीं. त्यासाठीं योग्य माणूस कोण गांठावा, ही महत्त्वाची जबाबदारी समर्थपणें कोण पेलूं शकेल व संकल्पित योजनेंत आपण कोणाचा सहकार मिळवावा, ह्याचा विचार करीत असतां मंगेशरावांना आचार्य प्रल्हाद केशव अत्रे ह्यांची आठवण झाली. विलायतेस जाऊन ते शिक्षणशास्त्राचा अभ्यास करून आले होते व शैक्षणिक दृष्ट्या तें नांव त्या काळीं जादूनें भारलेलें होतें. त्यामुळें मंगेशरावांच्या मनावर त्या

नांवाची पकड बसलेली असल्यास नवल नाहीं. कोणताही विचार एकदां मनांत आला असतां, मागें सांगितल्याप्रमाणें, तो पूर्णत्वास येईपर्यंत मंगेशराव बेचैन होत असत. त्याच अवस्थेंत आचार्य अत्रे ह्यांची भेट घेऊन त्यांच्यापुढें आपली क्रमिक पुस्तकांची योजना ठेवण्यासाठीं मंगेशराव तडक पुण्यास गेले.

बोलाफुलास गांठ पडावी, तसा प्रकार ह्या बाबतींत झालेला होता. आचार्य अत्रे हे विलायतेंत असतां व तेथें शिक्षणशास्त्राचा अभ्यास करीत असतां तिकडील प्राथमिक शाळांत अभ्यास करणाऱ्या मुलांच्या हातांत पडणारीं क्रमिक पुस्तकें व इकडील मुलांच्या हातांत पडणारीं क्रमिक पुस्तकें, ह्यांमध्यें महदंतर असल्याचें त्यांना आढळून आलें. संस्कारक्षम वयांत मुलांच्या वाचनांत विकासशील, सुलभ नि अंतःकरणाला भिडणाऱ्या, गोड नि सुलभ भाषेंत लिहिलेलीं पुस्तकें नकोत का पडायला ? आचार्य अत्रे ह्या विचारानें त्या काळांत अतिशय भारावलेले होते; परंतु त्याचबरोबर प्रकाशनाचा भार कोणी शिरावर घ्यावयाचा व तो यशस्वी रीतीनें वहावयाचा ? डोक्यांत सतत थैमान घालणारे ते विचार नामी होते; परंतु ते अंमलांत यावे कसे ? 'दरिद्राणाम् मनोरथाः' दरिद्री माणसांच्या मनांत येणारे विचार कितीही सुंदर असले, तरी त्यांची घडगत लागणें, तितकेंच कठीण असतें.

मुलांचीं मनें फुलवून त्यांचें जीवन सुगंधित करणारी ही योजना म्हणजे तें एक सत्कार्यच होतें. अशा कार्याकडे ईश्वराची कृपादृष्टि नाहीं वळली तरच नवल ! आणि जें घडावें असें मनापासून वाटत होतें, तें शेवटीं नेमकें घडून आलें !

*मंगेशराव पुण्यास पोहोंचतांच प्रथम आचार्य अत्रे ह्यांच्या भेटीसाठीं त्यांच्या घरीं गेले. आरंभीं ख्यालीखुशालीचें बोलणें झालें. त्यानंतर उभयतांच्या भेटींत काय बोलणें झालें नि शेवटीं त्याचें पर्यवसान कशांत झालें, हें आचार्य अत्रे ह्यांच्याच शब्दांत त्यांच्या आत्म-वृत्ताच्या आधारें सांगणें योग्य होईल—*

"यापुढें काय करायचा आपला विचार आहे ? कांहीं करायचा विचार आहे का ?" मंगेशरावांनीं बोलतां बोलतां प्रश्न केला.

"विचार पुष्कळ आहे; पण त्याचा उपयोग काय?" मी किंचित हंसून म्हणालों, "उदाहरणार्थ, मला प्राथमिक शाळांसाठीं क्रमिक पुस्तकें लिहावयाचीं आहेत."

"तेवढ्यासाठींच तर मी तुमच्याकडे आलों!" मंगेशराव चटकन मध्येंच म्हणाले, "बोला! तुमची लिहायची तयारी असेल तर मी पुस्तकें प्रसिद्ध करायला तयार आहें."

क्षणभर मी निरुत्तरच झालों! माझा अनेक वर्षांचा संकल्प साकार करणाराच माणूस आपण होऊन आपल्या पावलांनीं चालत आलेला, तोंपर्यंत तरी मला आयुष्यांत भेटला नव्हता. मनांतल्या मनांत मी दिपूनच गेलों.

कांहीं तरी बोलायचें म्हणून मी म्हणालों, "पण अशीं क्रमिक पुस्तकें लिहायला पुष्कळच खर्च येईल आणि त्यासाठीं अनेक माणसांचें सहकार्य घ्यावें लागेल—"

"किती खर्च येईल?" मंगेशरावांनीं ताडकन विचारलें.

"येईल पांच ते सहा हजार रुपये!" तोंडाला येईल तो आंकडा मीं बोलून टाकला.

मंगेशरावांनीं आपल्या खिशांतून चटकन चेकबुक काढलें नि सहा हजारांचा चेक माझ्या हातावर ठेवला!

तोंपर्यंत एवढ्या रकमेचा चेक जन्मांत माझ्या नावानें कोणीं लिहिलेला नव्हता. मी अक्षरशः कोलमडलों![१]

अशा रीतीनें बिगरीपासून चौथ्या इयत्तेपर्यंत पांच क्रमिक पुस्तकें तयार करून देण्याच्या बाबतींत आचार्य अत्रे ह्यांस मंगेशरावांनीं बांधून टाकिलें. अत्रे ह्यांचें तें अत्यंत आवडीचें कार्य होतें. ते विलंब न लावतां मुंबईंत आले नि आपणास योग्य वाटलेल्या पांच सहकाऱ्यांची निवड करून व न्यू ईरा स्कूलमध्यें आपली कचेरी थाटून तें कार्य त्यांनीं सुरू केलें.

लंडनमध्यें असतां लालभाई देसाई हे आचार्य अत्रे ह्यांचे सहाध्यायी होते. तेही शिक्षणतज्ज्ञ होते. न्यू ईरा स्कूलचे प्राचार्य एम्. टी. व्यास ह्या शिक्षणतज्ज्ञांचा सहकार घेऊन त्यांनींही आचार्य अत्रे ह्यांच्याप्रमाणें गुजराती

१ कऱ्हेचें पाणी-खंड दुसरा; ले आचार्य प्र. के. अत्रे. पृ. १०३–१०४

प्राथमिक शाळांसाठीं क्रमिक-पुस्तकें तयार करण्याची जबाबदारी स्वीकारली. मराठी नि गुजराती ह्या दोन्ही मालांचें नांव 'नवयुग-वाचन-माला' ठेवायचें व मराठीप्रमाणें गुजराती वाचन-मालाही कर्नाटक-मुद्रणालयांत छापायची, असा बेत निश्चित करण्यांत आला.

बिगरीसह पांच मराठी पुस्तकें तयार करून देण्याची जबाबदारी आचार्य अत्रे ह्यांनीं आपल्या सहकाऱ्यांच्या सहाय्यानें व स्वतःच्या हिंमतीनें तीन महिन्यांत पार पाडिली. गेल्या पन्नास वर्षांतील बालवाङ्मय चाळून त्यांतून योग्य ती निवड करायची होती व त्या वाङ्मयाला सोपें नि सुटसुटीत स्वरूप द्यावयाचें होतें. ही निवड कोणत्या ध्येयानें करण्यांत आली, ह्यासंबंधानें आचार्य अत्रे लिहितात[१]:—"त्यापूर्वीचीं क्रमिक पुस्तकें ज्यांना साहित्याचा गंध नव्हता अशा रूक्ष नि अरसिक शिक्षकांनीं लिहिलेलीं असल्यानें त्यांचें स्वरूप 'शालेय' होतें. माझ्या वाचन-मालेचा अभ्यास करणाऱ्या मुलांना भावी आयुष्यांत उत्तम मराठी भाषा बोलतां आली पाहिजे, लिहितां आली पाहिजे, एवढेंच नव्हे तर तीं नामवंत लेखक झालीं पाहिजेत व प्रतिभाशाली कवि झालीं पाहिजेत, ह्या एका दृष्टीनें मीं धड्यांची नि कवितांची निवड केलेली होती."

हीं पांचही पुस्तकें तयार होऊन त्याच्या कच्च्या प्रती छापून मान्यतेसाठीं सरकारच्या शिक्षणखात्याकडे मंगेशरावांकडून पाठविण्यांत आल्या. अर्धे काम पार पडलेलें होतें व अर्धें आणि त्याचबरोबर अत्यंत अवघड कार्य पार पडायचें बाकी होतें. सरकारची मंजुरी मिळविणें ही साधी व सहजसाध्य का गोष्ट होती? गेल्या ६०।७० वर्षांतील मिरासदारी मोडून काढण्याचा तो महाबिकट प्रश्न होता. जें कार्य करण्यासाठीं आजवर कोणी धजला नाहीं, तें पार पाडण्याचा चंग बांधून मंगेशराव बाहेर पडले होते. त्या काळीं सुदैवानें शिक्षणखात्यांत आचार्य अत्रे त्याचप्रमाणें मंगेशराव ह्या दोघांचीही चहाती नि परिचित मंडळी होती. त्यांच्याशीं पद्धतशीर संबंध जोडण्यांत आला. खूप पायपीट नि प्रयत्न करावे लागले व शेवटीं पुस्तकांस मंजुरी मिळण्याची आशा निर्माण झाली; परंतु एक अडचण निर्माण झाली. ती अडचण मोडवून मंजुरीचा मार्ग मोकळा करणें आतां आचार्य अत्रे ह्यांच्या हातीं होतें.

१ कऱ्हेचें पाणी—लेखक आचार्य प्र. के. अत्रे पृ. २०९

त्या बाबतींत मंगेशराव हे आचार्य अत्रे ह्यांस भेटून त्यांना म्हणाले, "अहो! आपलीं पुस्तकें मंजूर होण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली आहे, पण त्यासाठीं एक गोष्ट करावी लागेल—"

"कोणती?"

"तुमच्या जोडीला एकादा ब्राह्मणेतर संपादक घ्यावा लागेल."

"मग घ्या! माझी त्याला मुळींच हरकत नाहीं!"

"विठ्ठलराव घाट्यांचें नांव जर तुमच्याबरोबर नवयुग-वाचनमालेचे सहसंपादक म्हणून घातलें, तर तुमचें काय म्हणणें आहे?"

"उत्तम कल्पना! विठ्ठलराव माझे वर्गबंधु नि दोस्त आहेत! खुशाल घाला त्यांचें नांव!"

अशा रीतीनें आपली संमती देऊन आचार्य अत्रे आपल्या आत्मचरित्रांत (कऱ्हेचें पाणी) म्हणतात:—

"अशा तऱ्हेनें 'नवयुग-वाचनमाला' जरी मीं एकट्यानें लिहून तयार केली होती, तरी तिच्या संपादकांच्या जागीं 'अत्रे-घाटे' हीं नांवें घालण्यांत आलीं नि त्या मालेला सरकारी मान्यता मिळून, मुंबई इलाख्यांतील क्रमिक-पुस्तकांच्या अनेक वर्षांच्या सरकारी वतनदारीला एकदांचें प्रचंड भगदाड पडलें! घाट्यांना बिचाऱ्यांना कांहीं काम न करतां फुकटांत हजारों रुपये मिळाले! माझ्यापेक्षां त्यांचेंच नशीब जोरदार म्हटलें पाहिजे!"

ह्या नवयुग-वाचन-मालेनें महाराष्ट्रांतील विद्यार्थ्यांच्या जीवनांत नवयुग घडवून आणिलें; एवढेंच नव्हे तर मंगेशराव कुलकर्णी नि आचार्य अत्रे ह्यांच्या आर्थिक-जीवनांतही समृद्धीचें नवयुग घडवून आणिलें.

ह्या मालेनें मंगेशरावांच्या प्रकाशन-व्यवसायाचा पाया मजबूत केला. पुढें झपाझप पावलें टाकण्यासाठीं जरूर असलेलें उत्तेजन त्यांना मिळालें. आपली मुद्रण-संस्था नि प्रकाशन-संस्था आतां भाड्याच्या घरांत राहून चालायचें नाहीं, त्यासाठीं मालकीची इमारत झाली पाहिजे, अशी ईर्षा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. त्याप्रमाणें १९३४ सालीं चिराबाजारांत (ना. जगन्नाथ शंकरशेट रोड) जागा घेऊन तेथें सुमारें सव्वा लक्ष रुपये खर्च करून आपल्या मुद्रण-प्रकाशन व्यवसायाला सोयिस्कर अशी इमारत बांधून घेण्यांत आली.

योगायोग असा कीं, व्यास व चोकर्शी ह्यांच्याकडून मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांसाठीं एक सिलेक्शन बुक तयार करवून घेऊन तें मंजुरीसाठीं पाठविण्यांत आलें होतें. त्यास युनिव्हर्सिटीकडून मंजुरी मिळाल्याचा खलिता त्या इमारतीच्या वास्तुशांतीच्या दिवशींच मंगेशरावांच्या हातीं येऊन पडला !

हें झालें मंगेशराव ह्यांच्यासंबंधानें. आचार्य अत्रे आपल्या आत्मवृत्तांत ( कऱ्हेचें पाणी ) लिहितात कीं :—"१९३३ सालअखेर ह्या मालेच्या वार्षिक फायद्याचा माझ्या वांट्याला जो भाग आला, त्यावर मीं माझी कोरी करकरीत निळ्या रंगाची 'शेव्हरले' मोटर गाडी खरेदी केली ! शाळेंत मला पगार होता पाऊणशें रुपये महिना ! आणि माझ्या मोटारीच्या पेट्रोलचा दरमहा खर्च होता दीड दोनशें रुपये ! पुण्यामध्यें स्वतःच्या मोटार गाडीमधून गांवभर हिंडणारा पहिला शिक्षक जर कोणी झाला असेल तर तो मीच !"[१]

नवयुग वाचन-मालेस सरकारकडून मंजुरी मिळविण्यांत यश मिळविलें, एवढ्यावर राजी होऊन मंगेशराव स्वस्थ राहिले नाहींत. महाराष्ट्रांतील सर्व शाळांतून तीं पुस्तकें अभ्यासक्रमांत लावलीं गेलीं पाहिजेत, तरच एवढा आटापिटा केल्याचा उपयोग. त्यासाठीं त्यांनीं मालेच्या प्रचारार्थ महाराष्ट्रभर दौरा सुरू केला. एकही जिल्हा त्यांनीं शिल्लक ठेविला नाहीं. ते प्रत्येक ठिकाणीं जातीनें गेले नि ज्यांच्या हातीं अभ्यासक्रमासाठीं पुस्तकांची निवड करण्याची सत्ता असते, त्या सर्व ठिकाणच्या सत्ताधाऱ्यांस ते भेटले व नवयुग वाचनमालेचें महत्त्व त्यांनीं पटवून दिलें. त्यामुळें सर्व शाळांतून मालेसाठीं ग्राहक निर्माण झाले. अशा रीतीनें ध्येयवादी प्रकाशक हा आदर्श प्रचारकही कसा होऊं शकतो, ह्याचें एक नमुनेदार उदाहरण त्यांनीं सर्वांपुढें ठेविलें.

त्यानंतर मंगेशरावांनीं घाटे, रानडे, मानोलकर, ह्यांसारख्या नामवंत लेखकांच्या सहकारानें पांचवी, सहावी नि सातवी, तसेंच इंग्रजी पहिली, दुसरी नि तिसरी ह्या वर्गांसाठीं 'साहित्य-परिचय' आणि इंग्रजी चौथी, पांचवी व सहावीसाठीं 'गद्यवैभव' नि 'महाराष्ट्र-रसवंती' हीं क्रमिक पुस्तकें तयार करवून घेऊन तींही मार्गस्थ केलीं.

१ कऱ्हेचें पाणी - खंड २ रा, लेखक आचार्य प्र. के. अत्रे, पृ. ११६

विश्वासानें विश्वास वाढत जातो. ज्या काळांत त्यांनीं शालोपयोगी क्रमिक-पुस्तकांच्या क्षेत्रांत हें यश मिळविलें, तो काळ किती विकट होता, ह्याची आजच्या काळांतील प्रकाशकांना बरोबर कल्पना करतां येणार नाहीं; परंतु मंगेशरावांनीं त्या विपरीत काळावर मात करून दाखविली !

काळ कसा विपरीत होता, ह्याची कांहींशी कल्पना ह्यापूर्वी करून देण्यांत आली आहे. प्रकाशकांच्या दृष्टीनें त्या विपरीत काळासंबंधानें थोडें अधिक स्पष्टीकरण करणें जरूर वाटतें.

शक्य तों परदेशांतील लेखकांस उत्तेजन देऊन त्यांनीं लिहिलेलीं पुस्तकें महाविद्यालयीन अभ्यासक्रमांत लावण्यांत येत असत. ह्या देशांत का लेखक व प्रकाशक नव्हते ? परंतु शक्य तेवढा पैसा इंग्रज लेखक नि प्रकाशक ह्यांच्या खिशांत जाऊन पडावा, हें होतें तत्कालीन सरकारचें नि सरकारनियंत्रित युनिव्हर्सिटीचें धोरण ! वर्षानुवर्षे तें अबाधित चालू होतें. 'आंधळें दळतें नि कुत्रें पीठ खातें ! असा हा चालला होता कारभार आणि तो आम्ही निमूटपणें डोळे मिटून पहात होतों !

परंतु मंगेशरावांनी डोळे उघडून सभोंवार पाहिलें. शाळांच्या क्षेत्रांत आपण जसें यश मिळविलें, तसाच महाविद्यालयांच्या बाबतींतही प्रयत्न करून पहावयाचा. तसें पाहिलें तर प्रो. ताकखाव, प्रो. आर्. के. लागू ह्यांच्यासारख्या विद्वान् लेखकाकरवीं महाविद्यालयीन अभ्यासक्रमासाठीं पुस्तकें तयार करून घेऊन ह्या देशांत वावरणाऱ्या युरोपीयन प्रकाशकांनीं जर तीं प्रसिद्ध केलीं, तर त्यांना मात्र युनिव्हर्सिटीकडून मंजुरी सहज मिळत असे; परंतु तींच जर कर्नाटक-प्रकाशनसारख्या एतद्देशीय प्रकाशन-संस्थेनें प्रसिद्ध केली, तर त्यांना मंजुरी मिळत नसे !

गोऱ्या प्रकाशकांच्या ह्याही वतनदारीला सुरुंग लावण्याचा मंगेशरावांनीं स्वतांशीं निर्धार केला. तो कार्यवाहींत आणणें ही त्या काळीं तरी सहजसाध्य गोष्ट नव्हती. ज्या पुस्तकांसाठीं मंजुरी मागायची तीं तयार करून घेऊन तीं छापील स्वरूपांत मंजुरीसाठीं पाठवावीं लागत असत. त्यासाठीं फार मेहनत घ्यावी लागत असे व पैसाही गुंतवून ठेवावा लागत असे. मंजुरी नाहीं मिळाली तर सारे परिश्रम नि पैसा फुकट जायचा !

अशा परिस्थितींत ह्या विचित्र व्यापांत पडण्याचें धाडस कोण पतकरील ? परंतु तो भूर्दंड भरावा लागला तरी भरून गोऱ्या प्रकाशकांच्या ठेकेदारांस ठोकर देण्याचें ठरवून मंगेशराव त्या उद्योगास जिद्दीनें लागले. त्यांची चिकाटी दांडगी ! सतत सहा वर्षें ते युनिव्हर्सिटीकडे पुस्तकें तयार करवून पाठवीत होते; परंतु त्या दीर्घ प्रयत्नांत यश संपादन करायला सातवें वर्ष उजाडावें लागलें !

त्याचा परिणाम काय झाला ? भारतांत ग्रंथ-प्रकाशन व्यवसाय करून आपापल्या तुंबड्या भरणाऱ्या परदेशीय कंपन्यांनीं स्वतःच्या हितसंबंधांचें संरक्षण करण्यासाठीं संघटना निर्माण केली व देशी प्रकाशन-व्यावसायिकांना आपण प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांतील उतारे घेऊं द्यायचे नाहींत व अन्य तऱ्हेनें त्यांना सवलती मिळूं द्यायच्या नाहींत, ह्या दृष्टीनें त्यांचे उद्योग सुरू झाले.

परंतु काळ कोणासाठींही थांबून रहात नाहीं. त्याचीं पावलें झपाझप पडत चाललेलीं असतात. वतनदारीचेंही तसेंच आहे. ती एका जागीं स्थिर राहूं शकत नाहीं. फिरत्या कालचक्रांत ती कुणाच्या वांट्याला कधीं जाईल, हें निश्चितपणें कोणीही सांगूं शकणार नाहीं ! प्रतिकूल काळ वांट्यास आला तरी दमछाट होऊं न देतां धीर गंभीर-वृत्ति धारण करील, तोच ह्या शर्यतींत विजयी होईल !

मंगेशरावांच्याठायीं ते सद्गुण होते. म्हणून तत्कालीन चढाओढींत त्यांनीं यश मिळविलें नि इतर प्रकाशकांचा मार्ग मोकळा केला.

वरीलप्रमाणें प्राथमिक, दुय्यम नि महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठीं आवश्यक वाटणारीं पुस्तकें तयार करवून घेऊन त्यांचा त्यांनी प्रसार केला. १९३४ ते १९४५ ह्या १०।१२ वर्षांच्या काळांत मंगेशरावांनीं वाङ्मयक्षेत्रांतील निरनिराळ्या विभागांत उपयुक्त ग्रंथसंपदेच्या रूपानें जी अमाप भर घातली, तिला तोड सांपडणें कठीण आहे.

आपल्या प्रकाशन-संस्थेचा दर्जा शक्य त्या मार्गांनीं वाढला पाहिजे, ह्यासाठीं मंगेशराव परोपरीनें झटले. केवळ शालेय किंवा शैक्षणिक स्वरूपाच्या वाङ्मयनिर्मितीला वाहून घेऊन व त्यामुळें होणाऱ्या किफायतीवर सारें लक्ष पुरवून ते स्वस्थ राहिले नाहींत. उच्च दर्जानें नि कित्येक प्रसंगीं नुकसानीला कारण होणारें मराठी नि इंग्रजी वाङ्मयही त्यांनीं प्रकाशांत आणिलें. निरनिराळ्या

विषयांत तज्ज्ञ नि नांवाजलेल्या विद्वानांस हरप्रयत्नांनीं गांठावयाचें, त्यांना योग्य तो मोबदला द्यावयाचा व त्यांच्याकडून ऐतिहासिक, संशोधनविषयक नि आपल्या देशाचें वैभव वाढविण्यास कारणीभूत होणारे असे विद्वत्ताप्रचुर ग्रंथ लिहून घ्यावयाचे, हा धूमधडाका त्यांनीं सतत १०।१२ वर्षें चालविला होता. ह्या दृष्टीनें पहातां त्यांच्या एका बहुमोल प्रकाशन-कार्याचा येथें उल्लेख करणें जरूर आहे.

भारताचा प्राचीन इतिहास, संस्कृति नि कलाकौशल्य ह्यांना वाहिलेलें 'न्यू इंडियन अँटिक्वेरी' ह्या नांवाचें एक भारदस्त इंग्रजी मासिक त्यांनी डॉ. कत्रे नि प्रा. गोडे ह्या दोन जाड्या विद्वानांचा सहकार संपादन करून कांहीं काळ चालविलें होतें. जगांतील विद्वानांस त्यामुळें निरनिराळ्या क्षेत्रांतील भारतीय श्रेष्ठत्वाची जाणीव होण्यास फार मोठी मदत झाली. एकट्या जर्मनीत ह्या मासिकाच्या दोनशें प्रती त्या काळीं जात असत. तशाच इतर देशांतील विद्वानांकडे कमीजास्त प्रमाणांत त्या मासिकाचे अंक नियमितपणें जात असत.

कर्नाटक-प्रकाशन संस्थेनें संशोधनाच्या दृष्टीनें झीज सोसून जे महत्त्वाचे ग्रंथ प्रसिद्ध केले, त्यांत जातां जातां कविवर्य माधव ज्युलियन् (माधवराव पटवर्धन) ह्यांच्या 'छन्दो-रचना' ह्या श्रेष्ठ ग्रंथाचा उल्लेख करणें जरूर आहे. तो संशोधनपर, भारदस्त परंतु अत्यंत उपयुक्त ग्रंथ प्रसिद्ध करण्याची जबाबदारी शिरावर घेण्यास त्या काळीं कोणीही तयार नव्हता; परंतु त्या ग्रंथाचें महत्त्व पटल्यामुळें त्याच्या प्रसिद्धीसाठीं मंगेशराव पुढें सरसावले ! नंतर त्या ग्रंथराजाचें मौलिकत्व लक्षांत घेऊन मुंबई विश्वविद्यालयानें लेखकांस पांच हजार रुपयांचें पारितोषिक देऊन त्यांचा गौरव केला !

भारदस्त त्याचप्रमाणें वाचकांच्या बुद्धिविकासास व विचारांस चालना देणारें एखादें साप्ताहिक आपल्या प्रकाशन-संस्थेतर्फे सुरू करावें असे विचार मंगेशरावांच्या मनांत घोळत होते. त्यांच्या संस्थेंत विद्वान् मंडळींचा अड्डा नेहमीं असायचा. त्या मंडळींत प्रसिद्ध इतिहास-संशोधक प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर ह्यांच्या सडेतोड नि मूलग्राही विचारसरणीकडे मंगेशरावांचें लक्ष वेधलें गेलें. शिवाय त्यांच्यामागें कांहींना कांहीं उद्योग लावून देण्याच्याही विचारांत ते होते. प्रा. शेजवलकर ह्यांनीं संपादकीय जबाबदारी स्वीकारण्याची तयारी

दाखविल्यावरून 'प्रगति' साप्ताहिक जन्मास आलें. आपल्या अवघ्या ३।४ वर्षांच्या कामगिरीनें ह्या साप्ताहिकानें आपलें नांव संस्मरणीय करून ठेविलें आहे.

अशा रीतीनें आपली 'कर्नाटक प्रकाशन-संस्था' सर्व बाजूंनीं समृद्ध करण्यासाठीं मंगेशराव जीवेंभावें झटले. अनेक विद्वानांस आश्रय देऊन त्यांनीं दर्जेदार वाङ्मय निर्माण केलें. हें सर्व करीत असतांना देशांत जी स्वातंत्र्यप्राप्तीची चळवळ त्या काळीं जोरांत चालू होती, तिच्याकडेही त्यांचें लक्ष होतें. एक स्वदेशप्रेमी मुद्रक-प्रकाशक ह्या नात्यानें अनेक वेळां धोके पतकरूनही त्यांनीं आपलें कर्तव्य बजावलें आहे. त्यांच्या मुद्रणविषयक जीवनांतील ही बाजू अत्यंत उज्ज्वल तशीच अविस्मरणीय नि अज्ञात आहे.

जातां जातां मंगेशरावांच्या ह्या कर्तव्यपालनासंबंधीं अज्ञात अशा १।२ घटनांचा येथें उल्लेख करावासा वाटतो. होमरूल-लीग नि स्वराज्य-सभा ह्या संस्थांतर्फे त्या काळीं स्वातंत्र्य-संग्राम चालू होता. त्या संस्थेचे चिटणीसद्वय होते उमर सोमानी नि शंकरलाल बँकर. मंगेशरावांबद्दल सर्वांच्या अंतःकरणांत विश्वासाची नि आदराची भावना होती. महात्मा गांधी असोत किंवा पं. जवाहरलाल नेहरू असोत; मंगेशरावांवर नि त्यांच्या कर्नाटक मुद्रणालयावर सर्वांचें निस्सीम प्रेम होतें. त्याला कारणही तसेंच होतें. रात्रीं अपरात्रीं जरूर तीं महत्त्वाचीं छपाईचीं कामें तेथें हुकमी छापून मिळत असत. स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं मोठमोठीं माणसें असीम त्याग करीत आहेत, मग आपण यथाशक्ति त्यांना नको का हातभार लावायला ? ह्या भावनेनें मंगेशराव वागत असत.

त्या काळीं होमरूल-लीग, स्वराज्य सभा, कॉंग्रेस, ह्यांसारख्या सरकारशीं उघड उघड विरोध करणाऱ्या संस्थांकडून येणारीं छपाईचीं कामें स्वीकारण्यास सहसा कोणी धजत नसे. कारण उघडच आहे. परंतु मंगेशरावांनीं धोक्याची पूर्ण जाणीव असतांही, सरकारविरोधी व सतत सरकारच्या डोळ्यांत सलणाऱ्या उपरोक्त संस्थांकडून येणारीं छपाईचीं कामें कधीं नाकारलीं नाहींत.

त्याचा परिणाम काय झाला ? सरकारच्या काळ्या-यादींत त्यांचें नांव ठळकपणें नोंदलें गेलें नि सरकारकडून व रेल्वे कंपनीकडून जीं पायद्याचीं विपुल कामें यायचीं तीं खाडकन बंद झालीं !

मंगेशराव त्या सरकारविरोधी संस्थांच्या कार्यकर्त्यांस वेळोवेळीं नि

परोपरीनें सांगत असत कीं, "बाबांनो ! हा चिंतेचा व त्यागाचा भार माझ्या एकट्यावर टाकूं नका. आणखी २।३ मुद्रणालयें गांठून कामाची विभागणी करा. सगळ्या सरकारी कोपाचा धनी मलाच एकट्याला करूं नका ! मला थोडीबहुत साथ देणारे आणखी कोणी ना कोणी आहेत, असें होऊं द्या !"

परंतु छे; ऐकतो कोण ? त्या काळीं ती जबाबदारी स्वीकारण्यास कोणीही तयार झाला नाहीं ! फार कशाला ? 'बँबे क्रॉनिकल' चें मुद्रणालय सुसंपन्न व राष्ट्रीय बाण्याचें होतें; परंतु त्याचे चालकही तो धोका पतकरायला तयार झाले नाहींत !

एवढ्यावरून मंगेशरावांनीं स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं त्या काळीं चालू असलेल्या चळवळींत एक स्वातंत्र्यप्रेमी मुद्रक ह्या नात्यानें कसकसा भाग घेतला, ह्याची आजच्या काळांतील लोकांना कल्पना करतां येईल.

त्यांच्या राजद्रोही हालचाली लक्षांत घेऊन सरकारकडून प्रेसच्या नांवें सिक्युरिटीदाखल त्यांच्याकडून दहा हजार रुपये घेण्यांत आले होते !

त्यांच्या ह्या राष्ट्रीय हालचालींचें स्वरूप पुढील १।२ घटनांवरून सहज लक्षांत येईल.

एकदां काय झालें कीं, होमरूल-लीगतर्फे 'अली अदर्स पिटिशन' ह्या नांवाची एक पुस्तिका कर्नाटक-मुद्रणालयाकडे मंगेशरावांच्या गैरहजेरींत छापण्यासाठीं आली. ती पुस्तिका तयार होत आली होती. तिचीं मुद्रितें तपासलीं जात होतीं. मंगेशरावांची त्यांच्याकडे सहज नजर गेली. वाचतां वाचतां त्यांना आढळून आलें कीं, ही पुस्तिका आपल्या मुद्रणालयांतून छापून बाहेर पडली तर आपले च आपल्या मुद्रणालयाचे बारा वाजायला मुळींच विलंब लागणार नाहीं. ती पुस्तिका तत्कालीन राजवटीच्या दृष्टीनें राजद्रोही लिखाणानें ओतप्रोत भरलेली होती. सेक्रेटरी शंकरलाल बँकर ह्यांच्याकडून ती पुस्तिका आलेली होती, व ती तांतडीनें छापून द्यायची होती. मंगेशरावांनीं तगबगीनें शंकरलाल बँकर ह्यांची भेट घेतली व त्यांना शांतपणें भावी धोक्याची कल्पना करून दिली; त्याचबरोबर उपायही सुचविला.

कोणता उपाय सुचविला ? मंगेशराव म्हणाले, "माझें सोडा; परंतु ह्या मुद्रणालयांत आज दोन अडीचशें माणसें काम करीत आहेत. तुमची

पुस्तिका माझ्या मुद्रणालयांतून बाहेर पडतांच मुद्रणालय बंद पडेल किंवा त्याचें काय होईल तें सांगतां येत नाहीं. त्यामुळें शेंकडों माणसांच्या पोटावर पाय येतील. तेव्हां ही आपत्ति टाळण्याचा एक मार्ग मी सुचवूं इच्छितों.

"मग झटपट सांगा ना काय तो मार्ग ! आम्हांला ती पुस्तिका तर लवकर प्रसिद्ध करायनीच आहे !"—बँकर निर्धारपूर्वक म्हणाले.

"मग असं करा. एकादा छोटासा छापखानेवाला गांठा. त्याचं मन वळवा. मी त्याला टाईप वगैरे देईन. मुद्रक ह्या नात्यानें आपण त्या छापखानेवाल्याचें नांव टाकूं. त्याचा छापखाना सरकारकडून जप्त केला जाईल. त्यासाठीं त्यानें तयार राहावें. त्याचें त्यामुळें जें कांहीं नुकसान होईल, त्याची भरपाई करून देण्याचीतुम्ही हमी घ्या म्हणजे झालें ! मात्र माझें होणारें तीन-साडेतीन लक्ष रुपयांचें नुकसान भरून देणें फार कठीण आहे ! आहे का हा मार्ग पसंत ?" मंगेशराव साशंक मुद्रेनें त्यांच्याकडे पहात म्हणाले.

"काय सांगूं ? कांहीं तरी केलं हें पाहिजेच. मी उमर सोमानी ह्यांस भेटून काय तें ठरवितों."

असें सांगून शंकरलाल बँकर तेथून तात्वडतोब सोमानी ह्यांस भेटण्यासाठीं गेले.

उमर सोमानी ह्यांस परिस्थितीची जाणीव होतांच ते तडकाफडकी बाहेर पडले. नळबाजार व श्रीअर रोडच्या बाजूस असलेला एक लहानसा मुस्लीम छापखाना त्यांनीं पाहिला. उमर सोमानी मन वळविण्यांत पटाईत होते. त्या छापखानेवाल्याचें जें कांहीं नुकसान होईल तें सर्व भरून देण्याचें व त्याच्या आणि त्याच्या कुटुंबियांच्या पोटापाण्याची सोय लावून देण्याचें त्यांनीं त्याला आश्वासन दिलें. तो छापखानेवाला सुदैवानें तयार झाला व दिलेला शब्द शेवटपर्यंत, म्हणजे संकटें समोर दिमत असतांही त्यानें अक्षरशः पाळला.

अपेक्षेप्रमाणें सर्व प्रकार घडून आले ! पुस्तिका बाहेर पडतांच त्या मुस्लीम छापखानेवाल्यास अटक करण्यांत येऊन त्याला शिक्षा ठोठावण्यांत आली व त्याचा छापखाना जप्त करून तो पांच हजार रुपयांस लिलांवानें विकून टाकण्यांत आला ! अशा रीतीनें त्याच्या धंद्याची विल्हेवाट लावून टाकण्यांत आली !

कांहीं झालें तरी त्याच्या पाठीशीं समर्थ माणसें होतीं; त्यामुळें तो

डगमगला नाहीं. आश्वासन दिल्याप्रमाणें त्या छापखानेवाल्याचें जें कांहीं नुकसान झालें त्याची भरपाई करून देण्यांत आली, एवढेंच नव्हे तर त्याला बाँबे कॉनिकल प्रेसमध्यें चांगली नोकरी मिळवून देऊन त्याची पोटापाण्याची ददात मिटविण्यांत आली.

जालियनवाला-बाग कत्तलीची आठवण करून देणारी दुसरी एक घटना. आजच्या काळावरून त्या काळांतील गंभीर परिस्थितीची यथायोग्य कल्पना करतां येणार नाहीं. त्या कत्तलीसंबंधीं चौकशी करून अहवाल सादर करण्यासाठीं काँग्रेसतर्फे एक समिति नेमण्यांत आली. चौकशी केल्यानंतर त्या समितीनें आपला अहवाल तयार केला. दुसऱ्या बाजूनें सरकारी यंत्रणाही अहवाल तयार करण्याच्या उद्योगांत होती. काँग्रेसचा जालियनवाला बाग रिपोर्ट, सरकारी रिपोर्टापूर्वी बाहेर पडायला हवा होता. तो वेळेवर छापून देण्याची जबाबदारी स्वीकारून सरकारचा रोष स्वतःवर ओढवून घेण्यास त्या काळीं कोण तयार होणार?

प्रसंगाचें गांभीर्य नि त्यामागील धोका ओळखूनही ती जबाबदारी स्वीकारण्यासाठीं, त्या काळीं मंगेशराव धडाडीनें पुढें सरसावले! धन्य त्यांच्या धीरोदात्तपणाची, कर्तव्यपरायणतेची नि राष्ट्रभक्तीची!

बिल्कुल न डगमगतां त्यांनीं तो अहवाल अगदीं वेळेवर छापून दिला. महात्मा गांधी, पं. जवाहरलाल नेहरू, ह्यांच्यासारख्या थोर पुढाऱ्यांच्या प्रेमादरास ते पात्र होऊन राहिले होते, ते उगाच नाहीं!

स्वतंत्र बाण्याचा नि राष्ट्रीय वृत्तीचा मुद्रक-प्रकाशक आपल्या राष्ट्राची सेवा नाना प्रकारें करूं शकतो, ह्याचें हें एक ठळक उदाहरण आहे. त्या काळीं मंगेशरावांनीं हा जो विस्तवाशीं खेळ चालविला होता, त्यांत त्यांचे हात भाजून पोळून कसे निघाले नाहींत? ही शंका कोणाच्याही मनांत येणें अगदीं स्वाभाविक आहे. त्याचें निराकरण करणें जरूर आहे.

त्या काळीं मुंबई सरकारच्या गृहखात्याचे सेक्रेटरी होते मॅक्सवेल साहेब. त्या नात्यानें त्यांचा अधिकार फार मोठा होता, हें काय सांगायला पाहिजे? त्यांची नजर सर्वत्र असे. सर्वांना त्यांचा दरारा जाणवत असे; परंतु मॅक्सवेल नि मंगेशराव ह्यांचे ऋणानुबंध कांहीं ना कांहीं कारणामुळें आत्यंतिक

जिव्हाळ्याचे नि आपुलकीचे होते. मंगेशरावांच्याठायीं असलेल्या शालीनता, स्वदेशप्रेम नि धडाडी ह्यासारख्या गुणांचा पगडा त्या उमद्या अधिकाऱ्याच्या मनावर कायमचा बसलेला होता. थोडक्यांत सांगायचें म्हणजे मॅक्सवेलसारख्या वरिष्ठ अधिकाऱ्याशीं मैत्रीचें नातें जोडण्यांत मंगेशराव यशस्वी ठरले होते.

त्यामुळें काय झालें? कर्नाटक-मुद्रणालयाविरुद्ध मॅक्सवेलसाहेबांच्या गृह-खात्याकडे (होम डिपार्टमेंट) दरमहा तक्रारी जावयाच्या; आणि त्या साहेब-मजकुरांच्या दप्तरीं दाखल होऊन त्यांची तेथेंच समाप्ति व्हावयाची!

एकदां मंगेशराव मॅक्सवेलसाहेबांच्या भेटीसाठीं गेले. त्यांचे दहा हजार रुपये सरकारच्या खजिन्यांत पडून राहिले होते. ती रक्कम शक्य तर परत मिळवावी, हा ती भेट घेण्यांत त्यांचा मुख्य उद्देश होता.

मंगेशरावांनीं तो प्रश्न काढतांच साहेब सद्भावनापूर्वक म्हणाले, "तुमच्या विनंतीप्रमाणें ती रक्कम मी परत करूं शकतों; परंतु तसें करण्यांत तुमच्या दृष्टीनें फार मोठा धोका आहे, ह्याची कल्पना आहे का तुम्हांला? छपाईच्या बाबतींत (राजद्रोही मजकूर) तुमच्याकडून सतत गुन्हे घडत असतात; त्यामुळें तुमच्याकडून कदाचित वीस हजार रुपये सिक्युरिटीदाखल मागितले जातील! तेव्हां आहे तें ठीक आहे. सध्यां त्या पैशांच्या लोभांत सांपडूं नका! ह्या निमित्तानें तुमच्या हिताच्या दृष्टीनें दुसरी एक सूचना मी करूं इच्छितों. तुम्ही जपून वागत जा. अधिकारी-वर्गाच्या किंवा सरकारच्या डोळ्यांत भरण्यासारखी कोणतीही गोष्ट करूं नका. तुमचें अकल्याण मला करायचें नाहीं! माझ्या हातीं तुम्ही सुरक्षित आहांत असें समजा!"

(You are safe in my hands!)

तो विचित्र काळ, त्या काळांतील तें संशयी वातावरण व मंगेशरावांच्या मुद्रणविषयक हालचाली ह्या सर्व गोष्टी दृष्टीसमोर ठेवून आपण विचार करूं लागलों, म्हणजे मंगेशरावांनीं मॅक्सवेलसाहेबांच्या मनावर केवढी मोहिनी घालून ठेविली होती, ह्याची आपणांस कल्पना करतां येईल!

अशा रीतीनें मंगेशराव उणींपुरीं पंचवीस वर्षे मुद्रण-प्रकाशन व्यवसायांत मोठ्या इतमामानें नि स्वतंत्र बाण्यानें वावरले. प्रकाशन-क्षेत्रांत

त्यांनीं कांहीं नव्या परंपरा निर्माण केल्या व आपल्या कर्तबगारीच्या बळावर त्या व्यवसायांत पडणाऱ्यांसाठीं उच्च व अनुकरणीय आदर्श निर्माण करून ठेविला.

शिक्षण-कार्याकडे मंगेशरावांचें सतत लक्ष लागून राहिलेलें असे. असंख्य विद्यार्थ्यांस त्यांनीं परोपरीनें मदत केली. बंकीकोट ही त्यांची जन्मभूमि. तेथें प्राथमिक नि दुय्यम शिक्षण संस्था, तसेंच अतिथि-गृह स्थापन करण्यासाठीं त्यांनीं हजारों रुपये खर्च केले. तसेंच कुमठा येथें स्थापन झालेल्या कॉलेजला त्यांनीं पंधरा हजारांची देणगी दिली. त्याचप्रमाणें इतर अनेक शैक्षणिक नि धार्मिक संस्थांना त्यांच्या औदार्याचा हातभार लागलेला आहे.

मनुष्य आपल्या उद्योगधंद्यांत कितीही हुशार व कर्तबगार असला, तरी तो गृहसंसारांतील नात्याच्या बंधनांनीं जखडलेला असतो. संसारांतील चढउतार त्याच्या मनाला चटके देऊं शकतात. मंगेशरावांचे एकुलते एक नि कर्ते चिरंजीव वयाच्या तेविसाव्या वर्षीं एकाएकीं निधन पावले. लागोपाठ मनाला उद्विग्न करणाऱ्या दुसऱ्याही कांहीं आपत्ति त्यांच्यावर कोसळल्या! अशा परिस्थितींत दुर्दैवानें त्यांच्या मनांत वैराग्य उत्पन्न झालें! एवढा व्याप व जिवाचा आटापिटा करायचा तो कोणासाठीं? हेच विचार त्यांच्या मनांत सतत घोळूं लागले!

ह्या निराशाजनक विचारांनीं मंगेशरावांच्या मनाची कायमची पकड घेतली आणि शेवटीं नावारूपास आलेली कर्नाटक-प्रकाशन-संस्था व कर्नाटक-मुद्रणालय १९४५ सालीं केशव भिकाजी ढवळे प्रकाशन संस्थेस विकून, ह्या व्यवसायांतून ते निवृत्त झाले.

कविवर्य रे. नारायण वामन टिळक हे मित्रांच्या सहवासांत कार्यकारणपरत्वें आले होते. ते गुणांचे भोक्ते होते. त्यांना ह्या मित्रांच्या सहवासामुळें काव्यस्फूर्ति झाली आणि त्याचवेळीं, 'खरोखर लोक-मित्र ते' हें त्यांचें छोटें परंतु रसाळ काव्य जन्माला आलें. त्याची सुरुवात—

" खरोखर लोक-मित्र ते । सेवक आपण सकळ जनांचे
स्वर्मी ठाऊक अन्य न अपुलें । ज्यांस जगीं नातें !"

अशी आहे तर—

" जनसेवा ही ईश्वर-सेवा । याविण दुसरा धर्म न ठावा
प्रेम आणखी देव दिसावा । एक सदा ज्यातें" ॥

ह्या आहेत, त्या काव्याच्या शेवटच्या पंक्ति.

एवढ्यावरून काशिनाथ रघुनाथ मित्र ह्यांच्याठायीं असलेल्या गुणसंपदेची कल्पना करतां येईल.

सावंतवाडी संस्थानांतील आजगांव ह्या गांवीं काशिनाथपंतांचा जन्म ता. २ नोवेंबर १८७१ रोजीं झाला. वडील व्यापारउदीम करून कुटुंब-पोषण करीत असत. घरांत आईवडील व चार भावंडें. गरिबीचा संसार. तीन बंधु व एक बहीण. वडील बंधु नागपूर येथें शिक्षणासाठीं गेले. काशिनाथ ह्यांचें प्राथमिक शिक्षण आजगांवला झालें. वडील वारल्यामुळें त्यांना मनांत फार असूनही इंग्रजी शिक्षण घेतां आलें नाहीं. आपली आई, धाकटे बंधु दामोदर व बहीण ह्यांच्यासह पोटापाण्याचा उद्योग पहाण्यासाठीं १८८८ सालीं काशिनाथपंत वेंगुर्ल्यास आले. तेथें एका प्राथमिक शाळेंत त्यांना शिक्षकाची नोकरी पतकरावी लागली. त्या काळीं प्राथमिक शिक्षकाला मासिक पगार मिळत असे सहा रुपये ! तेवढ्यांत चार माणसांचें पोट कसें भरणार ? उत्पन्नांत वाढ करण्यासाठीं काशिनाथपंत मिळतील तेवढ्या शिकवण्या करूं लागले.

ह्या पोटाचा उद्योग चालू असतां इंग्रजी शिक्षण संपादन करण्याची मनाला लागून राहिलेली ओढ त्यांना स्वस्थ बसूं देत नव्हती. वेंगुर्ल्यांत इंग्रजी शाळा होती; परंतु तिचा लाभ कसा घेणार ? मग त्यांनीं १।२ शिक्षकांची मनधरणी करून आपल्या गुणांच्या बळावर त्यांचें प्रेम संपादन केलें. काशिनाथपंतांची शिकण्यासंबंधींची आतुरता पाहून त्यांनाही वेळ मोडून मनापासून शिकविण्याची प्रेरणा झाली.

काशिनाथपंतांना वाचनाचा मनस्वी नाद होता. तेथील वाचनालयांत उपलब्ध होणारीं सारीं पुस्तकें त्यांनीं वाचून काढिलीं. केसरी, सुधारक ह्या पत्रांचें वाचन मनापासून व विचारपूर्वक करावयाचें. त्यामुळें त्यांची विचारशक्ति जागी होऊन तिला धार चढूं लागली.

येंगुलें येथील त्यांचें ४।५ वर्षांचें वास्तव्य हें धडपडीचें व विचारमंथनाचें होतें. सभोंवारच्या सामाजिक परिस्थितीची त्यांना तीव्रतेनें जाणीव होऊं लागली. आपण कांहीं ना कांहीं हालचाल केली पाहिजे, असें त्यांना वाटूं लागलें. तळमळ स्वस्थ बसूं देईना. त्याजबरोबर काय करावें हें समजेना.

शेवटीं मुंबईंत गेल्यावर मार्ग गांपडेल असें वाटून काशिनाथपंत १८९२ सालीं मुंबईंत आले. मनांत खूप कोलाहल चाललेला होता. स्वतःच्या नि इतरेजनांच्या स्थितीबद्दल मनांत असंतोष निर्माण होऊं लागला होता. स्त्रियांच्या असहाय्यतेची व त्यांच्याठायीं वास करणाऱ्या गाढ अज्ञानाची जाणीव मनाला टोंचूं लागली होती.

स्वतःच असहाय्य असलेला माणूस दुसऱ्याची असहाय्यता कशी दूर करणार? काशिनाथपंत मुंबईंत आले व प्रथम नोकरीच्या शोधास लागले. त्यांना कुठें ना कुठें आपला जम बसवायचा होता. त्यासाठीं त्यांना २।३ वर्षे सतत धडपड करावी लागली. कधीं शिक्षकाची, तर कधीं कारकुनाची नोकरी करतां करतां त्या काळीं मुंबईंत प्रसिद्ध होणाऱ्या 'प्रभाकर' पत्राच्या चालकांशीं त्यांनीं संबंध जोडला व तेथें 'रिपोर्टर' ह्या नात्यानें ते वावरूं लागले.

आता त्यांचा संबंध प्रत्यक्ष लेखनाशीं आला. आपण लिहूं शकतों, असा आत्मविश्वास त्यांना वाटूं लागला. वर्तमानपत्री जगांत वावरत असतां आपण एकादें मासिक आणि तेंही सार्धेसुधें नव्हे तर सचित्र मासिक काढावें, वाचकांचें मनोरंजन करतां करतां त्यांना ज्ञानाचे घुटके पाजावे, असें वाटूं लागलें.

अशा प्रकारची आकांक्षा मनांत बळावण्याला आणखी एक कारण झालें. त्यांच्या ११२ परिचितांनी 'विद्यार्थी-मित्र' ह्या नांवाचें विद्यार्थीवर्गांत जागृति घडवून आणण्याच्या हेतूनें एक मासिक सुरू केलें होतें. मित्र-कर्तव्य ह्या नात्यानें त्या मासिकास वर्गणीदार मिळवून देणें, व शक्य त्या मार्गांनीं त्याचा प्रचार करणें, त्याना इष्ट वाटूं लागलें. कवि केशवसुत त्या मासिकासाठी

आपल्या सुबोध कविता मधून मधून देत असत. ह्याच काळांत त्यांचा ह्या श्रेष्ठ कविवर्यांशीं परिचय घडून आला असावा.

मासिक सुरू करावयाचें तर लेखनसहाय्य नको का? तें कुठून मिळवायचें? त्यासाठीं काशिनाथपंतांनीं प्रथम गुजराती व नंतर बंगाली भाषेचा अभ्यास केला. दोन्ही भाषांतील मासिकांतून प्रसिद्ध होणाऱ्या, त्याचप्रमाणें मनोरंजक नि बोधप्रद वाटणाऱ्या लघुकथांचीं ते भाषांतरें करूं लागले.

काशिनाथपंत आरंभकाळांत ठाकुरद्वारवरील कामत कंपनीच्या चाळींत रहात असत. त्यांच्या शेजारीं बाळकृष्ण रामचंद्र कुळकर्णी ह्या नांवाचे एक वाङ्मयप्रेमी गृहस्थ रहात असत. ते पोस्ट-खात्यांत नोकरी करीत असत. त्यांनींही बंगाली भाषेवर चांगलें प्रभुत्व संपादन केलें. मासिक सुरू करण्याचा मित्रांचा बेत त्यांना आवडला व त्यांनीं त्या कार्यास लेखनाच्या दृष्टीनें निरपेक्षपणें सहाय्य करण्याचें कबूल केलें.

लहानसेंच मासिक काढायचें; परंतु तें सुबोध, सुंदर व मनोरंजक असावें हें ध्येय त्या आरंभकाळांत मित्रांनीं आपल्या दृष्टीसमोर ठेविलें होतें.

मासिकाचें नांव काय ठेवावें ह्या बाबतींत बरीच 'भवति न भवति' होऊन शेवटीं 'मासिक मनोरंजन' हें नांव ठेवण्यांत आलें. पहिला सोळा पानी अंक जानेवारी १८९५ मध्यें प्रसिद्ध करण्यांत आला.

आरंभीं ह्या मासिकाची वार्षिक वर्गणी अवघी आठ आणे ठेवण्यांत आली आणि त्यांतही सवलत ठेवण्यांत आली. ही वर्गणी दर तिमाहीस दोन आणेप्रमाणें चार हप्त्यांत पूर्ण करायची!

संपादकांनीं पहिल्याच अंकांत ह्या उपक्रमाचें उद्दिष्ट पुढीलप्रमाणें जाहीर केलें होतें:- "आम्हीं कशाकरितां अवतार धारण केला आहे व पुढें काय करणार, हें स्वमुखानें वर्णण्यापेक्षां आमच्या सर्वांगाचें परिशीलन केल्यानें हळूहळू आमचे उद्देश आमच्या प्रेमळ आश्रयदात्यांच्या लक्षांत येतील, असें आम्हांस वाटतें. आम्हांला जें काय करायाचें आहे तें सवडीसवडीनें आम्ही करून दाखवूं, एवढेंच ह्या ठिकाणीं मागण्याची परवानगी घेतों. पुस्तक लोकांस आवडेलसें करण्याचे कामीं आमच्याकडून बिल्कुल कसूर होणार नाहीं, हें खचित."

स्त्री-पुरुष वाचकांचें मासिक मनोरंजन करण्याच्या कामीं बिल्कुल कसूर

करायची नाहीं हें होतें आरंभकाळांतील ध्येय. त्याचबरोबर पहिल्याच अंकांत वाचकांस विश्वासांत घेऊन आपण जें आश्वासन दिलें तें अक्षरशः पालन करणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे, ह्या जाणिवेनें काशिनाथपंत शेवटपर्यंत वागले व त्यासाठीं त्यांनीं अहोरात्र धडपड केली.

छोट्या मासिक मनोरंजनाच्या वर्गणीदारांचा आंकडा पहिल्या वर्षअखेर दोन हजारांपलीकडे गेलेला होता. त्यामुळें संपादकांचा हुरूप वृद्धिंगत होत गेला.

पहिल्या अंकापासून त्यांनीं लिथोवरील चित्रें द्यायला सुरुवात केली. त्या काळीं 'हिंदु-पंच,' 'मुंबई-पंच' वगैरे सचित्र साप्ताहिकें होतीं. परंतु 'मासिक मनोरंजन' हें त्या काळीं पहिलेंच सचित्र मासिक होतें. पहिल्या अंकांतील चित्रांपैकीं एक चित्र होतें बाला-वृद्ध विवाहाच्या दुष्परिणामासंबंधीं.

पहिल्या वर्षी व तदनंतरही कांहीं काळ मासिकांतील बहुतेक मजकूर काशिनाथपंत व त्यांचे सहकारी कुळकर्णी हेच लिहीत असत. वाचक, कवि आणि लेखक ह्यांचें लक्ष वेधून घेण्यासारखी कामगिरी पार पाडण्याची जबाबदारी आपल्या शिरावर आहे, ह्या गोष्टीचा विसर संपादकांस कधींही पडला नाहीं. मासिकाचें अंतर्बाह्य स्वरूप जास्तींत जास्त सुंदर व आकर्षक व्हावें, ह्यासाठीं ते फार जपत असत. हें मासिक म्हणजे आपली कसोटी आहे, त्या कसोटीला आपण रतीभरही कमी भरतां कामा नये, ह्या गोष्टीचें स्मरण त्यांना हरघडी होत असे.

मित्रांच्या मनावर आगरकरांच्या शिकवणुकीचा पगडा आरंभापासून बसलेला होता. स्त्रियांचें जीवन सुधारलें पाहिजे, त्यांचा घरादारांतील नि समाजांतील दर्जा वाढला पाहिजे, तो तर सर्व सुधारणांचा पाया आहे. त्या दृष्टीनें गु. अण्णासाहेब कर्वे ह्यांच्या स्त्रीशिक्षण-कार्याकडे त्यांचें सदैव लक्ष लागून राहिलेलें असे.

'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः' हें आपल्या आवडत्या मासिकाचें ध्येय-वाक्य त्यांनी आरंभापासून ठरवून टाकलें होतें व प्रत्येक अंकावर त्याचा ठसा उमटलेला असे.

कोणतीही गोष्ट असो; तिच्यासाठीं तुम्हीं जीवनसर्वस्व अर्पण करण्याचें ठरविल्यानंतर ती कां नाहीं नांवारूपास येणार ? आपल्या मासिकाचा दर्जा अंतर्बाह्य वाढला पाहिजे, ह्यासाठीं सतत २०।२५ वर्षें काशिनाथपंतांनीं आपल्या जिवाचें रान केलें ! रात्रंदिवस तोच एकमेव विचार डोक्यांत घोळावयाचा. लेखक-मित्र जोडले, त्यांच्या लहरी सांभाळल्या, त्यांच्या मार्गांतील अडचणी दूर केल्या; ज्या ज्या परीनें त्यांच्यावर प्रेमाची पाखर घालतां येईल, त्या त्या परीनें त्यांच्यासभोंवार आपुलकीचें वातावरण निर्माण केलें.

हें सर्व कशासाठीं ? मासिक मनोरंजनाचें महत्त्व वाढविण्यासाठीं. 'मनोरंजन' हें मित्रांचें खरोखर मनोविनोदन होतें. देवाचा निस्सीम भक्त नामस्मरणांत जीवनसर्वस्व मानून सदासर्वकाळ त्यांतच दंग होऊन रहात असतो, तसाच प्रकार होता मनोरंजनाच्या बाबतींत मित्रांचा. तो त्यांचा देव होता, तेथेंच त्यांचा भाव जडला होता व तेंच त्यांचें सर्वस्व होतें.

लेखक–मित्रांचा गोतावळा जवळ केल्यानंतर पुढील महिन्यांत किंवा पुढील वर्षी कोणत्या नवीन सुधारणा घडवून आणावयाच्या ह्यासंबंधीं त्यांच्याशीं ते विचारविनिमय करीत असत. जे लेखक–मित्र जवळ नसत, त्यांना पत्रें पाठवून त्यांचा सल्ला ते विचारीत असत. सर्वांच्या मतांचा नि सल्लामसलतीचा अंदाज घेतल्यानंतर शक्याशक्यतेचा विचार करून ते आपलें धोरण निश्चित करीत असत. असा हा उपक्रम सतत वर्षानुवर्ष चालू असे.

त्या काळांत ( १८९५ ते १९२० ) जे जे नामवंत लेखक व कवि होऊन गेले, त्यांपैकीं एकालाही त्यांनीं सोडलें नाहीं. लेखक व कवि ह्यांच्याशीं वागण्याची व त्यांना आपलेपणाच्या नात्यानें मारून टाकण्याची त्यांची पद्धति नमुनेदार होती. त्यांच्या तावडींतून सहसा कोणीही सुटूं शकला नाहीं. श्रीपाद कृष्णांचे 'सुदाम्याचे पोहे,' किंवा इतर मुबलक लेखन प्रसिद्ध झालें तें ह्या मासिकांतून. वामन मल्हारांची 'रागिणी' कादंबरी वाचकांस प्रथम लाभली ती मनोरंजनांतून. आणखी अशीं किती म्हणून नांवें सांगावीं ?

केशवसुत, गोविंदाग्रज, रेव्ह. टिळक, श्रीमती लक्ष्मीबाई टिळक, विनायक, घाटे, टेंकाडे, नागेश वगैरे तत्कालीन प्रमुख व आज चिरस्मरणीय होऊन राहिलेल्या सर्व कविश्रेष्ठांची कविता मित्रांच्या मनोरंजनांतून प्रकाशांत आलेली आहे.

अशा रीतीनें 'मित्र' हे लेखकांचे, कवींचे, मराठी भाषेचे, महाराष्ट्र-वाङ्मयोपासकांचे, स्त्रीवर्गाचे, सुधारणावाद्यांचे व राष्ट्रोद्धारार्थ झटणाऱ्यांचे मित्र होते. आणि मित्र होते म्हणून त्यांना त्या काळांत वाङ्मय-प्रकाशनाच्या दृष्टीनें कितीतरी अभिनंदनीय कार्य पार पाडतां आलें.

मित्रांचें लक्ष सतत प्रगतीकडे लागून राहिलेलें असे. सज्जनसहवासामुळें च सतत सन्मित्र लेखकांच्या गोतावळ्यांत वावरण्याची सुसंधी मिळाल्यामुळें काशिनाथपंतांच्याठायीं मासिकाचें संपादन करण्यासंबंधीं साराभार दृष्टि आलेली होती. ज्ञान आणि मनोरंजन हें आपल्या मासिकाचें ध्येय आहे व त्या ध्येयानुरूप प्रत्येक अंकाची अंतर्बाह्य सजावट झाली पाहिजे, ह्या गोष्टीचा विसर त्यांना कधींही पडला नाहीं.

आपल्या पंचवीस वर्षांच्या संपादकीय कारकीर्दीत मित्रांनीं कितीतरी नवीन उपक्रम सुरू केले. प्रत्येक लेख मनोरंजक तसाच बुद्धिवर्धक असावा. स्वयंपाकघरांत वावरणाऱ्या स्त्रीवर्गालाही मासिक चटकदार व वाचनीय वाटावें ही असे त्यांची संपादकीय दृष्टि. डोक्यावरून जाणाऱ्या लेखांस ते आपल्या मासिकांत कधींही स्थान देत नसत. लघुकथा, चालू कादंबरी, कविता, विनोदी चुटके, प्रवास-वर्णन, चरित्र, सामाजिक नि राजकीय घडामोडी वगैरे सर्व महत्त्वाच्या विषयांस मनोरंजनांत स्थान असे; परंतु त्यांनीं त्या काळी प्रथमच सुरू केलेल्या एका नवीन सदराचा येथें उल्लेख केल्याशिवाय रहावत नाहीं. 'साहित्य-समालोचन' हेंच तें सदर होय. हें सदर सर्वांगसुंदर, माहितीपूर्ण नि वाचनीय व्हावें, ह्यासाठीं त्यांनीं कसकसे प्रयत्न करावे? त्यासाठीं अनेक नामांकित इंग्रजी, गुजराती, बंगाली, हिंदी, तामीळ वगैरे भाषांतील मासिकें ते वर्गणी भरून मागवीत असत. त्याचप्रमाणें त्या त्या भाषेंतील श्रेष्ठ दर्जाच्या साहित्यिकांकडे तीं मासिकें सुपूर्द करीत असत. ही निवड ते कसोशीनें करीत असत. तामीळ विभाग सुप्रसिद्ध संदेशकार अच्युतराव कोल्हटकर हे सांभाळीत असत. हें आजच्या काळांतील फार थोड्या लोकांना माहीत असेल.

विलायतेंतील मासिकें नाताळानिमित्त खास अंक प्रसिद्ध करीत असत. त्यावरून आपणही आपल्या मासिकाचा सुंदर व भरगच्च दिवाळी अंक काढून महाराष्ट्रीय वाचकांच्या दिवाळीच्या आनंदांत भर घालावी, ही पहिली कल्पना

काशिनाथपंतांनी, १९०९ सालीं त्यांनी आपल्या मासिकाचा पहिलावहिला दिवाळी अंक प्रसिद्ध करून वाचकवर्गाला थक्क करून सोडलें! हा उपक्रम त्यांनी शेवटपर्यंत चालू ठेविला. कधीं कधीं ते वसंत अंक काढीत असत. दरबार खास अंक, आगरकर खास अंक, वगैरे त्या काळांतील त्यांचे खास अंक गाजलेले आहेत.

वर्गणीदारांस दर वर्षी एक किंवा दोन सुंदर पुस्तकें बक्षीस देण्याचें एक नवीन टूम सुरू करून वर्गणीदारांच्या संख्येंत त्यांनीं वाढ करविली. हीं बक्षिसादाखल वाटली जाणारीं पुस्तकें साधीसुधी व किरकोळ स्वरूपाचीं नसत. 'आमच्या आयुष्यांतील आठवणी' ले. रमाबाई रानडे किंवा 'आत्मवृत्त' ले. प्रो. धों. के. कर्वे यांसारख्या बक्षिसादाखल दिलेल्या पुस्तकांनीं मराठी वाङ्मय-वाटिकेला आजकाल केवढी शोभा आलेली आहे बरें? त्या पुस्तकांचा मनोहारी सुगंध आजही असंख्य वाचकांच्या मनांत दरवळत राहिलेला आहे, नाहीं का?

लेखकांस व कवींस यथाशक्ति मोबदला देणें, हें आपलें एक पवित्र कर्तव्य आहे, असें काशिनाथपंत मानीत असत व लेखक–कवि यांच्या गरजा लक्षांत घेऊन आपलें धोरण ठरवीत असत. तसेंच त्यांना यथाशक्ति मोबदला पोहोंचता करीत असत.

आपल्या मासिकाचें अंतरंग शक्य तेवढें सजविण्यासाठीं मित्रांची सतत धडपड चाललेली असे म्हणून सांगितलें. त्याचप्रमाणें बाह्यांगाच्या सजावटीकडेही त्यांचें बारकाईनें लक्ष असे. जसे लेखक व कवि, त्याचप्रमाणें चित्रकार नि फोटोग्राफर. प्रकाशनक्षेत्रांत तेही महत्त्वाचे घटक आहेत, ह्याची जाणीव मित्रांना आरंभापासून होती. तत्कालीन सर्व नामवंत कलावंतांशीं त्यांनीं सलगीचे संबंध जोडले होते. आपलें सचित्र मासिक सर्वांगसुंदर व्हावें, हाच त्यांत त्यांचा उद्देश होता. मासिकाचें मुद्रण मनाजोगें व्हावें, ह्यासाठीं अनेक मुद्रणालयें त्यांनीं बदललीं आणि शेवटीं ते निर्णयसागर मुद्रणालयांत स्थिरावले. तेथें मासिक मनोरंजनाची छपाई शेवटपर्यंत म्हणजे स्वतःचें मुद्रणालय स्थापन होईपर्यंत चालू होती; याचें कारण उघडच आहे.

अशा रीतीनें कांहीं वर्षे लोटल्यानंतर मासिक मनोरंजनाच्या जोडीला

आपण उपयुक्त, मनोरंजक नि ज्ञानसंवर्धक ग्रंथांचेंही प्रकाशन करावें असें काशिनाथपंतांना वाटूं लागलें. त्या कार्यांत अनेक नामवंत लेखकांचा त्यांना सहज सहकार मिळण्याची शक्यता आतां निर्माण झाली होती.

त्यासाठीं हुकमी व मालकीच्या मुद्रणालयाची जरूरी त्यांना भासूं लागली. आपल्या कांहीं मित्रांकडून, तसेंच डिपॉझिट-स्कीम योजनेच्या द्वारें जरूर त्या भांडवलाची जमवाजमव करून त्यांनीं आपल्या मनोरंजन मुद्रणालयाची स्थापना केली. ह्या मुद्रणालयांतून नीटनेटकें नि सुबक काम बाहेर पडलें पाहिजे, तेथें नांव ठेवायला जागा रहातां कामा नये, ह्याची दक्षता त्यांनीं बाळगली होती.

ह्या मुद्रणालयाची उभारणी करण्यांत आरंभापासून निर्णयसागरचे मालक तुकारामशेठ नि पांडुरंगशेठ ह्यांनीं त्यांना शक्य तेवढें उत्तेजन व सहकार दिला. कोणत्याही बाबतींत आखडता हात घेतला नाहीं, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें कर्नाटक मुद्रणालयाचे आद्य संस्थापक नि मालक गणपतराव कुलकर्णी (मंगेशरावाचे वडील बंधु) ह्यांचाही सहकार त्यांना लाभला होता.

ग्रंथ-प्रकाशनासाठीं मित्रांनीं 'मनोरंजक ग्रंथ-प्रसारक मंडळी' ह्या नांवाची एक प्रकाशन-संस्था स्थापन केली व एकाहून एक सरस अशीं शंभराच्यावर पुस्तकें प्रसिद्ध केलीं. ह्या मुद्रणालयांतून प्रसिद्ध झालेलें पहिलें पुस्तक 'आत्मोद्धार'-निग्रो सुधारकाग्रणी बुकर टी-वॉशिंग्टन, लेखक-नागेश वासुदेव गुणाजी, हें असावें, असा आमचा समज आहे.

धाकट्या सूनबाई, प्रियंवदा, गुणसुंदरी, मृणालिनी, सरस्वती, माणिकबाग वगैरे, स्त्रीवर्गाच्या दृष्टीनें अत्यंत सोज्ज्वळ च वाचनीय कादंबऱ्या प्रसिद्ध करून, त्या काळांत स्त्रियांच्या मनाची जडणघडण करण्याची जी उदात्त कामगिरी मित्रांच्या प्रकाशन-संस्थेनें पार पाडिली, ती खरोखर बहुमोलाची होती, असें म्हटल्याशिवाय रहावत नाहीं.

सुप्रसिद्ध लेखक श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे मित्रांचीं विविध प्रकाशनें व त्यांनी त्या काळांत जें भरघोस यश मिळविलें त्याचा उल्लेख करून आपल्या एका लेखांत म्हणतात---"त्यांच्या छापखान्यांतून छापून निघालेलीं पुस्तकें,

छपाई, बांधणी, व सुबकपणा इत्यादि बाबतींत निर्णयसागरसारख्या जुन्या व नांवाजलेल्या छापखान्यांतून निघणाऱ्या पुस्तकांशीं बरोबरी करण्यास समर्थ आहेत, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं....त्यांच्या यशाची गुरुकिल्ली बौद्धिक गुणांत नसून नैतिक गुणांत दिसून येते. स्वीकृत कार्याविषयीं निस्सीम आस्था व तें पार पाडण्याच्या कामीं विलक्षण चिकाटी, तसेंच स्वकार्यावरील असीम निष्ठा हे त्यांचे प्रमुख गुण होते."

काशिनाथपंतांनीं आपल्या आवडत्या मासिकासाठीं व उपयुक्त ग्रंथप्रकाशनासाठीं हुकमी नि मालकीच्या मुद्रणालयाची स्थापना केली खरी; परंतु अखेर तीच त्यांना सर्वपरीनें तापदायक झाली. मोठ्या खेदाची गोष्ट आहे ही! मुद्रणालयांतून आकर्षक नि सुंदर प्रकाशनें बाहेर पडूं लागलीं, त्यामुळें त्यांच्याकडे उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणांत छपाईचीं कामें येऊं लागलीं. तीं वेळच्यावेळीं पार पाडणें जरूर होतें. काशिनाथपंत श्रमविभागणीच्या तत्त्वाचे पुरस्कर्ते होते. तें तत्त्व त्यांनीं मासिकाच्या बाबतींत अंमलांतही आणिलें होतें.

परंतु छपाईचीं कामें झपाट्यानें वाढूं लागलीं. त्या कामांकडे दुर्लक्ष करून चालण्यासारखें नव्हतें. काशिनाथपंतांचा बहुतेक वेळ त्यांत खर्च व्हायचा. मनोरंजन मासिक हें तर आत्यंतिक जिव्हाळ्याचें! त्यांच्याकडे लक्ष पुरविल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे.

अशा परिस्थितींत त्यांची ओढाताण सुरू झाली. जेवणखाण, फिरणें सवरणें ह्या प्रकृतीच्या दृष्टीनें आवश्यक गोष्टींकडे त्यामुळें दुर्लक्ष होऊं लागलें! रोज कशाची ना कशाची तरी चिंता, हा त्यांच्या जीवनाचा स्थायीभाव होऊं लागला! खरोखर ही घटना दुर्दैवी होती; परंतु त्या जाळ्यांत ते अडकले गेले होते आणि शेवटीं त्याचा जो कांहीं अनिष्ट परिणाम व्हायचा तो झालाच!

मासिक मनोरंजनाचा नि ग्रंथ-प्रकाशनाचा पसारा दिवसेंदिवस वाढत चालला, त्याबरोबर मित्रांच्या शिरावरील चिंतेचा भारही वाढत गेला. मुद्रणालयाचा वाढता व्याप सांभाळावयाचा, मासिक मनोरंजनाचा दर्जा अधिकाधिक वाढत जावा म्हणून जपायचें आणि ग्रंथ-प्रकाशन दर्जेदार

व्हावें म्हणून सतत धडपडायचें। अशा ह्या तिन्ही जबाबदाऱ्या मित्रांना सांभाळाव्या लागत होत्या.

पंचवीस वर्षांच्या काळांत काशिनाथपंतांनीं मासिक मनोरंजनांत कितीतरी उपयुक्त सुधारणा घडवून आणिल्या. अंकाचीं पानें सोळांवरून आस्ते आस्ते वाढवीत त्यांची संख्या शंभरांपर्यंत आणून ठेवण्यांत आली. त्या मानानें वर्गणींत वाढ करण्यांत आली नाहीं. ती होती वार्षिक चार रुपये. त्यांतच भले मोठे दिवाळी अंक व इतर खास अंक वर्गणीदारांस मिळावयाचे आणि शिवाय बक्षिसादाखल एकादें सुंदर पुस्तक!

हा सारा कारभार तोट्यांत चालावयाचा; परंतु बडोद्याचे गुणग्राही महाराज श्रीमंत सयाजीराव गायकवाड ह्यांच्यासारख्या उदार संस्थानिकांकडून कधींमधीं मदतीचा उदार हात पुढें केला जावयाचा! कोणाकडून मदत मिळो; न मिळो; आपण अंगीकारलेलें कार्य शक्य तेवढें सुंदर करण्यासाठीं झटावयाचें ही होती काशिनाथपंतांची आरंभापासून दृष्टी!

'मासिक मनोरंजन' हें मित्रांचें मनोविनोदन होतें. तोच त्यांचा निदिध्यास होता, जीवनानंद होता. ह्या छंदापायीं आपण किती नुकसानींत येत आहोंत, हा विचार त्यांना कधीं भेडसावूं शकला नाहीं.

मित्रांच्या मनोरंजन मासिकास व त्यांच्या तत्संबंधीं वृत्तीस अनुसरून नागपूरचे कविवर्य आनंदराव टेकाडे ह्यांनाही काव्यस्फूर्ति झाली. ह्या प्रसंगीं त्यांच्या कांहीं काव्यपंक्तींची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं.

कविवर्य म्हणतातः—

"जें घडे पृथिविच्या पाटीं
तें मनोरंजनासाठीं ॥ केवळ ॥
कोणास्तव कांहीं कोणी
मुळिं न करी कसली करणी ॥ या जगीं ॥
आनंद स्वतांला नाहीं
कृति न अशी घडुनी येई ॥ या जगीं ॥
प्रतिक्षणीं । भुवनीं निशिदिनीं । जिवाच्याकडुनी
कृती ज्या घडती । कृती ज्या घडती
निज मनोरंजनासाठीं । केवळ" ॥

मासिक मनोरंजनाच्या बाबतींत अशी होती काशिनाथपंतांची वृत्ति. मनोरंजनाच्या सर्वांगसुंदरतेसाठीं त्यांनीं आपला जीव परोपरीनें व अहर्निश आटविला !

कालमान झपाट्यानें बदलत चाललें. छापखान्याच्या पसाऱ्यापायीं नाना प्रकारच्या कटकटी निर्माण होऊं लागल्या. अनेक नवीन मासिकें जन्माला येऊं लागलीं. 'नवयुग' सारख्या मासिकांची चढाओढ जाणवूं लागली. युद्धजन्य परिस्थितीमुळें कागद व छपाईचीं साधनें ह्यांच्या किंमती सतत वाढत चालल्या. पैशांची टंचाई तीव्रतेनें जाणवूं लागली. मासिकाचे अंक वक्तशीरपणें प्रसिद्ध करणें कठीण होऊं लागलें. त्यामुळें वर्गणीदारांच्या संख्येंत घट होऊं लागली. कामगारांस नियमितपणें पगार देतां येईनात. त्यामुळें माणसें सोडून जाऊं लागलीं.

अडचणींचा पाढा कुठवर वाचावा ? आणि दुर्दैवाची घटना म्हणजे चिंतेनें पोखरत चाललेल्या काशिनाथपंतांच्या शरीरांत कॅन्सरसारख्या दुर्धर रोगानें घर केलें असल्याचें तपासाअंतीं आढळून आलें !

ह्या भयंकर रोगाच्या तावडींतून आपली सुटका होणें अशक्य, हें मित्रांनीं ओळखलें. तरीही ते निराशेच्या आहारीं गेले नाहींत. आपल्या व्यवसायाची आवराआवर करण्याच्या उद्योगास ते लागले. आपल्यामागें आपलें आवडतें 'मासिक मनोरंजन' जिवंत रहावें, भरभराटीला यावें, हीच त्यांची अखेरची एकमेव जीवनाकांक्षा होती. त्या दृष्टीनें त्यांनीं आपणास योग्य वाटली ती व्यवस्था करून ठेविली.

त्यांच्या शरीरांत कॅन्सर रोगानें घर केल्याचें वर सांगितलें. तो रोग दिवसेंदिवस बळावत चालला. शस्त्रक्रिया करण्याची आवश्यकता निर्माण झाली. ह्या शस्त्रक्रियेंतून आपला बचाव होणें कठीण आहे, याची खूणगांठ त्यांनीं स्वतःच्या मनाशीं बांधिली !

सर्वांशीं मित्रत्वाचें नातें जोडण्यांत व तें टिकविण्यांत ज्यांनीं आपलें सारें जीवन घालविलें, त्या काशिनाथपंत मित्रांवर आतां मृत्यूशीं मैत्रीचें नातें जोडण्याचा प्रसंग आलेला होता. मनाची बिलकुल चलबिचल होऊं न देतां तेंही नातें त्यांनीं जोडिलें !

शस्त्रक्रिया करवून घेण्याचा दिवस उजाडला! डॉ. गोपाळराव देशमुख, डॉ. पेरूळकर वगैरे तत्कालीन नामवंत शस्त्रक्रियातज्ज्ञ डॉक्टर त्या प्रसंगीं त्यांना लाभले.

ऑपरेशन-टेबलावर जाण्यापूर्वी त्यांनीं सर्वांना उद्देशून आभारप्रदर्शक व ऋणनिर्देश करणारें एक अखेरचें पत्र लिहून काढिलें. त्या पत्रांत ते शेवटीं म्हणतातः— "सेवा करावी एवढ्याचसाठीं ईश्वर आम्हांला इहलोकीं पाठवितो. माझ्या हातून जी सेवा झाली ती क्षुद्र होती. तथापि माझ्या हातून ती घडली, एवढ्याबद्दल मला समाधान वाटत आहे, आणि पुढें जी सेवा तो नेमून देईल ती करण्यासाठीं मी आतां जात आहें!"

ह्या शस्त्रक्रियेनंतर एक दीड दिवसांनीं ता. २३ जून १९२० रोजीं काशिनाथ रघुनाथ मित्र ह्यांनीं ह्या नश्वर जगाचा अखेरचा निरोप घेतला!



# गणेश महादेव वीरकर

गणेश महादेव आणि कंपनी ह्या ग्रंथप्रकाशन संस्थेनें १९२० ते १९४० हा कालखंड उपयुक्त नि ज्ञानसंवर्धक ग्रंथांच्या प्रकाशनानें गाजवून सोडला. रियासतकार सरदेसाई, कादंबरीकार नाथमाधव, भक्तिमार्गी पांगारकर, वीर सावरकर, प्रा. ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, ह्यांच्यासारख्या उच्च श्रेणींतील लेखकांचें विविध स्वरूपाचें वाङ्मय प्रसिद्ध करून ह्या प्रकाशन संस्थेनें आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेविलें आहे.

गेल्या पंचवीस वर्षांच्या काळांत मुंबई, पुणें नि इतर शहरांतून अनेक प्रकाशक आपापल्या कर्तबगारीच्या बळावर पुढें येत आहेत. वाचकवर्ग नि लेखकवर्ग त्या मानानें आज अनेक कारणांमुळें वाढलेला आहे. परंतु तीस वर्षांपूर्वीच्या काळांत गणेश महादेव कंपनीनें प्रकाशन क्षेत्रांत जे कांहीं यशस्वी धाडसी प्रयोग केले, ते आजच्या काळांतही आश्चर्याचे धक्के देणारे आहेत!

ह्या कंपनीचे चालक गणेश महादेव वीरकर हे बालपणापासून मोठे कल्पक, लोकसंग्राहक नि परोपकारी वृत्तीचे आणि स्वतंत्र बाण्यानें वागणारे होते. त्यांचा जन्म चिपळूण तालुक्यांतील वीरगांव येथें १८८८ सालीं झाला.

चांगलें समजूं उमजूं लागलें, तेव्हां त्यांना एका गोष्टीचा त्या काळांत साक्षात्कार झाला. पोट भरण्यासाठीं किंवा संसार चालविण्यासाठीं माणसानें नोकरीची कांस धरण्याची मुळींच जरूर नाहीं. करणाऱ्या माणसाला हजार धंदे उपलब्ध आहेत. ते अंग मोडून करण्याचीच आपली तयारी पाहिजे. विनम्र,

ममताळू नि गोड स्वभावामुळें माणसें जोडण्याची कला त्यांना लहान वयापासून साध्य झालेली होती. तिच्या बळावर नोकरी खेरीज करून वीरकरांनीं असंख्य धंदे हाताळले. नवीन प्रयोग, नवीन उद्योग हाताळून पहाण्याची त्यांना खोड लागून राहिली होती. ती त्यांना एकेजागीं स्थिर राहूं देत नव्हती.

... असा हा हरहुन्नरी व उद्योगी माणूस प्रकाशन व्यवसायाकडे कसा वळला, त्या व्यवसायांत दीर्घकाळ कसा स्थिरावला आणि शेवटीं निवृत्त कसा झाला, हें पहाण्यासारखें आहे.

गणेश महादेव ह्यांचें हस्ताक्षर सुंदर होतें. जवळ सद्विचारांची शिदोरी नि थोड्याबहुत अनुभवांचेंही भांडवल जमा झालेलें होतें; परंतु वृत्तपत्रव्यवसायाशीं निकट संबंध जडला असतांही लेखणी चालविण्याच्या फंदांत ते कधींही पडले नाहींत. तें कुरण त्यांनीं इतरांसाठीं मोकळें ठेविलें व उत्तमोत्तम आणि प्रतिभाशाली लेखक हुडकून काढून त्यांना प्रकाशांत आणण्यांत आपलें सारें बुद्धिकौशल्य खर्च केलें. ही त्यांची त्या काळांतील कामगिरी कांहीं कमी महत्त्वाची नव्हती.

१९१३ सालीं मुंबईंत 'लोकसेवक' या नांवाचें एक साप्ताहिक सीतारामपंत ललित ह्यांनीं सुरू केलें. त्यांना लेखकाची जरूरी नव्हती; परंतु त्या पत्राची इतर व्यवस्था पहाणाऱ्या एकाद्या उत्साही तरुणाची त्यांना जरूरी होती. ती उणीव भरून काढण्यासाठीं वीरकर हे पुढें सरसावले. अशा रीतीनें मुद्रण-यंत्राशीं नि प्रकाशनाशीं त्यांचा जो दूरान्वयी संबंध आला, तो कायमचाच. मात्र येथें ते एकादें वर्षच टिकून राहिले असतील.

१९१४ सालीं अच्युतराव कोल्हटकर ह्यांचें 'संदेश' पत्र सुरू झालें. त्या काळीं अच्युतरावांच्या लेखणीनें आकर्षित झाला नाहीं, असा माणूस विरळा! 'संदेश' पत्रानें हां हां म्हणतां वाचकांचीं मनें काबीज केलीं. पत्राचा खप झपाट्यानें वाढूं लागला.

पन्नास वर्षांपूर्वीची घटना आहे ही. अच्युतरावांना आपल्या पत्रासाठीं जाहिराती आणणाऱ्या नि जाहिरात खातें संभाळणाऱ्या माणसाची तीव्रतेनें उणीव भासत होती. वीरकर ह्यांस लेखनाशिवाय कोणत्याही व्यवसायाचें वावडें नव्हतें. ते वाक्पटूही होतेच. प्रयोग तर करून पाहूंया. साधला तर साधला! असा

त्यांनीं स्वतःनीं विचार केला. त्या काळीं ह्या व्यवसायांत हिरीरीनें वावरणारा व नांवलौकिक मिळविलेला कोणीही महाराष्ट्रीय दिसत नव्हता. कांहीं पूर्वानुभव नसतां वीरकर ह्यांनीं त्या व्यवसायांत पदार्पण करून तो चांगलाच नांवारूपास आणून दाखविला.

कोणत्याही व्यवसायाची सुरुवात अगदीं सार्धीच असते. चिकाटीच्या नि कर्तबगारीच्या बळावर पुढें त्याची वाढ व्हायची असते. अल्प प्रकरणांत आरंभ करून वीरकरांनीं हा व्यवसाय कुठवर वाढविला ?

जाहिरातींचें कमिशन ह्या नात्यानें पहिल्या महिन्यांत त्यांनीं पन्नास रुपये मिळविले; आणि वाढवीत वाढवीत ह्या मासिक उत्पन्नाचा आंकडा त्यांनीं सातशें रुपयांवर नेऊन पोहोंचविला! ह्या निमित्तानें विविध क्षेत्रांतील लहान मोठे धंदेवाले नि व्यापारी ह्यांच्या निकट संबंधांत ते आले.

ह्या ठिकाणीं एका गोष्टीचा उल्लेख करणें अत्यंत जरूर आहे. लोकमान्य टिळक मंडालेहून सुटून आले आणि जनतेंत अपूर्व उत्साहाची लाट उसळली. त्या काळांत अच्युतरावांच्या 'संदेश'नें लोकजागृतीच्या दृष्टीनें फार महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. त्यांची लेखणी आणि वाणी अतिशय प्रभावी नि जनतेच्या मनाची पकड घेणारी होती. संदेशचा खप झपाट्यानें वाढत गेला. त्याचबरोबर आर्थिक अडचणीही वाढत गेल्या. अच्युतरावांनीं सुरू केलेला हा विनभांडवली धंदा होता. रोजच्या रोज आर्थिक अडचणी उपस्थित होत होत्या. त्या निभावून नेणारी एक प्रभावी नि हुकमी शक्ति गणेश महादेव वीरकर ह्यांच्या रूपानें अच्युतरावांच्या पाठीशीं वावरत होती. ह्याची कल्पना आजच्या काळांतील फार थोड्या लोकांना असेल.

लोकजागृति नि प्रचारकार्य उत्तम प्रकारें व वाढत्या प्रमाणांत पार पडत होतें. त्या काळांतील ही महनीय स्वरूपाची लोकसेवा अच्युतरावजींकडून पार पडत होती. त्यांच्या लोकसेवाकार्यांत वीरकरांचाही हात होता; परंतु तो पडद्यामागें राहून. भक्कम आर्थिक पाठबळ असल्याशिवाय कोणतेंही महान् कार्य पार पडत नाहीं. जाहिरात-व्यवसायामुळें वीरकरांचा अनेक धंदेवाइकांशीं संबंध जडलेला. संदेश कचेरींत पगारासाठीं, कागदासाठीं किंवा अन्य कारणांमुळें आर्थिक अडचणी वारंवार उपस्थित व्हायच्या. अच्युतरावांकडे

त्या काळीं बऱ्या पाहुणे मंडळींचा डेरा पडलेला असायचा. त्यामुळें घरखर्चाचें प्रमाण उत्तरोत्तर वाढत चाललें होतें. अच्युतरावांचे इतर साहसी उद्योगही चालू होते. ह्या साऱ्या व्यवहारांत वीरकर गुरफटले गेले. कागदवाल्यांचें देणें, सावकारांचें कर्ज व इतर किरकोळ देणीं कुठवर वाढवायचीं? कधीं ना कधीं हिशेब करणें जरूर होतें. हिशेब करून पाहतां केवळ संदेशाचा कर्ज-भार पंचावन्न हजारांपर्यंत पोहोंचल्याचें आढळून आलें! वीरकर ह्यांनीं तो कर्जभार शिरावर घेऊन तदनंतरच्या दीड दोन वर्षांत तो फेडण्यांत यश मिळविलें. त्यांत अच्युतरावांनींही शक्य तो सहकार त्यांना दिला.

कितीही अडचणी आल्या तरी 'संदेश' पत्र टिकवून धरायचें, हा होता दोघांचाही निर्धार. आपण एकाद्या गोष्टीचा निर्धार करतों, परंतु कोणत्या विपरीत परिस्थितीला कधीं तोंड द्यावें लागेल, ह्याची मात्र आपणांस कल्पना नसते.

मार्गांतील अडचणी दूर होत होत्या. युद्धतहकुबीचा अपेक्षित समय दृष्टिपथांत येऊं लागला होता नि आतां सुखाचे दिवस वाट्यास येणार, असें वाटूं लागलें होतें. इतक्यांत काय झालें? संदेशमध्यें युद्धविषयक अग्रलेख येत असत. त्यांपैकीं एका अग्रलेखांत "आम्हांवर युनियन जॅक फडको किंवा गरुडध्वज फडको, आम्हांस सारखेंच" ह्या अर्थाचा मजकूर प्रसिद्ध झाला. सरकारकडून त्याला आक्षेप घेण्यांत येऊन प्रेस ॲक्टअन्वयें दोन हजार रुपये भरण्याची नोटीस संदेशवर बजावण्यांत आली!

ही जामिनकीची रक्कम अवघ्या तीन दिवसांत भरावयाची होती. कठीण काळांतून पार पडण्यासाठीं धडपडत असतां एकाएकीं हें नवीन अरिष्ट आड आलें! गोंधळून जाण्यासारखी ती परिस्थिति होती! तिच्यांतून पार पडायचें कसें? ह्याचा विचार करतां एक नवीन कल्पना पुढें आली. अच्युतरावांनीं 'संदेश' पत्र बंद करायचें नि छापखाना वगैरे यंत्रसामुग्री वीरकर ह्यास विकून टाकायची व त्यांनी 'संजय' ह्या नांवाचें नवें दैनिक सुरू करायचें. संपादक, व्यवस्थापक वगैरे सारा जम पूर्वीचाच. वाचकांना मात्र संदेशऐवजीं 'संजय' मिळूं लागला. मोठ्या युक्तिबाजपणानें व झटपट झालेल्या ह्या घडामोडीचें सर्वांनीं कौतुक केलें!

आणि आपलें मायाप सरकार ? संदेशच्या नरडीला नख लावण्याचा प्रयत्न फसून तेंच प्रभावी पत्र 'संजय' या नांवानें समाजांत वावरूं लागलें होतें. ही घटना सरकारला सहन होण्यासारखी नव्हती. कांहीं महिने लोटल्यानंतर संजयच्या चालकांस कोर्टांत खेंचण्यांत आलें. कोर्टापुढें जे पुरावे आले व जे जाबजबाब झाले, त्यांच्या आधारें 'संदेश' व 'संजय' हीं नांवें भिन्न असलीं तरी पत्राचे संपादक व धोरण तेंच आहे, असें ठरवून संदेशप्रमाणें संजयकडे जामिनकीच्या रकमेची मागणी करण्यांत आली.

अशा परिस्थितींत दैनिक 'संजय' पत्र बंद करण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. त्या मार्गाचा अवलंब करण्यांत आला आणि त्याचबरोबर वीरकर हे वृत्तपत्र-प्रकाशन जबाबदारींतून मोकळे झाले.

... वीरकर वृत्तपत्र-प्रकाशन व्यवसायांतून मोकळे झाले असले तरी त्या व्यवसायापायीं त्यांच्या शिरावर जो कर्जाचा बोजा वाढला होता, त्यांतून त्यांची सुटका होण्यासारखी नव्हती. पुनरपि मस्तक सुन्न करणाऱ्या परिस्थितींत ते सांपडले. अत्यंत केविलवाणी नि कोणालाही हतबुद्ध करून सोडणारी ती स्थिति होती. परंतु तशाही स्थितींत वीरकर आपलें शिर सलामत ठेवूं शकले ! ह्या काळाची आठवण करून ते एके ठिकाणीं म्हणतात, "सर्वांना ती स्थिति निराशाजनक वाटली तरी माझ्या मनाची स्थिति मात्र भिन्न होती. ज्या खेळांत आपण हरलों तो सोडून न देतां अधिक दक्षतेनें खेळल्यास डाव जिंकूं, असेंच मला वाटे. पैसा जवळ नव्हता हें खरें; पण योग्य व्यवसाय योग्य प्रकारें करीत रहाणारास गरजेनुसार पैसा मिळूं शकतो, हा अनुभव ताजा होता. शिवाय अनुभव, मुद्रण-प्रकाशन व्यवसायाची आमूलाग्र माहिती, जरूर तें साहस, संबंधितांची सहानुभूति नि व्यवहारांतील पत, ह्या पैशाइतक्याच मोलाच्या गोष्टींचें मांडवल संदेशकालांत मला उपलब्ध झालें होतें, ही जाणीव होती."

ही जाणीव उराशीं बाळगून वीरकर ह्यांनीं १९२० सालीं 'गणेश महादेव आणि कंपनी' ह्या नांवानें प्रकाशन-संस्था सुरू करण्याचें ठरविलें. हें ठरविण्यात त्यांच्या दृष्टीपुढें कांहींतरी विशिष्ट ध्येय होतें. प्रकाशनव्यवसाय पतकरून पैशांच्या उलाढाली करावयाच्या हेंच केवळ त्यांच्यापुढें ध्येय

नव्हतें. तो मिळविणें जरूर होतें हें निर्विवाद; परंतु त्याशिवाय संदेश व संजय प्रकाशन काळांत एका ध्येयाची त्यांच्या मनावर पकड बसलेली होती. कोणतें तें ध्येय ? संदेश व संजय पत्र अच्युतरावांनीं कशासाठीं चालविलें व त्यांच्याशीं आर्थिक झीज नि चिंता सोसून आपण जो सहकार केला तो कशासाठीं ? लोक-शिक्षण व लोक-जागृति घडवून आणण्यासाठीं; त्याचप्रमाणें सामान्य जनतेची बौद्धिक पातळी वाढून त्यांच्या मनावर सुसंस्कार घडून यावे, ह्यासाठीं. त्याच कैफाच्या तावडींत वीरकर सांपडले होते. त्या भावनांशीं ते तन्मय झाले होते. ती त्यांची जीवननिष्ठा बनली होती. त्या निष्ठेपायीं त्यांच्या मनांतील साऱ्या चिंतांची जळून राखरांगोळी झाली आणि ते नव्या जोमानें ग्रंथ-प्रकाशन-कार्याकडे वळले.

नवनवे सावकार शोधून काढून त्यांचा आर्थिक सहकार संपादन करावयाचा, हा ह्यापूर्वीच्या ५।६ वर्षांच्या काळांतील वीरकरांचा एक उद्योग होता. त्यांत खंड फारसा पडूं शकला नाहीं हें खरें असलें, तरी त्याला त्याहीपेक्षां महत्त्वाच्या अशा एका उद्योगाची जोड त्यांनीं करून दिली. नवनवे व प्रतिभाशाली लेखक हुडकून काढायचे आणि त्यांचें सुसंस्कारी वाङ्मय प्रकाशांत आणायचें. हा उद्योग वीरकर ह्यांनीं मोठ्या निष्ठेनें नि जाणीवपूर्वक केला व आपल्या वीस वर्षांच्या प्रकाशनकाळांत तो चांगला नांवारूपास आणून सोडला.

ह्या काळांत त्यांनीं सुमारें ७५ ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यांत नाथमाधवांच्या शिवकालीन ऐतिहासिक सात कादंबऱ्या, स्वामी रामतीर्थांचें सहा खंडांत समग्र वाङ्मय, रियासतकार सरदेसाई ह्यांच्या रियासतींचे सर्व भाग, तसेंच प्रा. ना. सी. फडके, खांडेकर ह्यांच्या कादंबऱ्या, कांहीं सावरकर वाङ्मय, वगैरे ग्रंथांचा प्रामुख्यानें उल्लेख करतां येईल.

आजकाल विविध प्रकारच्या मालांचें पीक आलेलें आहे. परंतु तीस वर्षांपूर्वीच्या काळांत वीरकर ह्यांनीं 'चार आणे-माला' सुरू करून ती पहिल्याच धडाक्यांत लोकप्रिय करून दाखविली. चार आण्यांत सव्वाशें पृष्ठें देणाऱ्या ह्या मालेच्या पहिल्या पुष्पाच्या चार हजार प्रती अवघ्या चार दिवसांत संपून गेल्या !

अशा प्रकारची योजना तयार करून वीरकर हे वाट पहात स्वस्थ ब राहिले नाहींत. अनेक धनिकांकडे पायपीट करून त्यांची गाठी पटविण्याचा ते झटले. महाराष्ट्रांतील सुमारें पंधरा संस्थानिकांशीं महत् प्रयासांनीं त्यांनं संधान जोडलें. वीरकर ह्यांच्या पाठीशीं प्रकाशन–क्षेत्रांतील उज्वल तपश्चर्य होती. स्वभाव अत्यंत विनम्र, गोड नि निरभिमानी होता; परंतु त्यांचे कशाचाही प्रभाव पडूं शकला नाहीं ! बोलणीं व्हावीं आणि तीं कांहीं ना कांह कारणांमुळें फिसकटावीं हा नित्यक्रम होऊन राहिला होता. जमखिंडीच्या राजेसाहेबांशीं झालेलें बोलणें तर हातातोंडाशीं आलें होतें. वीरकर ह्यांनी त्यांची २।३ वेळां भेट घेऊन पन्नास हजार रुपये भांडवलाचा प्रश्न त्यांच्यापुढे ठेविला. वातावरण आशादायक वाटूं लागलें. पुण्याच्या मुक्कामांत बोलणी निश्चित व्हावयाचीं एवढें ठरलें. त्याप्रमाणें राजेसाहेब पुण्यांत आलेही; परंतु पुण्यांतील त्यांच्या सल्लागारांनीं 'पुस्तकी मालाच्या धंद्यांत पैसा गुंतविणें घोक्याचें आहे', असा सल्ला दिल्यावरून केलेल्या साऱ्या प्रयत्नांवर पाणी पडलें !

त्यानंतर वीरकर ह्यांनीं आपल्या प्रकाशन-संस्थेला लिमिटेड कंपनीचें स्वरूप देण्याची योजना तयार केली, व ती अंमलांत यावी ह्यासाठीं जरूर व शक्य ते सर्व प्रयत्न केले. ज्ञानज्योत केवळ शहरांत पेटवून काय उपयोग ? खेड्यापाड्यांतून त्या ज्योतीचा प्रकाश पसरत गेला पाहिजे, ह्या हेतूनें सर्वसाधारण लोकांच्या आटोक्यांत सहज येणाऱ्या अशा कांहीं प्रकाशन-योजना आंखून त्या अंमलांत आणण्यासाठींही ते झटले. त्यांपैकीं एक योजना मागासलेल्या शेतकरी-वर्गाला सुबुद्ध करण्यासंबंधानें होती. 'भूमिजन' नांवाचें नियतकालिक अवघ्या दोन आण्यांत द्यावयाचें. नमुन्यादाखल त्याच्या आठ हजार प्रती छापून त्या गांवोगांव मोफत वांटण्याची व्यवस्था केली. ना. बाळासाहेब खेर हे त्या वेळीं शिक्षण-मंत्री होते. त्यांना व इतर सर्वांना ही योजना फार आवडली. 'भूमिजन'च्या कांहीं हजार प्रती सरकारकडून घेण्यांत येतील असें आश्वासनही वीरकर ह्यांनीं मिळविलें.

एकीकडे अशा प्रकारच्या योजनांचें पीक येत होतें, तर दुसरीकडे 'भीक नको पण कुत्रें आवर,' अशी विचित्र स्थिति वीरकर ह्यांच्या वांट्यास

सावकारांच्या देण्यापायीं आलेली होती ! एकाला शांत करण्याचा प्रयत्न करावा तोंच दुसऱ्यानें पुढें यावें, अशी त्यांच्यांत चढाओढ सुरू झाली ! शेवटीं ती इतकी विकोपास गेली कीं, वीरकर ह्यांस, नांवारूपास आणलेल्या प्रकाशन व्यवसायांतून निवृत्त होण्याशिवाय दुसरा मार्ग राहिला नाहीं !

१९४० सालीं वीरकर ह्यांनीं शेवटीं तो मार्ग स्वीकारला असला, तरी आजच्या नि उद्यांच्या काळांतील प्रकाशकांसाठीं ह्या क्षेत्रांत मिळविलेल्या बऱ्यावाईट अनुभवांचा वारसा त्यांनीं मागें ठेविला आहे.

वीरकर ह्यांचें वयोमान आज पाऊणशें वर्षांपलीकडे गेलें आहे. अंगांत शक्ति होती तोंवर त्यांनीं आपल्या आवडत्या प्रकाशन-क्षेत्रांत नाना प्रकारच्या धडपडी नि उलाढाली केल्या. त्यांत स्वार्थापेक्षां परार्थाचाच भाग अधिक होता. आणि ह्या त्यांचा सारा जीवनेतिहास लक्षांत आणून आपल्या महाराष्ट्र-सरकारनें त्यांना वार्षिक बाराशें रुपये 'जीवन-वेतन' देण्याचा स्तुत्य उपक्रम गेल्या ३।४ वर्षांपासून सुरू केलेला आहे.

त्यांनी 'यशवंत' नावाचें मासिक सुरू करून (१९२८) तें नांवाप्रमाणें यशवंत करून दाखविलें. या मासिकाच्या पहिल्या अंकाच्या चार हजार प्रती काढण्यांत आल्या व त्या दोन दिवसांत संपून गेल्या! ज्या काळांत चांगल्या मासिकाचा खप पांच-सहाशें प्रतींपलीकडे जात नसे, त्या काळांतील वीरकर यांचा हा विक्रम आहे! तोटा होऊं लागल्यामुळें बंद पडण्याच्या बेतांत आलेलें 'सृष्टिज्ञान' नांवाचें विज्ञानविषयक सचित्र मासिक नफानुकसानीची जबाबदारी स्वीकारून वीरकर यांनीं चालविण्यास घेतलें व तें सुमारें साडे-चार वर्षेपर्यंत नियमितपणें चालविलें.

या प्रकाशनांच्या बरोबरीनें ग्रंथ-प्रकाशन कार्य चालू होतेंच. वीरकर यांच्या 'यशवंत' मासिकासंबंधानें केवळ ओझरता उल्लेख करून चालणार नाहीं. त्या काळीं हें मासिक लोकप्रिय होण्याचीं कारणें अनेक होतीं. अंतरंग बहुरंगी, बहुढंगी नि मनाची पकड घेणारें असेच; परंतु बहिरंगाच्या सजावटीकडेही भरपूर लक्ष पुरविण्यांत येत असे. तिरंगी किंवा बहुरंगी सुंदर कव्हर हेंही या मासिकाचें एक वैशिष्ट्य होतें. वाचकांचीं मनें आकर्षित करणारा असा मालमसाला त्यांत खच्चून भरलेला असे. यशवंतचे 'लघुकथा-विशेषांक' नि 'साहित्यसंमेलन-विशेषांक त्या काळीं फारच गाजले.

अशा या यशस्वी 'यशवंत' मासिकानेंच एके दिवशीं त्यांना वैभवशिखरावरून खालीं खेंचलें. त्याचें असें झालें. यशवंतच्या एका अंकांत 'कैद्यांची कैफियत' या मथळ्याखालीं एक गोष्ट प्रसिद्ध झाली. बंगालमधील तुरुंगांत कैद्यांवर झालेल्या अत्याचारांची (प्रत्यक्ष घडलेली) ती करुण कहाणी होती! तत्कालीन सरकारकडून ती आक्षेपार्ह ठरवून त्या मासिकाचे मुद्रक नि प्रकाशक या नात्यानें जामिनकीची रक्कम भरण्याचा हुकूम वीरकर यांच्यावर बजावण्यांत आला. परिस्थिति बिकट व गोंधळांत पाडणारी होती. सरकार-दरबारीं वजन असलेल्या एका भल्या गृहस्थाशीं संधान जोडून संकटपार होण्याची धडपड वीरकर करूं लागले आणि त्यांतून निसटेपर्यंत आठ महिन्यांचा कालावधि लोटावा लागला. आलेल्या गंडांतरांतून शेवटीं ते मोकळे झाले; परंतु त्या काळांत सावकारांचा ससेमिरा तीव्रतर झाला. आतां त्यांचा धीर खचला

होता. ह्या काळांत एक दोन नव्हे तर त्यांच्याविरुद्ध सावकारांनीं कोर्टाकडून पस्तीस हुकूमनामे मिळविले.

तरीही वीरकरांचा तो लहानसा व खंगलेला देह संकटांशीं झुंजत राहिला ! कुणालाही फसविण्याची किंवा बुडविण्याची त्यांची इच्छा नव्हती. त्यांतल्या त्यांत सवड करून जें फेडतां येईल तें फेडण्याकडे त्यांचें सतत लक्ष होतें. ह्या काळांत न रागावतां प्रत्येकाला सांभाळून धरण्यासाठीं नि आपला प्रकाशन व्यवसाय पुनश्च चालू करण्यासाठीं त्यांनीं निकराची धडपड केली. यशवंत मासिक मुंबईतील एका छापखान्याचा सहकार मिळवून त्यांनीं पुन्हां सुरू केलें. तीन वर्षांनंतर छापखान्याचें कांहीं देणें शिल्लक राहिल्यामुळें कराराप्रमाणें त्या मासिकाची मालकी त्यांना सोडावी लागली !

प्रकाशन-कार्यांत वावरत असतां वीरकर ह्यांना एक गोष्ट ठळकपणें आढळून आली, व तिची प्रचीति इतर अनेक प्रकाशकांनाही आली असेल किंवा येत असेल. केवळ उत्साह, कल्पकता, कष्ट करण्याची तयारी नि समाजावर सुसंस्कार घडविण्याची सदिच्छा असून भागत नाहीं. हे गुण ज्याच्या गांठीशीं असतील त्याचें समाज कौतुक करील; परंतु केवळ त्या कौतुकावर कोणाही प्रकाशकाला जगतां येणार नाहीं. जवळ भरपूर भांडवल पाहिजे. त्याशिवाय ह्या व्यवसायाचा भक्कम पाया घालतां येणार नाहीं. जरूर तेव्हां लहानसहान रकमा उसनवार आणणें नि त्या वक्तशीरपणें फेडणें, हें ठीक आहे; कांहीं काळ जगण्याचा हा मार्ग असला तरी दीर्घ काळ त्या मार्गाची कांस धरून चालत नाहीं.

वीरकर ह्यांचे प्रकाशन-क्षेत्रांतील मनोरे फार उंच नि मोठे मनोहारी होते. प्रकाशन-व्यवसायाला त्यांना कितीतरी उज्वल नि भव्य स्वरूप आणून द्यावयाचें होतें आणि त्यासाठीं पंचवीस ते पन्नास हजार रुपये निदान दहा वर्षेपर्यंत लोककल्याणकारी अशा प्रकाशनकार्यांत गुंतविणारा एखादा सुसंस्कृत सावकार किंवा संस्थानिक कुठें सांपडेल का ? ह्याचा शोध त्यांनीं सुरू केला. त्यांना देणगी नको होती. तेवढी रक्कम ठेव म्हणून मिळावी नि व्याजादाखल वेळोवेळीं प्रसिद्ध होणारीं प्रकाशनें नि पुस्तकें ठेवीदाराकडे पाठनीत रहावीं, अशी त्यांची योजना होती.

अशा प्रकारची योजना तयार करून वीरकर हे वाट पहात स्वस्थ बसून राहिले नाहींत. अनेक धनिकांकडे पायपीट करून त्यांची खात्री पटविण्यासाठीं ते झटले. महाराष्ट्रांतील सुमारें पंधरा संस्थानिकांशीं महत् प्रयासांनीं त्यांनीं संधान जोडलें. वीरकर ह्यांच्या पाठीशीं प्रकाशन–क्षेत्रांतील उज्वल तपश्चर्या होती. स्वभाव अत्यंत विनम्र, गोड नि निरभिमानी होता; परंतु त्यांपैकीं कशाचाही प्रभाव पडूं शकला नाहीं! बोलणीं व्हावीं आणि तीं कांहीं ना कांहीं कारणांमुळें फिसकटावीं हा नित्यक्रम होऊन राहिला होता. जमखिंडीच्या राजेसाहेबांशीं झालेलें बोलणें तर हातातोंडाशीं आलें होतें. वीरकर ह्यांनीं त्यांची २।३ वेळां भेट घेऊन पन्नास हजार रुपये भांडवलाचा प्रश्न त्यांच्यापुढें ठेविला. वातावरण आशादायक वाटूं लागलें. पुण्याच्या मुक्कामांत बोलणीं निश्चित व्हावयाचीं एवढें ठरलें. त्याप्रमाणें राजेसाहेब पुण्यांत आलेही; परंतु पुण्यांतील त्यांच्या सल्लागारांनीं 'पुस्तकी मालाच्या धंद्यांत पैसा गुंतविणें घोक्याचें आहे', असा सल्ला दिल्यावरून केलेल्या साऱ्या प्रयत्नांवर पाणी पडलें!

त्यानंतर वीरकर ह्यांनीं आपल्या प्रकाशन-संस्थेला लिमिटेड कंपनीचें स्वरूप देण्याची योजना तयार केली, व ती अंमलांत यावी ह्यासाठीं जरूर व शक्य ते सर्व प्रयत्न केले. ज्ञानज्योत केवळ शहरांत पेटवून काय उपयोग? खेड्यापाड्यांतून त्या ज्योतीचा प्रकाश पसरत गेला पाहिजे, ह्या हेतूनें सर्वसाधारण लोकांच्या आटोक्यांत सहज येणाऱ्या अशा कांहीं प्रकाशन-योजना आंखून त्या अंमलांत आणण्यासाठींही ते झटले. त्यांपैकीं एक योजना मागासलेल्या शेतकरी-वर्गाला सुबुद्ध करण्यासंबंधानें होती. 'भूमिजन' नांवाचें नियतकालिक अवघ्या दोन आण्यांत द्यावयाचें. नमुन्यादाखल त्याच्या आठ हजार प्रती छापून त्या गांवोगांव मोफत वांटण्याची व्यवस्था केली. ना. बाळासाहेब खेर हे त्या वेळीं शिक्षण-मंत्री होते. त्यांना व इतर सर्वांना ही योजना फार आवडली. 'भूमिजन'च्या कांहीं हजार प्रती सरकारकडून घेण्यांत येतील असें आश्वासनही वीरकर ह्यांनीं मिळविलें.

एकीकडे अशा प्रकारच्या योजनांचें पीक येत होतें, तर दुसरीकडे 'भीक नको पण कुत्रें आवर,' अशी विचित्र स्थिति वीरकर ह्यांच्या वांट्यास

सावकारांच्या देण्यापायीं आलेली होती ! एकाला शांत करण्याचा प्रयत्न करावा तोंच दुसऱ्यानें पुढें यावें, अशी त्यांच्यांत चढाओढ सुरू झाली ! शेवटीं ती इतकी विकोपास गेली कीं, वीरकर ह्यांस, नांवारूपास आणलेल्या प्रकाशन व्यवसायांतून निवृत्त होण्याशिवाय दुसरा मार्ग राहिला नाहीं !

१९४० सालीं वीरकर ह्यांनीं शेवटीं तो मार्ग स्वीकारला असला, तरी आजच्या नि उद्यांच्या काळांतील प्रकाशकांसाठीं ह्या क्षेत्रांत मिळविलेल्या बऱ्यावाईट अनुभवांचा वारसा त्यांनीं मार्गे ठेविला आहे.

वीरकर ह्यांचें वयोमान आज पाऊणशें वर्षांपलीकडे गेलें आहे. अंगांत शक्ति होती तोंवर त्यांनीं आपल्या आवडत्या प्रकाशन-क्षेत्रांत नाना प्रकारच्या धडपडी नि उलाढाली केल्या. त्यांत स्वार्थापेक्षां परार्थाचाच भाग अधिक होता. आणि हा त्यांचा सारा जीवनेतिहास लक्षांत आणून आपल्या महाराष्ट्र-सरकारनें त्यांना वार्षिक बाराशें रुपये 'जीवन-वेतन' देण्याचा स्तुत्य उपक्रम गेल्या ३।४ वर्षांपासून सुरू केलेला आहे.

१

## पॉप्युलर–प्रकाशनाचा वाढता पसारा

मुंबईंत 'पॉप्युलर प्रकाशन' ही आस्ते कदम, पायरी - पायरीनें वाटचाल करीत ग्रंथ-प्रकाशन क्षेत्रांत उच्चांक गांठण्यासाठीं झटणारी व नांवाप्रमाणें लोकप्रियता संपादन केलेली एक आदर्श प्रकाशन संस्था आहे. ग्रंथ-प्रकाशन हा एक माननीय नि राष्ट्रोन्नतीस पोषक होणारा व्यवसाय आहे. तो हाताळीत असतां नुकसान मोसावें लागूं नये, ह्यासाठीं जरूर ती खबरदारी घ्यावयाचीच, परंतु त्यावरोबर तो अधिकाधिक माननीय, लोकोपयोगी नि सर्वांगसुंदर करण्यासाठीं झटावयाचें, ही आहे आरंभापासून ह्या संस्थेच्या कर्तबगार चालकांची दूरदृष्टि.

आपली प्रकाशन--संस्था खऱ्या अर्थानें लोकोपयोगी नि लोकप्रिय कशी होईल, हीच चिंता चालकांस सतत लागून राहिलेली असते. ग्रंथ-प्रकाशक व ग्रंथ - विक्रेते ह्या नात्यानें जरूर नि शक्य त्या सुखसोयी आम्हीं उपलब्ध करून ठेविल्या आहेत; आणखी अधिक काय करायचें आहे ? असें ह्या संस्थेच्या चालकांस कधींही वाटलें नाहीं. अजून पुष्कळ करायचें बाकी आहे; तें बाकी राहिलेलें कसें अंमलांत आणतां येईल, त्यासाठीं कोणाचा सहकार मिळवितां येईल, नि कोणकोणत्या साधनांचा उपयोग करून घेतां येईल, हे विचार चालकांपुढें नेहमीं असतात. जें कांहीं हातून घडलें त्यावद्दल यत्किंचितही अहंकार नाहीं; परंतु जें घडूं शकलें नाहीं, त्यावद्दल मात्र मनाला खंत नि चुटपूट ! त्यामुळें ही प्रकाशन-संस्था आज प्रगति-पथावर असलेली दिसत आहे.

आपली प्रकाशन-संस्था सर्वांगसुंदर, यशस्वी नि दीर्घजीवी झाली पाहिजे यासाठीं स्वदेशांत किंवा परदेशांत नांवारूपास आलेल्या संस्था आपापला कारभार कशा रीतीनें चालवीत आहेत, त्या दृष्टीनें आपण काय करूं शकतों, ह्याचा केवळ विचारच नव्हे तर तदनुसार आचार करणारी, 'पॉप्युलर प्रकाशन' ही आजच्या काळांतील महाराष्ट्रांतील एक अग्रेसर प्रकाशन-संस्था आहे.

तिच्यामागें ४०।४२ वर्षांची अखंड तपश्चर्या नि अजोड कर्तृत्व आहे. आपली संस्था खंबीर पायावर सतत ताठ उभी राहिली पाहिजे, वर्षानुवर्षें तिची लोकप्रियता शुक्लेंदुवत् वृद्धिंगत होत गेली पाहिजे, ह्यासाठीं झटत असतां ग्रंथ-प्रकाशक ह्या नात्यानें आपल्या शिरावर कांहीं सामाजिक नि राष्ट्रीय जबाबदाऱ्या आहेत, त्या सतत लक्षांत बाळगून आपलें प्रत्येक पाऊल यशाच्या मार्गानें पुढें पुढें पडत जावें, ह्यासाठीं संस्थेचे संस्थापक व भटकळ-बंधु डोळ्यांत तेल घालून जपत असतात.

उपयुक्त, ज्ञानवर्धक नि विद्यार्थिवर्गाच्या व सर्वसामान्य वाचकांच्या गरजा भागविणारे असे आजवर सुमारें चारशें इंग्रजी व दोनशें लहानमोठे मराठी ग्रंथ प्रकाशांत आणून ह्या प्रकाशन-संस्थेनें महाराष्ट्रांतील ज्ञान-दीप सतत वाढत्या तेजानें तेवत ठेविला आहे.

परिस्थितीनुरूप किंवा यदृच्छेनें आपल्या वांट्यास जो व्यवसाय येईल, तो इमानेंइतबारें सांभाळून आपण मोकळे होतों. आपल्या व्यवसायाच्या नि कर्तबगारीच्या वर्तुळाचा व्यास सतत वाढत राहिला पाहिजे, ह्याची दक्षता आम्ही सहसा घेत नाहीं. पॉप्युलर बुक-डेपो व पॉप्युलर-प्रकाशनचे आद्य संस्थापक गणेश रामराव भटकळ ह्यानीं 'थेंबें थेंबें तळें सांचे' ह्या न्यायानें आपल्या व्यवसायांत उपयोगी पडणारे 'अनुभव-कण' इथून तिथून जन्मभर जमा केले आणि त्यांची वांटणी मुक्तहस्तांनीं आपल्या साऱ्या कुटुंबी-जनांत केली नि त्यांच्यांतही ग्रंथ-प्रेम निर्माण केलें.

ह्याचें कारण ग्रंथ-विक्री, ग्रंथ-प्रकाशन नि ग्रंथ-वितरण हा व्यवसाय जनतेच्या कल्याणास व सर्वांगीण उन्नतीस हातभार लावणारा, तसेंच समाजाची पातळी उंचावणारा आहे; आपण प्रयत्नेंकरून लाविलेला हा ज्ञानदीप आहे, तो नंदादीपाप्रमाणें अखंड प्रकाशत राहिला पाहिजे व त्याचें पावित्र्य नि पथ्य

सतत संभाळलें गेलें पाहिजे, ही आहे ह्या संस्थेच्या आद्य संस्थापकांची आरंभापासून दृष्टि.

जो व्यवसाय आपण पतकरला त्यावर आपली संपूर्ण निष्ठा असली पाहिजे. पॉप्युलर बुक-डेपोचे संस्थापक गणपतराव भटकळ ह्यांच्यापाशीं तें निष्ठेचें बळ भरपूर आहे आणि त्या निष्ठेचें लोण ते आपल्या मुलांमुलींपर्यंतच नव्हे तर जामातांपर्यंत नि संस्थेंत कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांपर्यंतही पोहोंचवूं शकले, हें त्यांच्या व्यवसायी जीवनाचें एक वाखाणण्याजोगें वैशिष्ट्य आहे.

त्यामुळें काय झालें? आपल्या व्यवसायाचा पसारा ते विश्वासपूर्वक वाढवूं शकले. शक्य तेथें पॉप्युलर बुक-डेपोच्या शाखा स्थापन करून त्या आपल्याप्रमाणें निष्ठेनें भारलेल्या विश्वासू नातलगांकडे नि इतर कार्यकर्त्यांकडे निश्चितपणें सोंपवूं शकले.

आपल्या व्यवसायाला दीर्घजीवित्व नि अखंडितपणा आणतां आला पाहिजे, एवढेंच नव्हे तर त्यांत वाढता जोमही निर्माण होत राहिला पाहिजे, ही आहे ह्या संस्थेच्या संस्थापकांची व आजच्या चालकांची आकांक्षा. गणपतराव आतां सत्तरीपलीकडे गेले आहेत आणि ह्या उतार वयांत आज तरी ती आकांक्षा आपल्या चिरंजीवांच्या कर्तव्यपरायणतेमुळें फलद्रूप झालेली पहाण्याचें भाग्य त्यांना लाभलें आहे.

पॉप्युलरचे संस्थापक गणेश (गणपतराव) रामराव भटकळ ह्यांचा जन्म मुर्डेश्वर येथें ता. ९ सप्टेंबर १८९६ रोजीं झाला. त्यांचें प्राथमिक शिक्षण गांवींच झालें. पुढील उच्च शिक्षणासाठीं ते मुंबईंत आपल्या मामांकडे आले व ट्युटोरियल हायस्कूलमधून १९१४ सालीं मॅट्रिक झाले. त्या काळीं मॅट्रिक होणें ही शैक्षणिक दृष्ट्या भूषणावह गोष्ट होती. आज पन्नास वर्षांनंतर त्या दृष्टींत महदंतर पडलें आहे. त्या काळीं मॅट्रिकला मोल होतें तें आज राहिलेलें नाहीं. कुठेंही पायसे झिजवावे न लागतां नोकरी सहज मिळत असे.

त्याप्रमाणें गणपतरावांस आरंभीं दरमहा पंचवीस रुपये पगाराची नोकरी मिळाली. नोकरी करण्यांत त्यांनीं दहा वर्षें घालविलीं; परंतु एका जागीं ते कधींच स्थिर होऊं शकले नाहींत. ह्या नोकऱ्या विविध स्वरूपाच्या होत्या. डनलॉप रबर कंपनी, रेमिंग्टन टाईप रायटर कं., ई. डी. सासून कंपनी, वगैरे.

त्याशिवाय नंतरच्या काळांत जो त्यांचा जीवनव्यापी व जिव्हाळ्याचा व्यवसाय झाला, त्या ग्रंथविक्री नि ग्रंथप्रकाशन ह्या व्यवसायाशीं संबंध असलेल्या अशाही दोन संस्थांशीं या नोकरीच्या काळांत त्यांचा संबंध आला. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस नि कर्नाटक प्रेस ह्याच त्या दोन संस्था होत. विविध नोकऱ्या तसें विविध प्रकारचें मानवी स्वभावाचें ज्ञान नि अनुभव सहजासहजीं पदरीं पडत गेले.

गणपतराव एका नोकरींत स्थिर होऊं शकले नाहींत. ह्याचा अर्थ नोकरी म्हणजे दुसऱ्याची ताबेदारी करण्यांत त्यांना रस वाटत नव्हता. मेहनत करून इमानेंइतबारें ज्या व्यवसायांत दोन पैसे मिळवितां येतील, अशा स्वतंत्र व्यवसायाच्या शोधांत ते होते. ऑक्सफर्ड यु. प्रेस नि कर्नाटक प्रेस ह्या ग्रंथ-प्रकाशक नि ग्रंथ-प्रसारक संस्थांशीं जो संबंध आला, त्यामुळें त्यांचें ग्रंथांशीं सलगीचें नातें जडलें असल्यास नवल नाहीं. विशेषतः ग्रंथ-प्रकाशन क्षेत्रांतील थोर तपस्वी मंगेशराव कुळकर्णी ह्यांच्याशीं घरोब्याचा व प्रेमादरभावाचा संबंध असल्यामुळें गणपतराव ग्रंथांकडे खेंचले गेले. नंतरच्या काळांत व्यवसायीं जीवनांत त्यांच्या सल्लामसलतीचा उपयोग त्यांना फार झाला.

त्या काळीं नाना चौकांत डी. ए. नाडकर्णी आणि कंपनी ह्या नांवानें चाललेलें एक छोटेंसें पुस्तक-विक्रीचें दुकान होतें. भागीदार ह्या नात्यानें गणपतराव त्या दुकानांत वावरूं लागले.

नोकरीच्या बंधनांतून मोकळे झाल्यामुळें पुस्तक-विक्रीच्या दुकानांत राहून जो कांहीं जुजबी अनुभव मिळवितां येईल तो त्यांना मिळवायचा होता. ह्या काळांत गणपतराव दुकानांत स्वस्थ बसून रहात नसत. विद्यार्थ्यांना नि सर्वसाधारण वाचकांना लागणाऱ्या कांहीं निवडक ग्रंथांचा भारा बरोबर घेऊन सकाळच्या प्रहरीं ते घरोघर जात असत. त्यामुळें कोणाला काय पाहिजे, कुठें कोणत्या ग्रंथाचा उठाव होईल हें त्यांना समजत असे. व्यवहारांत वक्तशीरपणा नि चोखपणा सांभाळणें जरूर असतें. त्यासाठीं स्वतःला कितीही त्रास सोसावा लागला तरी तो सोसून ग्राहकांच्या सोयीकडे अधिक लक्ष पुरवायचें, हें होतें गणपतरावांचें आरंभापासून धोरण. त्यामुळें उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणांत ते गिऱ्हाइकें जोडीत गेले.

हा उद्योग चालू असतां त्यांच्या आयुष्यांत एक दिवस असा उगवला कीं, आतां सर्वस्वी स्वतःच्या पायांवर उभें राहून ग्रंथ-विक्रीचें स्वतंत्र दुकान थाटायला हरकत नाहीं, असा आत्मविश्वास त्यांना वाटूं लागला. त्या व्यवसायावर जशी त्यांची निष्ठा जडली होती, त्याचप्रमाणें त्यांत यश मिळविण्याची गुरुकिल्लीही त्यांना सांपडली होती.

धंद्यांत यश मिळविण्याचा मार्ग कोणता ? त्यासाठीं अपरंपार परिश्रम करण्याची नि अहर्निश जागरूक रहाण्याची फार जरूरी असते. गणपतराव आपल्या व्यवसायांत यशस्वी झाले ह्याचें आमच्या मतें प्रमुख कारण जर कोणतें असेल, तर तें म्हणजे पतकरलेल्या व्यवसायाशीं ते समरस झाले. तो व्यवसाय सर्वांगसुंदर व्हावा, ह्यासाठीं जीवेंभावें झटले व त्याच्या यशस्वितेसाठीं त्यांनीं सुखासीनतेकडे कटाक्षपूर्वक पाठ फिरविली.

धंदा सुरू करायचा तर त्यासाठीं भांडवल पाहिजे. आरंभ करतांना शामराव विठ्ठल कोऑपरेटिव्ह बँकेकडून सहा हजार रु. कर्जाऊ घेऊन गणपतरावांनीं १९२४ सालीं 'पॉप्युलर बुक-डेपो' ह्या नांवानें आपल्या स्वतंत्र धंद्याची मुहूर्तमेढ रोविली.

सुमारें त्रेचाळीस वर्षें होऊन गेलीं त्या घटनेला. ह्या दीर्घकाळाकडे मागें वळून पहातां एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेंत भरते, ती कोणती ? गणपतरावांनीं ज्या ह्या ग्रंथविक्री-केंद्राचें गणपतिपूजन केलें, त्या केंद्राची उत्तरोत्तर भरभराट होत आहे, त्याच्या फांद्या दूरवर पसरत चालल्या आहेत, त्याला नवनवीन फळें-फुलें येऊं लागलीं आहेत व ह्या प्रकाशन-संस्थेचा भावी काळ आजच्यापेक्षांही उज्ज्वल आहे, अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत; आणि ज्यांनीं अत्यंत मेहनतपूर्वक ह्या संस्थेचें बीजारोपण केलें, त्यांच्या नजरेसमोर हें सर्व घडत आहे.

तुमचा व्यवसाय कोणताही असो, त्याला आदरणीय नि विश्वसनीय बनविणें हें तुमच्याच हातीं असतें. पॉप्युलर पुस्तक-विक्री-केंद्र नि पाप्युलर-प्रकाशन ह्या संस्थांनीं आपल्या धोरणी वागणुकीनें जनतेच्या मनांत आज आदराची नि विश्वासाची भावना निर्माण केली आहे; आणि ह्या भावना निर्माण करणें, हेंच त्या व्यवसायांतील यशाचें मर्म आहे.

आज ह्या संस्थेची जी प्रगति दिसत आहे, ती टप्प्याटप्प्यानें होत

आलेली आहे. दुकानाची स्थापना झाल्यानंतर (१९२४) शिक्षक नि प्राध्यापक ह्यांच्याशीं संबंध येऊं लागला. त्यांच्याकडून प्रकाशनासंबंधीं विचारणा होऊं लागली. तर कित्येकांनीं पुस्तकें छापवून घेतलीं, परंतु त्यांच्या विक्रीची व्यवस्था व्हावी, अशी त्यांची अपेक्षा आढळून येऊं लागली.

अशा परिस्थितीमुळें १९३० पासून प्रकाशनाकडे लक्ष पुरवावें असें वाटूं लागलें. प्रकाशनास आरंभ झाला तो शाळा-कॉलेजांसाठीं लागणाऱ्या इंग्रजी पुस्तकांच्या प्रकाशनानें. असा हा उपक्रम सतत १९४७ सालापर्यंत चालू होता; व आजही तो जोमांत चालू आहे. त्याच वर्षी संस्थेकडे गिरगांवांतील 'बाँबे बुक-डेपो' ह्या नामवंत ग्रंथविक्री-केंद्राची मालकी आली. तेव्हांपासून संस्थेच्या चालकांचा मराठी पुस्तकांशीं संबंध येऊं लागला, परंतु तो संबंध इतर लेखक नि प्रकाशक ह्यांनीं छापलेल्या पुस्तकांची सोल एजन्सी घेणें किंवा त्यांचीं पुस्तकें विक्रीस ठेवणें, एवढ्यापुरताच मर्यादित होता.

त्यानंतर संस्थेचे चालक मराठी पुस्तक-प्रकाशनाकडे वळले ते १९५२ सालापासून. त्या वर्षी 'कबुतरें'—गंगाधर गाडगीळ व 'कमळण'—अरविंद गोखले, हीं पहिलीं वहिलीं दोन पुस्तकें प्रसिद्ध करण्यांत आलीं, आणि वर नमूद केल्याप्रमाणें गेल्या पंधरा वर्षांच्या काळांत मराठी प्रकाशनांची संख्या दोन अर्डीचशेंच्या पलीकडे गेली आहे.

'बाँबे बुक-डेपो' ह्या गिरगांवांतील ग्रंथविक्री-केंद्राचा वर उल्लेख करण्यांत आलेला आहे. गेल्या कांहीं वर्षांच्या कालावधींत ह्या ग्रंथविक्री-केंद्रानें वाचक नि ग्राहक ह्यांच्या मनांत आदराची नि विश्वासाची भावना निर्माण केली आहे, आणि ही घटना पॉप्युलर बुक-डेपोला भूषणावह आहे. कोणतीही संस्था असो; तिचा व्यवस्थापक आपली जबाबदारी ओळखून वागणारा नि ग्राहकांच्या गरजा जाणून त्या पूर्ण करणारा असावा लागतो. बाँबे बुकडेपोचे व्यवस्थापक (पॉप्युलरचे संस्थापक गणपतराव ह्यांचे जामात) पां. ना. कुमठा हे त्या कसोटीस पूर्णपणें उतरणारे आहेत. ग्रंथ-प्रकाशन तसेंच ग्रंथ-प्रसार ह्यासंबंधीं ज्या ज्या चळवळी होतात, त्यांत ते आवडीनें भाग घेत असतात.

पॉप्युलर प्रकाशन-संस्था ही केवळ एकाच वाङ्मय प्रकारास चिकटून राहिलेली नाहीं. वाचकवर्ग मग तो बाल वा प्रौढ असो; त्याच्या ज्ञानाची

सर्वांगीण पातळी उत्तरोत्तर उंचावत गेली पाहिजे, ही आहे चालकांची प्रकाशन-क्षेत्रांतील सर्वव्यापी दृष्टि. ललित वाङ्मय, विविध शास्त्रांतील शास्त्रीय वाङ्मय, टीकावाङ्मय, चरित्रवाङ्मय, त्याचप्रमाणें बाल-वाङ्मय जितकें म्हणून समृद्ध व सकस करतां येईल तेवढें करावयाचें; त्यासाठीं नामवंत लेखक गांठावयाचे; त्या बाबतींत ज्ञात्यांची सल्लामसलत वेळोवेळीं घ्यावयाची; हें धोरण कटाक्षानें पाळण्यांत येत असतें. त्यामुळें चालू काळांतील एक दर्जेदार प्रकाशन-संस्था हा लौकिक तिला संपादन करतां आला आहे.

पॉप्युलर-प्रकाशन संस्थेला हें जें यश मिळालें नि तें आजवर वाढत्या जोमानें टिकवितां आलें, ह्याचें एकमेव प्रमुख कारण म्हणजे गणपतरावांचे चिरंजीव सदानंद नि रामदास ह्यांची, वडिलांनीं स्थापन केलेल्या व्यवसायासंबंधीं अजोड आस्था, सतत पुढें पुढें जाण्याची ईर्षा व सध्यांच्या काळांत सहसा आढळून न येणारी परस्परसहकारिताच होय. त्यांना आपल्या शिरावरील जबाबदारीची पूर्ण जाणीव आहे. भरघोस यश मिळवायचें तर तें एकटा दुकटा मिळवूं शकत नाहीं. अनेकांचा आस्थेवाईक सहकार नि शुभाशीर्वाद हें आपलें भांडवल आहे. त्यांत उत्तरोत्तर भर पडत गेली पाहिजे व तदनुरूप आपल्याकडून आचरण घडलें पाहिजे, ह्यासाठीं भटकळ-बंधु अहर्निश जपत असतात. त्याचप्रमाणें आपला प्रकाशन-व्यवसाय उन्नतदशेला आणण्यासाठीं कोणत्या साधनांचा सहकार घ्यावा, ह्या चिंतनांत ते नेहमीं असतात.

लेखक, वाचक नि ग्राहक हा आपला गोतावळा आहे. त्यांचा विश्वास सेवाभावानें संपादन करणें हें आपलें कर्तव्य आहे, हें ओळखणारा प्रकाशक आपल्या व्यवसायांत यशस्वी व्हावयाचाच, हें विधिलिखित आहे.

ग्राहकांचा विश्वास संपादन करायचा नि त्यांची सेवा करायची, म्हणजे काय करायचें ? कोणतेंही पुस्तक असो. अर्थशास्त्र, कायदा, वैद्यक, इंजिनियरिंग किंवा इतर कोणत्याही शास्त्रीय या अवांतर शाखेंतील पुस्तक असो; तें पॉप्युलर बुक-डेपोंत मिळायचेंच; किंवा नाहीं मिळालें तरी त्याची ' ऑर्डर ' नोंदविली असतां ठरलेल्या दिवशीं तें हमखास मिळायचेंच, अशा विश्वासानें ग्राहक पॉप्युलरमध्यें जातात आणि त्या विश्वासाला धक्का पोहोंचून त्यांना निराशेनें परतावें लागत नाहीं.

ग्रंथ ह्या देशांत प्रसिद्ध झालेला असो वा परदेशांत प्रसिद्ध झालेला असो. ज्याला मागणी आहे, त्याचा संग्रह पॉप्युलरच्या ग्रंथ-भांडारांत झालेला असावयाचाच, हा लौकिक संपादन करणें, ही साधी गोष्ट नाहीं. त्यासाठीं अमाप पैसा गुंतवून ठेवणें जरूर असतें. पॉप्युलरच्या चालकांनीं इंग्लंड-अमेरिकेसारख्या परदेशांतील पुस्तकविक्रेत्यांशीं सलोख्याचे संबंध जोडले असून त्यामुळें पुस्तकांची देवाण घेवाण सतत चालू असते. ग्रंथप्रेमी व वाचनप्रेमी ग्राहकांची त्यामुळें सोय होत असते. दुकानांत आलेल्या ग्राहकांची योग्य ती संभावना होणें, ही फार महत्त्वाची बाब आहे. त्याची त्वकर दाद लागावी व त्याला जरूरीपेक्षां अधिक वेळ ताटकळत रहाणें भाग पडूं नये अशी नोकरवर्गाची यंत्रणा घडवून आणणें, हें चालकांचें कर्तव्य असतें. त्या कर्तव्य-पालनांत पॉप्युलर बुक-डेपोनें नांव मिळविलें आहे.

त्यामुळें काय झालें ? ग्राहक लहान, मोठा, त्याचप्रमाणें तो मुंबईंतील असो, बाहेरचा असो, किंवा परदेशांतील असो; त्याला कोणत्याही विषयावरील एकाद्या ग्रंथाची किंवा रेफरन्स बुकाची जेव्हां जरूरी भासते, तेव्हां प्रथम आठवण जर कोणाची होत असेल तर ती पॉप्युलर-बुक-डेपोची होय.

त्यामुळें सरकारी कचेऱ्या किंवा सरकारचीं निरनिराळीं खातीं, तसेंच ह्या देशांतील व परदेशांतील लौकिकसंपन्न ग्रंथसंग्रहालयें, ग्रंथप्रेमी विद्वान वाचक, ह्या सर्वांना पॉप्युलर बुक-डेपो पुस्तकविक्री-केंद्र हें एक खात्रीचें नि विश्वासाचें स्थान होऊन राहिलें आहे.

प्रयत्नेंकरून संपादन केलेला हा लौकिक नि विश्वास हें पॉप्युलरचें सर्वांत मोठें भांडवल आहे. आणि मौजेची गोष्ट अशी आहे कीं, केवळ तेवढ्या भांडवलावर विसंबून पॉप्युलरचे चालक स्वस्थ राहिलेले नाहींत.

पुस्तक–विक्रेत्यानें भांडवल गुंतवून केवळ पुस्तकांचें भांडार वाढवून कसें चालेल ? त्या भांडारांतील ग्रंथांचा उठाव सतत होत राहिला पाहिजे. त्यासाठीं निरनिराळ्या शाखांतील ग्रंथांचीं सूची-पत्रकें सुंदर रीतीनें छापवून घेऊन तीं योग्य त्या ठिकाणीं पाठविणें, वाचकांच्या मनांत ग्रंथवाचनाबद्दल कुतूहल निर्माण करणें, वेळोवेळीं भरविल्या जाणाऱ्या ग्रंथांच्या प्रदर्शनांत किंवा जत्रांत भाग घेणें, त्यांच्याशीं निकट संबंध ठेवणें, ग्रंथविक्री, ग्रंथ-प्रकाशन

ह्या आपल्या व्यवसायांसंबंधीं स्वदेशांत त्याचप्रमाणें सुधारणांच्या अग्रस्थानीं असलेल्या इंग्लंड, अमेरिका, रशिया, जर्मनी वगैरे परदेशांतून ग्रंथविषयक कोणकोणत्या चळवळी चालू आहेत, त्यांचा सतत मागोवा घेत रहाणें, त्याचप्रमाणें मधून मधून परदेशाच्या यात्रा आपल्या ग्रंथविषयक ज्ञानांत भर पडावी ह्या हेतूनें करणें, हें आपलें एक व्यवसायीन आवश्यक कर्तव्य आहे, असें भटकळ-बंधु मानतात नि तें पार पडावें ह्यासाठीं सतत झटत असतात.

पॉप्युलर बुक-डेपोचा पसारा नि विस्तार उत्तरोत्तर वाढत चालला आहे. पुस्तक - विक्री हा व्यवसाय उत्तम प्रकारें चालवावा, ह्या हेतूनें संस्थेचे आद्य संस्थापक गणपतराव भटकळ ह्यांनीं ह्या व्यवसायाचा आरंभ कोणत्या परिस्थितींत नि कशा रीतीनें केला व आस्ते आस्ते त्या व्यवसायाला ग्रंथप्रकाशन शाखेची जोड कशा रीतीनें करून देण्यांत आली, हें आपण पाहिलें. परंतु त्यांचें व विशेषतः त्यांच्या चिरंजीवांचें तेवढ्यानें समाधान झालें नाहीं.

आज आपला देश स्वतंत्र झालेला आहे. विविध क्षेत्रांतील ज्ञान संपादन केलें पाहिजे, असें सुबुद्ध जनतेला वाटूं लागलें आहे. परदेशांतील लोकांमध्येंही भारत देश, भारतीय जनता, भारताची प्राचीन व अर्वाचीन संस्कृती, इतिहास, कलाकौशल्य वगैरेबद्दल एक प्रकारचें कुतूहल निर्माण झालें आहे. आपणांस तत्संबंधीं ज्ञान व्हावें, असें त्यांना वाटूं लागलें आहे. त्या दृष्टीनें आपली प्रकाशन-संस्था अधिकाधिक समृद्ध, अद्ययावत् नि देशी-परदेशी वाचकांची वाढती ज्ञान-तृष्णा तृप्त करणारी व्हावी व त्यासाठीं जाणीवपूर्वक जरूर तीं प्रकाशनें प्रसिद्ध करतां यावीं, अर्थात् ह्या कार्याकडे जास्तींत जास्त व खास लक्ष पुरवितां यावें, ह्या हेतूनें 'पॉप्युलर-प्रकाशन' ही संस्था गेल्या ५।६ वर्षांपासून (१९६२) पॉप्युलर बुक-डेपोपासून अलग करण्यांत आली आहे. त्यामुळें अलीकडे तिचें कार्य विशेष जोमानें चालू झालें आहे. प्रतिवर्षी निरनिराळ्या शास्त्रांतील किमानपक्षीं शंभर ग्रंथ प्रसिद्ध करावे, असें लक्ष्य ह्या जोमदार संस्थेनें आपल्यापुढें ठेविलें आहे.

ह्या देशांतील व परदेशांतील ग्रंथविषयक हालचाली, चळवळी, तसेंच ग्रंथ - व्यवसायासंबंधीं जरूर ती माहिती व नवीन प्रकाशनांचें वृत्त सर्व ठिकाणच्या ग्रंथप्रेमी व ग्रंथव्यवसायी लोकांस मिळणें, त्याचप्रमाणें ग्रंथ-प्रकाशकांना

मार्गदर्शन होणें, ह्या उदात्त हेतूंनीं पॉप्युलरतर्फे गेल्या सोळा वर्षांपासून (१९५०) 'इंडियन पब्लिशर्स अँड बुक-सेलर्स' ह्या नांवाचें मासिक वक्तशीरपणें प्रसिद्ध होत असतें. ग्रंथ-प्रकाशक नि वाचक ह्यांच्या दृष्टीनें ह्या नियतकालिकाची आजवरची कामगिरी प्रशंसनीय आहे.

ह्या उपयुक्त मासिकातर्फे ग्रंथांच्या आयात-निर्यातीसंबंधानें त्या व्यवसायाशीं संबंध असलेल्यांना, त्याचप्रमाणें ग्रंथ-वाचकांना मार्गदर्शन होऊन ग्रंथ-निर्यातीचा व्यवसाय शक्य तेवढा वाढीस लागावा ह्या हेतूनें मधून मधून ग्रंथ-निर्यात विशेषांक प्रसिद्ध करण्यांत येत असतात.

वर सांगितल्याप्रमाणें भारत स्वतंत्र झाल्यापासून विशेषतः गेल्या १०।१२ वर्षांपासून परदेशीय लोकांत भारतासंबंधानें कुतूहल निर्माण झालें आहे. भारतीय संस्कृति, कलाकौशल्य, भारतेतिहास, नामवंत भारतीय पुढारी वगैरे-संबंधानें जे जे ग्रंथ प्रकाशित होतील ते ते वाचावे, अशा प्रकारची जिज्ञासा अनेक देशांतील लोकांत उत्पन्न झाली आहे. त्यामुळें भारतीय प्रकाशकांनीं इंग्रजी भाषेंत प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांना मागणी निर्माण झाली आहे. ह्या परिस्थितीचा योग्य तो फायदा ह्या देशांतील प्रकाशकांनीं व ग्रंथ-विक्रेत्यांनीं घेणें जरूर आहे.

पॉप्युलर पुस्तक विक्री-केंद्र नि पॉप्युलर-प्रकाशन ह्या संस्थांनीं त्या दृष्टीनें पद्धतशीर पावलें टाकून इंग्लंड-अमेरिकेंतील ग्रंथ-विक्रेत्यांशीं व ग्रंथ-प्रकाशकांशीं सलोख्याचे संबंध निर्माण केले आहेत.

ग्रंथ-विक्री नि ग्रंथ-प्रकाशन हे व्यवसाय माननीय नि लोकादरास पात्र होऊन रहावे असे आहेत. कां बरें ? कारण ज्ञान-प्रसार, नि ज्ञान-संवर्धन ह्या बाबी कोणत्याही समाजाच्या किंवा देशाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत. परंतु त्या महत्त्वाची जाणीव प्रथम प्रकाशकाला असली पाहिजे. पॉप्युलर-प्रकाशनचे चालक आज त्या जाणिवेनें वावरत आहेत असें आम्हांला वाटतें. आणि म्हणूनच आजच्या काळांत त्यांचें महत्त्व.

पॉप्युलर-प्रकाशन ह्या संस्थेनें आजवर विविध विषयांवरील शेंकडांनीं मोजतां येतील इतके ग्रंथ प्रसिद्ध केले; परंतु ते इतर मुद्रणालयांचा सहकार संपादन करून. ग्रंथांचें प्रकाशन मनाप्रमाणें सुंदर नि वक्तशीर करायचें तर स्वतःच्या मालकीचें मुद्रणालय नको का असायला ?

ह्यासंबंधीं भटकळ-बंधूंशीं बोलत असतां ते म्हणाले, "होय; खरं आहे तुमचं म्हणणं. आम्हांलाही स्वतःचं मुद्रणालय असावं असा मोह निदान अलीकडे तरी वारंवार होत असतो. कारण आजकाल मुद्रणालयें इतक्या कामांत असतात कीं, दिलेलीं कामें वेळेवर नि मनाप्रमाणें होत नाहींत. परंतु ह्या बाबतींत बहुतेकांचा अनुभव असा आहे कीं, प्रकाशकानें स्वतःच्या मुद्रणालयाची उभारणी करून त्यांत लक्ष गुंतविणें, ह्यामध्यें नफ्यापेक्षां तोटेच अधिक आहेत."

"कां बरें? असे कोणते तोटे होण्याचा संभव आहे?"

"तोटे अनेक आहेत. २-३ च सांगतों. पहिला तोटा म्हणजे आपल्या-जवळचें भांडवल प्रकाशनापेक्षां मुद्रणालयांतच गुंतून बसतें. अनेक तोंडें बंद करतां करतां मुद्रणालयाचा चालक मेटाकुटीस येतो. शिवाय मुद्रणाच्या कामांत सतत देखरेख ठेवावी लागते ती वेगळीच. हे व्याप संभाळून प्रकाशनाचा व्यापही यशस्वी रीतीनें सांभाळणें कठीणच नाहीं का? शिवाय सध्यांच्या काळांत मुद्रणालयांतील कामगार-वर्गाला सांभाळणें हीं एक तापदायक बाब होऊन राहिली आहे. तेव्हां जाणून बुजून मुद्रणालय चालविण्याच्या मारक मोहांत स्वतःला अडकवून घेणें आम्हांला श्रेयस्कर वाटत नाहीं."

"प्रकाशन-व्यवसाय यशस्वी होण्यासाठीं प्रकाशकानें कोणत्या गोष्टींची विशेष खबरदारी घेणें जरूर आहे असें इतक्या वर्षांच्या अनुभवानंतर आपणांस वाटतें?"

ह्या प्रश्नाचें भटकळ-बंधूंकडून जें उत्तर मिळालें, त्यांतच त्यांच्या यशाचें मारमर्म सांठविलेलें आहे, असें आम्हांला वाटतें.

ते म्हणाले, "ग्रंथ-प्रकाशन हा व्यवसाय असला तरी त्याचा समाजाच्या सांस्कृतिक घटकांशीं नेहमीं संबंध येत असतो. त्यामुळें प्रकाशक कांहीं प्रमाणांत, व्यवहार विसरून ध्येयवादाला बळी पडण्याची शक्यता असते. तेव्हां आपल्या ध्येयानुसार प्रकाशन-व्यवसाय करतांना व्यवहार सुटूं देऊं नयें; मात्र हा व्यवहार म्हणजे मतलबी स्वार्थ नव्हे, हें उघडच आहे."

स्वार्थ साधून परमार्थही कसा साधतां येतो, ह्याचा आदर्श पॉप्युलर प्रकाशन ह्या संस्थेनें सर्वांपुढें ठेविला आहे.

## १०

## केशव भिकाजी ढवळे-प्रकाशन

अल्प किंमतींत धार्मिक व संतवाङ्मय सर्वसाधारण जनतेपर्यंत पोहोंचविणारे निष्ठावंत नि ध्येयवादी प्रकाशक ह्या नात्यानें केशव भिकाजी ढवळे प्रकाशन ही संस्था गेल्या अनेक वर्षांपासून महाराष्ट्रांत मशहूर होऊन राहिली आहे. गोड स्वभाव, सचोटी नि वांट्यास येतील ते कष्ट करण्याची तयारी, ह्या गुणांच्या बळावर ढवळे बंधूंनीं अत्यंत अल्प प्रमाणांत पुस्तकविक्रीचा व्यवसाय सुरू करून त्यांत सर्व बाजूंनीं घवघवीत यश मिळविलें.

महादेव, केशव नि गणेश हे तीन बंधु, समजूं उमजूं लागल्यापासून एकमतानें वागणारे. आयुष्याच्या अखेरीपर्यंत त्यांच्यांत बेबनाव असा कधींच झाला नाहीं. संगमेश्वर तालुक्यांतील पुर्ये हा त्यांचा जन्मगांव. वडील बंधूंचें शिक्षण मराठी सहावीपर्यंत होऊन त्यांनीं शाळेंत शिक्षकाची नोकरी पतकरली. पगार होता रुपये सात. दुसऱ्या दोघांचें शिक्षण तीन इयत्तांपलीकडे जाऊं शकलें नाहीं.

शाळेंत अपमानकारक वागणुकीस तोंड द्यावें लागल्यामुळें महादेव ह्यांनीं नोकरीचा राजीनामा देऊन पुनरपि नोकरीच्या फंदांत कधींही पडायचें नाहीं असें ठरवून कामधंद्यासाठीं मुंबई गांठली. सुरवातीस त्यांनीं परळ, मोईवाडा येथें एक खासगी शाळा सुरू केली (१८९८). कांहीं दिवसांनीं बंधु केशव ह्यांस मदतीसाठीं मुंबईस बोलावलें. शाळा ठीक चालली होती; परंतु त्या काळीं मुंबईंत मधून मधून प्लेगाचा प्रादुर्भाव होई. त्यामुळें शाळा बंद ठेवावी लागे. मुंबईसारख्या

ठिकाणीं रिकामें राहून कसें चालेल? रोजचा निर्वाह तर चालला पाहिजे? हातांत रोजच्या रोज थोडा कां होईना, पैसा तर घोळत राहिला पाहिजे?

दोन डोकीं एकत्र झालीं. त्यांनीं खूप विचार केला आणि शेवटीं ठरविलें कीं, लहानसहान पुस्तकें विकण्याचा रोजगार सुरू करावा. त्यासाठीं भांडवल कुठून आणायचें? वडील बंधूंनीं तो प्रश्न सोडविला. ते गांवीं गेले नि एका ओळखीच्या सावकाराकडून दोनशें रुपये घेऊन मुंबईस आले. ज्यांचा खप हटकून होईल अशीं स्तोत्रें, भजनें, अंकलिप्या ह्यांसारखीं अल्प किंमतीचीं पुस्तकें घेतलीं नि तीं खपविण्यासाठीं दोघेही बंधु बाहेर पडले.

होय; पण पुस्तकें मांडून बसायचें कुठें? भाड्यानें दुकान घेण्याएवढें भांडवल त्यांच्याजवळ नव्हतें. त्यामुळें ते निराश झाले नाहींत. त्यांनीं माधवबाग गांडली नि तेथील पिंपळाच्या पाराचा त्यांनीं आश्रय घेतला. पुस्तकांचे भारे खांद्यावर वाहून आणावयाचे नि तीं पुस्तकें पिंपळाच्या पारावर व्यवस्थित मांडून गिन्हाईकांची मार्गप्रतीक्षा करीत बसावयाचें. अल्प किंमतींत मिळणारीं धार्मिक पुस्तकें. तेथें देवदर्शनासाठीं येणारी जाणारी मंडळी पाराजवळ थांबून पुस्तकें निरखून नि चाळूनही पहात, व आपापल्या आवडीप्रमाणें पुस्तकांची निवड करीत.

अपेक्षेप्रमाणें दोघांही बंधूंच्या हातांत थोडा कां होईना, पैसा घोळूं लागला. त्यांची रहाणी होती अत्यंत काटकसरीची नि टापटिपीची. अंगीकृत रोजगारावर त्यांची जबरदस्त निष्ठा होती. माधवबागेंत दुकानासाठीं जागा घेण्याइतपत ऐपत येतांच त्यांनीं एक लहानसें दुकान भाड्यानें घेतलें. तेथें 'केशव भिकाजी ढवळे—बुकसेलर' ह्या नांवानें पुस्तक विक्रीचें दुकान थाटलें. व्यवसाय आस्ते आस्ते वाढूं लागल्यामुळें गांवीं राहिलेले तिसरे बंधु गणपतराव ह्यांस मदतीसाठीं मुंबईस बोलावून घेण्यांत आलें.

दोघे होते तेथें आतां तिघे झाले. तिघे झाले म्हणून तिघांचीं तीन मतें असें कधीं घडलें नाहीं. ते शरीरानें तीन असले तरी मनानें एक होते नि एकमेकांना पोषक होते. धंदारोजगारांत उत्तरोत्तर त्यांचें पाऊल प्रगतीच्या मार्गानें पडत गेलें ह्याचें हेंच प्रमुख कारण होतें.

दुर्दैवानें १९१० सालीं वडील-बंधु महादेव निधन पावल्यामुळें सारा भार मागें राहिलेल्या दोन बंधूंवर पडला व तो त्यांनीं धीर-गंभीरपणें उचलला.

१९०० ते १९१४ पर्यंत ढवळेबंधूंनी दुसऱ्यांनीं प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें विकण्याचा व्यवसाय मोठ्या नेकीनें केला. बाहेरगांवच्या पुस्तकविक्रेत्यांनाही ते ह्या मालाचा पुरवठा करीत असत.

पायरी-पायरीनें पुढें जायचें हा होता ह्या बंधूंचा बाणा. दुसऱ्यांनीं प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें आपण विकतों, मग नेहमीं हमखास लागणारीं कांहीं लहान-सहान पुस्तकें प्रसिद्ध करून आपण कां होऊं नये प्रकाशक? हा विचार त्यांच्या मनांत घोळूं लागला आणि १९१४–१५ सालीं त्यांनीं ह्या मार्गावर पहिलें पाऊल टाकलें तें उजळणीचें मुलांमुलींचें चिमुकलें पुस्तक प्रसिद्ध करून! आणि त्यानंतर लागोपाठ शनिमाहात्म्य, व्यंकटेशस्तोत्र, मनाचे श्लोक, ह्यांसारखीं नित्योपयोगी छोटीं छोटीं पुस्तकें त्यांनीं प्रसिद्ध केलीं.

दोघां बंधूंनीं प्रकाशन क्षेत्रांत मोठ्या उमेदीनें पाऊल टाकलें. समर्थकृपेनें त्यांत यशही मिळूं लागलें. पुस्तकविक्रीच्या जोडीला लहान प्रमाणांत प्रकाशन व्यवसाय सुरू करून २।३ वर्षें झालीं असतील. एवढ्यांत केशव भिकाजींना आजारानें गांठल्यामुळें त्यांना मुंबई सोडून बाहेरगांवीं जाणें भाग पडलें.

आतां सारी जबाबदारी तिसरे बंधु गणेश भिकाजी ह्यांच्यावर येऊन पडली व ती त्यांनीं समर्थपणें सांभाळली. प्रकाशन-क्षेत्रांत पदार्पण झालेलें होतेंच. गणेश भिकाजींचें धार्मिक ग्रंथांकडे विशेष लक्ष होतें. सर्वसाधारण लोकांच्या हातांत धार्मिक ग्रंथ व संतवाङ्मय सहज रीतीनें पडलें पाहिजे; त्याशिवाय जनतेंत स्वधर्माबद्दल पसरलेलें औदासीन्य नाहींसें होणार नाहीं, असें त्यांना मनापासून वाटत असे.

पहिले महाराष्ट्रीय मुद्रक-प्रकाशक गणपत कृष्णाजी ह्यांनीं धार्मिक वाङ्मय-प्रकाशनाचा खंबीर पाया घातला. निर्णयसागरचे जावजी दादाजी ह्यांनीं त्या पायावर टोलेजंग मंदिर उभारलें नि ढवळेबंधूंनीं त्या मंदिरावर कळस चढविला असें म्हणतां येईल. प्रथमारंभीं त्यांनीं सार्थ ज्ञानेश्वरी, श्रीमद्भगवद्गीता हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्यानंतर पांगारकरकृत सार्थ दासबोध, भक्तिमार्गप्रदीप, ह्यांसारखे एकाहून एक सरस नि घरोघर नित्य वाचनांत येणारे बहुमोली, परंतु अल्प किंमतींत मिळणारे अनेक ग्रंथ प्रसिद्ध केले.

प्रकाशन-व्यवसायाचा व्याप वाढत चालला. त्यांत किफायतही चांगली

होऊं लागली. स्वतःच्या मालकीच्या घरांत संसार थाटावा असें वाटूं लागलें. समर्थकृपेनें तीही इच्छा पूर्ण झाली.

१९३४ सालीं बनाम हॉल लेनमध्यें तीन मजली इमारत बांधून तिचें नांव 'श्रीसमर्थसदन' ठेवण्यांत आलें. स्थलांतर होत होत शेवटीं त्या सदनांत संस्थेचें कार्यालय व विन्हाड थाटण्यांत आलें तें आजतागायत तेथेंच आहे.

ह्या मालकीच्या व नवीन जागेंत आल्यापासून प्रकाशनकार्य विशेष जोमानें सुरू झालें. एक ध्येयशील नि प्रगतिपरायण प्रकाशक ह्या नात्यानें संस्थेचा लौकिक वाढीस लागला, ही समाधानाची घटना होती. परंतु कोणत्याही बाबतींत ईश्वर तुम्हांला संपूर्ण समाधानाचें सुख घेऊं देत नाहीं. त्यांत कांहीं ना कांहीं उणेपणाचा भाग तो राखून ठेवीत असतो! गणेश भिकाजी हे ह्या प्रकाशनाचा गाडा यशस्वी रीतीनें रेटीत होते. केशव भिकाजी यांचें आजारीपण चालूच होतें. त्यांच्या सल्लामसलतीचा नि मार्गदर्शनाचा वेळोवेळीं उपयोग होत असे.

गणेश भिकाजींनीं शालेय-वाङ्मय, बाल-वाङ्मय, तसेंच धार्मिक-वाङ्मय वगैरे निरनिराळ्या वाङ्मयीन क्षेत्रांत विद्वान लेखकांचें सहकार्य संपादन करून मोलाची भर घातली.

मुंबई-वैभव, लक्ष्मी-नारायण, ह्यांसारख्या समर्थ छापखान्यांचें सहकार्य मिळवून हें प्रकाशनकार्य चालू होतें. प्रकाशनाचा वाढता व्याप संभाळण्याच्या दृष्टीनें स्वतःचें मुद्रणालय असावें असें वाटूं लागलें. त्या दृष्टीनें प्रयत्न सुरू झाले. कर्नाटक-मुद्रणालय नि कर्नाटक-प्रकाशन ह्या लौकिकसंपन्न संस्था विकायच्या आहेत, असें समजल्यावरून त्या दिशेनें पावलें पडूं लागलीं व १९४५ सालीं त्या दोन्ही संस्था खरेदी करण्यांत आल्या. ढवळे ह्यांनीं हें फार मोठें धाडस पतकरलें होतें; परंतु धाडस पतकरल्याशिवाय मनाप्रमाणें धंद्याची वाढ नि विकास साधतां यायचा नाहीं, हेंही तितकेंच खरें होतें.

आजवर ढवळे-प्रकाशन-संस्था महाराष्ट्राच्या बौद्धिक नि आत्मिक जीवनाचा विकास करण्याचा यशस्वी प्रयत्न आपल्या परीनें करीत होती. त्याच्या जोडीला कर्नाटक-मुद्रणालय व प्रकाशन ह्यांचा संगम घडून आला. कर्नाटक प्रकाशन संस्थेनें आपल्या कर्तबगारीच्या बळावर वाचकांच्या मनांत उच्च

आकांक्षा नि परंपरा निर्माण करून ठेविल्या होत्या. त्या कायम टिकवून त्यांत मोलाची भर घालण्याची जबाबदारी आतां नव्या चालकांवर येऊन पडली. हें त्या क्षेत्रांतील एक आव्हानच होतें म्हणाना !

ढवळे ह्यांना आपल्या शिरावरील ह्या जबाबदारीची पूर्ण जाणीव होती. त्या जाणिवेनें त्यांचीं पावलें पडूं लागलीं. श्रीसमर्थसदनांतून संस्थेची कचेरी चिराबाजारांतील 'कर्नाटक हाऊस' मध्यें हालविण्यांत आली. मुद्रणालयाचा कारभार तेथें चालू होताच.

येथें आल्यापासून कांहीं नवीन उपक्रम सुरू करण्याचें चालकांच्या मनांत घोळूं लागलें. मुद्रण-प्रकाशनाचा व्याप वाढवायचा तर जागेची उणीव भासूं लागली. शिवाय परिस्थिति अशी जुळून आली कीं, स्थलांतर केलें तर मनांतील आशा-आकांक्षा फलद्रूप होऊं शकतील. त्याप्रमाणें चिराबाजारमधून शीव येथें स्थलांतर झालें. नवीन छपाईची यंत्रसामुग्री घेऊन मुद्रणसामर्थ्य दुप्पटीनें वाढविण्यांत आलें. त्याला ऑफसेट मशीनची, ब्लॉकमेकिंगची व चित्रविभागाचीही जोड करून देण्यांत आली. असें करण्यांत हेतु अत्यंत स्तुत्य होता.

ग्रंथ-प्रकाशन झपाटेबंद स्वरूपांत सुरू करण्यांत आलें. ग्रंथकार, ग्रंथप्रकाशक, ग्रंथविक्रेते, ग्रंथालयें नि विद्यालयें ह्यांमधील परस्पर संबंध वाढावे नि भेटीगांठी व्हाव्या, ह्या सद्धेतूनें 'मराठीचिये नगरीं' ह्या नांवाचें नवीन धर्तीचें एक नियतकालिक सुरू करण्यांत आलें. ( १९४८ ) मुलांसाठीं एकादें सुंदर नि आदर्श मासिक असावें, ह्या हेतूनें पालवणकर ह्यांचें 'खेळगडी' मासिक घेऊन तें सुंदर सजावटींत प्रसिद्ध होऊं लागलें. हे दोन्ही उपक्रम नंतर बंद करावे लागले !

शींव येथें एकंदर तीन वर्षें वास्तव्य होतें. ज्या आशा-आकांक्षा बाळगून संस्था शींवला नेण्यांत आली, त्यांपैकीं एकही आशा सिद्धीला गेली नाहीं ! जागेच्या बाबतींत बांधलेलें धोरण फसलें व एकंदरींत साऱ्या आशांचा चुराडा झाला !

कामगारवर्ग नि सहकारी ह्यांच्याकडून ज्या सहकार्याची अपेक्षा करण्यांत आली होती, त्या सफल झाल्या नाहींत. जागेच्या बाबतींतही अपेक्षा फसल्या. पुन्हां स्थलांतर करावें लागलें. १९५० सालीं मुद्रणालय पुन्हां पूर्वस्थळीं आलें. एकंदरींत पहातां हें स्थलांतर व्यवसायाच्या दृष्टीनें अत्यंत नुकसानकारक

च अपकारक ठरलें. एकदां जी घडी विस्कटली ती पुन्हां कांहीं केल्या नीट बसूं शकली नाहीं.

अशा स्थितींत एकंदर परिस्थितीचा विचार करतां पांढरे हत्ती होऊन राहिलेले संस्थेतील कांहीं विभाग बंद करण्याचा निर्णय घ्यावा लागला. स्वतःच्या नजरेखालीं चालवितां येतील तेवढेच भाग चालू ठेवण्याचें धोरण स्वीकारावें लागलें. त्याला अनुसरून ऑफसेट यंत्रासह सिद्धलियो प्रेस विकून टाकण्यांत आला.

सर्व विभाग स्वतःच्या नजरेखालीं असावे ह्या हेतूनें १९५२ च्या उत्तरार्धांत मुद्रण, मुद्राकरण, चित्रण, प्रकाशन व विक्री हे सर्व विभाग एकाच इमारतींत आणून त्यांमध्यें सुसंगतता नि सुनियंत्रितता आणण्याचा प्रयत्न करण्यांत आला.

प्रकाशन विभागाचें कार्य पुनश्च जोमानें सुरू झालें. ह्यानंतरच्या काळांत कांहीं उपयुक्त ग्रंथप्रकाशन झालें.

ह्या काळांत शैक्षणिक नि शालेय पुस्तकप्रकाशनाकडे विशेष लक्ष पुरविण्यांत आलें. प्रौढ साक्षरांसाठीं उपयुक्त नि वाचनीय वाङ्मयनिर्मिती व्हावी ह्या हेतूनें भारत सरकारच्या शिक्षणखात्यातर्फे एक स्पर्धा जाहीर करण्यांत आली. प्रकाशकांना तें एक प्रकारचें आव्हान होतें. ढवळे-प्रकाशन संस्थेनें तें उत्साहानें नि मोठ्या उमेदीनें स्वीकारलें. भरपूर खर्च व मटाटोप करून तज्ज्ञ लेखकांच्या सहकारानें कांहीं पुस्तकें छापून प्रसिद्ध करण्यांत आलीं; परंतु त्या बाबतींत सरकारकडून जी अपेक्षा करण्यांत आली होती ती फोल ठरली. नुसतें शाब्दिक उत्तेजनही मिळूं शकलें नाहीं !

१९५३ सालीं सरकारनें प्राथमिक नि माध्यमिक शाळांकरितां नवीन अभ्यासक्रम आंखला. पुन्हां लेखक, चित्रकार, ह्यांची जरूर ती निवड करून पाठ्यपुस्तकें तयार करण्याचा उद्योग हातीं घेण्यांत आला. हा फारच मोठा मटाटोप होता. पुढील आशेनें संस्थेनें ती जबाबदारी पतकरली. पाठ्यपुस्तकें तयार करवून चेऊन तीं छापूनही घेतलीं; परंतु सरकारच्या अनुदार धोरणामुळें केलेले सारे श्रम व पैसा शेवटीं पाण्यांत गेला ! छापलेलीं पुस्तकें

रद्दीत जमा झालीं. त्यापायीं संस्थेला चांगली पाऊण लाखाची ठोकर बसली ! (१९५५)

पाठ्यपुस्तक-निर्मितीच्या व्यवसायांतील ही एक दारुण शोकांतिका आहे ! संस्था जिवंत ठेवून तिला भरभराटीला तर आणली पाहिजे. त्या दृष्टीनें चालक विचार करूं लागले. मराठी व इंग्रजी भाषेंतील ग्रंथ आपण प्रसिद्ध करतों. मग इतर भाषा-भगिनींकडेही कां बरें वळूं नये ? या विचारमंथनांतून 'पंचभाषिक' योजनेचा जन्म झाला. मराठी, इंग्रजी, हिंदी, गुजराती नि कानडी ह्या पांच भाषांतून पुस्तकें प्रसिद्ध करण्याचा नवा संकल्प करण्यांत आला. त्या त्या भाषांतील ग्रंथमालेचीं नांवेंही मुकर झालीं. १ श्रीधरप्रकाशन, २ मयूर किताबें, ३ सोमनाथ साहित्य, ४ कर्नाटक प्रकाशन व ५ फिनिक्स पब्लिकेशन्स. १९५६ सालीं सुरू झालेल्या ह्या योजनेनुरूप कांहीं पुस्तकें त्या त्या भाषांतून प्रसिद्ध झालीं.

प्राथमिक, माध्यमिक व महाविद्यालयीन असे विद्यार्थ्यांचे तीन गट पाडून एकाच लेखकानें एकाच विषयावरील पुस्तक भाषा, मांडणी नि विवेचन ह्या दृष्टीनें तीन प्रकारें चढत्या श्रेणीनें लिहावयाचें, अशी ती कल्पना होती. ह्या योजनेचें नांव 'त्रिविध वाचन' ठेवून 'श्रीसमर्थ रामदास' या पुस्तकानें तिचा शुभारंभही करण्यांत आला.

अशा रीतीनें एकेक नवनवे उपक्रम सुरू करण्यांत आले. मुलांचें, स्त्रियांचें व पुरुषांचें मासिक मनोरंजन करण्यासाठीं 'ढवळे' मासिक सुरू करण्यांत आलें. सामान्य जनांचें सामान्य मासिक असावें हीच त्याच्यामागें एकमेव आकांक्षा होती. (१९५७) त्याचबरोबर 'खेळगडी' व 'मराठीचिये नगरीं' हीं बंद करण्यांत आलेलीं पूर्वीचीं दोन्ही मासिकें, त्यांची उपयुक्तता लक्षांत घेऊन पुनश्च सुरू करण्यांत आलीं. त्यानंतर वृत्तपत्रें व नियतकालिकें ह्यासंबंधीं वेजबोर्डाचा जो निर्णय प्रसिद्ध झाला, त्यानुसार हीं मासिकें आपणास चालवितां येणार नाहींत, असें वाटून तीं चालकांकडून बंद करण्यांत आलीं !

अशा ह्या घडामोडी चालू असतां ढवळे-प्रकाशन संस्थेचे जन्मदाते व जे सतत आजारानें झगडत असले तरी ज्यांच्या सल्लामसलतीचा, मार्गदर्शनाचा नि प्रोत्साहनाचा वेळोवेळीं फार मोठा उपयोग होत असे, ते केशव भिकाजी

ढवळे डिसेंबर १९५७ मध्यें इहलोक सोडून गेले. संस्थेवर झालेला हा सर्वांत मोठा आघात होय.

त्यानंतर गेल्या ८।१० वर्षांच्या काळांत ह्या मुद्रण - प्रकाशन संस्थेच्या चालकांनीं जर कोणतें धोरण स्वीकारलें असेल तर तें म्हणजे वाढलेला व्याप, पसारा व शिरावरील जबाबदाऱ्या आस्ते आस्ते कमी करावयाच्या व स्वतःच्या आटोक्यांत व स्वतःला झेपेल तेवढाच भाग सांभाळावयाचा. त्या दृष्टीनें मुद्रण - विभाग बंद करण्यांत आला असून केशव भिकाजी ढवळे प्रकाशन संस्था ही स्वतंत्र करण्यांत आली आहे. तिचा व्याप केशव भिकाजींचे नातु सांभाळीत आहेत.

## ११

## व्हीनस-प्रकाशन

प्रकाशनक्षेत्रांत पडणाऱ्यांना आतां ध्येयवादाची कांस धरावी लागत आहे. आज आपल्या राष्ट्राची गरज कोणती आहे व जनतेच्या बौद्धिक विकासासाठीं कोणत्या प्रकारची वाङ्मय-निर्मिती होणें जरूर आहे, ह्याकडे लक्ष पुरवून प्रकाशकांना जपून पावलें टाकावीं लागत आहेत. आणि आजच्या नव-महाराष्ट्रांत तशा प्रकारचे प्रकाशक पुढें येत आहेत, ही समाधानाची गोष्ट आहे.

पुणें येथील व्हीनस-प्रकाशन संस्था ही त्यांपैकी एक आहे. तिला आतां उणींपुरीं तीस वर्षें होत आलीं. तिचे उत्साही व ध्येयवादी चालक आहेत सदाशिव कृष्ण पाध्ये. प्रकाशनक्षेत्राकडे ते कसे वळले हें पहाण्यासारखें आहे. मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यानंतर त्यांना नोकरीकडे वळावें लागलें. संसाराचा गाडा रेटण्यासाठीं पैसे मिळविणें जरूर होतें. प्रथम त्यांनीं भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूटच्या ग्रंथालयांत सहकारी-ग्रंथपाल या नात्यानें नोकरीस प्रारंभ केला. तेथें साहजिकच त्यांचा नानाप्रकारच्या ग्रंथांशीं संबंध आला. वृत्तपत्रांशीही संबंध आला तो घरोघर जाऊन 'सकाळ' पत्राचे अंक वाटतांना!

नोकरी कोणत्याही प्रकारची असो. पाध्ये यांस तिचा मनापासून तिटकारा होता. स्वतंत्रपणें व्यवसाय करण्याकडे त्यांच्या मनाचा कल होता. त्या शोधांत असतां एस्. एन्. डी. टी. कॉलेजच्या वसतिगृहांतील विद्यार्थिनींना पुस्तकें, स्टेशनरी, टॉयलेटसारख्या वस्तु नेहमीं लागतात व त्यासाठीं शहरांत जाणें

त्यांना जड पडतें, असें पाध्ये ह्यांस आढळून आलें. ह्या संधीचा फायदा घेऊन डॉ. कमलाबाई देशपांडे ह्यांच्या सल्ल्यानें त्यांनीं 'व्हीनस-स्टोअर्स' ह्या नांवानें एक विक्री-केन्द्र सुरू केलें.

हें केंद्र म्हणजे नानाप्रकारचे अनुभव घेण्याची ती एक लहानशी शाळाच होती. ओळखीचें क्षेत्र वाढूं लागलें. ह्या काळांत एका विद्यापीठाला उत्तरपत्रिका छापून देण्याचें टेंडर मिळविण्यांत पाध्ये ह्यांनीं यश मिळविलें. ही बाब होती लहानशीच; परंतु त्यांत नियमितपणा नि कौशल्य प्रकट करण्याची संधी मिळाली आणि त्यामुळें तशा प्रकारचीं कामें सतत ३।४ वर्षें मिळत गेलीं. येथेंच छपाई व प्रकाशन व्यवसायांची त्यांना तोंडओळख झाली. ग्रंथविक्रीचा ओनामा गिरविण्याचीही संधि त्यांना केवळ योगायोगानेंच मिळाली. डॉ. कमलाबाई देशपांडे ह्यांच्याशीं परिचय झालेला होताच. त्यांनीं लिहिलेल्या 'चाइल्ड इन् एन्शंट इंडिया' ह्या ग्रंथाच्या विक्रीची जबाबदारी त्यांच्याकडे आली नि ती त्यांनीं पारही पाडली.

पाध्ये हे आकुंचित नि आटोपशीर क्षेत्रांत वावरत होते; परंतु पदरीं पडणारा प्रत्येक अनुभव मोठ्या दक्षतेनें टिपीत होते. आपण पुस्तकांची विक्री करूं शकतों, मग पुस्तक-प्रकाशनाशीं आपण कां वरें संबंध जोडूं नये? हा विचार त्यांच्या मनांत घोळूं लागला. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे तोही योग त्यांच्या जीवनांत लवकरच जुळून आला. मुंबई विद्यापीठानें एफ्. वाय्. परीक्षेसाठीं तात्यासाहेब केळकर ह्यांनीं संपादिलेलें 'निबंधकार टिळक' हें पुस्तक मुकर केलें होतें. लोकमान्य टिळक ह्यांच्या नांवाशीं निगडित असलेल्या ह्या पुस्तकाचें प्रकाशन करण्याचें भाग्य आपल्या वांट्यास आलें तर काय बहार होईल! ही सुखद कल्पना त्यांच्या मनांत त्या काळीं घोळूं लागली व प्रयत्नांतीं अंमलांतही आणतां आली!

अशा रीतीनें पाध्ये ह्यांच्या प्रकाशन-व्यवसायाची सुरुवात 'निबंधकार टिळक' या पुस्तकानें १९३७ सालीं झाली. आपण पतकरलेला प्रकाशन व्यवसाय पद्धतशीर रीतीनें करतां यावा, ही होती त्या काळीं पाध्ये ह्यांची उत्कट आकांक्षा. त्या दृष्टीनें ज्यांच्या अनुभवांचा फायदा घेतां येणें शक्य होतें, तो घेण्यांत त्यांनीं कुचराई केली नाहीं. अनेक थोरामोठ्यांचा नि अनुभवी माणसांचा

मिळवितां येईल तेवढा सहकार त्यांनीं मिळविला. आयुष्यांत कांहीं तरी करायचें व कसें बसें करून चार पैसे मिळवायचे, हें नव्हतें त्यांचें धोरण. प्रकाशन-व्यवसाय ह्या जनतेच्या विकासाशीं नि उन्नतीशीं जिव्हाळ्याचा संबंध जोडणारा माननीय व्यवसाय आहे; तेथें खेळखंडोबाला स्थान नाहीं, ह्याची जाणीव त्यांना झालेली होती व त्या जाणिवेनें त्यांचीं पावलें आस्ते कदम पडूं लागलीं.

ग्रंथविक्री व ग्रंथ-निर्मिती हे वेगवेगळे व्यवसाय आहेत. ते एकट्यानें संभाळणें कठीणच. कोणताही व्यवसाय असो; आरंभकाळ फारसा आशादायक नसतो. भावी काळांतील आशा-आकांक्षांवर जगायचें असतें. जवळ पैसा नसतो, हिरीरीनें हातभार लावणारीं माणसेंही आटोक्यांत आलेलीं नसतात! सर्वच बाबतींत 'एकला चलो रे' असा प्रकार असतो. असें असलें तरी पाध्ये डगमगले नाहींत. सुरू केलेला व्यवसाय त्यांना आशादायक वाटूं लागला. यशाचीं चिन्हें दिसूं लागलीं. पुस्तक-विक्रीसाठीं पाध्ये ह्यांनीं अप्पा बळवंत चौकांत एक दुकान भाड्यानें घेतलें; तसेंच कामाची वांटणी करून रोजगार सुरळीत चालवितां यावा ह्या हेतूनें आपले एक स्नेही अनंतराव लिमये ह्यांचा भागीदार ह्या नात्यानें सहकार संपादन केला.

खपाच्या दृष्टीनें व जनमानसावर इष्ट परिणाम घडविण्याच्या दृष्टीनें उपयुक्त अशी पुस्तकांची निवड करणें व तीं मिळवून प्रकाशांत आणणें ही बाब प्रकाशन-व्यवसायांत फार महत्त्वाची आहे. हाताशीं येतील तीं व कोणाची तरी भीड पडली म्हणून भरमसाट प्रमाणांत ग्रंथप्रसिद्धी करणें म्हणजे संकटांस आव्हान देण्यासारखें आहे. पाध्ये त्या फंदांत पडले नाहींत.

ह्या व्यवसायाचीं पहिलीं ५।६ वर्षें हीं पायाभरणीचीं असतात. प्रसिद्धीसाठीं पुस्तकांची निवड करण्यांत, त्यांचा दर्जा संभाळण्यांत व त्यांचें वितरण करण्यांत पाध्ये यांनीं जरूर तें कौशल्य प्रकट केल्यामुळें प्रगतीच्या मार्गानें त्यांची वाटचाल सुरू झाली; व आजतागायत ती तशीच चालू आहे.

ह्या व्यवसायाच्या बाबतींत दुसरी एक गोष्ट लक्षांत बाळगण्याजोगी व खबरदारी घेण्यासारखी असते. ती कोणती? प्रकाशन-क्षेत्रांत वावरत असतां जो कांहीं नफा मिळतो तो केवळ स्वतःच्या खर्चासाठीं किंवा चैनीसाठीं न वापरतां उत्कृष्ट ग्रंथ मिळवून त्यांचें प्रकाशन करण्यासाठीं

पांच मजली इमारतीचा उद्घाटन समारंभ डॉ. पी. बी. गजेंद्रगडकर (सध्यां व्हाईस-चॅन्सलर, मुंबई विश्वविद्यालय) ह्यांच्या शुभहस्तें साजरा केला. तेथें संस्थेचा संसार उत्तरोत्तर वाढत्या भरभराटींत सध्यां चालू आहे.

जनतेच्या बुद्धिविकासाच्या, मनोरंजनाच्या नि ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें जें जें वाङ्मय मोलाचें नि उपयुक्त वाटेल, तें प्रयत्नेंकरून प्रकाशांत आणावयाचें ह्या धोरणानें व्हीनस प्रकाशननें आजवर सुमारें साडेतीनशें लहान मोठे ग्रंथ प्रकाशित केले असून त्यांची पृष्ठसंख्या एक लाखापर्यंत जाईल असा अंदाज आहे.

काळ बदलला आहे. पारतंत्र्याची जागा स्वातंत्र्यानें पटकाविली आहे. देशांत घडून आलेलें हें केवढें मोठें स्थित्यंतर आहे! ह्या स्थित्यंतरामुळें वाचकांच्या मनांत ज्या नवनव्या आशा-आकांक्षा निर्माण होऊं लागल्या आहेत, त्यांचें पोषण करणारें, त्यांना प्रोत्साहन देणारें व बदलत्या काळाच्या गरजा भागविणारें वाङ्मय आज प्रकाशांत आलें पाहिजे.

हें कोणीं ओळखायचें? आजच्या लेखकांपुढें नि प्रकाशकांपुढें ही फार महत्त्वाची समस्या उभी राहिली आहे. तिचा साकल्यानें विचार होणें व तदनुरूप लेखक-प्रकाशकांनीं आपापलीं पावलें टाकणें अत्यंत जरूरीचें आहे.

'व्हीनस प्रकाशन' ह्या प्रकाशन संस्थेसारख्या ज्या कांहीं ध्येयवादी संस्था पुणें, मुंबई, नागपूर व इतर ठिकाणीं वावरत आहेत, त्यांनीं आपापल्या परीनें स्वतःच्या शिरावरील ही जबाबदारी ओळखून व्यवसायाची मातब्बरी वाढविली पाहिजे. अज्ञानांधकार नाहींसा करून जनतेला प्रकाश व नवदृष्टि देणारा तो 'प्रकाशक' हें बहुमानाचें बिरुद त्यांनीं संपादन केलें पाहिजे.

# १२

## एक लोकविलक्षण प्रकाशक

प्रत्येक व्यवसायाचे कांहींना कांहीं संकेत ठरून गेलेले असतात; व ते परंपरेनें पाळीत जाण्याची प्रथा पडलेली आहे. ग्रंथ-प्रकाशन हा एक माननीय व्यवसाय आहे. तो करायचा तो कोणासाठीं नि कशासाठीं? तो स्वतःच्या फायद्यासाठीं तर करायचाच; परंतु तो करतां करतां स्वार्थाबरोबर परार्थही साधतां येतो, तो साधतां आल्यास साधावयाचा. हा ह्या व्यवसायांतील एक महत्त्वाचा भाग आहे.

ह्या व्यवसायाला दोन अंगें आहेत. तो व्यवस्थितपणें, किफायतीवर नजर ठेवून हाताळला तर स्वतःची व स्वकीयांच्या पोटापाण्याची सोय लावतां येते, त्याचप्रमाणें इतरेजनांचीही ज्ञानतृष्णा शमवितां येते.

थोडक्यांत सांगायचें तर स्वार्थाबरोबर परमार्थही साध्य करून देणारा हा माननीय व्यवसाय आहे. गेल्या सव्वाशें वर्षांच्या काळांत महाराष्ट्रांत जे ग्रंथ-प्रकाशक होऊन गेले व आज मोठ्या संख्येनें आपल्यांत वावरत आहेत, त्या सर्वांनीं कमीअधिक फरकानें हा संकेत यथामति, यथाशक्ति पाळलेला आहे. कारण तो पालन करूनच सुटका! व्यवसायांत स्वार्थ हा अभिप्रेतच असतो.

परंतु प्रकाशन–व्यवसाय म्हणजे एक आवडता छंद; जीवनांत सात्त्विक समाधान प्राप्त करून घेण्याचें एक साधन नि मनोविनोदन, ह्या भावनेनें तो व्यवसाय अधूनमधून गेलीं ३०।३५ वर्षे यशस्वी रीतीनें हाताळणारे एक लोकविलक्षण ग्रंथ-प्रकाशक आपल्यांत आज वावरत आहेत, त्यांचें नांव हरी विष्णु मोटे व त्यांनीं चालविलेल्या प्रकाशन-संस्थेचें नांव आहे, 'ह. वि. मोटे प्रकाशन'

नि त्याद्वारें आपल्या लौकिकांत भर घालण्यासाठीं वापरण्याचें धोरण कटाक्षानें जो प्रकाशक अंमलांत आणील, त्याचें त्या क्षेत्रांतील भवितव्य उज्वल असतें. पाध्ये ह्यांनीं त्या धोरणाची कांस धरली नि एक ध्येयवादी प्रकाशक ह्या नात्यानें त्यांनीं लेखकांचें नि वाचकांचें आपल्याकडे लक्ष वेधवून घेतलें; एवढेंच नव्हे तर त्यांचा सहकारही संपादन केला.

कांहीं कांहीं लेखक आपल्या लेखन-कर्तृत्वाच्या बळावर समाजांत बहुमानानें व आपला दर्जा संभाळून वावरत असतात. प्रकाशकांचेंही तसेंच आहे. त्यासाठीं दर्जेदार लेखक मिळवून दर्जेदार स्वरूपांत ग्रंथप्रकाशन करावें लागत असतें. आमच्या मतें ही एकप्रकारें तपश्चर्या आहे, हें योगसाधन आहे. तें सहजसाध्य नाहीं. त्यांत खडतरपणाचा भाग अधिक आहे. येथें स्वतःला विसरावें लागतें, कधींमधीं पैशांवर पाणी सोडावें लागतें व 'हें विश्वचि माझें घर' असें मानून वावरावें लागतें!

अशा प्रकारचें आगळें भाग्य आज नाहीं तरी उद्यांच्या काळांत पाध्ये ह्यांच्याच नव्हे तर अनेक ध्येयवादी प्रकाशकांच्या वांट्यास यावें, अशी कोणीही सदिच्छा प्रकट करील. त्या ध्येयानें त्यांची वाटचाल आस्ते कदम सुरू आहे, हें का थोडें झालें?

१९४७ पासून संस्थेच्या प्रकाशनकार्याचा व्याप वाढत चालल्यामुळें जागा अपुरी पडूं लागली. सोयीच्या दृष्टीनें संस्थेचे प्रकाशन-विभाग व विक्री-विभाग असे दोन स्वतंत्र विभाग करण्यांत आले. प्रकाशनासंबंधींची जबाबदारी पाध्ये हे पाहूं लागले व बुकस्टॉलची (विक्री विभागाची) व्यवस्था अनंतराव लिमये हे पाहूं लागले. प्रकाशन-व्यवसायांत उपयोगी पडणारे कितीतरी बहुमोल गुण अनंतरावांच्या ठायीं आहेत. त्या गुणांच्या बळावर दोघांनींही आपापल्या विभागाची प्रतिष्ठा शक्य त्या मार्गांनीं वाढविली. आपल्या विनम्र व मनमिळाऊ स्वभावामुळें पाध्ये यांनीं अनेक नामवंत लेखकांचा सहकार संपादन करून त्यांच्या ग्रंथांच्या प्रकाशनाच्या रूपानें संस्थेच्या प्रतिष्ठेंत व आर्थिक लाभांत चांगली भर घातली.

तुम्ही यशाच्या मार्गानें वाटचाल करीत असतां दुर्दैव कधीं दगा देईल व कोणत्या मार्गानें तुमच्यावर झडप घालील हें सांगतां येणें कठीण असतें!

पुण्यांत पानशेतच्या पुरानें अनेकांस फटका दिला. तो फटका पाध्ये यांच्याही वांट्यास आला. लकडी पुलाजवळच्या एका इमारतींत ग्रंथसंग्रहाचें गोडाऊन होतें. तेथें असलेला माल पुराच्या पाण्यामुळें बहुतेक खराब झाला. त्यामुळें नुकसान फार झालें. जो कांहीं ग्रंथ-संग्रह बचावतां आला तो निरनिराळ्या ठिकाणीं, जेथें आधार मिळाला तेथे ठेवण्यांत आला!

सदाशिवराव पाध्ये ह्यांच्यावर ओढवलेली ही एक आकस्मिक आपत्ति होती; परंतु काय करणार? कोणीही हतबुद्ध होऊन हातपाय गाळावे अशी ती घटना होती. परंतु पाध्ये ती पचवूं शकले. 'कीं तोडितां तरु फुटे आणखी भरानें' ह्या न्यायानें ते दुप्पट उत्साहानें आपल्या व्यवसायांत मन घालूं लागले. धीर गमावून चालणार नाहीं हें त्यांनीं बरोबर ओळखलें.

होय; एक महत्त्वाची गोष्ट सांगायची राहिली. १९३९ ते १९५७ ह्या प्रदीर्घ काळांत सदाशिवराव पाध्ये ह्यांना अनंतराव लिमये ह्यांचा, भागीदार ह्या नात्यानें भरघोस सहकार लाभला होता. पाध्ये ह्यांनीं आपल्या प्रकाशन व्यवसायांत जें यश मिळविलें, त्या यशांत लिमये ह्यांचाही वांटा आहे असें म्हटल्यास वस्तुस्थितीचा विपर्यास केल्याचा दोष आमच्यावर येणार नाहीं अशी बळकट आशा आहे.

ही भागीदारी १९५७ साल अखेर संपुष्टांत आली. त्यानंतर 'व्हीनस बुक स्टॉल' ह्या प्रकाशन संस्थेची जबाबदारी अनंतरावांनीं स्वीकारली असून ती संस्था नांवारूपास आणण्यासाठीं त्यांचे यशस्वी प्रयत्न अहर्निश चालू आहेत. अनेक कारणांमुळें एक सुबुद्ध, अनुभवी व काळाचीं पावलें ओळखून वागणारा पदवीधर-प्रकाशक ह्या नात्यानें वाचकवर्ग त्यांच्याकडे मोठ्या आशेनें पहात आहे.

कोणत्याही प्रकाशन संस्थेच्या वांट्यास स्वतःच्या मालकीची वास्तु येणें म्हणजे त्या व्यवसायांतील सुयशाची ती एक निशाणीच होय.

परंतु हें भाग्य वाट्यास येण्यासाठीं तशीच निष्ठापूर्वक तपश्चर्या करावी लागत असते. त्या दृष्टीनें पाध्ये यांची 'व्हीनस प्रकाशन' संस्था भाग्यवान समजली पाहिजे. १९६३ सालीं त्यांनीं ह्या संस्थेचा रौप्यमहोत्सव मोठ्या थाटामाटांत साजरा केला. त्याच वेळीं 'तपश्चर्या' या आपल्या मालकीच्या

वाङ्मय ही एक महान् नि प्रभावशाली शक्ति आहे. तिच्याठायीं अचाट सामर्थ्य आहे. माणसाला माणसांत आणून सोडणारी, त्याला दिव्य-दृष्टीचा लाभ करून देणारी व त्याच्या महन्मंगलाला कारणीभूत होणारी ती एक अमृतवल्ली आहे.

क्षीरसागराप्रमाणें साहित्य-सागरही अफाट आहे. त्याचें यथाशक्ति मंथन करून जें जें मंगल नि अमृततुल्य वाङ्मय दृष्टिपथांत येईल तें सुंदर स्वरूपांत वाचकांस सादर करावयाचें व हें पवित्र कार्य पार पाडीत असतां आपल्या पदरांत आर्थिक दृष्ट्या काय पडेल ह्याचा विचार सहसा करायचा नाहीं, हें आहे मोटे-प्रकाशनचें आजवर अबाधित चालत आलेलें धोरण.

अव्वल दर्जाची प्रतिमा, मग ती कुठेंही कोनाकोपऱ्यांत दडलेली असो. ती प्रयत्नेंकरून हुडकून काढायची आणि वाचकांच्या सेवेस सादर करायची. बस्स ! एवढेंच आपलें कार्य, असें हरीभाऊ मोटे आजवर मानीत आले आहेत. ते उच्च प्रतीच्या प्रतिमेचे भुकेले आहेत. ती शोधून काढल्याशिवाय नि तिला प्रकाशांत आणल्याशिवाय त्यांना मुळीं चैनच पडत नाहीं !

प्रतिमेचा शोध लावणें ही चांगली गोष्ट आहे; परंतु कोणत्या लिखाणांत अव्वल दर्जाच्या प्रतिमेचा सुंगध दरवळलेला आहे, ह्याचें अचूक ज्ञान व्हायला माणसाचें ज्ञानेंद्रिय अत्यंत सुतीक्ष्ण असलें पाहिजे. त्याशिवाय अभिजात नि अस्सल प्रतिमेशीं संधान जुळवितां येणार नाहीं. त्या तंत्रांत हरीभाऊ कोणालाही हार जाणार नाहींत. तें त्यांना वरदान आहे म्हणा ना !

तपश्चर्येशिवाय, हालअपेष्टांच्या मार्गानें गेल्याशिवाय व लोखंडाचे चणे खाल्ल्याशिवाय कोणतेंही ब्रह्मपद प्राप्त होत नाहीं म्हणून सांगतात; परंतु प्रकाशन-क्षेत्रांत पदार्पण करण्यापूर्वीच्या हरीभाऊंच्या जीवनक्रमाकडे लक्ष पुरविलें असतां तसा कांहीं प्रकार आढळून येत नाहीं. त्यामुळें अव्वल दर्जाची प्रतिमा नेमकी हुडकून काढण्याच्या असामान्य गुणाचा आविष्कार त्यांच्याठायीं कसा झाला, हें सांगतां येणें कठीण आहे. ह्या बाबतींत शेवटीं निष्कर्ष काढावा लागतो तो हाच कीं, प्रतिमा ही जशी कित्येकांच्या ठायीं निसर्गदत्त असते, त्याचप्रमाणें ती हुडकून प्रकाशांत आणण्याचा हा गुण हरीभाऊंच्याठायीं निसर्गदत्त असणेंच संभवतें.

ह्या गुणांच्या बाबतींत ही एवढी घासाघीस कशाला ? त्याला कारण आहे. त्या बहुमोल व असामान्य गुणामुळें हरीभाऊ मोटे ह्या व्यक्तीसभोंवार प्रकाशन-क्षेत्रांत आजवर कोणाच्याही वांट्याला आलें नाहीं, असें एक तेजोवलय आपोआप निर्माण झालें आहे. प्रकाशन-क्षेत्रांतील अजोड कर्तृत्वामुळें तें 'वलय' त्यांच्या वांट्यास आलें आहे, हें कोणीही सांगूं शकेल.

आपल्या आयुष्याचीं बहुमोल ३०।३५ वर्षे प्रकाशन व्यवसायांत घालवून हरीभाऊ मोटे ह्यांनीं मिळविलें काय ? हें तेजोवलय ! आजवर पैसा मिळविण्यापेक्षां तो घालविला ! परंतु त्याबद्दल त्यांना खंत वाटत आहे का ? मुळींच नाहीं. कारण पैसा मिळविण्यासाठीं ते ह्या व्यवसायांत पडले नाहींत.

आयुष्याच्या आरंभींच हरीभाऊंनीं असा व्यवसाय पतकरला व त्याचें गणितही असें मांडलें कीं, त्यामुळें मनाला कधींही खंत वाटूं नये. आपण जें कांहीं यथाशक्ति करूं शकलों, त्याबद्दल अहंकारही वाटूं नये. जें कांहीं हातून घडलें त्याबद्दल जसा अहंकार नाहीं, त्याचप्रमाणें जें घडलें नाहीं, त्याबद्दल खंतही नाहीं. आपल्याकडून होईल तेवढें करीत रहावयाचें, एवढेंच हरीभाऊ जाणतात.

अव्वल दर्जाची प्रतिभा हुडकून काढण्याचा हा गुण सर्वसामान्य नाहीं. तो असामान्य आहे. ह्या गुणाचा उगम कुठून होत असेल बरें ? हा विचार आमच्या मनांत जेव्हां जेव्हां येतो, त्या त्या वेळीं आमचे एक स्नेही नि एका काळचे 'नवाकाळ' मधील सहकारी भालचंद्र रावजी धुरंधर ह्यांची मूर्ति आमच्यापुढें चटकन उभी रहाते. ते प्रतिभाशाली लेखक आहेत, त्याचप्रमाणें दुसऱ्या एका तेजस्वी प्रतिभेचें वरदान त्यांच्या वांट्यास आलेलें आहे. हरीभाऊ जसे 'ग्रंथ-पारखी', तसे धुरंधर हे 'रत्न-पारखी' आहेत. हातांत एकादा रत्नाचा खडा आला असतां अस्सल कोणता आणि हीन कोणता ह्याचें ज्ञान त्यांच्या ज्ञानचक्षूंना चटकन होऊं शकतें !

अलीकडे कृत्रिम खड्यांचा अर्थात् बनावट हिऱ्यांचा फार सुळसुळाट झालेला आहे. साध्या तुमच्या आमच्या सारख्यांच्या दृष्टीला अस्सल आणि नकली ह्याचा मुळींच बोध होऊं शकत नाहीं; आणि त्यामुळें पुष्कळांची फसवणूक होऊं शकते. मनाला भलतीच मुरळ पडते ! तसें घडूं नये ह्या हेतूनें अस्सल आणि नकली ह्याचें ज्ञान करून देणारें यंत्र अलीकडे निघालें

आहे. परंतु ज्यांचा वर उल्लेख करण्यांत आला आहे, ते अभिजात रत्नपारखी धुरंधर यंत्राच्या सहाय्याशिवाय हिऱ्याला स्पर्श करतांच त्याचा दर्जा व मोल ताबडतोब सांगू शकतात. अशा रीतीनें रत्नांची अचूक पारख करणारीं माणसें जशीं त्या क्षेत्रांत कुठें कुठें सांपडूं शकतात, त्याचप्रमाणें अस्सल प्रतिभेचा शोध लावून ती निरपेक्षपणें वाचकांपुढें ठेवण्यासाठीं झटणारीं हरीभाऊंसारखीं माणसेंही वाङ्मयक्षेत्रांत वावरतांना कधींमधीं आढळून येत असतात.

हरीभाऊ मोटे ह्यांचा जन्म उमरावती येथें ता. २ आक्टोबर १९०७ रोजीं झाला. त्यांचें प्राथमिक व दुय्यम शिक्षण त्याचप्रमाणें कांहीं महाविद्यालयीन शिक्षणही तेथेंच झालें. नंतर त्यांनीं शिक्षणासाठीं इंदूरला स्थलांतर केलें. तेथें इंटरपर्यंत मजल मारली व पुढेंही मजल दरमजल करीत बी. ए. पर्यंतचा प्रवास झेपणें त्यांना सहजसाध्य होतें. एवढेंच नव्हे तर आर्थिक अनुकूलता असल्यामुळें अधिक पदव्या मिळविण्यासाठीं इंग्लंड-अमेरिकेसारख्या देशांत वास्तव्य करून २०।२५ हजार रुपयांचा चुराडा ते सहज करूं शकले असते.

परंतु हें सारें कशासाठीं करायचें ? आपल्या देशबांधवांकडून मोठेपणा नि मानमान्यता मिळविण्यासाठीं ! आजकाल ज्यांना साधनें अनुकूल आहेत ते त्या मार्गाचा अवलंब करतातच; परंतु ज्यांना साधनांची अनुकूलता नसते, त्यांचीही त्यासाठीं जारीनें धडपड चाललेली असते; हा आपला नित्याचा अनुभव आहे.

हा मोठेपणा मिळविण्याचा पाया विद्यार्थिदशेंत नि ऐन तारुण्यांत असतां रचावयाचा असतो. 'हा महाग पडणारा, परंतु शक्य असलेला मोठेपणाचा मार्ग माझ्यासाठीं नाहीं; माझा मार्ग ह्याहून वेगळा आहे व त्या जगावेगळ्या मार्गानें आपण जायचें आहे', हा निर्धाराप्रत हरीभाऊ मोटे हे आले, त्या वेळीं त्यांचें वयोमान पंचविशीपलीकडे गेलें नव्हतें.

सुखासीनतेकडे नि मानमान्यतेच्या लालसेकडे पाठ फिरविण्याचें का तें वय होतें ? आणि त्याच वयांत हरीभाऊंनीं निर्णय घेतला कीं, युरोप-अमेरिकेला जाऊन नि २०।२५ हजारांची किंमत देऊन जो पोकळ दर्जा प्राप्त होईल, त्याची मला जरूरी नाहीं. त्याऐवजीं दर्जेदार नि प्रतिभाशाली वाङ्मय हुडकून काढून तें प्रकाशांत आणण्याकडे, त्या रकमेचा मी विनियोग करीन. ती मला

मनापासून आवडणारी गोष्ट आहे. तो माझ्या हौसेचा प्रयोग आहे. तो नाहीं यशस्वी झाला तरी त्यामुळें मनाला जें समाधान लाभेल, तें कोणीही हिरावून घेऊं शकणार नाहीं !

तो मार्ग रुळलेला असला तरी तो आपला नाहीं. अशा रीतीनें हरीभाऊंनीं ऐन तारुण्यांत शाश्वत समाधानाचा मार्ग स्वीकारला. ज्यामुळें अहंकार अंगाला चिकटेल, त्या मार्गानें जाण्याचें त्यांनीं जाणीवपूर्वक नाकारलें !

जयाचेनि संगें, समाधान भंगे।
अहंता अकस्मात येऊनि लागे॥

ह्या ठिकाणीं हरीभाऊंच्या जीवनांतील दुसऱ्या एका घटनेचा उल्लेख करणें जरूर आहे. बालवयापासून म्हणजे वयाच्या दहा - अकराव्या वर्षापासून दमा हा दुर्धर रोग हरीभाऊंचा 'सांगाती' बनला होता. अजूनही कधींमधीं तो त्यांच्याशीं लगट करीत असतो नि त्यांना निकामी बनवीत असतो !

प्रकाशन-कार्य हेंच आपलें जीवनकार्य आणि त्याच कार्याला सर्वस्वी वाहून घ्यायचें, हा निर्णय हरीभाऊंनीं घेतला, तो त्यांच्या आयुष्यांतील काळ नवीन आशा-आकांक्षांनीं फुललेला व उत्साहानें ओथंबलेला होता.

सतत ३।४ वर्षे पाठिराखेपणा करणाऱ्या दम्याच्या तावडींतून त्या वेळीं त्यांची सुटका झालेली होती. कॉलेज-शिक्षणाला सोडचिठ्ठी दिल्यामुळें आतां मन लावून अभ्यास करीत बसण्याचें शुक्लकाष्ठही त्यांच्यामागें नव्हतें. काश्मीरसारख्या सुरम्य ठिकाणीं ४।६ महिने मजेंत घालवून आल्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें अंतःकरणांत गुलाबाचे ताटवे फुलले होते. दम्याची जागा दमदारपणा नि दुर्दम्य उत्साह ह्यांनीं पटकाविली होती!

ज्या विशिष्ट ध्येयावर दृष्टि खिळून राहिली होती, त्या ध्येयसाधनेकडे आतां वळायला हरकत नाहीं, असें त्या प्रसन्न परिस्थितींत हरीभाऊंना वाटूं लागलें, तर त्यांत नवल कसलें ?

वर सांगितल्याप्रमाणें अव्वल दर्जाची प्रतिभा शोधून काढून ती वाचकांपुढें सुंदर सजावटींत सादर करावयाची, हें जीवनकार्य मुक्रर झालें असलें, तरी त्या व्यवसायाला प्रत्यक्ष आरंभ करण्यापूर्वी तत्संबंधीं जरूर तें सामान्य शिक्षण संपादन करणें जरूर आहे, असें त्यांना वाटूं लागलें. प्रकाशन-

व्यवसायालाही नाना प्रकारचीं अंगें-उपांगें असतातच कीं नाहीं ? तीं एकाद्या संपन्न मुद्रणालयांत वर्ष सहामहिने राहून समजून घ्यावीं, त्यामुळें जी जबाबदारी आपण शिरावर घेणार ती सुलभतेनें नि यशस्वी रीतीनें पार पाडतां येईल, ह्या उद्देशानें हरीभाऊंनीं 'किर्लोस्कर' मासिकाच्या संपादकांशीं पत्रव्यवहार केला; परंतु त्या काळांत त्यांनीं त्यांच्याकडून ज्या उत्तेजनाची अपेक्षा केली होती, तें कांहीं मिळूं शकलें नाहीं. संपादकांकडून जें उत्तर आलें, तें उत्साहभंग करणारें होतें !

हरीभाऊंनीं विचार केला कीं, प्रकाशन क्षेत्रांत पाऊल टाकण्यापूर्वी आपल्या पदरीं कांहीं ना कांहीं पूर्वानुभवाची पुण्याई असावी, ह्या सद्भावनेनें आपण जरूर तो प्रयत्न करून पाहिला. त्यांत यश नाहीं मिळालें म्हणून अडून थोडेंच रहायचें ? शारदेची यथाशक्ति यथामति सेवा करण्याचें व्रत आपण घेतलें आहे, ती देवी शारदाच यापुढें आपलें मार्गदर्शन करील. तेव्हां तिलाच वंदन करून आपण मार्गाला लागावें, ह्या विचारानें त्यानंतर 'भवति न भवति' करण्यांत वेळ न गमावतां त्यांनीं प्रकाशन क्षेत्रांत पाऊल टाकिलें.

आपल्या पहिल्या प्रकाशनासाठीं त्यांनीं सौ. कमलाबाई टिळक ह्यांच्या लघुकथांच्या संग्रहाची निवड केली व तो संग्रह 'हृदयशारदा' ह्या नांवानें १९३२ सालअखेर प्रसिद्ध केला. त्या सुंदर संग्रहाचें सर्वांकडून यथोचित स्वागत करण्यांत आलें. सुप्रसिद्ध वाङ्मय-समीक्षक व टीकाकार वामन नारायण देशपांडे ह्यांनीं आपल्या अभिनंदनपर पत्रांत हरीभाऊंना त्या वेळीं लिहिलें होतें कीं, "प्रथमच, आपण प्रकाशनकार्य इतक्या घटाटीनें हातीं घेतल्याबद्दल आपलें मनःपूर्वक अभिनंदन करणें जरूर वाटतें. या सुंदर पुस्तकामुळें कार्यास आरंभ तर फारच फक्कड झालेला आहे; आणि त्यावरून भावी काळांत आपण या दिशेनें किती यशस्वी कार्य करूं शकाल याची सहज कल्पना येते."

वामनराव देशपांडे ह्यांनीं सुमारें पन्नास वर्षांपूर्वी पहिलीच 'बानगी' पाहून जें भविष्य वर्तविलें तें नंतरच्या काळांत अपेक्षेपलीकडे खरें ठरलें आहे.

'मोटे-प्रकाशन 'तर्फे प्रसिद्ध झालेल्या सर्वच प्रकाशनांचा इतिहास येथें सांगण्याचा उद्देश नाहीं. हरीभाऊ गेलीं पन्नास वर्षें ह्या व्यवसायांत वावरत आहेत. त्या दीर्घकालावधींत त्यांनीं प्रकाशित केलेल्या पुस्तकांची संख्या

३०।३२ पेक्षां अधिक नाहीं; परंतु त्यांच्या प्रत्येक प्रकाशनामागें उज्ज्वल इतिहास आहे. ज्या लेखनांत प्रतिभा आहे, नावीन्य आहे, नि कांहीं ना कांहीं वैशिष्ट्य आहे, अशाच वाङ्मयास त्यांनीं प्रसिद्धीचा मार्ग दाखविला आहे.

वाङ्मय-प्रकाशनाच्या बाबतींत हरीभाऊंनीं आपल्यापुरती एक चाकोरी आंखून घेतली आहे. त्या चाकोरीच्या बाहेर सहसा जायचें नाहीं, हें बंधन ते आजवर कसोशीनें पाळीत आले आहेत. ज्यांचीं पुस्तकें आधींच प्रसिद्ध होऊन जे कीर्तीच्या प्रकाशांत तळपत आहेत, अशा नामवंत लेखकांच्या वांट्यास हरीभाऊ सहसा जात नाहींत. नंतरच्या काळांत त्यांनीं हातीं घेऊन तीन साडेतीन वर्षे अत्यंत यशस्वी रीतीनें चालविलेल्या 'प्रतिभा' पाक्षिकामुळें महाराष्ट्रांतील अनेक नामवंत लेखकांशीं त्यांचा निकट नि जिव्हाळ्याचा संबंध आला; त्यामुळें ग्रंथ-प्रकाशनाच्या बाबतींत त्यांचा सहकार वाटेल त्या प्रमाणांत मिळविण्याची शक्यता असतांही त्या लेखकांच्या वांट्यास हरीभाऊ गेले नाहींत. प्रतिभासंपन्न नवीन लेखक, कितीही प्रयास पडले तरी शोधून काढायचे नि त्यांच्या वाङ्मयाचा वाचकांस लाभ करून द्यावयाचा. लेखकाशीं फक्त एका आवृत्तीपुरताच संबंध ठेवावयाचा; पुस्तक खपाच्या दृष्टीनें कितीही फायदेशीर होण्यासारखें असलें तरी त्याची दुसरी आवृत्ति काढण्याच्या फंदांत सहसा आपण पडायचें नाहीं. हें आहे ह्या लोकविलक्षण प्रकाशकाचें गेल्या ३०।३५ वर्षांतील धोरण.

मोटे-प्रकाशनाचीं प्रकाशनें कालमानाच्या दृष्टीनें फार थोडीं असलीं, तरी गुणवत्तेच्या दृष्टीनें तीं श्रेष्ठ प्रतीचीं आहेत. त्यांच्यापैकीं बहुसंख्य प्रकाशनांपायीं प्रकाशकाचा खिसा भरण्याऐवजीं तो रिताच रहाण्याची खात्री. परंतु जाणून बुजून ज्यानें तुकोबारायाची अव्यवहारी दुकानदारी पतकरली, त्याला नफ्या-तोट्याचें कसलें आलें आहे सुखदुःख! असल्या ह्या प्रकाशन-छंदापायीं वर्षानुवर्षे नुकसान सोसावें लागलें, तरी आपण वाचकांस कांहीं ना कांहीं मरगळ, भारी मोलाचें नि भव्योदात्त दिलें, त्यामुळें जो सात्त्विक समाधानाचा लाभ त्यांना झाला, त्याची तुलना रुपये, आणे, पैच्या हिशेबानें करतां येणार नाहीं. आणि हरीभाऊंना त्याविरहित दुसरें काय हवें होतें?

'याचसाठीं केला होता अट्टाहास' अशी आहे त्यांची वृत्ति!

वैभवशाली विभावरी–वाङ्मयाचें प्रकाशन ही मोटे–प्रकाशनाची सर्वांत मोठी नि चिरंतनकाळ स्मरणांत राहाणारी वाङ्मयीन कामगिरी आहे. त्यांची ही कामगिरी खरोखर अभूतपूर्व होती. तिनें त्यांच्या कर्तृत्वावर कळस चढविला. एक चतुर प्रकाशक वाचकांस दीर्घकाळपर्यंत कसा चकवूं शकतो नि आमच्या सामाजिक जीवनावर झगझगींत प्रकाश कसा पाडूं शकतो, ह्याचें प्रत्यंतर 'कळ्यांचे निःश्वास, 'हिंदोळ्यावर' नि 'विरलेलें स्वप्न' ह्या मोटे–प्रकाशनतर्फे लागोपाठ प्रसिद्ध झालेल्या स्त्रीजीवनविषयक तीन कथा-कादंबऱ्यांनीं सर्व वाचकांस आणून दिलें. हीं तिन्ही पुस्तकें 'विभावरी शिरूरकर बी. ए.' ह्या टोपण नांवानें प्रसिद्ध झालीं. वाङ्मयीन प्रतिभेच्या व सडेतोड प्रतिपादनाच्या दृष्टीनें तीं प्रकारानें अप्रतिम होतीं. त्यांच्यावर दीर्घकाळपर्यंत जो वादविवाद झाला, तोही अप्रतिम, अविस्मरणीय नि अभूतपूर्व होता.

लेखिकेच्या नांवासंबंधीं व तिच्या विषयप्रतिपादनशैलीसंबंधीं तत्कालीन वाचकवर्गांत नि विद्वानांत उत्पन्न झालेलें कुतूहल कसें शिगेला पोहोंचलें होतें, त्याचप्रमाणें त्यांत किती तोलामोलाचीं माणसें गोंवलीं गेलीं होतीं, ह्याची यथातथ्य कल्पना आजही ज्यांना करून घ्यायची असेल, त्यांनीं त्यानंतर सुमारें पंधरा वर्षांनीं ( १९४९ ) ग्र. मु. नाडकर्णी ह्यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'विभावरीचे टीकाकार' ह्या पुस्तकावरून सहज नजर फिरवावी.

'मोटे–प्रकाशन'चें कोणतेंही पुस्तक हातीं घेऊन पहा. त्याचें अंतरंग नि बहिरंग हीं दोन्ही सुबक नि सुफलदायी असावयाचींच. हरीभाऊ एका बाबतींत मोठे भाग्यवान आहेत. प्रतिभासंपन्न वाङ्मय हुडकून काढण्याची त्यांना जशी दिव्य–दृष्टि ईश्वरकृपेनें प्राप्त झाली आहे, त्याचप्रमाणें चित्रकलेच्या क्षेत्रांत ज्यांना दिव्यत्वाचा स्पर्श झालेला आहे, असे अभिजात चित्रकार द. ग. गोडसे ह्यांचा सस्नेह सहकार त्यांना लाभलेला आहे. त्यामुळें मोटे-प्रकाशनचें कोणतेंही प्रकाशन असो; त्यांत प्रतिभा नि कला ह्यांचा सुंदर नि अभिनव संगम साधलेला असावयाचाच, हा संकेत ठरून गेलेला आहे. खरोखर, प्रभावशाली प्रकाशनाच्या दृष्टीनें हा संगम किती तरी सुरेख आहे, नाहीं का?

त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण प्रकाशनांपैकीं कांहींचीं नांवें येथें सांगावींशीं वाटतात. हृदय-शारदा ( सौ. कमलाबाई टिळक ), मदनकुमारी ( विश्राम बेडेकर ),

कळ्यांचे निःश्वास, हिंदोळ्यावर नि विरलेलें स्वप्न ( विभावरी शिरूरकर-बाळूताई खरे आणि नंतर सौ. मालती बेडेकर ), इंदु काळे व सरला भोळे ( प्रो. वा. म. जोशी ), आत्मवृत्त ( श्री. कृ. कोल्हटकर ), सुषमा ( वा. कृ. चोरघडे ), शेजवलकर वाङ्मय ( प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर ह्यांच्या निवडक लेखांचा संग्रह दोन खंडांत ), बहुरूपी ( चिंतामणराव कोल्हटकर ), राम गणेश गडकरी ( चिंतामणराव कोल्हटकर ), अप्रकाशित गडकरी ( संपादक—आचार्य अत्रे ), गांवगाडा ( त्रिं. ना. आत्रे ), गांवरहाटी ( वि. म. दांडेकर व म. भा. जगताप ), सूर्यास्त ( प्र. के. अत्रे ), राजयाचा पुत्र अपराधी देखा ( द. ग. गोडसे ), स्वनातीत ( ज. श्री. देशपांडे ) वगैरे, वगैरे.

ह्या ठिकाणीं मोटे—प्रकाशनाच्या कांहीं ठळक प्रकाशनांचा ओझरता उल्लेख केला आहे. वरीलपैकीं ज्या लेखक—लेखिकांचीं प्रकाशनें, त्यांतील प्रतिभा नि वैशिष्ट्य ओळखून 'मोटे—प्रकाशन'नें प्रथम प्रकाशांत आणिलीं, अशा त्या काळांतील नवीन लेखक—लेखिकांत सौ. कमलाबाई टिळक, विश्राम बेडेकर, विभावरी शिरूरकर, बी. ए., वामनराव चोरघडे, चिंतामणराव कोल्हटकर व ज. श्री. देशपांडे, ह्यांचा प्रामुख्यानें उल्लेख करतां येईल. तसेंच हरीभाऊंच्या प्रत्येक प्रकाशनानें इतिहास घडविला आहे.

हेंच पहा ना. इतिहासाचे प्रकांड पंडित नि इतिहासांतील सत्य आपल्या मूलग्राही दृष्टीनें शोधून काढून तें निर्भीडपणें सांगणारे प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर हे एक सडेतोड लेखक होऊन गेले. कोणताही विषय असो, त्यावर कोणाचीही भीड मुर्वत न बाळगतां मनाला जें पटलें तेंच लिहायचें. ह्या त्यांच्या वृत्तीमुळें त्यांच्या हयातींत त्यांना फार थोडे नि निवडक चहाते भेटले. हरीभाऊ मोटे हे त्यांपैकीं एक होते. ते त्यांचें केवळ शाब्दिक कौतुक करून थांबले नाहींत, तर त्यांचे निवडक लेख मिळवून ते त्यांनीं दोन खंडात प्रसिद्ध केले.

त्यांनीं लिहिलेल्या अपूर्ण नि अपूर्व अशा शिवछत्रपति-चरित्राचें महत्त्व ओळखून यंदा साहित्य ॲकाडमीनें त्यांना मराठी वाङ्मयाचें सर्वोच्च पारितोषिक अर्पण करून त्यांच्या वाङ्मयसेवेचा गौरव केला ! परंतु तो केव्हां ? त्यांच्या निधनानंतर !

शेजवलकर-वाङ्मयाची महत्ता हरीभाऊंनीं त्यांच्या हयातींतच ओळखली.

तें वाङ्मय चिरंतन-काळ टिकणारें व विचारवंतांना खाद्य पुरविणारें आहे हें जाणून त्यांनीं खपाकडे लक्ष न देतां तें प्रसिद्ध केलें नसतें, तर आज तें मौल्यवान वाङ्मय एकत्र पहायला सांपडलें नसतें!

'गांव—गाडा' हें मराठी वाङ्मयांतील एक महत्त्वाचें पुस्तक आहे. १९१५ सालीं त्याची प्रथमावृत्ति प्रसिद्ध झाली. नंतर दहा वर्षांनीं दुसरी आवृत्ति व त्या ग्रंथाची महती ओळखून हरीभाऊ मोटे ह्यांनीं तिसरी आवृत्ति १९५९ सालीं प्रसिद्ध केली. त्याच्या खपासंबंधानें किंवा त्यांत अडकविलेला पैसा बाहेर पडेल कीं नाहीं, ह्याचा त्यांनीं कधीं विचार केला नाहीं.

'इंदु काळे व सरला भोळे' ह्यासारख्या उच्च कोटींतील त्यांच्या अनेक प्रकाशनाच्या नंतरच्या काळांत आवृत्त्यांवर आवृत्त्या निघाल्या व इतरांनीं त्या प्रकाशनांवर भरपूर कमाई केली; परंतु हरीभाऊंनीं त्या कमाईकडे जाणूनबुजून पाठ फिरविली. त्यांनीं एकाच आवृत्तीवर समाधान मानिलें. प्रकाशन—क्षेत्रांतील त्यांचें धोरणच लोकविलक्षण होतें.

चिंतामणराव कोल्हटकर ह्यांचें 'बहुरूपी' पुस्तक मोटे—प्रकाशनतर्फे प्रसिद्ध झालें. मराठी वाङ्मयांतील त्या वर्षीचें सर्वोत्कृष्ट पुस्तक ह्या नात्यानें त्या ग्रंथाला साहित्य ॲकाडमीचें भव्य पारितोषिक मिळालें! परंतु असा हा कीर्तिशाली ग्रंथराज कोणीही प्रकाशक छापायला तयार नव्हता, हें कोणाला खरें वाटेल का? त्या ग्रंथाच्या प्रकाशनाच्या बाबतींत चिंतामणराव निराश झाले होते; परंतु हरीभाऊंनीं त्या ग्रंथाचें महत्त्व ओळखून त्याच्या प्रकाशनाची सारी जबाबदारी स्वीकारली.

प्रतिभाशाली नि शाश्वत मोलाचे ग्रंथ प्रकाशित करण्याचें हरीभाऊ मोटे ह्यांचें कार्य चालू होतें. विभावरी वाङ्मय-प्रकाशनामुळें महाराष्ट्रांत त्यांचें नांव सर्वतोमुखीं झालें होतें; परंतु त्या कीर्तीचा लोभ त्यांनीं बाळगला नव्हता. अनुभवांतीं तो उद्योग त्यांना अपुरा वाटूं लागला. लेखकांतील कलागुणाला नि विद्वत्तेच्या विकासाला चांगला वाव देण्यांत आला पाहिजे, वाङ्मयसमृद्धीचा तो एक मार्ग आहे, अशी त्यांची धारणा होती.

तो वाव द्यावयाचा तर एकादें नियतकालिक आपल्या हातांत असणें ज़रूर आहे असें हरीभाऊंना तीव्रतेनें वाटूं लागलें. तें नियतकालिक मराठी

वाङ्मयाचें मुखपत्र होऊं शकेल अशा स्वरूपाचें असावें, ह्या दृष्टीनें त्यांचे विचार चालू असतां 'प्रतिभा' पाक्षिकाकडे त्यांचें लक्ष खेंचलें गेलें. एक वर्षभर तें पाक्षिक चालविल्यानंतर त्याचे उत्साही चालक वाढत्या कर्जापायीं जेरीस आले होते. हरीभाऊंनीं कर्जाच्या बोजासह त्या पाक्षिकाची मालकी मोठ्या हौसेनें व आशेनें पतकरली आणि त्यापायीं स्वतः चांगले जेरीस येईपर्यंत तें पाक्षिक साडेतीन वर्षे आपल्या धोरणानुसार मोठ्या हुशारीनें व दक्षतेनें चालविलें. त्यांत त्यांच्या संपादन–कौशल्याची झलक दिसून आली.

गेल्या ४०।५० वर्षांच्या काळांत मराठी भाषेंत जीं नियतकालिकें निघालीं नि मागें कीर्तीचा मधुर सुगंध दरवळत ठेवून अंतर्धान पावलीं, त्यांत 'रत्नाकर,' 'प्रगति,' 'ज्योत्स्ना' हीं आपल्या अजोड कामगिरीमुळें अमरत्व पावलीं आहेत. त्याच मालिकेंत हरीभाऊ मोटे ह्यांच्या 'प्रतिभा' पाक्षिकाला मानाचें स्थान देतां येईल, एवढी अविस्मरणीय कामगिरी अवघ्या साडेतीन वर्षांच्या काळांत त्या पाक्षिकानें पार पाडिली आहे.

अवघ्या साडेतीन वर्षांच्या अल्पावधींत हरीभाऊ मोटे ह्यांच्या संपादकत्वाखालीं 'प्रतिभा' पाक्षिकानें मराठी वाङ्मयक्षेत्रांत संस्मरणीय इतिहास घडविला आहे. त्या वाङ्मयीन कामगिरीवर अभ्यासु वृत्तीनें एकादा स्वतंत्र प्रबंध लिहिला जाणें जरूर आहे, असें आम्हांला वाटतें.

विचारवंत वाचकांचें लक्ष वेधून घेईल असें लिखाण हरप्रयत्नांनीं व आपणास शक्य असेल तें मोल देऊनही मिळवायचें नि तें वाचकांपुढें ठेवायचें, हा हरीभाऊंच्याठायीं प्रकर्षानें वास करणारा सद्गुण प्रतिभेच्या द्वारेंही प्रकट झाला.

प्रतिभेनें प्रसिद्ध केलेला शेवटचा खास अंक म्हणजे 'डॉ. केतकर–अंक' होय. तो अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण नि विचारी वाचकांच्या स्मृतींत चिरंतन काळपर्यंत राहील असा सुंदर होता. हें सुंदर लेणें महाराष्ट्र–शारदेला अर्पण करून प्रतिभा–पाक्षिकानें वाचक, वर्गणीदार नि लेखक ह्यांपैकीं कोणाही विरुद्ध तक्रारीची नोंद न करतां अत्यंत शांत नि सोशिकपणें सर्वांचा निरोप घेतला!

तो दुःखद निर्णय समजतांच प्रा. बनहट्टी ह्यांनीं हरीभाऊंना लिहिलें होतें कीं, "प्रतिभा बंद करण्याचा निश्चय अत्यंत खेदकारक आहे, यांत शंका

नाहीं. कोणत्याही कंपूच्या आहारीं न जातां स्वतंत्र बाण्यानें लिहूं इच्छिणाऱ्या आमच्यासारख्या लेखकांना आपले विचार प्रकट करण्यास प्रतिभेचेंच एक द्वार मोकळें होतें, तें बंद झालें !"

अशा प्रकारचा आक्रोश त्या काळीं ग. त्र्यं. माडखोलकर, प्रा. क्षीरसागर वगैरे अनेक नामवंत लेखकांनीं केलेला आहे; व तो सर्वथैव योग्य होता, असें म्हटल्याशिवाय रहावत नाहीं.

हरीभाऊंच्या आणखी एका वाङ्मयीन छंदाचा ओझरता उल्लेख करणें जरूर आहे. एकेकाला एकेका गोष्टीचा छंद असतो, तसा हरीभाऊंना जुन्यानव्या साहित्यिकांच्या पत्रांचा संग्रह करण्याचा फार नामी छंद आहे. आमच्या माहितीप्रमाणें सध्यां तरी त्यांच्या संग्रहीं सुमारें ४०।५० जुन्या नव्या साहित्यिकांचा दुर्मिळ व साहित्यिक जीवनावर प्रकाश पाडणारा पत्रव्यवहार आहे. तो कधीं व कोणत्या निमित्तानें प्रकाशांत येतो, हेंच पहावयाचें आहे. पत्र-वाङ्मयाचें महत्त्व हरीभाऊंनीं पुरेपूर ओळखलें आहे व त्याचें प्रकाशन महत्त्वाच्या प्रसंगीं त्यांच्याकडून केलें जाईल. त्यांच्या 'प्रकाशन-प्रतिमा' ह्या पुस्तकाच्या द्वारें कांहीं मौल्यवान पत्र-वाङ्मय प्रकाशांत आलेंच आहे; तसेंच आपल्या संग्रहीं असलेलें बहुमोल पत्र-वाङ्मय हरीभाऊ योग्य वेळीं प्रकाशांत आणतील अशी अपेक्षा आहे.

हरीभाऊंचें वयोमान आतां साठीकडे झुकूं लागलें आहे. गेलीं पस्तीस वर्षे अधूनमधून ते प्रकाशन-क्षेत्रांत वावरत आहेत असें म्हणण्यापेक्षां तळपत आहेत, असें म्हणणें अधिक शोभेल. प्रकाशनासंबंधीं त्यांचा उत्साह अजूनही कायम आहे. तरी ज्या तऱ्हेनें त्यांनीं हा व्यवसाय आजवर हाताळला, त्यामुळें उत्साह असला तरी पूर्वीचा तो आर्थिक जोम टिकून रहाणें शक्य नव्हतें. प्रतिमासंपन्न ग्रंथ-प्रकाशन हा हरीभाऊंचा आवडता नि जीवनव्यापी छंद ! परंतु कांहीं ना कांहीं अडथळे उपस्थित होत गेल्यामुळें त्या आवडत्या छंदाकडे सुमारें १६।१७ वर्षे पाठ फिरवून त्यांना स्वस्थ बसून रहावें लागलें !

त्यानंतर चिंतामणराव कोल्हटकर यांच्या 'बहुरूपी' ह्या आत्मचरित्रपर ग्रंथानें हरीभाऊंचें प्रकाशन-व्यवसायांत पुनरागमन झालें. त्यानंतर मधून मधून सवडीनुसार त्यांचें ग्रंथ-प्रकाशन-कार्य चालू आहे. ह्यापूर्वींच्या काळांत प्रकाशन-क्षेत्रांत प्रतिभाबळावर त्यांनीं जसे चमत्कार घडवून आणिले, तशाच

प्रकारचे वाङ्मयीन चमत्कार यापुढील काळांतही त्यांच्याकडून घडून येण्याची शक्यता आहे.

परंतु तूर्त तरी त्यांनीं स्वतःसाठीं एक महत्त्वाचें कार्य अंगिकारिलें आहे. प्रकाशन-क्षेत्रांतील आपल्या गेल्या तीन तपांच्या अनुभवांचा फायदा होतकरू लेखकांस व ज्यांना आपले ग्रंथ प्रकाशांत आणायचे आहेत, त्यांना करून देण्याचें त्यांनीं योजिलें आहे. लेखक, ग्रंथकार व ग्रंथ-प्रकाशक ह्यांच्या मार्गांत एक मोठी अडचण असते. आपलें प्रकाशन कुठें व कशा रीतीनें करावें, तें प्रकाशांत आणण्यासारखें आहे कीं नाहीं, व असल्यास कोणाकडे जावें, ह्याची बरोबर कल्पना अनेकांस नसते. त्या बाबतींत आपल्याकडून शक्य असेल तें मार्गदर्शन हरीभाऊ करूं शकतात. प्रतिभा-संशोधनाच्या बरोबरीनें प्रकाशन-कार्यासंबंधीं त्यांचें अनुभव-भांडार दांडगें आहे. नामवंत प्रकाशकांशीं त्यांचे संबंध अत्यंत सलोख्याचे आहेत; त्यामुळें होतकरू ग्रंथकार नि ग्रंथप्रकाशक ह्यांच्यामधील दुवा ते यशस्वी रीतीनें सांधूं शकतात आणि उभयतांच्याही दृष्टीनें हा सांधा सोयीस्कर रीतीनें जोडून देणें व ग्रंथकारांस मार्गस्थ करणें, ही आजच्या काळांतील एक महत्त्वाची गरज आहे.

हरीभाऊंच्या ह्या नवीन उपक्रमाचें नांव 'मार्ग' आहे. हा मार्ग कशा रीतीनें कार्यवाहींत आणिला जाईल? थोडक्यांत त्याचें स्वरूप असें आहे :—

"नव्या लेखकांचीं हस्तलिखितें वाचून त्यांजविषयीं अवश्य ती कार्यवाही करण्यास 'मार्ग' मदत करील. अशा हस्तलिखितांवर प्रकाशनयोग्य असे संस्कार करणें, अशा हस्तलिखितांच्याबाबत लेखकास योग्य तो सल्ला देणें व प्रकाशनक्षम हस्तलिखितांस योग्य प्रकाशक गांठून देणें, इ. कार्यें करण्याची उमेद 'मार्ग' बाळगून आहे."

हरीभाऊंचा हा 'मार्ग' प्रकाशन-क्षेत्रांत प्रभावी नि सर्वांना उपकारक ठरो, हीच इच्छा.

## १३

# प्रकाशन—व्यवसायांतील 'पठाण'

एका काळीं पठाण हा शब्द कानांत पडल्यावरोबर अंगांतून दरदरून घाम सुटायचा! कारण त्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या व्यक्तींत कांहीं भयानक गुणांचा समन्वय झालेला आहे, अशी सर्वसाधारण समजूत. तेव्हां त्याच्यापासून चार हात दूर रहाणेंच श्रेयस्कर असें वाटणें स्वाभाविक होतें. परंतु अलीकडे सकारण किंवा अकारण लोकांच्या मनांत घर करून राहिलेल्या त्या कल्पना बऱ्याच अंशांनीं दूर झालेल्या आहेत. पठाणांचे पुढारी बादशहा खान अब्दुल गफारखान ह्यांनीं गांधी-युगांत जें कर्तृत्व गाजविलें व जनमनावर स्वतःसंबंधानें व आपल्या पठाण जमातीसंबंधानें जो ठसा उमटविला, तो अनन्यसाधारण नि अविस्मरणीय होता.

पठाण म्हणजे प्रामाणिकपणा, पठाण म्हणजे प्राणपणानें अन्यायाशीं झुंज देणारा वीरपुरुष; पठाण म्हणजे खाल्लेल्या मिठास जागणारा, पठाण म्हणजे ज्याच्याशीं एकदां मित्रत्वाचें नातें जोडलें, त्याच्यासाठीं वाटेल तो त्याग करणारा, पठाण म्हणजे कणखरपणा, पठाण म्हणजे हिशेबीपणा, पठाण म्हणजे निर्भीडपणा नि सडेतोडपणा; पठाण म्हणजे प्रामाणिक पहारेकरी; पठाण म्हणजे दंडेली, पठाण म्हणजे आडदांडपणा, पठाण म्हणजे स्वतःचीं मतें चूक असोत वा बरोबर असोत, त्यांच्यावर दृढ श्रद्धा ठेवून त्यांच्याबाहेर पाऊल न टाकणारा-आणि असे पठाणी पेशाचे किती गुण सांगावे?

आतां हा जो एवढा मोठा पाढा वाचला, त्यांना गुण म्हणा या अवगुण म्हणा, त्यांपैकीं बहुतेकांचा संगम पुणें येथील देशमुख आणि कंपनीचे कर्तबगार

चालक राम जयवंत देशमुख ह्यांच्याठायीं झालेला आढळून आल्यामुळें त्यांचे जिगर दोस्त सुप्रसिद्ध विनोदी लेखक पु. ल. देशपांडे ह्यांनीं त्यांना मोठ्या प्रेमभावानें 'प्रकाशन-व्यवसायांतील पठाण' ही पदवी बहाल केलेली असावी.

रामभाऊ देशमुख हे उर्णीपुरीं सुमारें तीस वर्षें प्रकाशन-व्यवसायांत वावरत आहेत. त्यांच्यापेक्षां ज्यांनीं ह्या व्यवसायांत अधिक वर्षें घालविलीं, असे आणखी कोणी प्रकाशक नाहींत असें नाहीं; परंतु रामभाऊंचें वैशिष्टय हें आहे कीं, त्यांनीं हा व्यवसाय अगदीं डोळ्यांत तेल घालून हिरीरीपणानें चालविला आहे. हा व्यवसाय ही त्यांची अनुभव मिळविण्याची नि नाना प्रकारचे प्रकाशन-प्रयोग करतां करतां पोटासाठीं भाकरी मिळविण्याची एक प्रयोग-शाळा आहे. प्रयोग करून पहायला धाडस लागतें, त्यांत पैसा ओतावा लागतो. तो हातीं लागला तर लागला, नाहीं तर गंगार्पण म्हणून मनाचें समाधान करून घ्यावयाचें!

देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें महाग समजलीं जातात. परंतु तीं हातांत घरावींशीं वाटतात; कारण तीं सुंदर नि आकर्षक असतात. ह्या किंमत लावण्यासंबंधानें अनुभवांतीं त्यांनीं कांहीं आराखडे ठरवून ठेवलेले आहेत. त्यांच्याबाहेर ते सहसा कधींही पाऊल टाकणार नाहींत. ह्या बाबतींत त्यांची विचारसरणी समजून घेण्यासारखी आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, "किंमत पृष्ठसंख्येवर ठेवणें किंवा पृष्ठसंख्येवर तिचा विचार करणें, ही पद्धति चुकीची आहे. स्वस्त आणि महाग हे शब्द नुसते लिहून किंवा बोलून उपयोग नाहीं. किंमत सर्व जगांत जो मूळ खर्च (लेखक-रॉयल्टी सोडून) आला असेल, त्याच्या पांचपट ठेवतात. मराठींत फक्त तिप्पटच ठेवली जाते. शिवाय सहा महिन्यांत खर्च निघत नसेल, तर परत तें पुस्तक छापलें जात नाहीं. भांडवल फिरतें रहातें का? वर्षांतून एकदां तरी फिरतें का? ह्या गोष्टीचा विचार करून किंमत स्वस्त महाग हे शब्द उच्चारले जावेत. एकाद्या लेखकास शंभर पानांचें पुस्तक लिहिण्यास दोन वर्षें लागलीं असतील, तर त्या लेखकास ज्या मानानें खर्च आला असेल व तो प्रकाशकानें दिला असेल. त्या प्रमाणांत पुस्तकाची किंमत वाढेल; पण ह्या गोष्टीचा विचार न करतां, किंमत फार आहे, असें म्हणण्याची पद्धति पडली आहे."

देशमुखांचा सारा कारभार हिशेबी आहे. हिशेबाशिवाय पाऊल टाकायचें नाहीं. आधाराशिवाय व पूर्ण अनुभव घेतल्याशिवाय वायफळ बोलायचें नाहीं. हिशेबीपणाच्या दृष्टीनें प्रकाशन–व्यवसायाचा अभ्यास केलेला त्यांच्यासारखा साक्षेपी माणूस दुसरा सांपडणार नाहीं. जमाखर्च म्हणजे त्यांचा जीव कीं प्राण आहे म्हणा ना. प्रकाशन-व्यवसायाचा हिशेब कसा ठेवावा, हें त्यांच्यापासून शिकावें. असकी बाब हिशेबांत कशी धरायची, ती सोडून देऊंया, असें ते म्हणणार नाहींत. व्यवहार करायचा तर तो बिनहिशेबी काय कामाचा? तो चतुराईनेंच केला पाहिजे. हिशेबांत कोणकोणत्या बाबींकडे लक्ष असावें? ते सांगतील कीं, 'जें कांहीं भांडवल घातलें असेल त्याला व्याज लावणें (कारण तें द्यावें लागतें), जमाखर्च ठेवण्यांत बिलकूल हयगय न करणें, गोडाऊन भाडें लावणें, दरवर्षी पुस्तकें किती खपलीं नि भांडवल किती मोकळें झालें तें पहाणें, ऑफीस खर्च लावणें, इन्शुअरन्स करणें नि लावणें, जाहिरातखर्च लावणें; लेखकासाठीं होणारा खर्च नमूद करणें,' वगैरे, वगैरे.

अशा रीतीनें हिशेबाच्या बाबतींत दक्षता बाळगून प्रकाशन-व्यवसाय चालविणाऱ्यास पश्चात्ताप करून घ्यावा लागणार नाहीं; उलटपक्षीं त्याचें त्या व्यवसायांत पुढें पुढें पाऊल पडत जाईल. हा रामभाऊंचा स्वानुभव प्रत्येक प्रकाशकानें आत्मसात करण्यासारखा नाहीं, असें कोण म्हणेल?

आपल्याकडून किंवा इतर प्रकाशकांकडून पुस्तकांच्या ज्या किंमती ठेवल्या जातात, त्या सर्वसाधारण वाचकांच्या दृष्टीनें परवडणाऱ्या नसतात, ह्याची जाणीव रामभाऊंना नाहीं असें कसें म्हणतां येईल? परंतु व्यवसाय करायचा व तो चालू ठेवायचा तर तो आंतबट्टयाचा करून कसें चालेल? हेंही तितकेंच खरें आहे.

परवडणाऱ्या किंमतीच्या दृष्टीनें पहातां देशमुख आणि कंपनीनें अलीकडे जो एक धाडसी, परंतु वाचकवर्गाच्या दृष्टीनें वाखाणण्यासारखा प्रयोग सुरू केला आहे, तो प्रकाशन-क्षेत्रांत खरोखर अभिनव, तसाच शक्य त्यांनीं अनुकरण करण्यासारखा आहे.

कोणता तो प्रयोग? 'व्यक्ति आणि वल्ली' (ले. पु. ल. देशपांडे), 'स्वामी' (ले. रणजीत देसाई), व 'ययाति' (ले. वि. स. खांडेकर) ह्या

बक्षिसपात्र व लोकप्रिय म्हणून गाजलेल्या तीन पुस्तकांच्या सर्वांना सहज परवडणाऱ्या स्वस्त आवृत्त्या काढून देशमुख ह्यांनीं प्रकाशन–क्षेत्रांत नामी व अभिनव खळबळ उडवून दिली आहे. पंधरा किंवा बारा रुपये किंमतीचें वाचनीय नि लोकप्रिय पुस्तक तीन चार रुपयांस मिळालें, तर वाचकांच्या त्यावर उड्या पडल्याशिवाय कशा राहतील? परंतु ही किंमतीची सवलत एकेका आवृत्तीच्या पंधरा किंवा वीस हजार प्रती काढून व त्या हातावेगळ्या होऊनही परवडते कीं नाहीं, हें ठरायचें आहे. कसेंही असो; हा अभिनव उपक्रम करून पहाण्याचें रामभाऊ देशमुखांनीं ठरविलें व तो उपक्रम अंमलांतही आणिला हें कांहीं थोडें थोडकें नाहीं. आमच्या मतें हा उपक्रम अनेक कारणांमुळें त्यांच्या अंगाशीं येऊं नये; कारण बिनहिशेबी कारभार रामभाऊंकडून सहसा होणार नाहीं, असा आपला आमचा समज आहे. शिवाय ह्या उपक्रमासाठीं त्यांनीं ज्या पुस्तकांची निवड केली आहे, तीं पुस्तकें दगा देणारीं नाहींत, तर दाम देणारीं आहेत.

रामभाऊंनीं पठाण–पहारेकऱ्याप्रमाणें आपल्या प्रकाशन–व्यवसायावर सक्त पहारा ठेविला आहे; परंतु कधींमधीं 'काव्यप्रकाश' सारखे वाङ्मयीन महत्त्वाचे व त्याचबरोबर दीर्घकाळ गोडाऊनमध्यें पडून रहाणारे ग्रंथही प्रकाशांत आणण्याचें धाडस ते खुशीनें पतकरीत असतात. हिला निःस्वार्थ वाङ्मय–सेवा नाहीं तर दुसरें काय म्हणायचें?

मराठी–वाङ्मय सुसमृद्ध व्हावें, त्यासाठीं प्रकाशक ह्या नात्यानें आपण शक्य तो त्याग केला पाहिजे, ह्याची जाणीव त्यांना आहे. ती सद्भावना ते कृतींत आणतील; परंतु ती बोलून दाखविणार नाहींत किंवा त्यावद्दल टेंमाही मिरविणार नाहींत. प्रकाशक आणि प्रकाशन–व्यवसाय ह्यांचें सामाजिक स्थान फार महत्त्वाचें आहे, ह्याची जाणीव त्यांना पूर्णपणें आहे; परंतु त्या क्षेत्रांत आपण कांहीं चांगल्या गोष्टी करीत आहोंत, ह्या अहंकारापासून ते चार हात दूर आहेत. मोठेपणाचा किंवा कृतार्थतेचा टेंमा मिरविणें त्यांच्या स्वभावांत नाहीं.

"अहो देशमुख! सगळें सोडून तुम्हीं प्रकाशन-व्यवसायांत कां प्रवेश केला?" तर ते सांगतील कीं, "पोटासाठीं भाकरी मिळवायची होती; त्यासाठीं आयुष्याच्या आरंभीं कोळसे विकले, चहा, सिगारेट विकल्या; फार काय?

पोटासाठीं हमालीसुद्धां केली! त्यांतलाच हा एक व्यवसाय! कसली वाङ्मयसेवा नि कसलें संस्कृति-संवर्धन घेऊन बसलां आहांत!" परंतु कोणत्याही प्रकारें डांगोरा न पिटतां नेमकें तेंच सत्कार्य त्यांच्या हातून घडत आहे.

ह्या व्यवसायांतील मोठेपणाचें श्रेय ते स्वीकारीत नसले, तरी तें त्यांच्यापासून कोण हिरावून घेऊं शकणार आहे? हेंच पहा ना. मराठी तिसऱ्या इयत्तेपलीकडे ज्यांच्या शाळागृहीन शिक्षणाची मजल जाऊं शकली नाहीं, त्यांनीं गेल्या तीस वर्षांच्या कालावधींत तीन-साडेतीनशें ग्रंथ प्रसिद्ध करून मराठी वाङ्मयाच्या समृद्धीला हातभार लावावा, ही घटना सर्वसामान्य म्हणतां येईल का?

अशा रीतीनें रामभाऊंच्या पदरीं प्रकाशन-व्यवसायांतील पुण्यांश परोपरीनें सांचत आहे. त्याची दाद त्यांना नसूं द्या. पण जें करायचें तें मनमुराद आणि मनापासून; परंतु त्यांतून अहंकाराला वर मान करूं द्यायची नाहीं, त्याचा विटाळ मानायचा, अशी आहे त्यांची वृत्ति!

मराठी प्रकाशन-व्यवसायाची परंपरा उज्ज्वल आहे. ह्या पवित्र क्षेत्रांत वावरणाऱ्यांना व आजवर जे वावरले नि ज्यांनीं उज्ज्वल परंपरा निर्माण करून ठेवल्या, त्यांचें पुस्तकी शिक्षणाच्या अभावीं अडलें नाहीं. येथें मातब्बरी आहे ती व्यवहारी शिक्षणाची, अनुभवजन्य ज्ञानाची नि अढळ निष्ठेची. आपल्या महाराष्ट्रांत गणपत कृष्णाजी, शेठ जावजी दादाजी, मंगेशराव कुळकर्णी ह्यांच्यासारखे जे मातबर प्रकाशक आपापली कारकीर्द गाजवून गेले, त्यांच्या भाग्यांत पुस्तकी-शिक्षण कितीसें होतें? परंतु प्रकाशन-क्षेत्रांतील त्यांची कामगिरी किती वंदनीय नि चिरस्मरणीय होऊन राहिली आहे! प्रकाशन-व्यवसायांत त्याच परंपरेचे पाईक रामभाऊ देशमुख आहेत.

ह्या माननीय व्यवसायांत पुस्तकी शिक्षणाला महत्त्व नाहीं असें मुळींच नाहीं; परंतु त्याहीपेक्षां अधिक महत्त्वाच्या आणखी कांहीं गोष्टी असतात. त्या पुस्तकांतून मांडलेल्या नाहींत; कोणी तरी शिकवून समजत नाहींत. त्याचे हमखास धडेही कोणाकडून घेतां येत नाहींत. ती गुणसंपन्न माणसांची जातच वेगळी असते. जन्माला घालतांनाच जन्मदात्यानें आवश्यक गुणांची शिदोरी त्यांच्या गांठीशीं बांधून दिलेली असते.

त्या शिदोरीचा उलगडा व्हायला किती कालावधि लागेल, याचें भविष्य वर्तवितां येत नाहीं. वाटचाल करीत रहायचें. कळी कधीं उमलेल तेव्हां उमलेल !

रामभाऊ देशमुख यांचा जीवन-प्रवास सुखकर नव्हता. सारी खडकाळ मार्गानें त्यांना जावें लागलें आहे. त्यांचा जन्म ता. ३१ मार्च १९१७ रोजीं उस्मानाबाद जिल्ह्यांतील हिप्परगें (नरसोबाचें) गांवीं झाला. मागें सांगितल्याप्रमाणें शिक्षणाची मजल मराठी तिसरीपलीकडे जाऊं शकली नाहीं. अशा माणसाच्या वांट्याला हमाली किंवा चहा-सिगारेटी विकीत बसण्याशिवाय दुसरी कसली रोजगारी येणार ?

रामभाऊंनीं पोटासाठीं वांट्यास येईल ती रोजगारी बिनतक्रार केली. आरंभकाळांतील या रोजगारीनें त्यांना अनुभवाचें अमृत पाजलें. त्याचबरोबर त्यांना कणखर, करारी व खडकाळ बनविलें ! आणि त्या खडकाळ भूमींत जें प्रकाशन-बीं पेरलें गेलें, तें टक्केटोणपे खात भिजत सुकत स्वयंप्रेरणेनें फोफावत गेलें !

हमाली केली, चहा-सिगारेट विकण्याचा रोजगार केला, तेव्हां भांडवलाचा प्रश्न आड आला नव्हता; परंतु प्रकाशन-व्यवसाय करायचा तर त्याचा पाया भांडवलाशिवाय कसा घालतां येईल ! शेवटीं त्यांनीं एक भांडवलदार गांठला नि त्याच्याकडून अवघे दीडशें रुपये भांडवलासाठीं घेतले. त्याचें व्याज रामभाऊंकडून त्यानें किती उकळावें ? दीडशें रुपयांस दीडशें रुपये !

माणूस 'पठाण' केव्हां बनतो, माहीत आहे ? त्याला जेव्हां अशा भरमसाट व्याजखाऊ माणसाशीं मुकाबला करावा लागतो तेव्हां ! उठतां बसतां पाठीवर परिस्थितीचे कठोर फटके बसतात, तेव्हां माणसाला सभोंवारची परिस्थिति 'पठाण' बनवीत असते !

सुदैवानें म्हणा वा दुर्दैवानें म्हणा; ऐन विशी-पंचविशीच्या काळांत पोटाची खळगी भरण्यासाठीं रामभाऊंना जे रोजगारधंदे करावे लागले व ते करीत असतां त्यांना जें जग आढळून आलें, त्या जगानें त्यांना जागविलें; त्यांना शहाणपणाचे कडू-गोड डोस पाजले, त्यांना कर्तव्यकठोर बनविलें व त्यांतून आजच्या रामभाऊ देशमुखांची ओबडधोबड परंतु कणखर मूर्ति घडविली गेली.

आयुष्यांत वेळोवेळीं आलेल्या खडतर अनुभवांच्या सहाय्यानें त्यांनी

आपलें जीवनविषयक तत्त्वज्ञान बनविलें. जीं एकदां अनुभवांतीं मतें बनविलीं, तीं ठाम. मग तीं कोणाला आवडोत वा न आवडोत. त्या मतांच्या मेरुपर्वतावर उभें राहून आपले नित्याचे व्यवहार हाताळावयाचे. जगांत आपण सभोंवारच्या माणसांशीं कसें वागावें, हिशेबीपणा कसा सांभाळावा, दुबळ्यास हात देऊन त्याला जवळ कसें करावें, जगांत ' माणुसकी ' नांवाचा जो बहुमोल गुण आहे तो पैशांपेक्षांही कसा सर्वश्रेष्ठ आहे, ह्याची खूणगांठ मनाशीं पक्की बांधून ते जगांत जागरूकतेनें वावरूं लागले.

रामभाऊंचें बोलणें नि वागणें ह्यांत कमालीची तफावत असते. बोलणें ओबडधोबड, लिहिणें ओबडधोबड, परंतु प्रत्यक्ष वागणें मात्र सुंदर, मनाला मोहिनी घालणारें नि कोणींही हेवा करावा असें. अंतरीं निर्मळ! वाचेचा फटकळ ( रसाळ नव्हे वरं ! ) त्याच्या गळां माळ असो नसो ! असा आहे विचित्र खाक्या रामभाऊंचा !

त्यांच्या बोलण्यांत विक्षिप्तपणाचा भाग असला तरी प्रत्यक्ष वागण्यांत आत्यंतिक प्रेमळपणा, सज्जनपणा नि माणुसकी मनमुराद असते. जशा विक्षिप्त वागण्याच्या, तशाच त्यांच्या माणुसकीच्या किती तरी गोष्टी प्रचलित आहेत.

लेखक हा ' प्राणी ' त्यांना प्राणाहून प्रिय आहे. त्याच्यासाठीं वाटेल तो त्याग करायला ते मागेंपुढें पहाणार नाहींत. अभिजात व प्रतिभासंपन्न लेखक हा आपला अन्नदाता; आपल्या व्यवसायाचा पोशिंदा, ह्याची जाणीव त्यांना नेहमीं असते. सध्यांच्या काळांतील नामवंत नि प्रतिभासंपन्न अशा बहुतेक लेखकांशीं त्यांनीं आपुलकीचें नातें जोडलें आहे. एकदा त्यांच्याशीं संबंध आला म्हणजे त्यांच्या तावडींतून निसटणें कठीण असतें. कारण लेखक वर्गाशीं त्यांची वागणूकच मनाला ओढ लावणारी असते. त्याचबरोबर ' प्रकाशक ' नांवानें ओळखला जाणारा जो प्राणी आहे, त्याला सरकारकडून व समाजाकडून जी मानमान्यता किंवा जो दर्जा मिळाला पाहिजे तो आजकाल मिळत नाहीं, ह्याचीही त्यांच्या मनाला खंत वाटत असते. सरकार प्रकाशकांना इतर धंद्यांप्रमाणें धंदा करणारे घटक मानतें, ही सरकारची चूक आहे असें ते स्पष्टपणें सांगतील. " प्रकाशन हा धंदा नसून तो व्यवसाय आहे. सरकारी कमिट्यांवर लेखकांस घेतलें जातें, मग प्रकाशकांस कां घेतलें जात नाहीं ? समाजाकडून सरकार जो

पैसा घेतें व खर्च करतें तो योग्य प्रकारें खर्च व्हावा असें वाटत असल्यास सरकारनें लेखकांप्रमाणें प्रकाशकांनाही विचार-विनिमयप्रसंगीं स्थान दिलें पाहिजे," असें ते ठांसून सांगतील.

रामभाऊंना आपल्या प्रकाशकबंधूंबद्दल फार जिव्हाळा आहे. त्यांच्याशीं ते बंधुभावानें वागतील व वेळप्रसंगीं आपल्याकडून होण्यासारखी असेल ती मदत त्यांना निरपेक्षपणें नि कर्तव्यबुद्धीनें करतील. मागें पानशेतच्या महापुरांत इतर अनेकांबरोबर त्यांचेंही नुकसान झालें; परंतु त्याबद्दल दुःखाश्रु ढाळीत न बसतां ते थेट आपल्या बँकेंत गेले आणि तेथें शिल्लक असलेली सर्व रक्कम काढून घेऊन ती त्यांनीं गरजू नि संकटांत सांपडलेल्या आपल्या मुद्रक-प्रकाशक बंधूंना दिली. आपल्या गरजेपेक्षां किंवा आपल्यावर ओढवलेल्या संकटापेक्षां त्या आपल्या व्यवसाय-बंधूंची गरज मोठी आहे, हें त्यांनीं तावडतोब ओळखलें! ह्याचें नांव माणुसकी! ती बोलण्यापेक्षां कृतींत आणणें महत्त्वाचें आहे, हें त्यांना बरोबर समजतें.

प्रकाशन-व्यवसाय किंवा प्रकाशन-व्यावसायिक ह्यांच्यासंबंधीं आमची म्हणजे प्रस्तुत लेखकाची, कांहीं ना कांहीं अल्पस्वल्प हालचाल चाललेली आहे, ह्याची खबर लागतांच एक पत्र पाठवून त्यांनीं तत्संबंधीं आपली सद्भावना खुल्या दिलानें प्रकट करतांना म्हटलें होतें कीं, "आपण घेतलेलें काम फार मोठें आहे. आणि आतांपर्यंत निदान मराठी भाषेंत तरी या प्रकारचें काम कोणी केलें नाहीं. आपण तें करीत आहांत, ही फार चांगली गोष्ट आहे. मराठी प्रकाशक हें आपलें ऋण कदापीही विसरणार नाहींत."

बोलण्यांत किंवा वागण्यांत अनेकांस ओबडधोबड वाटणाऱ्या रामभाऊ देशमुखांचे हे मायेचे शब्द आमच्या अंतःकरण-पटलावर सदैव कोरलेले रहातील. अजून तसें कांहीं करणें शक्य झालेलें नाहीं, तरी त्यांच्या शब्दांमुळें शिरावरील जबाबदारीची जाणीव नेहमीं होत राहील.

ह्या ग्रंथाचें काम चालू असतां उपेक्षित अशा प्रकाशक-वर्गाची स्थिति व त्यांचीं गाऱ्हाणीं शक्य तर समजून घ्यावीं, ह्या उत्कंठेनें एक प्रश्न-मालिका तयार करून ती, ज्यांचे पत्ते मिळूं शकले, अशा प्रकाशकांकडे पाठविण्यांत आली. त्याची दखल फार थोड्यांनीं घेतली. ज्यांनीं घेतली त्यांचे आम्ही आभारी आहोंत. रामभाऊ देशमुख ह्यांनीं त्या प्रश्नमालिकेची

व्यवस्थित दखल तर घेतलीच; आणि कोणत्याही कारणामुळें असो, जें धाड
कोणीही प्रकाशक करूं शकला नाहीं, तें मुद्दाम पत्र लिहून दोन उत्तेजनप
शब्द लिहिण्याचें सौजन्य प्रकट करण्यासाठीं रामभाऊ पुढें सरसावले! त्यां
*त्यांना प्रकाशन-व्यवसायाबद्दल नि आपल्या प्रकाशक बंधूंबद्दल वाटणार*
तळमळ स्पष्ट होत आहे.

रामभाऊंच्या स्वभावासंबंधानें नि वागण्यासंबंधानें आजवर पुष्कळ
लिहिलें गेलें आहे. त्या प्रांतांत प्रवेश करण्याची आमची ताकद नाहीं; परं
शेवटीं जातां जातां त्यांच्या बाबतींत एक अपेक्षा प्रकट करण्याचा मोह मात्र
आवरतां येत नाहीं.

मराठी ग्रंथ-प्रकाशन म्हणजे लघुकथा-संग्रह नि कादंबऱ्या ह्यांचें प्रकाशन, असा अर्थ आज रूढ होऊन बसला आहे. जें खपतें व ज्यांच्यावर वाचकांच्या उड्या पडतात तें प्रसिद्ध करावयाचें, हा शिरस्ताच पडून गेलेला आहे. कालमान लक्षांत घेऊन, तसेंच सध्यां शैक्षणिकदृष्ट्या ज्या मार्गानें आमची वाटचाल सुरू झाली आहे, त्या नवीन मार्गाकडे आमच्या प्रकाशक-बंधूंनीं आतां लक्ष पुरविणें जरूर आहे, असें *आमच्या अल्प मतीस वाटतें. पॉप्युलर-प्रकाशनसारख्या* संस्थांचें लक्ष त्या मार्गाकडे वळूं लागलें आहे, ही समाधानाची गोष्ट आहे.

प्रकाशन-व्यवसायांत पडून कांहीं काळ लोटल्यानंतर जें अर्थ-शास्त्राचें थोडेंबहुत ज्ञान झालें, त्यामुळें ललित-वाङ्मय छापून प्रसिद्ध करण्याच्या उपक्रमाला आळा घालावा, असें रामभाऊंना अलीकडे वाटूं लागलें आहे. त्या प्रयत्नांत सध्यां ते आहेत.

यांत्रिक नि तांत्रिक शिक्षण ही आजच्या काळाची गरज आहे. त्या गरजेचें पोषण करणाऱ्या वाङ्मयाची निर्मिति करणें आज अत्यंत आवश्यक आहे. *आजच्या नि उद्यांच्या काळाची ती गरज आहे. त्यासाठीं योग्य तीं* माणसें हेरून व त्यांना हाताशीं धरून त्यांच्या सहकारानें तांत्रिक-वाङ्मय प्रकाशांत आणण्यांत आलें पाहिजे. हें करायचें कोणीं? ज्याच्या पदरीं धोरण नि धाडस असेल त्यांनीं.

रामभाऊ देशमुख ह्यांच्यापाशीं हें भांडवल आहे आणि म्हणूनच *यापुढील काळांत प्रकाशन-कार्याला त्यांच्याकडून* जरूर ती *कलाटणी* दिली जाईल, अशी अपेक्षा प्रकट करणें, अनाठायीं होणार नाहीं.

## १४

## मौज - मुद्रणालयाची कर्तबगारी

'मौज मुद्रणालय' नि 'मौज प्रकाशन' ह्या एकाच छत्राखालीं एकत्र नांदणाऱ्या दोन्ही संस्थांनीं आजच्या मुद्रण नि मराठी-वाङ्मय प्रकाशन क्षेत्रांत बहुमानाचें स्थान मिळविलें आहे. तें सार्थेसुर्धे नाहीं, तर कोणींही आश्चर्यानें तोंडांत बोटें घालावीं अशा प्रकारचें. नयनमनोहर मुद्रण नि त्याला साजेसें सुंदर सजावटीचें ग्रंथ-प्रकाशन हीं मौज संस्थेचीं आजच्या प्रकाशन-जगांतील खास वैशिष्ट्यें मानिलीं जातात.

तुम्हांला कलावंत जागोजाग आढळतील. कलेचा व स्वतःचा संसार कमावसा रेटावयाचा व त्यांतच समाधान मानून रहावयाचें, हें झालें सर्वसामान्य जीवन; परंतु ज्या कलेच्या प्रांतांत आपण प्रवेश केला, त्या प्रांतांत जें सर्वोत्कृष्ट असेल तें ढवळून घुसळून बाहेर काढावयाचें नि त्यावर आपल्या कर्तृत्वाचा ठसठशीत ठसा उमटवावयाचा, ही सर्वसामान्य गोष्ट नाहीं.

परंतु हें असामान्यत्व उगाच नाहीं वांट्याला येत. त्यासाठीं त्या विषयाशीं तादात्म्य व्हावें लागतें, तेंच जीवनसर्वस्व मानून रात्रंदिवस त्याच विषयाचा ध्यास घ्यावा लागतो नि तो एकमेव विषय खेरीज करून इतरांशीं जाणून बुजून तातातूट करून घ्यावी लागते. 'देवाचिया सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगांच्या तुटी॥'

परमेश्वर कोणाला पावतो? जो आपला भक्तिभाव नि संपूर्ण निष्ठा त्याच्या चरणीं अर्पण करील त्याला. येथें भक्तीचें आणि निष्ठेचें प्राबल्य आहे.

हे दोन्ही शब्द उच्चारायला फार सोपे आहेत; परंतु आचरणांत आणण्याच्या दृष्टीनें ते तितकेच कठीण आहेत. ते तसे सुलभ असते तर तुम्हांला गणपत कृष्णाजी नि जावजी दादाजी घरोघर वावरतांना दिसले असते. लाखांत किंवा हजारांत एकादाच निष्ठेच्या बळावर त्या माननीय थोर पदापर्यंत पोहोंचलेला आढळून येतो.

कोणत्याही कलेच्या क्षेत्रांत अग्रपूजेचा मान मिळवून 'पूजा-स्नान' होऊन राहाणें ही सहजसाध्य गोष्ट नाहीं. जेव्हां अनेक असामान्य गुणांची कांस धरावी, स्वतःला सर्वस्वी विसरून रात्रंदिवस कष्ट उपसावे नि सुखासीनतेकडे पाठ फिरवावी, तेव्हांच नांव घेण्यासारखें कार्य हातून पार पडत असतें.

'मौज-मुद्रणालय' नि 'मौज-प्रकाशन' ह्या संस्थांना आज जी वैभवश्री प्राप्त झालेली दिसत आहे, तिच्यामागें एका ध्येयवादी व्यक्तीची गेल्या दोन तपांतील एकनिष्ठ तपस्या आहे. त्या व्यक्तीचें नांव आहे विष्णु पुरुषोत्तम भागवत. स्वभावाच्या दृष्टीनें पहातां त्या व्यक्तींत तुम्हांला प्रथमदर्शनीं विलोभनीय व आकर्षक असें कांहीं आढळणार नाहीं. आढळेल तुमच्या बाबतींत दुर्लक्ष नि बेफिकीरपणा!

आरंभापासून त्यांना ज्या विपरीत परिस्थितीशीं सामना द्यावा लागला, स्वीकाराव्या लागलेल्या व्यवसायांत जे अपरंपार कष्ट उपसावे लागले नि ध्येयसिद्धीसाठीं जी एकात्मकता स्वीकारावी लागली, त्यामुळें त्यांची दृष्टि स्वयंकेंद्रित बनली आहे. आपल्या हातांतील कामापलीकडे त्यांना दुसरें कांहीं दिसत नाहीं!

परिस्थितीमुळें जो व्यवसाय स्वीकारावा लागला, तोच आपला परमेश्वर. त्याची पूजा भक्तिभावपूर्वक एकनिष्ठपणें बांधण्यासाठीं मनापासून झटायचें, त्यासाठीं जितकें म्हणून कौशल्य प्रकट करतां येईल तेवढें करायचें आणि तेंच आपलें सर्वस्व मानून जगांत वावरायचें, हा आहे विष्णुपंतांचा खाक्या.

गोड नि रसाळ बोलून एकाद्याचें मन वळविण्याच्या भरीस पडणें, वायफळ बोलण्यांत वेळ दवडणें किंवा घासाघीस करीत बसणें त्यांच्या स्वभावांत नाहीं. निर्णय घ्यावयाचा तो तडकाफडकी. आपल्या विचित्र

वागण्यामुळें तुम्हांला काय वाटेल ह्याचा विचार करायला वेळ नाहीं ! नेहमीं आपल्या हातांतील कामांत दंग !

त्यामुळें कोणत्याही कामानिमित्त असो; त्यांना भेटणाऱ्याचा, प्रथमदर्शनीं त्यांच्या बाबतींत विपरीत ग्रह होणें हा त्याचा दोष नाहीं; परंतु हा जो किरकोळ दोषांचा अंधुक काळोख त्यांच्या सभोंवार पसरलेला आहे, त्याच्यावर मात करणारा नि क्षणार्धांत प्रकाशस्रोत सोडून तो काळोख देशोधडीस लावणारा, एवढेंच नव्हे तर त्यांना तेजःपुंज विष्णु बनविणारा एक अत्यंत आदरणीय नि दुर्मिळ सद्गुण त्यांनीं दीर्घप्रयत्नांच्या व चिकाटीच्या बळावर प्राप्त करून घेतलेला आहे.

'एकश्चंद्रस्तमो हन्ति'—ह्यासारखा आहे हा प्रकार. मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांत विलोभनीय प्रावीण्य संपादन केल्यामुळें सहाजिकच त्या क्षेत्रांत वावरणाऱ्यांना ते हवे हवेसे वाटत असतात.

विष्णुपंत आज ज्या क्षेत्रांत मानानें वावरत आहेत, ती माननीयता ही त्यांनी गेल्या दोन तपांतील कमाई नि पुण्याई आहे. त्या क्षेत्रांत त्यांचा हात धरणारीं नि त्यांच्या खांद्यास खांदा लावून चालणारीं माणसें आज फारच थोडीं आहेत. सध्यां त्यांच्या पावलांवर पावलें टाकून तीं आस्ते आस्ते पुढें येऊं लागलीं आहेत. त्यामुळें भावी–काळ आशादायक वाटूं लागला आहे; परंतु आज तरी विष्णुपंत हे त्या येऊं घातलेल्या अभिनव प्रकाशन - युगाचे अग्रदूत आहेत असें म्हणतां येईल.

मला आकाशांतील चांदोबा हवाय, अशी आकांक्षा बाळगणारीं बालबुद्धीचीं माणसें तुम्हांला ठायीं ठायीं आढळून येतील; परंतु तेथपर्यंत हात पोहोंचावा ह्यासाठीं जी अविश्रांत धडपड नि तपस्या करावी लागते, त्याचप्रमाणें कितीही त्रास सोसावा लागला तरी हरकत नाहीं; परंतु मी तेथपर्यंत जाऊन पोहोंचणारच, असा जो हिय्या बाळगावा लागतो, त्याचें काय ?

तो हिय्या किंवा ती ईर्षा विष्णुपंतांच्याठायीं आहे; किंवा प्राप्त परिस्थितीमुळें यशस्वितेला खेंचून जवळ आणणाऱ्या त्या मौल्यवान गुणांचा परिपोष त्यांच्याठायीं होत गेला, असें वाटल्यास म्हणा.

## ॐ मौज-मुद्रणालयाची कर्तबगारी

सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी विष्णुपंतांना मुद्रण-क्षेत्रांत प्रवेश करावा लागला, तो काळ सर्व बाजूंनीं विपरीत व पदोपदीं वैफल्य पदरीं बांधून ठेंचा खायला लावणारा होता. अशा ह्या क्षेत्रांत ते स्वखुषीनें शिरले नाहींत, तर परिस्थितीनें त्यांना तेथें खेंचून आणिलें.

४०।४२ वर्षांपूर्वींच्या काळाकडे आपण क्षणभर थोडेसे वळूंया. निर्णयसागर, कर्नाटक मुद्रणालय, मनोरंजन मुद्रणालय ह्यांसारख्या नामवंत मुद्रणालयांच्या चलतीचा तो जमाना होता. त्या काळांत (१९२६) विष्णुपंतांचे चुलते पांडोबा भागवत ह्यांनीं मौज मुद्रणालय नि अनंतराव गद्रे ह्यांचें 'मौज' साप्ताहिक ह्यांची मालकी मिळविली. पांडोबा हे राष्ट्रीय वृत्तीचे नि लो. टिळक ह्यांच्या पक्षाचे अनुयायी होते. प्रचाराच्या दृष्टीनें मुद्रण-यंत्राचें नि वृत्तपत्राचें महत्त्व ते पूर्णपणें ओळखून होते. सुप्रसिद्ध पत्रकार नि नागपूरच्या 'महाराष्ट्र' साप्ताहिकाचे आद्य संपादक गोपाळराव ओगले ह्यांच्या हाताखालीं त्यांनीं वृत्तपत्रीय शिक्षण संपादन केलें होतें.

मुद्रणालयाची मालकी मिळविल्यानंतर दोन वर्षांनीं त्यांनीं 'प्रभात' ह्या नांवाचें एक दैनिक सुरू केलें. त्याची किंमत अवघी एक पैसा ठेवण्यांत आली. उद्देश ? तें सर्वांना सहज घेतां यावें नि त्याचा घरोघर प्रवेश व्हावा. त्यांनीं आरंभलेला तो एक धाडसी प्रयोग होता. त्यांत झीज सोसावी लागेल ह्याची त्यांना कल्पना होती; परंतु त्या प्रयत्नांच्या पाठीशीं ज्ञान-प्रसाराची नि लोककल्याणाची तळमळ होती.

पांडोबांच्या अपेक्षेप्रमाणें 'प्रभात' ह्या स्वस्त दैनिकाचा खप खूप वाढला; विशेषतः कामगार-वर्गांत त्या पत्राच्या हजारों प्रती खपूं लागल्या. आपलें वृत्तपत्र बहुजनसमाजाचें व्हावें ही होती त्यांची आकांक्षा. वर्षानुवर्ष तोटा सोसावा लागत होता तरी आपले परिश्रम नि पैसा सत्कारणीं लागत आहे, हें समाधान त्यांना लाभत होतें.

१९३८ सालीं पांडोबा निधन पावल्यानंतर मौज मुद्रणालय नि प्रभात, मौज वगैरे नियतकालिकें चालविण्याची जबाबदारी त्यांचे वडील बंधु पुरुषोत्तम म. भागवत ह्यांच्याकडे व त्यांच्या चिरंजीवांकडे आली. त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव दत्तात्रय पु. भागवत ह्यांचें इंटरपर्यंत शिक्षण झाल्यानंतर वृत्तपत्रीय कामाकाजाची

माहिती मिळविण्यासाठीं ते नागपूर येथें 'महाराष्ट्र' कचेरींत राहिले होते. मौज-मुद्रणालयाचा नि वृत्तपत्रांचा गाडा चालू ठेवून तो पुढें रेटावयाचा होता. अशा परिस्थितींत दत्तोपंत हे मुंबईंत येऊन संपादकीय बाजू संभाळूं लागले व त्यांचे बंधु जयरामपंत हे छापखान्याच्या अंतर्गत कारभाराकडे लक्ष पुरवूं लागले.

तिसरे बंधु विष्णुपंत ह्यांचें महाविद्यालयीन शिक्षण चालू होतें. त्यांची मजल बी. एस्‌सी. पर्यंत पोहोंचली होती. आपल्या शिक्षणांत ते रमले होते. भावी काळासंबंधींचीं सुखस्वप्नें रंगवीत होते.

मुद्रणालयांतील त्यांचे बंधु आपापली जबाबदारी पार पाडण्यासाठीं प्राप्त परिस्थितीशीं निकरानें सामना देत होते. कारण युद्धजन्य परिस्थितीमुळें मुद्रणालयांच्या बांध्यास मोठा कठीण काळ आलेला होता. तें १९४० साल असावें. छापखान्यांत सतत सोसाव्या लागलेल्या दगदगीमुळें दत्तोपंतांस आजारानें गांठलें. त्यांनीं विश्रांति घेणें अत्यंत जरूर होतें.

आतां काय करायचें? त्यांच्या जागीं कोणाची योजना करायची? हा प्रश्न 'आ' वासून पुढें उभा राहिला, तेव्हां नांवारूपाला येत असलेला आपला शिक्षणक्रम बाजूला ठेवून मुद्रणालयांतील कारभाराला तात्पुरता हातभार लावण्यासाठीं म्हणून विष्णुपंत मुद्रणालयांत दाखल झाले. त्या वेळीं त्यांचें वयोमान एकवीसच्या पलीकडे गेलें नव्हतें. ज्या कार्याशीं आपला संबंध येईल तें सर्वांगसुंदर बनविण्यासाठीं मनोभावें झटायचें, ह्या त्यांच्याठायीं असलेल्या उपजत गुणाचा प्रभाव आस्ते आस्ते येथेंही आढळून येऊं लागला. विस्कटलेली घडी नीट जुळवून आणावी ह्यासाठीं ते धडपडत असतां वडील बंधु दत्तोपंत ह्यांचा हृदयविकार बळावून दुर्दैवानें त्यांतच त्यांचा १९४३ सालीं अंत झाला!

संकटपरंपरा एकदां सुरू झाली म्हणजे तिची प्रगति कधीं खुंटेल हें सांगतां येणें कठीण असतें! मौज-मुद्रणालयावर एकामागून एक संकटें येऊं लागलीं. मति गुंग करून सोडणारा तो मोठा विचित्र काळ होता. अशा काळांत वावरणाऱ्यावर धीरगंभीरपणें व विचारपूर्वक न वागल्यास रसातळास जाण्याची पाळी कधीं येईल, हें सांगण्यासाठीं भविष्यवाद्याची जरूरी नसते. हातातोंडाशीं आलेलें महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करून एखाद्या शैक्षणिक नि राष्ट्रोपयोगी

विषयांत नांव घेण्याजोगें कर्तृत्व गाजवायचें, हें विष्णुपंतांनीं विद्यार्थिदशेत हृदयांत जोपासलेलें सुखस्वप्न जागच्याजागीं जिरून त्यांना नव्या मार्गानें वाटचाल करणें प्राप्त झालें !

'आलिया भोगासी, असावें सादर' हा द्वादशाक्षरी मंत्र जपत विष्णुपंतांनीं मुद्रणालयाची घडी नीट बसविण्याचा निर्धार स्वतःच्या मनाशीं करून त्यानंतरच्या काळांत त्यांनीं पुनर्घटनेच्या कार्यास स्वतःस सर्वस्वी वाहून घेतलें-लोक काय म्हणतील याची विवंचना करीत चालढकल करण्याचा तो समय नव्हता. त्यांना आपलें घर सुधारायचें होतें. वाढत्या नुकसानीला आळा घालून संस्था कशी जगवितां येईल व भरभराटीला आणतां येईल हें पहावयाचें होतें.

अशा वेळीं मायमानें कर्तव्यकठोरतेनें वागावें लागतें. खोल्या नि खिशाला खळगी पाडणाऱ्या इभ्रतीला बळी पडून चालत नाहीं. स्वस्तांत स्वस्त नि लोकप्रिय होऊन राहिलेल्या 'प्रभात' सारख्या दैनिक पत्राला दुसऱ्याच्या हवालीं करतांना विष्णुपंतांच्या हृदयाला दारुण यातना होणें अगदीं स्वाभाविक होतें ! परंतु एकदां मुद्रणालय चालविण्याची जबाबदारी स्वीकारल्यानंतर आर्थिकदृष्ट्या अनिष्ट दिसेल तें दूर करायचें व इष्ट वाटेल तें जवळ करायचें, ह्या मार्गाचा अवलंब केल्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. तोच त्यांनीं अवलंबिला !

ती विपरीत परिस्थिति, तो प्रतिकूल काळ नि तें कोंवळें वय, ह्या सर्व गोष्टी जमेस धरून विष्णुपंतांनीं धीरगंभीरपणें जीं पावलें टाकलीं, यश दृष्टिपथांत यावें ह्यासाठीं त्या काळांत जे कष्ट उपसले व विपरीत परिस्थितीशीं जो धैर्यानें सामना दिला, त्याबद्दल त्यांचें कौतुक करावें तेवढें थोडेंच होईल.

मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांत आज विष्णुपंत सर्वांच्या कौतुकाचा विषय होऊन राहिलेले आहेत. ऐन तारुण्यांत महाराष्ट्र मुद्रण परिषदेच्या अध्यक्षपदाचा मान त्यांच्याकडे चालून आला. मुद्रण-कलेंत त्यांनीं एवढें प्रावीण्य संपादन केलें व त्यांच्या मुद्रणालयांतून एकामागून एक सुंदर नि कोणीही हेवा करावा अशीं नयनरम्य कामें बाहेर पडूं लागलीं कीं, भारत सरकारला व आमच्या प्रांतिक सरकारला त्यांच्यावर पारितोषिकांची खैरात करावी लागली !

## शताब्दि महोत्सव समितीची स्थापना.

निर्णयसागर शताब्दि महोत्सव समितीकरितां साहित्य संघांत सभा भरलेली असतांना भाषण करीत असलेले श्री. बापुराव नाईक, मुंबई युनिव्हर्सिटीचे गोवर्धन पारिख (डावीकडून असलेले) व गुजराथ टाईप फौण्ड्रीचे गोपाळराव मोदी.



साहित्य-संघमंदिरांत निर्णयसागर शताब्दि-महोत्सव-समितीच्या सभेस हजर असलेले. श्री. पु. बा. कुळकर्णी, श्री. दा. भ. कर्णिक, श्री. भागवत वगैरे.

## चरित्र-ग्रंथाचें साप्ताहिक वाचन (दोन दृश्यें)



लेखक श्री. अप्पासाहेब कुळकर्णी कै० जावजी शेठ चरित्राचें साप्ताहिक वाचन करीत असतांचें दृश्य. बसलेले (डावीकडून) श्री. काळेसाहेब (सेक्रेटरी) श्री. मोरे (व्यवस्थापक), लेखक श्री. अप्पासाहेब कुळकर्णी, श्री. कृ. वि. सोमणशास्त्री, श्री. मोडक, चरित्र-लेखकाच्या मागें उभे, त्यांचे नातू चित्तरंजन



कै० जावजी दादाजी चरित्राचे लेखक श्री. अप्पा कुळकर्णी साप्ताहिक वाचन करीत असतांनाचें दृश्य.



श्री. बापुराव नाईक कै० जावजी शेठ चरित्र ग्रंथाचे खिळे जुळविण्याच्या शुभारंभासंबंधीं भाषण करित असतांना.



कै० जावजी शेठ चरित्राचे खिळे-जुळवणीचा कार्यारंभ श्री. बापुराव नाईक यांचे शुभहस्तें झाला, त्यावेळचें दृश्य.

## गुढीपाडव्याच्या सुमुहूर्तावर जावजीशेठ ह्यांच्या चरित्राचा खिळे-जुळवणी समारंभ झाला त्याचीं कांहीं दृश्यें.



कै० जावजीशेठ यांच्या चरित्राचा खिळे-जुळवणी शुभारंभ गुढीपाडव्याचे सुमुहूर्तावर श्री. बापुराव नाईक यांचे हस्तें झाला, त्यावेळीं जमलेली पाहुणे मंडळी.



कै० जावजीशेठ चरित्र ग्रंथाच्या जुळणीचें काम सुरु झालें त्यानिमित्त जमलेली पाहुणे मंडळी.

बसलेले ( डावीकडून )—वैद्य नाना जोशी, आमदार वामनराव राणे, नानासाहेब पुराणिक, सौ. पुराणिक, कु. नीलिमा कुलकर्णी (ग्रंथलेखकांची नात), श्रीमती लक्ष्मीबाई चौधरी, बापूराव नाईक, पु. बा. कुलकर्णी व वैद्य वेणीमाधव शास्त्री

आयुर्वेद कोषाच्या कार्यारंभ सुमुहूर्तावर झाला त्याचें दृश्य.



गुढीपाडव्याच्या मुहूर्तावर आयुर्वेद कोष ( साहित्य संस्कृति मंडळाचें एक प्रकाशन ) या पुस्तकाच्या कम्पोजिंगच्या कामास ज्या दिवशीं सुरवात झाली, त्यावेळचें दृश्य. उभे मॅनेजर–श्री. मोरे, श्री. मोडक, बसलेले आमदार वामरावराणे, वेणीमाधवशास्त्री, जोशी, श्री. सोमण शास्त्री, श्री. जळुकर शास्त्री, श्री. मायनेकर शास्त्री, श्री. बापुराव नाईक, श्री. नानासाहेब पुराणिक.



श्री. बापुराव नाईक यांना व्यवस्थापक श्री. मोरे हे कारखाना दाखवीत असतांनाचें दृश्य. शेजारी श्री. खरे उभे आहेत.

## शेठ जावजी दादाजी ह्यांचें पुण्यस्मरण.



शेठ जावजी दादाजी ह्यांची ७५ वी पुण्यतिथि निर्णयसागर मुद्रणालयांत ता. १९ एप्रील १९६७ रोजीं चित्रकार व साहित्यिक श्री. नी. म. केळकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं साजरी झाली. श्री. केळकर जावजीशेठच्या प्रतिमेस पुष्पहार घालीत आहेत.



समारंभाचे अध्यक्ष श्री. नी. म. केळकर भाषण करीत आहेत.

शेठ जावजी यांच्या ७५ व्या पुण्यतिथीनिमित्त
भरलेल्या सभेंत—





श्री. मोरे आभार-प्रदर्शन करीत असतां.

मुद्रण नि ग्रंथ-प्रकाशन किती सौंदर्यपूर्ण नि वैभवशाली करतां येतें ह्याचा उच्चतम आदर्श त्यांनीं सर्वांपुढें ठेविला. हें क्षेत्र जनतेच्या सर्वांगीण उन्नतीशीं सर्व परीनें संलग्न झालेलें आहे. तेथें चालढकल बिलकूल कामाची नाहीं. जें उत्कृष्ट, उच्चतम व उपकारक असेल तें प्रकर्षानें पुढें आलें पाहिजे. विष्णुपंतांनीं हें बरोबर ओळखलें नि आजच्या काळांत जें आवश्यक तें आचरणांत आणून दाखविलें.

हें जें आगळें नि अनुकरणीय कर्तृत्व त्यांनीं गाजवून दाखविलें, त्याच्यामागें ह्यापूर्वीच सांगितल्याप्रमाणें मुद्रण-प्रकाशन कार्यावरील त्यांची जातिवंत निष्ठा, तादात्म्य, तळमळ, नि दीर्घ तपस्या आहे. ह्या गुणांची कांस धरल्याशिवाय तुम्हांला मानानें जगतां येणार नाहीं, हें स्वतःच्या उज्ज्वल उदाहरणानें त्यांनी सर्वांना दाखवून दिलें आहे.

जो काळाचीं पावलें ओळखून वागेल, तोच सध्यांच्या जगांत मानानें जगूं शकेल. इतर अनेक क्षेत्रांप्रमाणें मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांतही प्रत्यहीं नवनव्या नि अनुकरणीय सुधारणा घडून येत आहेत. पाश्चात्य राष्ट्रांनीं ह्या क्षेत्रांत आश्चर्यकारक आघाडी मारली आहे. ग्रंथ-प्रकाशन हें एक शास्त्र, एक कला ह्या दृष्टीनें तिच्याकडे पाहिलें जातें. तें नावीन्य, ती आधुनिकता नि तें सौंदर्य आपल्याकडे नको का यायला ?

मुद्रण-प्रकाशन ह्या कला आज भरधांव पुढें पुढें चालल्या आहेत. आणि आम्ही ? आम्ही आत्मसंतुष्ट ! जेथें पूर्वी होतों तेथें रहाण्यांतच समाधान मानणारे ! मग आमची प्रगति व्हावी कशी आणि आधुनिकतेचा नि सौंदर्यातिशयाचा ध्यास घेतलेल्या चौकस नि चोखंदळ गिऱ्हाइकांच्या उड्या आमच्यावर पडाव्या कशा ?

विष्णुपंतांनीं हें बरोबर हेरलें आणि आपल्या वांट्यास यदृच्छेनें आलेला व्यवसाय सौंदर्यसंपन्न बनविण्यासाठीं त्यांनीं त्यांत आपला सारा जीव ओतला. मोडकळीस येऊं पहाणारा मुद्रणालयाचा गाडा मनस्वी उद्योगाच्या बळावर सांवरला, एवढेंच नव्हे तर ज्याला सुंदर नि मनपसंत छपाई हवी असेल, त्यानें मौज मुद्रणालयाकडे येऊनच सुटका, असा पायंडा त्यांनीं पाडिला.

याला म्हणतात अजोड कर्तृत्व. जें ग्राहकांना आपल्याकडे खेंचून आणतें, जें नको नको म्हणतांही गळीं पडतें व जें मागाल तें द्यायला तयार होतें! म्हणतात ना कीं, योग्य काम नि हुकमी दाम!

ज्याला मुद्रण आणि ग्रंथ-प्रकाशन हीं कामें यशस्वी रीतीनें चालवायचीं असतील, त्यानें डोळ्यांत तेल घालून सतत जपावें लागतें. हें एकट्या दुकट्याचें काम नाहीं. त्यासाठीं तज्ज्ञ, कष्टाळू नि निष्ठावान कार्यकर्त्यांचा संच जवळ करावा लागत असतो.

शेठ जावजी दादाजी ह्यांनीं मुद्रण-व्यवसायांत असामान्य यश मिळविलें व तें शंभर वर्षे लोटलीं तरी आजही टिकून राहिलें आहे. तें कशाच्या बळावर! ते स्वतः महाउद्योगी नि त्या क्षेत्रांत टक्केटोणपे खात स्वयंप्रेरणेनें पुढें आलेले होतेच; परंतु त्याशिवाय राणूजी आरू ह्यांच्यासारखे त्या क्षेत्रांतील पट्टीचे व निष्ठासंपन्न कलावंत त्यांना लाभले होते. त्यांनीं मुद्रण-व्यवसायाचा खंबीर पाया रचिला. भाग्य उगाच नाहीं उदयास येत. त्यासाठीं बहुतांचीं अंतरें जोडावीं लागत असतात.

कोणाची कुणाशीं तुलना करण्याच्या भरीस शहाण्या माणसानें सहसा पडूं नये, हें खरें असलें, तरी येथें सहज आमच्या दृष्टीसमोर असलेलें उदाहरण देण्याचा मोह आवरणें लेखणीला कठीण झालें आहे! विष्णुपंतांना, नाना प्रकारच्या मुद्रिका पाडण्यांत तरबेज नि त्या क्षेत्रांत नवनवीन प्रयोग करून पहाण्याची ज्यांना हौस आहे, असे निष्ठावंत बंधु जयरामपंत हे लाभले आहेत. मौज टाईप फाऊंड्री जितकी अद्ययावत् नि सुसंपन्न करतां येईल, तेवढी करण्यासाठीं झटावयाचें, ह्यासाठीं त्यांची अहर्निश धडपड चाललेली असते.

आपल्याकडे जीं जीं लहानमोठीं कामें छपाईसाठीं येतील तीं टाईपाच्या, छपाईच्या नि सजावटीच्या दृष्टीनें सुंदर झालीं पाहिजेत, ह्याबाबतींत जसें विष्णुपंतांचें लक्ष असतें, तसेंच त्यांच्या इतर बंधूंचें व कामगार-वर्गाचेंही लक्ष असतें.

माणूस संवयीचा गुलाम असतो. चांगल्या संवयी लावल्या, सर्वांना सौंदर्य-दृष्टीचा लाभ करून दिला, तर कोणींही वाखाणणी करावी, असें

छपाई–काम कां नाहीं बाहेर पडणार ? विष्णुपंतांनीं आपल्या कारखान्यांतील कामगार-वर्गाला अशा प्रकारची शिस्त लाविली आहे. त्या शिस्तीचीं गोड फळें आज सर्वांना चाखायला मिळत आहेत.

मुद्रण आणि ग्रंथ–प्रकाशन हे व्यवसाय एकमेकांस पूरक असले तरी ते एकमेकांस पोषक आहेत असें निश्चितपणें म्हणतां येणार नाहीं. त्याऐवजीं ते एकमेकांस मारक आहेत, असें कदाचित् म्हणतां येईल. ह्याबाबतींत अनेक प्रकाशकांस विचारलेल्या प्रश्नांवरून आमच्यापाशीं जो पुरावा आजवर जमा झालेला आहे, त्यावरून असें दिसून येतें कीं, ज्यांनीं ग्रंथप्रकाशनाचा पेशा पतकरला आहे, त्यांना मुद्रण-व्यवसायाची जबाबदारी पतकरणें धोक्याचें च दगदगीचें वाटतें. एकाच दृष्टीनें नव्हे तर अनेक दृष्टींनीं.

असें असतांही पूर्वीच्या जमान्यांत गणपत कृष्णाजी, शेठ जावजी दादाजी नि मंगेशराव कुळकर्णी ह्यांच्यासारखे दोन्ही व्यवसाय यशस्वीपणें नि सुकरतेनें हाताळणारे नामवंत व कर्तबगार मुद्रक-प्रकाशक महाराष्ट्रांत नांव मिळवून गेले आहेत कीं नाहीं ? त्यांपैकीं मंगेशराव कुळकर्णी हे त्या व्यवसायांतून निवृत्त झाले असले, तरी सुदैवानें हयात आहेत. त्याच्या मुद्रण-प्रकाशन व्यवसायाचा परिचय ह्या ग्रंथांत करून देण्यांत आलेला आहेच.

एकंदरींत पहातां दुहेरी कर्तबगारी यशस्वी रीतीनें गाजविणारीं अशीं माणसें फार विरळा. सध्यांच्या बदललेल्या काळांत तरी त्या जातीचीं माणसें धुंडाळून सांपडणें फार कठीण आहे. ' मौज-मुद्रण नि प्रकाशन-गृह ' ही संस्था त्या दुर्मिळ जातींत मोडणारी आहे. खरोखर, आजच्या काळांत तरी मुद्रण नि प्रकाशन ह्या दोन्ही जबाबदाऱ्या यशस्वीपणें सांभाळून मधून मधून ग्राहकांस नि वाचकांस नावीन्याच्या नि सजावटीच्या दृष्टीनें आश्चर्याचे धक्के देत रहाणें, ही अनन्यसाधारण गोष्ट आहे. ती साधना मौज-मुद्रणालयानें सध्यांच्या काळांत पार पाडून दाखविली आहे.

मौज मुद्रणालयाचा कारभार आपल्या हातीं घेतल्यानंतर विष्णुपंतांनीं सुमारें दहा वर्षें त्याची घडी नीट बसवून तें नांवारूपास आणण्यासाठीं रात्रंदिवस आपल्या जिवाचें कसें रान केलें, ह्याचा परिचय ह्यापूर्वी करून देण्यांत

आलेला आहेच. घडी नीट बसून स्थिरस्थावरपणा आला असें वाटूं लागल्यानंतर ते ग्रंथ-प्रकाशन कार्याकडे १९५० सालापासून वळले. गेल्या एकंदर सतरा वर्षांच्या काळांत ह्या प्रकाशन-संस्थेनें सुमारें दीडशें ग्रंथ प्रसिद्ध केले.

('आदर्श भारत सेवक' ले. प्रा. न. र. फाटक, हा नुकताच बाहेर पडलेला १४७ वा ग्रंथ व मध्यां २।३ ग्रंथांची छपाई चालू आहे.)

ह्या दीडशें ग्रंथांच्या स्वरूपाकडे वर वर नजर टाकिली असतां असें आढळून येईल कीं, त्यांत साहित्य, संगीत, चित्रकला, नाट्यकला नि मनोरंजन ह्या मराठी वाङ्मयांतील सर्व शाखांचा समावेश झालेला आहे. जीवनाला शोभा आणणाऱ्या नि सुसंस्कृत बनविणाऱ्या ज्या विविध कला आहेत, त्यांचा त्या त्या विषयांत प्रावीण्य मिळविलेल्यांकडून योग्य तो परामर्श अनेक ग्रंथांच्यारूपानें घेवविण्यांत आला आहे. जास्तींत जास्त काय खपेल, ह्यापेक्षां वाचकांच्या ज्ञानांत मोलाची भर घालून त्याला बहुश्रुत कसें बनवितां येईल, ह्याकडे अधिक लक्ष पुरविण्यांत आलें आहे. मौज प्रकाशनाचें हें एक फार महत्त्वाचें वैशिष्ट्य आहे.

वाचकांच्या विचारांस योग्य वळण लावून त्यांना विचार करायला लावणाऱ्या समीक्षात्मक वाङ्मयाची आज फार जरूरी आहे हें ओळखून मौज प्रकाशन-गृहानें सौंदर्य आणि साहित्य ( मर्ढेकर ), ॲरिस्टॉटलचें काव्यशास्त्र ( गो. वि. करंदीकर ), घरंदाज गायकी ( देशपांडे ), भाषा आणि संस्कृति ( ना. गो. कालेलकर ), अस्ताई व माझें संगीत ( भोळे ), मराठी छंदोरचनेचा विकास ( ना. ग. जोशी ), अमेरिकन चित्रकला ( माधव आचवल ), श्री ज्ञानेश्वर, श्री एकनाथ ( न. र. फाटक ), ह्यासारखे समीक्षात्मक ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. त्याचप्रमाणें गारंबीचा बापू, यशोदा, हृद्पार ( श्री. ना. पेंडसे ), शितू, पडघवली ( गो. नि. दांडेकर ), बनगरवाडी, वावटळ ( व्यंकटेश माडगूळकर ), ह्यांसारख्या वाचनीय कादंबऱ्याही प्रसिद्ध केल्या आहेत. न खपणारीं परंतु वाङ्मयीनदृष्ट्या उच्च दर्जाचीं नाटकें, डॉ. केतकर, बालकवि, ह्यांचीं चरित्रें, दिवस असे होते ( विठ्ठलराव घाटे ), माझ्या आठवणी ( पां. चि. पाटील ) ह्यांसारखीं आत्मचरित्रें, त्याचप्रमाणें काव्यग्रंथ वगैरे विविध स्वरूपाचें वाङ्मय प्रसिद्ध केलें आहे. ही

निवड करण्यांत ह्यापूर्वीच सांगितल्याप्रमाणें जास्तींत जास्त चोखंदळपणा चालगण्यांत आलेला आहे. विष्णुपंतांचे बंधु श्री. पु. भागवत हे ही महत्त्वाची बाजू आपल्या साहित्यिक मित्रांच्या सहकारानें आजकाल समर्थपणें सांभाळीत आहेत.

जातां जातां मौज प्रकाशनापैकीं सध्यां चालू असलेल्या 'सत्यकथा' ह्या श्रेष्ठ दर्जाच्या मासिकाचा उल्लेख करणें जरूर आहे. सध्यांच्या काळांत नवसाहित्यिकांचें हें एक आवडतें, आदर्श नि उच्च अभिरुचीचें पोषण करणारें नियतकालिक आहे. तें चालविण्यांत तोटा सोसावा लागत असला तरी विशिष्ट नि उच्च ध्येयानें प्रेरित होऊन मौज-प्रकाशन संस्थेनें तें चालू ठेविलें आहे. त्याचप्रमाणें मौज-प्रकाशन संस्थेनें गेल्या १५।२० वर्षांच्या काळांत अनेक नवे, होतकरू नि जातिवंत लेखक, कवि नि चित्रकार त्यांना शक्य तें उत्तेजन देऊन उजेडांत आणिले आहेत.

मुद्रण-प्रकाशन क्षेत्रांत मौज मुद्रण-प्रकाशन संस्थेनें आपल्या अजोड कर्तृत्वाच्या बळावर आज कोणींही हेवा करावा असें माननीय स्थान मिळविलें आहे. याला कारण प्रमुख चालक विष्णुपंत भागवत ह्यांचें कर्तृत्व असलें, तरी त्यांच्या सभोंवार वावरणारे नि निरनिराळीं अंगें-उपांगें सांभाळणारे त्यांचे निष्ठावान बंधु व इतर कार्यकर्ते ह्यांनाही आहेच; परंतु कांहीं झालें तरी विष्णुपंत ही त्यांच्यांत वत्सलतेनें वावरणारी एक महान् प्रेरक शक्ति आहे. ती केवळ मौज कुटुंबियांनाच नव्हे, तर त्याच व्यवसायांत इतरत्र वावरणाऱ्या असंख्य कुटुंबियांना प्रेरणा देत आहे. तशीच ती दीर्घकाळ देत राहो नि ह्यापुढील काळांत महाराष्ट्रीय मुद्रणप्रकाशन-मंदिरांना कोणींही हेवा करावा नि मानाचा मुजरा द्यावा, असें उन्नत स्वरूप प्राप्त होवो, हीच शारदेच्या चरणीं प्रार्थना.

# शेठ जावजी दादाजी ह्यांचें काव्यमय चरित्र.

शेठ जावजी दादाजी हे इहलोक सोडून गेल्यानंतर तत्कालीन, अनेक कवींना काव्यस्फूर्ति झाली व त्यांनी आपापला दुःखावेग काव्यरूपानें प्रकट केला. त्यापैकीं पुढील तीन काव्यें ह्या ग्रंथांत परिशिष्टरूपानें प्रसिद्ध करण्यात येत आहेत.

शार्दूलविक्रीडित

राजा रंक असो, असो धनपती हो वृद्ध कीं दांडगा
साधू भोंदु असो असो कुशलही हो शांत वा भांडगा ॥
भेदाभेद न पाहशी कधिच तूं हा उंच ना हा खुजा
रे रे फार कठीण दुःसह जगीं मृत्यो तडाका तुझा ॥ १ ॥
हा आहे कविवर्य मूढजन हा हा तों प्रजापालक
वालेचा पति एकलाच सुत हा हें नेणतें बालक ॥
हा कर्ता धनसंपदा मिळविता दारामुलांचा धनी
नाहीं येत असा विचार तुझिया मूढा कसा रे मनीं ॥ २ ॥
किंवा बुद्धि नसे तुला पदरचे मंत्रीही सारे खुळे
चालेना तव राज्यसूत्र बरवें त्यांच्या प्रभावामुळें ॥
नेलेले नररत्नसंघ अपुरे रे काय झाले वरी
ह्यासाठीं नरमौक्तिकें हुडकुनी नेतोसि चोरापरी ॥ ३ ॥
नाहीं लेश दया तुला तळमळे प्राणी जरी घावरा
रे रे फार कठोर मानस तुझें पाषाण काळा वरा ॥
नाहीं काळ न वेळ योग तुजला घेवोनि जाशी क्षणीं
आल्या दूत तुझे जिवास न मिळे रक्षावयाला धणी ॥ ४ ॥
आजी जो जगतीं सुखांत मिरवे तो मित्र नाहीं उद्यां
जेथें हर्ष वसे तिथें निपजती दुःखोदकाच्या नद्या ॥
जावें जों शुभ ऐकतांच करण्या स्तुत्यंवरें अर्पण
मृत्यो तेथ करावयासि पडतें शोकाश्रुनें तर्पण ॥ ५ ॥

# शेठ जावजी दादाजी ह्यांचें काव्यमय चरित्र

शेठ जावजी दादाजी हे इहलोक सोडून गेल्यानंतर तत्कालीन, अनेक कवींना काव्यस्फूर्ति झाली व त्यानीं आपापला दुःखावेग काव्यरूपानें प्रकट केला. त्यापैकीं पुढील तीन काव्यें ह्या ग्रंथास परिशिष्टरूपानें प्रसिद्ध करण्यात येत आहेत.

शार्दूलविक्रीडित

राजा रंक असो, असो धनपती हो वृद्ध कीं दांडगा
साधू भोंदु असो असो कुशलही हो शांत या भांडगा ॥
भेदाभेद न पाहशी कधिंच तूं हा उंच ना हा खुजा
रे रे फार कठीण दुःसह जगीं मृत्यो तडाका तुझा ॥ १ ॥
हा आहे कविवर्य मूढजन हा हा तों प्रजापालक
बालेचा पति एकलाच सुत हा हें नेणतें बालक ॥
हा कर्ता धनसंपदा मिळविता दारामुलांचा धनी
नाहीं येत असा विचार तुझिया मूढा कसा रे मनीं ॥ २ ॥
किंवा बुद्धि नसे तुला पदरचे मंत्रीही सारे खुळे
चालेना तव राज्यसूत्र बरवें त्यांच्या प्रभावामुळें ॥
नेलेले नररत्नसंघ अपुरे रे काय झाले परी
ह्यासाठीं नरमौक्तिकें हुडकुनी नेतोसि चोरापरी ॥ ३ ॥
नाहीं लेश दया तुला तळमळे प्राणी जरी घाबरा
रे रे फार कठोर मानस तुझें पाषाण काळा बरा ॥
नाहीं काळ न वेळ योग तुजला घेवोनि जाशी क्षणीं
आल्या दूत तुझे जिवास न मिळे रक्षावयाला धणी ॥ ४ ॥
आजी जो जगतीं सुखांत मिरवे तो मित्र नाहीं उद्यां
जेथें हर्ष वसे तिथें निपजती दुःखोदकाच्या नद्या ॥
जावें जों शुभ ऐकतांच करण्या स्तुत्यंवरें अर्पण
मृत्यो तेथ करावयासि पडतें शोकाश्रुनें तर्पण ॥ ५ ॥

आर्या

निर्णयसागर पालक होते नृपमान्य जावजी दादा ॥
साधा पुरुष परंतु न पुरे हा देश कीर्तिच्या नादा ॥ १ ॥
सत्वस्थ साधुवृत्ति सत्यव्रत नित्य मानसांत दया ॥
हृदयास पूज्य गमती स्वोद्योगानेंच पावले उदया ॥ २ ॥
निजकन्येचीं विधिनें वस्त्राभरणें वधूनि बहु जीर्ण ॥
वाटे समुद्र केलें साक्षेपें जावजींस अवतीर्ण ॥ ३ ॥
मणिखचित उचित शुचितनु सजविति ते फार फार भारतिला ॥
भारतिलाहि उणी कीं उपकृतिचा खचित होय भार तिला ॥ ४ ॥
पतिंना रतिसुख देते प्रतिमासीं नट्टुनि वाग्विलासवती ॥
नवती प्रसन्नवदना लाजति पाहोनियां जिला सवती ॥ ५ ॥
कीं स्वर्गीं स्वकृतीतें पाहुनि कवि सकल ये जरा खाया ॥
चाखाया रसिकांतें प्रार्थिति दे ईश्वरासि राखाया ॥ ६ ॥
कीं बुडतांना केला भारतिनें फार दीन रव तार ॥
कविता रक्षक झाला निर्णयसागर म्हणूनि अवतार ॥ ७ ॥
किति ती सुरेख मुद्रा स्पष्टाक्षर घळण नीट शुद्ध रिती ॥
धरिती नव्यासि हातीं नियमानें जीर्ण लेख उद्धरिती ॥ ८ ॥
मुद्रणकला प्रयत्नें पोंचविली खचित फार शिखराला ॥
दिव्याक्षरमुद्रेची शोभा ती जाळिच्या न मखराला ॥ ९ ॥
वैराग्यशास्त्र विरहित पुतळा जो शुद्ध साधुरीतीचा ॥
नीतीचा सागर तो भोक्ता सत्संगमाधुरी तीचा ॥ १० ॥
झाला न शिकुन बी. ए. नाहीं कीं वेदशास्त्रही पढला ॥
लढला प्रयत्नशस्त्रें सन्मार्गें श्रेष्ठतेप्रती चढला ॥ ११ ॥
उद्योग सत्य विनयें मानवला फार फार लोकांला ॥
तो काला वश होतां पात्र नव्हे काय विश्व शोकाला ॥ १२ ॥
" जस्टीसाब्धी पीस " हि पद दे राज्ञीहि थोर मानाचें ॥
मा नाचे दासीशी स्थळ न मिळे काय त्या विमानाचें ॥ १३ ॥
होते अनेक सनदी हाताखालीं परंतु नच ताप ॥
बापहि कमी गमे त्यां सुखें त्या ठेविली अशी छाप ॥ १४ ॥
बहु गोड शब्द बोले चुकतांही फार तो न रागेजे ॥
मागे जें जें कोणी तें तें दे योग्यतेस लागे जें ॥ १५ ॥

विद्वद्वर्ग निवडुनि घे मोडक ओक युग्म वर परख ॥
शरभ महा विद्येचे ज्यांची बहुतांस वाटते जरब ॥ १६ ॥
आहे गुणश्लेचा सद्गुण लोकांत पंडितंमन्य ॥
धन्य असो पुरुषा त्या ऐसा होईल केधवां अन्य ॥ १७ ॥
साधुनि प्रपंच केला परमार्थहि फार थोर चतुराई ॥
सुतुरा ईशपदाचा व्हावें हो काय त्यास उतराई ॥ १८ ॥
वागूं जनांत कैसा दारजनांचें भरूं कसें पोट ॥
पुसतां कोणी मजला दाविन मी जावजींकडे बोट ॥ १९ ॥
सत्य महापुरुषानें सत्कृतिनें दाविलें जनां वळण ॥
पोकळ अन्य जनांसम वक्तृत्वाचें न घातलें दळण ॥ २० ॥
नूतन पदवी दिधली राह्मीनें सुगुण सर्व तोलून ॥
आम्हींहि मान द्यावा मित्रत्वें दोन शब्द बोलून ॥ २१ ॥
हेतू धरूनि ऐसा प्रेमानें कलम घेतलें हातीं ॥
केली सर्व निराशा काळानें काय हो अहाहा ! ! ती ॥ २२ ॥
कविनें बोलायाला केला आरंभ हर्षसिंधूनें ॥
हर हर शेवट झाला त्याचा कीं आज अश्रुबिंदूनें ॥ २३ ॥
पदवी योग्य म्हणूनि झाला बहु घोष वृत्तपत्रांचा ॥
गौरव करावयाला मेळा जमला असंख्य मित्रांचा ॥ २४ ॥
तों विषवार्ता आली कीं धरिलें जावजींस तापानें ॥
सर्वांच्या हृदयाला वाटे कीं डंशिलेंच सर्पानें ॥ २५ ॥
आले होते सारे सन्मानार्थ धरूनियां प्रेम ॥
झाला विरस मनाचा न टळे देवादिकांसही नेम ॥ २६ ॥
सत्कारुनि आणावे जावजिंला हा धरोनियां हेतू ॥
यमही धांवत आला सूर्याला पहातां जसा केतू ॥ २७ ॥
डॉक्टर वैद्य मिळाले म्हणती शेटींस जाहलें उदर ॥
औषधउपाय थकले काळाची केवढी पहा कदर ॥ २८ ॥
नजिक महालक्ष्मीही जाऊं राहूं धरूनियां चरण ॥
शरणजनां रक्षक ती अथवा तेथेंचि यो सुखें मरण ॥ २९ ॥
ऐसा विचार करुनी गेले तेथेंचि जावजी शेट ॥
खेद बहु लोकांची झाली घ्यायास अंतिची भेट ॥ ३० ॥

भरला गळा कफानें हां हां चढणीस लागलें पोट ॥
ओठ न हाले श्वासें तरिहि वसायास दाविती बोट ॥ ३१ ॥
निस्तेज नेत्र झाले वदनाचें तेज सर्व मावळलें ॥
कळलें भविष्य सर्वां दुःखानें हातपायही गळले ॥ ३२ ॥
तरिही कष्टें वदती प्रेमें सकलांसि या वसा नीट ॥
न चळे विपन्न समयीं स्थीरपणें राहिला महाधीट ॥ ३३ ॥
होती शुद्धि मनाला हळु हळु परि शब्द चालला खोल ॥
" लक्ष्मीसन्निध जातों परलोका " हे अखेरचे बोल ॥ ३४ ॥
पाहोनियां दशा ती मित्र तसे इष्ट आप्त हळहळती ॥
तळमळती दुःखानें सांगावी काय आज कळकळती ॥ ३५ ॥
हां हां म्हणतां नेला काळानें हाय ! साधली वेळ ॥
तारा तुटोनि पडला संपविला मृत्युलोकिंचा खेळ ॥ ३६ ॥
किति पुण्यपुरुष तो कीं ठेवियला देह रामनवमीतें ॥
दिवसहि मंगल होता काय वदूं इष्ट आप्तस्व मी ते ॥ ३७ ॥
दुःसह दुःखद वार्ता पाण्यावरि तैलबिंदुशी पसरे ॥
नसरेल दर्शनाला कोण तयाच्या गुणांस हो विसरे ॥ ३८ ॥
प्रातःकालीं लोटे लोकांचा तेथ दर्शनास थवा ॥
वाटे आला सागर प्रेमाचा जावजींकडे अथवा ॥ ३९ ॥
दिसती उदास सारे खिन्नमनें म्लान जाहलीं वदनें ॥
नेत्राश्रुपूर वाहे दुःखानें बांधलीं जणूं सदनें ॥ ४० ॥
शतसंख्य लोक आले शेटविणें शून्य भासलें भवन ॥
रव न निघे तोंडांतुनि कोणाचें कोण करिल शांतवन ॥ ४१ ॥
मग एकदांचि उकळी फुटली केला विलाप लोकांनीं ॥
ढळढळ कितीक रडले करुणारव ऐकवे न तो कानीं ॥ ४२ ॥
सज्जन गेला नेला काळानें मानलें कृपानिधिला ॥
विधिला सादर न्हावें पुढच्या लागा चला उठा विधिला ॥ ४३ ॥
मग आणूनि महात्मा बैसविला नीट आसनावरती ॥
निर्जिव शरीर झालव वरचेवरि हात पाय सावरती ॥ ४४ ॥
सद्वस्त्रें नेसविलीं नित्याची घातली शिरीं पगडी ॥
निर्जिव देह परंतु तितुक्यानें शोभला मराठि गडी ॥ ४५ ॥

टाकुनि टिपें टपापा शिव शिव बोलूनि सर्वेही रडती ॥
इष्टांनीं आप्तांनीं प्रेमाची दीघली पुरी झडती ॥ ४६ ॥
सौजन्य तेज शांती प्रगटे गंभीरता तदा सुमुखीं ॥
वाटे सांगे लोकां "करुनी कर्तव्य मी अखंड सुखी ॥ ४७ ॥
सांडोनि शोक सारा वळवा माझा वरा खरा चित्ता ॥
चित्तांत शांति ठेवा सोडुं नका विनय पाहुनी वित्ता ॥ ४८ ॥
कोणाची दारा हो कोणाचे मित्र कीं स्वजन तोक ॥
शोक कशाकरितां हा आहे कीं मृत्युचाचि हा लोक" ॥ ४९ ॥
होती दशा कनिष्ठा तरि चढला थोर वैभवाला जो ॥
परि सरळ साधुवृत्ति पाहुनि विद्वानही नवा लाजो ॥ ५० ॥
नररत्न एक गेलें म्हणती कालासि लाविती दोष ॥
अठवुनि पुनः पुन्हा त्या नामाचा करिति सर्व जयघोष ॥ ५१ ॥
पुनरपि जनांस दुर्लभ ऐशी ही पुण्यवंत बहु काया ॥
गाया गुणा पहाया यंत्रानें घेतली प्रतिच्छाया ॥ ५२ ॥
हळहळुनी कळवळुनी रडुनी जन सकळ तेधवां दमले ॥
जमले सुमार दशशत भक्तीनें प्रेमसिंधुसे गमले ॥ ५३ ॥
मेळा स्मशानयात्रे करित पुढें थोर चालला भजन ॥
यजन किती सन्मणिचें घेती साधूनि अंत्यलाभ जन ॥ ५४ ॥
चेतवितां अग्नीतें झाली तनुची क्षणांत रांगोळी ॥
गेले सकल घरा मग दीनमुखानें करोनि आंघोळी ॥ ५५ ॥
अवतार जावजींचा यापरि काळें क्षणांत संपविला ॥
कंपविला देश कसा शोकप्रद विषय देउनी कविला ॥ ५६ ॥
कोणाला अमित जगीं असती कोणास पांच चार अरी ॥
परिशोध करुनि कोणी दावा हो जावजींस एक तरी ॥ ५७ ॥
हंसक्षीरन्यायें निवडुनि नेलें यमें महाभागा ॥
जागा हो सत्कर्मीं भरली काढील कोण ती जागा ॥ ५८ ॥
परते पुन्हां न सज्जन केला कोणी किती जरी शोक ॥
लोकभ्रम वद करी याकी हा मृत्युचाचि कीं लोक ॥ ५९ ॥
दुःखोद्गार जलातें हृदयाचें लघु पुरे न साठवण ॥
ह्यास्तव कवित्व पात्रीं भरलें व्हाया जनासि आठवण ॥ ६० ॥

कीं दुःखपूर फुगला जाया बाहेर त्या नसे वाट ॥
भाट वरी पाहुनियां पद्यमिषें फोडिला तया पाट ॥ ६१ ॥
सच्छील त्यांस दोघे मागें आहेत जे चिरंजीव ॥
रंजीव ईश्वरा त्यां राखीं यश देउनी चिरंजीव ॥ ६२ ॥
येथें न योग आला स्वर्गी तरि जावजींस हे गोड ॥
लागोत शब्द माझे दे देवा येवढी मला जोड ॥ ६३ ॥
दूरस्थ कोकिळाचा जावजिंचा स्नेहबंध पळकटसा ॥
चटसाच आश्रयाला झाला अजि दग्ध रेशमी पटसा ॥ ६४ ॥
तत्तनयांचीहि असो ह्या केरळकोकिळावरी माया ॥
गाया निर्णयसागर-तरुची त्याला नको कधीं छाया ॥ ६५ ॥

कविः–महाराष्ट्रभाषा चित्रमयूर कृ. ना. आठले.

केरळकोकिळ पुस्तक ६ अंक ५

## जावजी – निधन – विलाप

शार्दूल-विक्रीडित.

मुद्रा सुंदर देवनागर-लिपी ज्याच्या श्रमें लाभली ।
माहाराष्ट्रिय मुद्रणांत सरणी ज्याच्या बहु गाजली ॥
जीर्ण-ग्रंथ करी प्रकाशित वरी सत्कीर्ति लोकीं वरी ।
गेला तो प्रिय जावजी सकळिकां सोडोनि आम्हां दुरी ॥ १ ॥
ज्याचा पाहुनि वालबोध शिशु ते खाऊ दुरी फेंकिती ।
ज्याच्या पाहुनि काव्यसंग्रह कवी त्याच्या रसीं गुंगती ॥
औत्सुक्यें वसु संस्कृतज्ञ धरिती यत्काव्यमाला करीं ।
गेला मासिक-पुस्तकत्रयपिता सोडोनि आम्हां दुरी ॥ २ ॥

आर्या

भापेला विष्णु जसा । कवितेला मोगरा खुलवि नीट ॥
रविवर्मा चित्रकले । वर्णशलाकांस जावजीशेट ॥ ३ ॥
द्राक्षापाकसमसुलभ । बहु सुंदर रम्य लेख ओक रची ॥
रमणीय मातृकांना । करुनि बहु जावजी धना खरची ॥ ४ ॥
काळानें हा अमुचा । लिपी-सुधारक पहा हरविला हो ॥
यास्तव लेख मराठी । प्रस्तुत बहु फेडितात कीं टाहो ॥ ५ ॥

श्लोक

हे वालबोधा तव तात गेला । लोकांतरा फार अनर्थ झाला ॥
आतां तुझ्या चालवि बाललीला । वा कोण रे तो नकळे अम्हांला ॥६॥
हा । हा । मुला तूं बहु धाकुटा रे । गेला पिता टाकुनि संकटीं रे ॥
बाळा तुझें होइल काय आतां । ही जाळिते फार मनास चिंता ॥ ७
वाढे लेखनकार्य फार म्हणुनी मुद्रालयाचा धनी ।
काळा उत्तम जाणुनी निजपुरा गेलास कां घेऊनी ॥
देतां काम सुरेख छापुनि तुझें हा जावजी येथुनी ।
नेतां या जन शापितील मजला हें नाणिलें कां मनीं ॥ ८ ॥
हाहा रे नष्ट काळा प्रियसख अमुचा जावजी तूं हिरोनी ।
नेशी कां सांग नीचा नच दिसशि अम्हां टाकितों कीं चुरोनी ॥

लोकांचा कार्यकर्ता तव नयनिं सले नेहि त्यातें लयाला ।
घालाया दुष्ट लोकांवरि नच तुजला होतसे धैर्य घाला ॥ ९ ॥
प्राणांतावधिही रडूनि सुजवूं डोळे जरी आपुले ।
गेलेला अमुचा हिरा न परते हें पाहिजे जाणिलें ॥
लागूं यास्तव जावजीसम अम्हीं कृत्यें कराया जनीं ।
होऊं त्यासम शुद्ध उद्यम सुखीं चित्तीं तया चिंतुनी ॥ १० ॥
जैसा तो क्षणही रिता न दवडी कामाविणें आपला ।
जैसा तो बहु नम्रता धरुनियां लोकांमध्यें वागला ॥
दावी थोर दया समस्त अपुल्या जो आश्रितां संतत ।
त्याची उत्तम धाटणी धरुनियां लाभूं जनीं कीं हित ॥ ११ ॥
होतें त्याचें सरल मन तें तन्मुखीं रेखिलेलें ।
दावी खासें हंसत मुख तें चित्रही छापिलेलें ॥
बोले तैसा सतत अमुचा जावजी चालला हो ।
त्याचा कित्ता वळवुनि अम्हीं आदरूं मान लाहो ॥ १२ ॥
त्याची छवी आणि चरित्र आम्हां । करावया लाविति योग्य कामा ॥
ठेवूं तया संतत हृत्पथांत । लाभूं तरी सौख्य अम्ही नितांत ॥ १३ ॥

—इंदुप्रकाश ६।६।९२.

# शेठ जावजी दादाजी चौधरी यांजवर कटाव.

श्लोक

हेरंबा गणनायका तव पदीं साष्टांग माझी नती ।
पावो त्यावरि सज्जनांस विनती लोकांत जे गाजती ॥
गातों सज्जनसत्कृतीस वरव्या ध्यानांत आणा कसें ।
दादाजीसुत जावजी करुनियां कीर्ती जनीं जातसे ॥ १ ॥

आर्या

गणपति कृष्णार्जीच्या मार्गे ज्यानें स्वनाम गाजविलें ॥
करुनि स्वपराक्रम तो आर्यावर्ती स्वतांस साजविलें ॥ १ ॥
त्या जावजी महात्म्या नेई ओढून काळ कैलासीं ॥
नचि आत्मा जावजिचा वाटे नेलेंच शौर्यशैलासी ॥ २ ॥
" सत्पुरुष कथा अद्भुतरसदा सुरभी " म्हणे मयूरेश ॥
वर्णितसें त्यांतिल जो ज्ञात असे कीं मला जरा लेश ॥ ३ ॥

कटाव

परिसा सज्जनचरित ॥ ऐकतां दूर होय दुरित ॥ ध्रु० ॥

सद्गुणवर्णत गोड वाटतें ॥ ऐकुनि हृदयीं प्रेम दाटतें ॥ जनांस दावी सुगम वाटतें ॥ जगीं जयाचें सुयश थाटतें ॥ तद्वत् झालें चरितनायका ॥ सज्जन हो तें वृत्त आयका ॥ न एकिहुन त्या अधिक वायका ॥ कसें न वाटे गोड गायका ॥ भुलला कधिं नच पंचसायका ॥ असा जावजी शेट चौधरी ॥ सुकीर्तिसुरभी दुग्ध चव धरी ॥ विडें गांव तालुके शापुरी ॥ तेथुनि आले या मुंबापुरीं ॥ दादाजी हा पिता सुंदरी ॥ काशीबाई मातेउदरीं ॥ जावजी हे जन्मले वत्सरीं ॥ सतराशें एकसष्ट सुमारीं ॥ बाळबोध अक्षर हें स्वकरीं ॥ आणुनि केली स्वतां तयारी ॥ वयास वर्षे दश झाल्यावरि ॥ अमेरिकेचे गांठी मिशनरि ॥ गेले मुद्रणयंत्रागारीं ॥ खाउनि केवळ सुक्या भाकरी ॥ धरिली त्यांनीं तेथें चाकरी ॥ कधीं स्वकामीं आळस ना करि ॥ मग ती लक्ष्मी कशी न त्या घरि ॥ वृत्ति न होऊं दिली बावरी ॥ दयार्द्र दृष्टी ती गरिबांवरि ॥ दोनपासुनी तीस रुपये ॥ त्याच्या कामीं खरें रूप ये ॥ स्वतंत्रतेचा मनीं हुरुप ये ॥ टाइप

स्वतांच मी हे तरि करूं ॥ अशी सुइच्छा हूँ जणुं तारूं ॥ पराक्रमें लागले हकारूं ॥ मिळे तयाला सुकर्णधारू ॥ नामें राणू रावजी आरू ॥ रामचंद्र अमृत ते मोरे ॥ तसेच आले त्या सामोरे ॥ सन अठराशें चौसष्टोत्तर ॥ साल असे तें बहुत सुखकर ॥ सरसाची त्या सालीं निजकर ॥ मुद्रणयंत्रकलेचें आगर ॥ नांव ठेवि त्या निर्णयसागर ॥ सुधारसें जणुं भरली घागर ॥ किती दक्षिणी ब्राह्मण नागर ॥ विसरुनि निद्रा ठेवित जागर ॥ उद्योगाचा मार्ग काढिला ॥ दिवसें दिस तो फार वाढला ॥ जणुं कीं विजयस्तंभ गाडला ॥ कधि न जावजी त्यांत आडला ॥ विद्वानांतें निरोप धाडिला ॥ यावें तुम्ही या मदतीला ॥ ऐकुनि ऐशा त्यांच्या बोला ॥ बालबोध हा पुढें सरकला ॥ तशीच संस्कृत सुकाव्यमाला ॥ म्हणते जागा द्यावी माला ॥ परव झटति हे त्या कामाला ॥ काव्यसंग्रहें करुन काला ॥ वृत्तचि केलें त्या रसिकांला ॥ ऐसा भरला सारा रंग ॥ अनेकविध त्या ठाउक रंग ॥ चित्रकलापटु तो श्रीरंग ॥ सांभाळी चित्रांचें अंग ॥ चाले ऐसें कृत्य अभंग ॥ त्यामधिं झाला किंचित भंग ॥ काळानें हें आणिलें व्यंग ॥ निधन पावला पुत्र विठोबा ॥ होता त्यांचा तो पाठिंबा ॥ करुनि दुःखें "बाबा! बाबा!" ॥ तशीच दुःखें विठ्ठल अंबा ॥ म्हणत कोपली कशि जगदंबा ॥ जावजी वदती "शिव शिव सांबा"! ॥ ह्या दुःखाचा मोठा धक्का ॥ बसला त्यांच्या हृदयीं धक्का ॥ तेव्हांपासुनि रंगचि फिक्का ॥ होउनि मिळविति पैसा टका ॥ परंतु शरिर नसे अबांका ॥ दुःखि तशा भागिर्थीबाई ॥ म्हणति विठोबा टाकुनि जाई ॥ करूं कायगे अंबाबाई! ॥ अशाच दुःखें शरीर खचलें ॥ तेथें विद्वद् शब्द सुरुचले ॥ चिंताग्नीनें मन हें पिचलें ॥ शेवटिं त्यांना घेऊनि गेलें! ॥ मान्य जाहला जावजी श्रेष्ठां ॥ नव्हती त्यामधिं लब्धप्रतिष्ठा ॥ मान देत त्या लोकीं शिष्टा ॥ आश्रय पदरीं देइ कनिष्ठा ॥ यांचे स्नेही मोठे मोठे ॥ पंडित दुर्गाप्रसाद कोठें ॥ गेले त्यजू नह्या भूलोका ॥ मोडकांनि त्या दिधलें शोका ॥ आणिक स्नेही ते अवलोका ॥ डाक्टर कुंटे सुमान्य लोका ॥ विद्वन्मणि त्या मानिति लोक ॥ बापट राव विनायक श्रोक ॥ गुंजीकरादि मित्र अनेक ॥ यांस प्रार्थना आहे एक ॥ सांभाळा तुम्ही जावजीतोक ॥ दूर करा हा त्यांचा शोक ॥ ठेवा बापासमान झोंक ॥ करा सुव्यवहारिं ते चोख ॥ शके अठराशें चवदा सालीं ॥ रामजन्मतिथि नवमी आली ॥ जावजींस ती घेउनि गेली ॥

दुःखी झाली मित्रमंडळी ॥ पसरे वार्ता आर्यमंडळीं ॥ म्हणती मुद्रणकला बुडाली ॥ परी तत्सुतें अवरून धरिली ॥ वापाची सच्छिक्षा वरिली ॥ चार शतें मंडळी अचरिली ॥ अशीच राहो स्थिति सांवरली ॥ जावजिनीं जी कीर्ति वरिली ॥ तीच चालवा रीती ठरली ॥ हीच तयांची स्मारक छत्री ॥ आज रविदिन नवमी रात्रीं ॥ मुंवापुरिचे गुणिजन शास्त्री ॥ यांहीं अवलोकावा नेत्रीं ॥ अपूर्व देखावा ह्या क्षेत्रीं ॥ करितां श्रीहरिकीर्तन सारा ॥ यामधिं थोडा सुवेळ सारा ॥ विसरा क्षणभरि सर्व पसारा ॥ साल शके अठराशें पंधरा ॥ हलवा श्रीहरिनामें कंधरा ॥ उत्सव मुंवापुरी यंदरा ॥ तुकारामजी यांनीं केला ॥ पांडुरंग त्या साह्य जाहला ॥ पाहुनि गुणिजनमेळा धाला ॥ सुकीर्ति होवो तुमची अचला ॥ संपत् संतति हो वळवंत ॥ खंडुजीचा सुत वळवंत ॥ मित्राचरि हा कटाच करित ॥ ईश्वरचरणीं मस्तक धरित ॥ विद्वानांचे सुपाद चुरित ॥ तैसा तुष्ट पाहुनि सुरित ॥ ऐकतां दूर होय दुरित ॥ परिसा सज्जनजनचरित ॥ १ ॥

—वळवंत खंडूजी पारख.

## संदर्भ-ग्रंथ, वृत्तपत्रें, मासिकें वगैरे

### ( साभार ऋणनिर्देश )

१ शेठ जावजी दादाजी —- छोटें चरित्र—- ले. वि. कों. ओक
२ जावजी-कीर्ति-प्रकाश. जावजी दादाजी ह्यांच्या निधनोत्तर निरनिराळ्या नियतकालिकांत नि वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालेल्या लहान मोठ्या लेखांचा संग्रह.
३ शेठ तुकाराम जावजी }
४ शेठ पांडुरंग जावजी } छोटीं चरित्रें
५ भारतीय ज्योतिष-शास्त्राचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास, ले. शं. बा. दीक्षित
६ मुंबई-वर्णन ले. गो. ना. माडगांवकर
७ सांप्रतच्या लेखकांचें कर्तव्य ले. वि. कों ओक
८ पुणें शहराचें वर्णन ले. ना. वि. जोशी
९ विष्णुशास्त्री चिपळूणकर चरित्र ले. ल. कृ. चिपळूणकर. दुसरी आवृत्ति
१० वामन पंडितकृत कवितासंग्रह भाग २ रा
११ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें ले. वि. का. राजवाडे भाग १ ला
१२ शेजवलकरांचे लेख, पुस्तक दुसरें
१३ रा. सा. वि. ना. मंडलिक यांचें चरित्र ले. ग. रा. हवालदार, भाग १ ला व २ रा
१४ रा. ब. दादोबा पांडुरंग यांचें चरित्र ले. अ. का. प्रियोळकर
१५ ना. नाना शंकरशेठ यांचें चरित्र ले. पु. बा. कुळकर्णी
१६ लो. बा. गं. टिळक यांचें चरित्र ले. कृ. आ. गुरुजी
१७ कऱ्हेचें पाणी. खंड दुसरा ले. आचार्य प्र. के. अत्रे

याशिवाय दिग्दर्शन, बुद्धिप्रकाश, प्रभाकर, विविधज्ञानविस्तार, निबंध-माला, बालबोध, काव्यमाला, काव्यसंग्रह, इतिहाससंग्रह, मुद्रण-प्रकाश, मराठी संशोधन-पत्रिका, इंदुप्रकाश, नवयुग, दीनबंधु वगैरे नियतकालिकें मासिकें व वृत्तपत्रें ह्यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें जरूर आहे.


1. The Invention of Printing in China and its spread Westward by Thomas Francis Cartes.
2. The Printing Press in India by A. K. Priolkar.
3. Typography of Devanagari by Bapurao Naik.
4. The Bombay Secretariat Records 1821, 1824 and upwards.

## शेठ जावजी दादाजी चौधरी

### प्रमुख घटनांचा कालपट

| | |
|---|---|
| जन्म— | १८३९ |
| जेमतेम अक्षर—ओळख होत असता शाळा सोडली | १८४९ |
| मासिक दोन रु. पगारावर टाईप घासण्याची नोकरी | १८४९ |
| टाईप पाडण्याच्या कलेत प्रावीण्य व इंदु—प्रकाशमध्यें नोकरी | १८६२ |
| विवाह | १८६२ |
| ओरिएंटल प्रेसमध्यें | १८६३ |
| टाईप—फाऊंड्रीची स्थापना | १८६४ |
| चिरंजीव तुकाराम ह्याचा जन्म | १८६४ |
| दुसरे चिरंजीव विठोबा ह्याचा जन्म | १८६७ |
| पंचाग छापण्यासाठीं निर्णयसागर-मुद्रणालयाची स्थापना | १८६९ |
| गरुड—पुराणानें ग्रंथ प्रकाशन व्यवसायाचा प्रारंभ | १८७० |
| धर्मसिंधु व इतर धार्मिक ग्रंथ—प्रकाशनाची सुरुवात | १८७४ |
| तिसरे चिरंजीव पांडुरंग ह्यांचा जन्म | १८७४ |
| बालबोध मासिकाचा जन्म | १८८१ |
| ‘ काव्य — माला ’ जन्म | १८८६ |

| | |
|---|---|
| श्रीमंत सयाजीराव गायकवाड ह्यांजकडून 'बालबोध' मासिकास पुरस्कार | १८८८ |
| 'काव्य – संग्रह' मासिकाचा आरंभ | १८९० |
| पुत्र विठोबा ह्यांचें निधन | १८९० |
| जावजीशेठ ह्यांस सरकारकडून जे. पी. ची पदवी | १८९२ |
| शेठ जावजी दादाजी -- निधन | १८९२ |
| शेठ तुकाराम जावजी कारकीर्द सुरू | १८९२ |
| 'इतिहास – संग्रह' मासिकाचा जन्म | १९०८ |
| 'काव्य – संग्रह' बंद पडला | १९०९ |
| 'बालबोध' मासिकाचा अस्त | १९१४ |
| 'काव्य -- माला' बंद | १९१६ |
| तुकारामशेठ -- निधन | १९१८ |
| पांडुरंगशेठजींची कारकीर्द सुरू | १९१८ |
| पांडुरंगशेठ -- निधन | १९४० |
| श्रीमती जिजाबाई व श्रीमती सत्यभामाबाई ह्यांची कारकीर्द सुरू | १९४० |
| श्रीमती जिजाबाईचें निधन | १९४४ |
| श्रीमती सत्यभामाबाई -- निधन | १९५१ |
| श्रीमती लक्ष्मीबाई नारायण चौधरी ह्यांची कारकीर्द | १९५१ पासून |